World
Religion
Supplement

# धर्मचक्र

THE WHEEL OF
THE MORAL LAW

वर्ष १० वें ] १५ मार्च १९५८ [ अंक ८ वा



## तर मी कोण ?

पूजितों मी प्रस्तरा जो शिल्पकारें त्यागिला
सूर्य नीतीमत्वतेचा देव माझा मानिला ॥ १ ॥

अग्नि करि जो भस्म त्यातें सर्व भावें वंदितों
अहिंसेचा भक्त असुनी मद्य मांसा सेवितों ॥ २ ॥

एक पैगंबरहि माझ्या अंतरीं संचारला
एक आज्ञा पाळिली म्यां-क्रूस स्कंधीं बांधिला ॥ ३ ॥

—वसंत मेघश्याम जाधव

# संपादकीय

मागील महिन्यांतील शेवटच्या आठवड्यांत भारताचे शिक्षण मन्त्री, स्वातंत्र्याच्या लढ्यांतील निधड्या छातीचा सेनानी व राष्ट्रीय वृत्तीची राजकीय अग्रणी मौलाना अबुलकलम आझाद यांच्या निधनानें अखिल भारतीयाचीं मनें दुःखानें भारावून गेलीं होतीं. त्यांचें निधन आकस्मिकच झालें. अवघ्या तीन दिवसांच्या अवधींत त्यांना निर्घृण काळानें आपणाकडे खेंचून घेतलें. राष्ट्रपति व पंत प्रधान हे तर त्यांच्या बिछान्याजवळ येऊन जाऊन असत व जवळजवळ त्यांनीं आपलें सारे व्यवसाय एका बाजूला सारले होते. त्यांच्या सारखा गाढा विद्वान् व मुरब्बी मुत्सद्दी झाला नव्हता. पंडीत नेहरूना तर अतोनात दुःख झालें. तें स्वभावातःच भावनाप्रधान आहेत व त्यांचें अन्तःकरण लहान मुलासारखें सरळ आहे. त्यामुळें त्यांना आपलें दुःख लपवितां येत नाहीं. म्हणून राजधानींतील सभेंत नेत्यांनीं त्यांना जी श्रद्धाञ्जलि दिली त्यांत त्यांच्या पुष्कळशा अभिजात व उत्तम गुणांचा उच्चार करण्यांत आला. त्यांची वाणी मधुर होती. लेखनशैली तेजस्वी व प्रभावशाली होती व राष्ट्राच्या स्वातंत्र्यासाठीं व ऐक्यासाठीं त्यांनीं आपलें सर्व जीवन पणास लावलें होतें. त्यांचें गेल्या ४५ वर्षांचें जीवन म्हणजे स्वातंत्र्य लढ्याचा व राष्ट्रउभारणीचा इतिहास होय. हिंदु व मुसलमान यांचें ऐक्य अभेद्य असें राहील, अशी त्यांची निष्ठा होती. विनोबांनीं तर त्यांना "महान् नेते" व "विद्वान् मुत्सद्दी" म्हटलें आहे. पण्डित नेहरू म्हणाले, मीं त्यांना वडील भाऊ म्हणून समजत होतों. महात्मा गांधींनीं त्यांना बरोबर आणलें होतें; म्हणून गांधीजींच्याबरोबर जे पुरुष पुढें आले त्यांचे एक 'स्वतंत्र युगच' म्हणतां येईल. जातीयवादी लोकांच्या दृष्टीनें ते भ्रष्ट होते व त्यांचा मुस्लीम समाजानें छळ केला. भारतीय संस्कृतीवर ज्या मुस्लिम संस्कृतीचा परिणाम झाला आहे, त्या मुस्लीम संस्कृतीचे ते प्रतिनिधी होते. मौलानाना 'दीपस्तंभाची' उपमा दिली. पंडितजी म्हणाले–'संस्कृति, सुधारणा, विचार व तत्वज्ञान यांचा समन्वय साधणारा व जुन्या नव्यांतील दुवा म्हणून वागणारा मौलानासाहेब हे होते. त्यांच्या मृत्यूनें भारतीय जीवनांत जी पोकळी निर्माण झाली आहे, ती लौकर भरून निघणें शक्य नाहीं. त्यांना सांस्कृतिक संबंध जोडण्याची फार आवड होती. India Council of Cultural relations हीं त्यांची आवडती कल्पना होती व ती साकार स्वरूपांत आणण्यांत ते आपला वेळ खर्च करीत. त्यांची विद्वत्ता, कवित्व व निरीक्षणशक्ती उच्च प्रकारची होती. अलम भारतांत त्यांच्यासाठीं शोकसभा घेण्यांत आल्या व त्यांतून मौलानांच्या गुणवर्णनपर भाषणें करण्यांत आलीं. मौलानाचें वर्णन आम्ही खालील शब्दांत करूं :—डोळ्यांपुढें ठेवलेल्या ध्येयापासून एक रेसभरहि धीरवान् लोक ढळत नाहींत. त्यांना भीति नसते, किंवा आनंद हि नसतो. एक अखंड प्रयत्न करीत रहावयाचा व राष्ट्राचें सर्वांगीण कल्याण करावयाचें, हा त्यांचा बाणा असतो. महात्माजींनीं या रत्नाची पारख केली व त्याला कोंदण केलें व त्यांनीं निर्माण केलेल्या कोंदणांत हा हिरा दैदीप्यमान म्हणून आपलें तेज दाखवीत तळपत होता! त्यांची कुशाग्र बुद्धिमत्ता, शैक्षणिक तळमळ, सांस्कृतिक ऐक्य स्थापण्याचें स्वप्न, मानव जातीला एकत्र आणून तिचें कल्याण करण्याचें ध्येय व त्यासाठीं सेवावृत्तीची आवश्यकता—ह्या त्यांच्या डोळ्यांत भरणाऱ्या गोष्टी होत. भारताची शिक्षण पद्धति अद्याप भरभक्कम पायावर उभारावयाची आहे. अशा वेळी मौलानासारखा खंदा विद्वान् व शिक्षण तज्ज्ञ जावा, हें भारताचें दुर्दैव होय. मौलानाचें जीवन उज्ज्वल स्वरूपाचें होय. त्यांत त्याग व धडाडी आहे. ११ वर्षें स्वातंत्र्यासाठीं तुरुंगवास भोगणारे ते होते व त्यानंतर ११ वर्षें दिल्लीचें मन्त्रिपद मौलानासाहेबांनीं उत्तमरीतीनें गाजविलें. त्यांचे वय ६९ वर्षांचे होते. त्यांच्या बुद्धिमत्तेची प्रभा जी तेवत राहिली, त्याचें कारण त्यांचें "कुळ" हे होय. त्यांचा जन्म मक्केला, बाळपण मदीनेंत व शिक्षण कैरो विद्यापीठांत आणि अशा सर्वांगीण उन्नतीनंतर इ. स. १९०७ साली ते भारतांत आले. त्यांची वृत्ति पहिल्यापासूनच राष्ट्रीयवादाची होती. इंग्रज सरकारला तें आवडणें शक्यच नव्हतें. त्यांना सहावर्षे रांची येथे स्थानबद्ध करून ठेवलें. ते राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष दोनवेळा होते. म. गांधींनीं त्यांचें मूल्यमापन योग्य शब्दांत केलें आहे. ते म्हणतात, इस्लामी धर्माचें ज्ञानाचे बाबतींत त्यांचेवर कोणीच मात करूं शकला नाहीं व त्या धर्मातील निष्ठे इतकीच त्यांची राष्ट्रनिष्ठाहि खंबीर होती. त्यांची राजकारणांतील पदवी जशी थोर आहे, तसेंच आरबी व पारशी भाषेवरील प्रभुत्वही असामान्य होतें. जिन्हाला वाटे मौलानानीं आपणाकडे यावें. पण त्यांची दृष्टि एवढी संग्राहक होती की, त्यांना जिन्हांचा जातीयवाद त्यांना आवडणें शक्यच नव्हतें "काँग्रेसच्या शोकेसमधील चित्र" म्हणून जरी जिन्हांनीं त्यांची अवहेलना केली, तरी ते विचलित झाले नाहींत. त्यांची बुद्धि निश्चित असून ते स्थितप्रज्ञ होतें. मृत्यूला न भिणारे असे ते होते. खालील संस्कृत अवतरण उधृत करून मौलानाना आम्ही श्रद्धाजलि अर्पण करीत आहों :—

रत्नैर्महार्हैस्तुतुषुर्न देवाः।
न भेजिरे भीमविषेण भीतिम्।
सुधां विना न प्रययुर्विरामं।
न निश्चितार्थात् विरमन्ति धीराः॥

या आदर्श मानवतेच्या कोटीप्रत गेलेले मौलाना आज आमच्यांतून गेले आहेत! परमेश्वर त्यांच्या आत्म्यास चिर शान्ति देवो व पोरक्या झालेल्या भारताचा संभाळ तोच करो, ही प्रार्थना आम्ही आज करीत आहोंत!

• • •

# – श्री तुकाराम विश्वविद्यालय संघ, पुरवणी –

'तपोधाम कॉलनी व तळेगांव दाभाडे येथील
**तुकाराम बीज** ( शुक्रवार, तारीख ७ मार्च १९५८ )
**अपूर्व सोहळा !**

**प्रास्ताविक** :—मागील सालीं तुकाराम बीजेच्या दिवशीं 'संघा'च्या वास्तूंत प्रवेश केल्यावर पुढील बीजेपर्यंत वास्तूवर एखादी इमारत उठवावी, अशी संघ संचालकांच्या मनांत तीव्र इच्छा उत्पन्न झाली. इमारतीच्या कामास सुरुवात करणें हें कांहीं सोपें काम नाहीं, हें ते जाणून होते. परंतु ज्या संताच्या पुण्याईनें "संघा"च्या खडतर व संघर्षपूर्ण जीवनानें एथपर मजल मारली त्याच पुण्याईच्या जोरावर ही हि इच्छा कां पुरी होऊं नये ? त्यांनीं याच आधारावर प्रयत्नास सुरवात केली. त्याची हकीकत "धर्मचक्रा"च्या मासिक पुरवणींत वाचकांना वेळों वेळीं कथन केली आहेच. मागील बीजेनंतर तळेगांव दाभाडे येथें वाचस्पति क्षीरसागर यांचीं प्रवचनें झालीं व त्या वेळीं त्यांनीं स्थानिक जनतेस श्री तुकाराम विश्वविद्यालय संघाची संगतवार व संपूर्ण माहिती करून देउन तळेगांवीं स्थापन झालेल्या या संघास मदत करून सहानुभूति दाखवावी, अशी कळकळीचीहि विनंति केली. त्या वेळीं संचालकांनींहि त्यांच्या धार्मिक व भावनात्मक वृत्तींना अवाहन केलें. तेंव्हां तेथील कांहीं सद्गृहस्थांनीं 'आपण मदत करूं' असें अभिवचन दिलें. श्री श्रोत्रिय, व श्री महाजनी, या द्वयांनीं या कामीं पुढाकार घेण्याचें ठरवून तेथील 'नवीन समर्थ विद्यालया'चे प्रिन्सिपाळ गोखले हे ही त्यांच्याशी सहकार करण्यास तयार झाले. फार काय ? तेथील वारकरी सांप्रदायी भक्तांनीं ही आपण भजनाचा उत्तम कार्यक्रम ठेऊं व त्या दिवशीं १२–३० वाजून गेल्यावर ( श्री तुकाराम महाराजाचें सदेह वैकुंठगमनाचा सोहळा झाल्यावर ) आपण देहूहून परत येऊं व बीजेचा कार्यक्रम यशस्वी करण्यास मदत करूं, असें निक्षून सांगितलें ! त्यामुळें संघचालकांना फारच आनंद झाला. तळेगांव दाभाडे ( ज्याचें महत्त्व देहूच्या खालोखाल आहे. ) तेथें तुकाराम बीजेचा अपूर्व उत्सव करण्याचें त्यांनीं ठरविलें व मग ते मुंबईस परत आले. मध्यंतरीं श्री श्रोत्रिय व श्री महाजनी यांनी संघ सभासद नोंदविण्याचें काम सुरू ठेवलें. नंतर जशजशी तुकाराम बीज जवळ येऊं लागली तसतशी संचालकांची दुसरी हि खटपट सुरूं झाली व "संघा"चे अध्यक्ष श्री. विष्णूपंत निंबकर यांच्याशीं या बाबतींत त्यांनीं विचारविनिमय चालविला. श्री. निंबकर यांनीं सर्व साधक बाधक विचारांचा परामर्श घेऊन या सर्व इमारतीपैकीं दोन खोल्या ( उपस्थान शाळा ) बांधण्यास काय खर्च येईल, याचें अंदाजपत्रक मागविलें. संघाचे इंजिनिअर श्री. गोखले यांनीं तें पाठवून दिल्यावर पुन्हां संघ संचालक व अध्यक्ष यांची बैठक झाली. मध्यंतरींच्या काळांत संचालकांनीं तळेगांवच्या कार्यकारी मंडळीशीं पत्रव्यवहार सुरूं ठेवला व त्यांच्या सांगण्यावरून संचालक रविवार, ता. २३ फेब्रुवारी रोजीं दुपारीं तळेगांवास गेले व तेथें दुपारीं ४ वाजतां श्री. महाजनी यांचे घरीं सभा घेण्यांत आली. या सभेंत आणखी एक विद्वान संतवाङ्मयप्रेमी व अध्यात्माची गोडी असणारे श्री. गोपाळ नीळकंठ दांडेकर यांची ओळख झाली व त्या योगानें या त्रयीच्या जोरावर तळेगांवचा यंदाचा तुकाराम बीजेचा पहिलाच उत्सव चांगला होणार, अशीं सुचिन्हें दिसावयास लागलीं. निव्वळ 'तपोधाम' कॉलनींतच उत्सव साजरा करण्यापेक्षां त्याच दिवशीं सायंकाळीं गांवांतहि तो साजरा झाला तर लोकांना श्रीतुकाराम महाराजांच्या महोत्सवांत भाग घेण्यास संधी मिळून सर्वांचाच फायदा होईल, ही विचारसरणीं संमत होऊन त्या सभेंत कार्यक्रमाची रूपरेखा आंखण्यांत आली. सकाळीं ( ७ मार्च ) तपोधाम वसाहतींत भजन, पायाभरणी व कॉफीपान होऊन तेथील कार्यक्रम उरकावयाचा व मग तळेगांव येथें सायंकाळीं ६–३० वाजल्यापासून भरगच्च कार्यक्रम पार पाडावयाचा. हे दोन्ही कार्यक्रम 'श्री तुकाराम विश्वविद्यालय संघा'चे वतींनेंच पार पाडावयाचे. सायंकाळीं विद्यार्थ्यांची "वक्तृत्व चढाओढ" श्री. गोपाळ नीळकंठ दांडेकर यांच्या अध्यक्षतेखालीं घ्यावयाची. त्यानंतर यशस्वी विद्यार्थ्यांना पारितोषिक वितरण, नंतर वाचस्पति क्षीरसागर यांचें प्रवचन, त्यानंतर विश्राम व पुन्हां ९ वाजतां कु. अनुसूयाबाई धुर्ये यांचें कीर्तन व त्यानंतर स्थानिक तळेगांवकर यांचें "भारूड." या सर्व कार्यक्रमासाठीं श्री विठ्ठल मंदिरासमोर मंडप घालण्यांत येऊन तेथें ध्वनिविस्तारक यंत्र व विद्युद्दीप वगैरे गोष्टी वापरण्यांत याव्या असें, ठरलें. त्यासाठीं लागणाऱ्या खर्चाचा अंदाज बांधण्यांत येऊन तेथच्या तेथें आंकडे पडले व मंडळींनीं आपल्या कार्यक्षमतेची व कार्य–कळकळीची साक्ष पटवून दिली. संचालकाचें अन्तःकरण कृतज्ञेनें भरून आलें. अशा भावनामक वातावरणांत सभेचें विसर्जन झालें ! इकडे संचालक मुंबईस आल्याबरोबर त्यांनीं संघाचे अध्यक्ष, श्री. विष्णूपंत निंबकर यांची गांठ घेतली. त्यावेळीं त्यांची प्रकृति बिघडली असतांना देखील त्यांनीं मोकळेपणानें संचालकाशी चर्चा केली. अंदाजपत्रकांत दाखविलेल्या रकमेप्रमाणें स्वतःची देणगी देऊन उपस्थान शाळा बांधून देण्याचें कबूल केलें. एवढेंच नव्हे, तर त्यांच्या म्हणण्याप्रमाणें नं. २२ च्या प्लॉटजवळील नं. २३ चा प्लॉटहि खरेदी करावा, असें त्यांचें मत पडलें. अध्यक्षांनीं तुकाराम बीजेच्या दिवशीं तळेगांवास जाऊन उत्खनन करावें व समारंभ साजरा करावा, अशी विनंति संचालकांनीं केल्यावरून त्यांनीं त्यास संमति दिली व सकाळच्या कार्यक्रमांची निश्चिति झाली ! त्यानंतर संचालकांनीं निमन्त्रण पत्रिका काढून सर्वत्र पाठविण्यास सुरुवात केली व तिकडेहि श्री. महाजन यांनीं सकाळीं व सायंकाळीं होणाऱ्या कार्यक्रमाचीं हस्तपत्रकें छापून घेतलीं. बीज जवळ येऊन ठेपली व हा बीजेचा अपूर्व महोत्सव तळेगांवीं पहिल्याच व मोठ्या प्रमाणावर होणार असल्यामुळें तो सर्वस्वी यशस्वी कसा होईल याकडे सर्वांचें लक्ष लागलें. इकडे कु. अनुसूयाबाई आपल्या कीर्तनावर परिश्रम घेऊन आपल्या 'मास्तरां'च्या नेतृत्वाखालीं शिक्षण घेत होत्या. श्रीयुत दांडेकर यांनीं वक्तृत्व स्पर्धेकरितां निरनिराळ्या इयत्तांतील विद्यार्थी–विद्यार्थिनींच्या मगदुराप्रमाणें चार विषय निवडले होते :—( १ ) "श्री तुकाराम व जिजाई" हा विषय मराठी पांचवी व सहावी इयत्तेकरितां होता; ( २ ) "जे कां रंजले गांजले त्यासि म्हणे जो आपुलें" हा विषय मराठी सातवी करितां ठेवला होता ( ३ ) "देहूगांव व परिसर" हा विषय इंग्रजी आठवी व नववी या करितां

होता; (४) तर "तुकाराम आणि शिवाजी" हा विषय इंग्रजी दहावी इयत्तेकरितां मुक्रर केला गेला व त्या अर्थाचीं परिपत्रकें स्थानिक विद्यालयांतून व शाळांतून पाठविण्यांत आलीं. उत्सवाचा खर्च भागविण्यासाठीं श्री.निंबकर यांनीं १०० रुपये; श्री. नानिक मोटवानी यांनीं १०१ रुपये व श्री. एन्. जी. वीरकर (वीरकर आहारभवनचे मालक) यांनी रु. २५ रु. (बक्षिसांसाठीं) उदार मनानें दिले व कार्य करणें सुलभ झालें. त्याबरोबरच तळेगांवांतील स्थानिक समितीनेंहि रु. ६० ते ६५ जमा केले होतें. "सर्वारम्भास्तण्डुला : प्रस्थमूला :" या प्रमाणें सर्व तयारी झाली व "तुकाराम बीज" **शुक्रवार तारीख ७ रोजीं** येऊन ठेपली संघ संचालक, व वाचस्पती क्षीरसागर हें दोघे हि प्रथम गुरुवारी सांयकाळी तळेगांवी मुक्कामास गेले. या प्रसंगास अनुरूप "श्री तुकाराम विश्वविद्यालय संघा"ची एक पाटी तयार करण्यास आली होती व ती बीजेच्या दिवशीं लावण्याचें ठरलें. अध्यक्ष निंबकर यांच्या प्रकृतींत फरक न पडल्यामुळें त्यांना तळेगावीं कसे जातां येईल, हा प्रश्नच उभा राहिला. म्हणून त्यांनीं संचालकाजवळ आपला खास संदेश दिला होता.

### तुकाराम बीजेच्या दिवशीं.

**शुक्रवार सकाळीं** :- सकाळ पासूनच "तपोधाम" वसाहतींत माणसांची जा ये सुरुं झाली. प्रथम पुण्याहून श्री गोखले एंजिनिअर व त्यांचे सहकारी श्री लागू हे आले. त्यांनीं नांवाची पाटी दाखविली व ती कोठें व कशी लावयाची हे वाचस्पति क्षीरसागर यांनीं दाखवून दिलें. मध्यंतरी स्नानें वगैरे उरकून बांधकामचालू असलेल्या इमारतींतील एका प्रशस्त हॉलमध्यें भजनाचा कार्यक्रम ठरविला होता. प्रथम बैलाच्या गाडींतून 'नवीन समर्थ विद्यालया'चे विद्यार्थी, त्याचे प्रमुख 'गोखले' श्री. मेहेंदळे व श्री सिद्धये हे आले. हॉलच्या मध्यमागीं श्री. तुकाराम महाराजाचें छाया चित्र ठेवण्यात आलें होतें. बरोबर ८ वाजता मुलांनी सुरेल आवाजात व ठेक्यांत भजनें म्हटलीं. नंतर वारकरी सांप्रदायांतील भक्तांनीं एकत्र जमून ९ वाजेपर्यंत सुंदर भजन केलें व सर्व भूमी निनादानें भरून गेली. सकाळी ९-१५ वाजेपर्यंत संघाचें अध्यक्ष श्री विष्णूपंत निंबकर न आल्यामुळें व त्यांच्या खाली उपाध्यक्षांपैकी हि कोणी न येऊ शकल्यामुळें संचालकांनी अध्यक्षांचा संदश वाचून दाखविला. तो खालीलप्रमाणें:—

"उद्यां श्री तुकाराम बीजेच्या दिवशीं तपोधाम वसाहतींत संघाच्या उपस्थान शालेच्या पायाचा समारंभ करण्याचें ठरविलें होतें. व त्याप्रसंगीं मी पाया भरण्याचें कबूल हि केलें होतें. परंतु प्रकृतीच्या अस्वास्थामुळें व डॉक्टरच्या सल्ल्यानुसार मी येऊं शकत नाहीं या बद्दल फार वाईट वाटतें.

"माझी अशी इच्छा आहे कीं, या पवित्र दिवशीं आरंभलेलें कार्य पूर्ण होऊन श्री संत तुकाराम महाराजांचा संदेश सर्वत्र प्रसृत करण्यास ही संस्था कार्यक्षम होवों!

आपला—

**विष्णू निंबकर**

अध्यक्ष, श्री तुकाराम विद्यालय संघ.

हा संदेश वाचून दाखविल्यानंतर संचालकांनीं अशी सूचना पुढें मांडली कीं, अशा परिस्थितींत वाचस्पति क्षीरसागर यांच्यासारखा दुसरा सर्वस्वी योग्य प्रवचकार हें कार्य करण्यास मिळणें शक्य नाहीं, म्हणून त्यांनीं उत्खननाचा समारंभ करावा. या सूचनेस सर्वांनीं अनुमति दर्शविल्यानंतर श्री. भागवत यांनीं प्रथम भूमिपूजन केलें व जमलेल्या निमंत्रितांच्या उपस्थितीनें वाचस्पति यांनीं प्रथम कुदळ मारली! त्यांनीं यावेळीं कांहींच भाषण केलें नाहीं. त्यानंतर सर्वांना प्रसाद देण्यांत आला व कॉफीपान झाल्यावर सकाळचा कार्यक्रम पुरा झाला. उणेंपुरे ७०-८० स्थानिक सद्गृहस्थ व स्त्रिया उपस्थित होत्या. या समारंभाची माहिति 'स्थानिक कार्यक्रमां'त पुण्यांतील बहुतेक दैनिकांनीं छापली होती. व मुंबईतींलहि पत्रांनीं ती दिली होती.

या समारंभास यश चिंतणारे खालील मित्र व ऋणानुबंधी होते. त्यांचा उल्लेख करतों :—

श्री. मालोजीराव नाईक निंबाळकर, श्री. ग. वि. पुराणिक, श्रीमान् डी. पी. बिर्ला (नागडा), आचार्य स्वामी (मद्रास), श्री. सदानंद रामचंद्र म्हात्रे, (गामदेवी), श्री. पु. ह. गद्रे (नाशिक), प्रिन्सिपॉल के. एम्. मुनशी (खामगांव), संपादक विवेक (मुंबई), शेट नारायणदास तुळशीदास उर्फ नंदूभाई (तुळशीदास खिमजी) मुंबई. श्री. शंकरराव बडाकेरी (चिटणीस श्री. तु. वि. वि. संघ) यांनीं मुद्दाम अभिनंदनपर तार पाठवून समारंभाला संपूर्ण यश चिंतिलें होतें. या सर्वांच्या सदिच्छेमुळें संचालकांना व त्यांच्या सहकारी मित्रांचा उत्साह वाढावा यांत नवल नाहीं. तसेंच बरोबर सकाळीं दहा वाजतां ग्रँटरोड (मुंबई) या पोष्टांत

दिलेला एक विद्युत् संदेश आला. त्यांत पाठवणाराचें नांव नव्हतें. पण " Wishing you all the best for today's programme" हें भविष्यवादी शब्द होते.

इंग्रज लोकांना पण त्याकाळच्या त्यावेळीं सर्व वातावरण प्रसन्न उत्साहवर्धक दिसत होतें. समोर भंडारा डोंगर दिसत होता व २-फर्लांगवर माई इन्द्रायणी वहात होती अशा त्या जागेंत संघाचा नामफलक उन्हांत तळपत होता! वारकरी मंडळी देहूस गेली व कांहीं गांवांत परत गेली. श्री. महाजनी हें स्वतः सर्व गोष्टी पहात होते; व श्री. गोखले श्री. काकासाहेब चाफेकर व श्री. अनंतराव चाफेकर यांनीं कॉफी, बैठक व नंतर दुपारचे भोजनाची व्यवस्था ठेवली होती. पुण्याहून श्री. तुंगार गुरुजी, हे मुद्दाम आले होते व ११-३० च्या एक्सप्रेसच्या मुंबईहून कु. घुर्ये व त्यांचे साथी व श्री. तुकाराम विश्वविद्यालय संघाच्या कार्यकारी मंडळीचे सभासद श्री. विठ्ठल उछाळ हे आलें होतें. सर्वांनीं विश्रांती घेऊन व नंतर स्नानें वगैरे उरकून भोजन उरकून घेतलें. सकाळचा तपोधाम कॉलनींतील कार्यक्रम पार पडला.

× × ×

सायंकाळीं गांवांत कार्यक्रमास सुरुवात होण्याचे अगोदर मध्यंतरीचा वेळ प्रा. भागवत, वाचस्पति क्षीरसागर व श्री तुंगार गुरुजी यांनीं स्थानिक २ शिक्षण विषयक संस्थांना भेटी देण्यांत घालविला! समर्थ विद्यालयानें मुद्दाम खास बैलाची गाडी पाठविली होती. २-३० वाजतां त्यांत बसून तिघेजण मार्गस्थ झाले व बाकीची पाहुणे मंडळी तळेगांवी टांगे करून पाठविण्याचे ठरले होते नवीन समर्थ विद्यालय ही संस्था कै. विष्णू गोविंद विजापूरकर यांनीं राष्ट्रीय शिक्षणाचा एक नमुना म्हणून काढली होती. ती राजद्रोही वाटून तिच्या अस्तीत्वावरच घाला घालण्यांत आला म्हणून अशा नमुनेदार संस्थेस भेट देण्यांत आम्हाला फार आनंद झाला. तेथील वातावरण आश्रम थाटाचे आहे. गुरुजी विद्यार्थी यांचे संबंध औपनिषदकालीन शैक्षणिक पद्धतीवर आधारलेले दिसले. तेथील वसतिगृहांत कांहीं विद्यार्थ्यांना प्रश्न विचारले. मग सभागृहांत विद्यार्थी जमले. तेथें आम्हीं गेलों. प्रिन्सिपॉल गोखले यांनीं आमची ओळख करून दिली व आम्हीं तिघांनीं आपापल्या परीनें चार शब्द सांगितलें. वाचस्पति क्षीरसागर यांनीं रामायण व रामायणांतील आदर्श राम यावर भाषण केलें; व प्रा. भागवत यांनीं श्रीतुकाराम महाराजांचा एकच अभंग म्हणून दाखवून त्याचें रहस्य सांगितलें. " सोनें करणें हा परिसाचा धर्म आहे; त्या ठिकाणीं स्पर्धास्पर्धा भावना नसते. तो आपली जाणीव पूर्णपणें विसरलेला असतो. संत हे जगाच्या कल्याणासाठीं आपला देह कष्टवीत असतात, व त्यांना स्वतःचें ममत्व नाहीं. भूतांची दया हेंच त्यांचें भांडवल. "दुसऱ्याचें सुख हेंच आपलें सुख" असें समीकरण त्यांनीं केलेलें असतें. ही वृत्ति आजच्या स्वातंत्र्याच्या काळांत आम्हां सर्वांत उत्पन्न झाली पाहिजे. गरीब व गलिच्छ वस्त्यांना वारंवार भेटी दिल्या पाहिजेत व श्रीसन्त तुकाराम महाराजांचा नैतिक उपदेश त्यांना शिकविण्याचा आपण प्रयत्न केला पाहिजे." वगैरे भाषण त्यांनीं केलें. त्यानंतर काव्यतीर्थ तुंगार यांनींहि संस्कृतिव तिचें महत्व यावर चार शब्द सांगितलें. त्यानंतर थोडावेळ बसून तिघेहि दुसरी शाळा पाहण्यास गेलों. ही शाळा "मावळ एज्युकेशन सोसायटी "ची असून तिचें नांव "नूतन विद्यामंदीर" असें आहे. ही शाळा माळ्याच्या जागेंत आहे. तिला जर कोणी धनिक व विद्याप्रेमी दानशूर भेटला, तर जागेचा प्रश्न सुटणें अशक्य नाहीं. या विद्यामंदिरात शाळेची शिस्त, वातावरण व एकंदर शिक्षक व शिक्षित यांचा एकोपा लोभनीयवाटला. त्यांचा निरोप घेऊन आम्ही बाहेर पडलों.

× × ×

गांवांत गेलों तों श्रीविठ्ठलमंदिरासमोर मंडप उभारला असून ध्वनिदूरक्षेपणांतून ध्वनिमुद्रिका वाजत होत्या. श्री महाजनी, श्री श्रोत्रिय व श्री दांडेकर हजर होते. सायंकाळीं ६-३० वाजण्याचें सुमारास नगराध्यक्ष श्री परांजपे व श्री दांडेकर हे उच्चस्थानीं विराजमान झाले. परीक्षक समितीचें काम प्रा. भागवत व वाचस्पति क्षीरसागर यांच्याकडे सोंपविण्यांत आलें होतें. चढाओढीकरितां एकंदर २४ विद्यार्थी-विद्यार्थीनी असून ते सर्व स्थानिक शाळेंत जात असतात.

चढाओढीस सुरवात करण्याचे पूर्वी नगराध्यक्ष परांजपे यांनीं लहान भाषण करून या उत्सवाचें रहस्य व तळेगांवांतील याचें वैशिष्ट्य व्यक्त केलें व श्री तुकाराम विश्वविद्यालय संघाच्या कार्याचा उल्लेख केला. नंतर अध्यक्ष श्री दांडेकर यांनीं स्पर्धेच्छूनें पाळावयाचे नियम समजावून सांगितले व सुरुवात झाली. एकंदरींत विद्यार्थ्यांचा उत्साह पाहण्यासाठीं संबंध रस्ता व दोन्ही बाजूचे ओटे नरनारींनीं भरून गेले होते. एकेक विद्यार्थी पुढें येऊन २--३ मिनिटांत आपलें भाषण करून जाई. पर अशा रीतीनें सर्वांनीं भाषणे केल्यावर परीक्षक समितीने आपला निकाल जाहीर केला. प्रत्येक वर्गातील यशस्वी विद्यार्थ्यांना दोन बक्षीसें ठेवली असून पहिला येणाऱ्यास एक चांदीचें पदक व दुसऱ्यास एक पुस्तक अशी व्यवस्था होती. चांदीचीं पदकें विकत घेण्यास लागणारी सर्व रक्कम (रु. २५) श्री तुकाराम विश्वविद्यालय संघाचे उपाध्यक्ष श्री. एन्. जी. वीरकर (वीरकर आहार भवनाचे मालक) यांनीं संघास देणगी म्हणून दिली! त्यांतून उत्तम पदकें घेतां आलीं. त्या पदकावर श्री. तु. वि. वि. संघ. इ. स. १९५८ हें लेखन कोरलें होतें. श्री. गोपाळराव दांडेकर यांनीं लागणारीं सर्व पुस्तकें देणगी म्हणून दिली. परीक्षा समितीच्या वतीनें वाचस्पति क्षीरसागर यांनीं परीक्षणात्मक, विधायक व टीकात्मक भाषण केलें व यशस्वी विद्यार्थ्यांचें अभिनंदन केलें. श्री. अध्यक्ष दांडेकर यांनींही या वक्तृत्व स्पर्धेबद्दल समाधान व्यक्त केलें. नंतर हार वगैरे घातल्यावर कार्यक्रम पार पडला. उपस्थित सभासदांनी या नवीन उपक्रमाबद्दल व्यवस्थापकांचें अभिनंदन केलें. हा यशस्वी रीतीनें पार पडला असे उद्गार काढले. त्यानंतर लगेच वाचस्पति यांनीं श्रीतुकाराम महाराजाच्या संबंधानें आतिशय विचारपरिप्लुत व चित्रोपम प्रवचन केलें व संतांची बैठक, त्याची तपस्या व साधना व त्यांतील वैशिष्ट्यें व त्याचें साक्षात्कारांतील होणारें पर्यवसान या मुद्यांवर प्रवचन केलें. सर्वांचे धन्यवाद मिळविलें. उत्तम प्रवचनकार म्हणून ते सर्व महशूर आहेत. त्यांनीं संघाचे कर्त्यास सर्वांनीं मदत का करावी, ह्याचें विवेचन केलें; हा प्रवचनाचा कार्यक्रम उरकल्यावर मंडळी भोजनास गेली. नंतर ९-३० वाजतां कुमारी अनुसूयाबाई घुर्ये यांचें श्री तुकाराम चरित्रावरील कीर्तनास सुरवात झाली. कुमारी घुर्ये यांनीं या कीर्तनासाठीं फार परिश्रम घेतले होते. त्यांचा तो कांहीं पेशा नव्हता; पण श्री तुकाराम विश्वविद्यालय संघाचें स्वप्न साकार करण्यासाठीं व संघाचें संचालक श्री नानासाहेब भागवत यांनां मदत करण्यासाठीं त्यांनीं हें परिश्रम केलें. त्यांनीं प्रथम हें कीर्तन प्रा. भागवत यांच्या वाढ दिवशीं खार येथें केलें. संघाच्या उत्सवासाठीं त्यांचा हा कार्यक्रम मुद्दाम ठवण्यांत आला होता. जसे वक्त्यांत भाग घेणारे विद्यार्थी व विद्यार्थीनी नवशिके पण कौतुक करण्याजोगे; तसेच कु.

अनुसूयाबाई यांचे कीर्तन कसलेल्या कीर्तनकाराच्या दृष्टीनें उत्तम नव्हते; पण समाजाला आवडणारे होते. त्यांच्या कीर्तनास सुरवात उशोरा झाली व पुढें होणारा भारुडाचा बहारदार कार्यक्रमहि पुढें होता. त्यामुळें त्यांना आपलें कीर्तन घाईघाईत उरकावें लागलें. तथापि त्यांची प्रतिपादन पद्धति, उदाहरणें देऊन लोकांच्या गळीं उतरविण्याची कला व त्यांचे ल्हान वय व सभाधाटपणा या गुणांनीं श्रोतृवृंद शेवटपर्यंत बसून राहिला व १ चे सुमारास भारूडाच्या कार्यक्रमास सुरवात झाली. कु. घुर्ये यांचें आम्हीं मनःपूर्वक अभिनंदन करतों. शेवटी प्रा. भागवत यांनीं थोडक्यात सकाळ पासून चारवाजेपर्यंत ह्या क्रमाचा आढावा घेतला व त्यांत सर्वांचें आभार मानले मुख्यत तळेगांवकर बंधूनीं (यांत महाजनी दांडेकर श्रोत्रिय व प्रिन्सिपल गोखले.) व त्याच्यां बरोबर खांद्यास खांदा लाऊन काम करणारे सहकारी व यांच्या योगानें ह्या उत्सवास सर्व दर्जांचे लोक उपस्थित झाले. सरकारी अधिकारी, व्यापारी, साक्षरप्रजा, सामान्य जनता असे सर्व जण श्री. तुकाराम बीजेला त्याच्या नंतर हनुमान प्रासादिक मंडळीचा कार्यक्रम सुरूं झाला. भारुडांत कांहीं धर्म, वेदान्त, भक्ति, सामाजिक निरीक्षण, सामाजिक ब वाइर्ट चालीवरील कोरडे, खालील वर्गाचें यथार्थ दर्शन, या दृष्टीनें हा लोकनाट्याचा प्रकार फारच लोकांना आवडला. कृष्ण व त्याचें सवंगडी, राधा व गवळणी यांची गांणीं, वैदूचें जीवन, खेडवळ नवरा-बायकोचें चित्र वगैरे व समाजाच्या खालील थरातील आवडी निवडी, आशा आकांक्षा, ध्येय व विचारसरणी, विनोदप्रचुरता व समयसूचकत्व, कलात्मकता व नृत्य करण्याची सफाई, हीं दिसून आलीं. त्या मुळें पहाटे चार वाजेतां हा कार्यक्रम सर्वजण (जवळजवळ ४००, ५००) पुरुष स्त्रिया व मुलें मोठ्या एकतानतेनें पहात होतीं व त्याचा अनुभव घेत होतीं. सायकांळच्या कार्यक्रमातींल मनोरंजन व व्यवहारता या दृष्टीनें कलाकार हा परमोच्च बिंदू ण्यास हरकत नाहीं हे कलाकार सर्व स्थानिक आहेत. म्हणून त्यांचे कौतुक करण्यासाठीं प्रा भागवत यांनीं छोटेसे भाषण करून त्याना "संघा"चें गुणग्रहण-युक्त कौतुक म्हणून चांदीचे पदक अर्पण केले. हजार सहभ्याचा हा पहिलाच प्रसंग होय, असे उद्गार तेथील लोकांनीं काढले. प्रा. भागवत यांनीं तर असें सांगितलें कीं, ज्याप्रमाणें सातारचे भोसले यांची मूळ गादी साताऱ्यास व त्यांचे पेशवे (एकनिष्ठ सेवक व गादीचे कल्याण इच्छिणारे) यांचें स्थान पुण्यास या दोन्ही गांवांस राजकीय दृष्ट्या पावित्र्य आहे, त्याप्रमाणेंच देहू ही श्रीतुकाराम महाराजांची कर्मभूमि व तळेगांव हें त्यांचे एकनिष्ट शिष्य संत संताजी जगनाडे यांची जन्मभूमि व शिवाय त्या विठ्ठल मंदिरांत श्रीतुकाराम महाराजांनीं कीर्तनें करून देहूच्या खालोखाल तळेगांवला महत्व प्राप्त करून दिलें. म्हणून तुकाराम बीजेच्या दिवशीं खुद्द देहू येथील दुपारीं १२-३० वाजेपर्यंत कार्यक्रम होऊन श्रीतुकाराम महाराजांचें स्वर्गारोहण झाल्यावर जेव्हां यात्रा परत फिरते, त्यावेळीं त्या यात्रेला हेंही समजलें पाहिजे कीं, श्रीतुकाराम महाराजांच्या धुळीनें व त्यांच्या कर्तबगार शिष्यांच्या जीवनाने पुनीत झालेलें तळेगांव येथेंही महाराजांची बीज मोठ्या प्रमाणावर साजरी केली जाते व ही बातमी कळून ती यात्रा त्यादिवशीं रात्री तळेगांव येथेंही त्या बीजेंत भाग ण्यास येईल व नंतर त्यांची यात्रा सफल होईल. असें चित्र एका भाविक वारकऱ्यानें रेखाटलें होतें, त्याचा उल्लेख प्रा. भागवत यांनीं शेवटच्या भाषणांत करून श्री तुकाराम विश्वविद्यालयाचा हा उपक्रम स्थानिक कार्यनिष्ठ व तुकाराम प्रेमी जनतेच्या सहकार्यानें लोकप्रिय होऊन देहूची यात्रा येथें आकृष्ट करण्यास समर्थ होईल, अशी आशा प्रदर्शित करून आपलें भाषण संपविलें.

**फलश्रुति :** अशा रीतीनें हा बीजेचा कार्यक्रम या वर्षी अननुभूत उत्साहानें पार पडला; व याचें सर्व श्रेय श्री तुकाराम महाराजांचा असंख्य भक्तजनाना आहे. इ. स. १९५२ सालीं देहू क्षेत्रीं स्थापन केलेल्या या संघाच्या जीवनांत संघर्ष, नाराजी, सांप्रदायिका हटाग्रह, जातीय वादाचा उग्र वास, इत्यादि स्थित्यन्तरावून जावे लागून देहूच्या कार्याचे स्थलान्तर तळेगांव येथें करण्याचे ठरवल्यावर त्यासाठीं संघटना नवीन तत्वावर केल्यापासून झालेला उत्कर्ष पाहून त्यांची फलश्रुति यांत होत आहे, हे पाहून संचालकांचे अंतःकरण भरून आलें! "तुझें तूंच करून घेणारा आहेस, आम्ही निमितमात्र आहोंत, अशा एकमेव विचारानें या कामीं त्यांनीं काळ, पैसा, शरीराची झीज चालविली आहे व त्यांना मदत करणारे श्री. विष्णूपंत निंबकर यांचेसारखे अध्यक्ष, वीरकर व शेंबवणेकर यांचेसारखे उपाध्यक्ष, श्री. नानक मोटवानी व वाचस्पति क्षीरसागर यांच्यासारखे खजिनदार लाभले आहेत. त्यामुळें मागील सालीं संघानें भूमि खरेदी केली व या वर्षी संघाच्या भूमीवर उपस्थान शाळेच्या पाया भरणीचा समारंभ झाला; व सर्व तळेगांवांचे नागरिक यांनीं सायंकाळचा हा बहुविध व बहुरंगी कार्यक्रम पाहिला व अनुभविला. हीच संघाची कमाई आहे. त्यासाठीं ज्यांनीं ज्यांनीं उदार मनानें पैशाची मदत केली, त्यांचा उल्लेख वर केलाच आहे. त्याशिवाय ज्यांनीं ज्यांनीं संदेश पावून संघाला प्रोत्साहन दिलें, त्यांचे आम्हीं शतशः ऋणी आहोंत. तुकाराम बीजेच्या दिवशीं केलेला हा "यज्ञ" सर्वांच्या कल्याणाप्रत उपयोगी पडो व श्री तुकाराम महाराजांच्या कृपेनें व भारतीय जनतेच्या सहाय्यानें संघानें योजिलेल्या समारंभाचे पर्यवसान संघास पूर्ण यश मिळविण्यांत होवों अशी आशा प्रदर्शित करून, **श्री संत-तुकाराम विश्वविद्यालयाच्या** बीजेच्या उत्सवाचें वर्णन संपवितों. जगाच्या कल्याणास बद्ध परिकर झालेले श्री संत तुकाराम महाराज आजही सूत्रें हालवीत आहेत ! व मदत करीत आहेत, अशी निष्ठा या हृदयांत बद्धमूल होते व मग मस्तक आपोआपच अवनत होतें ! शेवटीं मुंबईचे तुकाराम प्रेमी **श्री बाळाजी पांडुरंग बोबडे** यांचा संदेश संपूर्ण देत आहों तो कसा :—

प्रो. एन्. के. भागवत M. A. : संचालक श्रीतुकाराम विश्वविद्यालय संघ. तपोधाम, मु. तळेगांव दाभाडे, जि. पुणें यांना सप्रेम नमस्कार विनंति विशेष आपलें दिनांक ३।३।५८ चें पत्र व त्यासोबत उपरनिर्दिष्ट संघाच्या वास्तूर्त उपस्थान शाळेचा "भूमिपूजन व उत्खनन" समारंभ, शुक्रवार तारीख ७ मार्च १९५८ रोजीं-अर्थात् श्रीसंत तुकाराम महाराजांच्या बीजेच्या दिवशीं, सकाळीं नऊ वाजतां संघाचे अध्यक्ष—श्री. विष्णूपंत निंबकर यांचे शुभहस्तें होणार आहे, त्याची निमंत्रणपत्रिका व आग्रहाचें आमंत्रण आपण पाठविलें तें वाचून परम आनंद वाटला. सदर संस्थेच्या वतीनें आपलेकडून आलेल्या प्रस्तुत निमंत्रणाबद्दल मी आपला अतिशय आभारी आहें व सदर समारंभास व्यक्तिशः मला उपस्थित रहातां आलें असतें तर या अनन्य संधीबद्दल मला फार आनंद वाटला असता व मी मोठ्या आवडीनें अवश्य हजर राहिलो असतों परंतु त्याच दिवशीं सालाबादप्रमाणें आमचे लोखंडी जथ्थांतील श्री. संत शीरोमणी तुकाराम महाराज यांचीं बीज माझे देखरेखीखालीं साजरी होत असल्यामुळें आपलें तेथील कार्यक्रमास मला हजर रहातां येत नाहीं, या बद्दल वाईट वाटतें. आपण संदेश पाठविण्याबद्दल मला लिहिलें आहे. मी स्वतः स इतका मोठा मनुष्य समजत नाहीं. मात्र "जे कां रंजले गांजले । त्यासी म्हणे जो आपुलें ॥" हें असिधाराव्रत घेऊन "आपुली ममता नाहीं देहीं" या परमार्थ बाण्यानें जगाच्या कल्याणा झटणाऱ्या या महान् संत विभूतीच्या पुण्यदिवशीं आपण आरंभिलेल्या शुभ कार्यास व सदर समारंभास प्रचंड सुयश व द्रुत गतीनें अभिनंदनीय सफलता, आपल्या पुढील सुयोजनेस अवश्य प्राप्त होवों व तें "तरु कोटी" हक्प्रत्यास लवकरच येवोंत अशी श्री विठ्ठल चरणी मनोभावें प्रार्थना करून व शुभेच्छा व्यक्त करून हें पत्र पुरें करतों. कळावे. लोभ असावा ही सप्रेम विनंति." ● ●

# म्हातारी आणि तिची सवत

संध्याकाळची रमणीय वेळ होती. मी सहज फिरायला बाहेर पडलों होतों. खेड्यामध्यें केवळ हवाखाण्यासाठींच बाहेर पडणारीं माणसें फारच थोडीं. कांहीं कामावाचून कुणी उगीचच फिरतांना दिसायचा नाहीं. मला बरेंच दूर जाईपर्यंत कोणी भेटलें नाहीं. कांहीं वेळानें एक म्हातारी दुरून येतांना दिसली. तिच्या डोक्यावर निरनिराळ्या प्रकारच्या पाल्याचा भारा होता. व कुठें कांहीं हिरवें झुडुप अगर डहाळी दिसली कीं, लगेच उपटून ती त्या भाऱ्यांत भर घालीत होती. हातांत एक दोरीला बांधलेली शेळी होती. ती बरीच ओढाताण करीत होती. तो पाल्याचा भारा त्या शेळीला खायला घालण्यासाठींच ती बाई गोळा करीत होती, हें स्पष्टच होतें. कपड्यावरून व चेहऱ्यामोहऱ्यावरून बाई उत्तर भारतांतून येथें येऊन राहिली असावी, असें दिसत होतें. वयानें चांगली पंचावन्न–साठ वर्षांची असावी. चेहऱ्याला पुष्कळ सुरकुत्या पडलेल्या होत्या; कपडे गरीबीचे पण नीटनेटके होते.

"बुढीमा, सूर्य तर मावळला. अजून दूर जायचें आहे वाटतें ?" मी उगीच कांहींतरी बोलायचें म्हणून हिंदीमध्यें बोलायला सुरुवात केली. म्हातारी लगेच थांबली.

"नाहीं बेटा, कामावर गेलें होतें. शेत खुरपायचें होतें. थोडेसें पुरें करीन म्हटलें, तों उशीर झाला. घरीं लहानगा वाट पाहात असेल. इथें स्टेशनाच्या पलीकडेच झोंपडी आहे आमची. आत्तां जाऊन पोहोंचेन."

माझी जिज्ञासा जागृत झाली. या म्हातारीनें लहान मूल वाट पाहात असेल असें म्हटलें. फार म्हातारपणीं मूल झालें असलें पाहिजे तिला. तेंव्हां मी सहजच विचारलें, "काय काय मुलेंबाळें आहेत तुला, बुढी मा ! घरीं कोण कोण आहे ?" माझ्या सहानुभूतीच्या प्रश्नानें म्हातारीला बरें वाटलें. ती मोकळेपणानें माझ्याशीं बोलूं लागली.

"कुठली मुलेंबाळें बाबा, एकुलता एक बच्चा आहे," म्हातारी म्हणाली. तिनें आपली गोष्ट सांगायला सुरुवात केली. ती आणि तिचा नवरा मुरादाबाद जिल्ह्यांतील एका लहानशा खेड्यांतले रहिवासी. लहान दहा वर्षांची असतांनाच तिचें लग्न झालें. नवऱ्याला रेल्वेमध्यें नोकरी होती. पण ती ५० वर्षांची होईपर्यंत तिला मूलबाळ झालेंच नाहीं. त्यामुळें दोघें नवराबायको अत्यंत उदास होतीं. शेवटीं तिनेंच एक आपल्या जातींतली ३०।३५ वर्षांची बाई पाहून आपल्या नवऱ्याचें तिच्याशीं लग्न लावून दिलें. मूल होईपर्यंत ती हिच्याशी चांगली वागत होती. पण मूल झाल्यावर जमाना बदलला. वरती "लहानगा वाट पहात असेल" म्हणून ज्याचा उल्लेख केला तो म्हातारीच्या या सवतीचाच मुलगा. मुलाला म्हातारीचा भारी लळा ! तो स्वतःच्या आईवर तितकेंसें प्रेम करीत नसे, पण म्हातारीवर फारच प्रेम करी. म्हातारीच त्याचें न्हाणें धुणें, खाणेंपिणें सर्व करी. आणि मुलगा पण म्हातारी क्षणभर देखील दूर दृष्टीआड झाली म्हणजे रडूं लागे. हेंच तिच्या सवतीला खपत नसे. हेंच खरें भांडणाचें मूळ.

नवराही आतांशा म्हातारीपेक्षां सवतीचीच बाजू घेत असे. पहिल्यासारखें म्हातारीबरोबर नीट वागत नसे. त्या लहान मुलाखेरीज म्हातारी घरांत दुसऱ्या कुणालाच नको होती. भल्या पहाटे उठून म्हातारीच रोटी, भाजी वगैरे सर्व स्वयंपाक करीत असे. पाणी भरून ठेवीत असे. सवत इतक्या लवकर उठत देखील नसे. इतकें सगळें काम आटोपून म्हातारी शेतावर मोलमजुरी करायला जायची व रोजचा सव्वा रुपया मिळवून आणायची ! पण नवऱ्याच्या बेपर्वाईमुळें व सवतीच्या द्वेषामुळें तिला दुःख होई. लहानग्या रामप्रताप ( हें त्या मुलाचें नांव ठेवलें होतें ) मुळें मात्र तिला थोडा जिवाला विरंगुळा होता. त्याचें नांव काढतांच म्हातारीचे डोळे चमकूं लागले. "काय गुणाचा मुलगा आहे म्हणून सांगूं ! थेट आपल्या आज्यासारखा दिसतो." म्हातारीनें डोक्यावर बोटें कडाकडा मोडली. "माझा सासरा रामनारायण भारी प्रसिद्ध व थोर गृहस्थ होता. त्याची जमीनजुमला सर्व कांहीं होतें. पण भाऊबंदकीच्या भांडणांत सर्व बरबाद झालें."

मी म्हातारीला म्हटलें, "बुढीमा, तुला एवढी काय गरज पडली होती कीं तूंच स्वतः आपल्या हातानें सवत करून आणलीस आणि आतां कष्टी झालीस. नसतें मूल तर काय मोठी इष्टेट वाया चालली होती ?"

"असें कसें बोलतोस रे बाबा ?" म्हातारी म्हणाली. "अरे, रामनारायणाचा ( हे तिच्या सासऱ्याचें नांव ) निर्वंश झाला, असें लोकांनीं म्हटलें असतें ना ? आणि बाबा, निपुत्रिकाला कांहीं गती असते का ? माझी सवत आणखी माझ्याशीं भांडली, माझ्या नवऱ्यानें आणखी माझी बेपर्वाई केली तरी मला चालेल. पण रामनारायणाच्या कुळाचा निर्वंश–निःसंतान मला कसें झालेलें पाहवलें असतें ? चाललेंच आहे. माझा बाळ किती गुणाचा आहे ! वाट पहात असेल माझी. जाऊं दे मला लवकर !" म्हातारीनें झपाझप पावलें टाकायला सुरुवात केली.

तिची पाठ फिरल्यावर केवढा वेळ तरी मी तिच्याकडे पाहातच राहिलों. व माझ्या मनांत विचारांचें काहूर उभें राहिलें. **मला ती म्हातारी त्यागाची मूर्ती वाटली.** दुसरें लग्न करण्याची नवऱ्यानें इच्छा दर्शविली नव्हती व दुसरें लग्न होईपर्यंत तो सर्वस्वी म्हातारीवरच प्रेम करून संतुष्ट होता. 'कुलाचा नाश होऊं नये. त्यासाठीं आपल्या वैयक्तिक सुखांत व्यत्यय आला तरी त्याची पर्वा करूं नये,' हें तत्व म्हातारीला कुणी शिकविलें ? आजकाल स्वार्थत्यागाची इतकी मीमांसा चाललेली असते, वर्तमानपत्रांतून चर्चा चाललेली असते. धर्मप्रसारासाठीं मिशनरी लोक दूरदूरच्या देशांत जाऊन हालअपेष्टा सोसून राहतात. हरिजन सेवेसाठीं, आदिवासींच्या उन्नतीसाठीं, अनाथ आश्रमासाठीं, अनेक संस्थांसाठीं लोकांना त्याग करण्याची विनंती करण्यांत येते. पुष्कळ मोठमोठे फंड

( पान १२ वर )

# आदर्श भगिनी

अनुवादक :—श्री. भवानीशंकर नी. वागळे

बडोदें शहरांत दोन बंधु एकत्र राहत होते. थोरल्या बंधूचें नांव माधव व धाकट्या बंधूचें नांव मनोहर असें होतें. त्यांना मंगला या नांवाची एक बहीण होती. माधवराव एक प्रतिष्ठित जमीनदार होते त्यांचे आईबाप हयात नव्हते. थोरल्या बंधूनीं मनोहरपंतांना एम्. ए. एल. एल. बी. पर्यंत शिक्षण दिलें. मनोहरपंतांनीं वकिलीचा पेशा पत्करला.

धाकटी बहीण मंगला जेव्हां विवाहयोग्य झाली तेव्हां तिच्या बंधुद्वयांनीं तिच्यासाठीं पति शोधण्याचें काम सुरू केलें. माधवराव हे पुरातन विचाराचे अर्थात् सनातन पंथी होतें व मनोहरपंत सुधारक मतवादी होते. बंधुद्वय आपआपल्या मतप्रणालीनुसार मंगलेसाठीं वर शोधूं लागले. पण या विषमतत्वामुळें बंधुद्वयामध्यें वितुष्ट सुरू झालें व त्याचा परिणाम म्हणजे मनोहरपंत माधवरावांपासून विभक्त झाले. ते आपल्या पत्नीसह दुसरीकडे राहण्यास गेले. माधवरावांनीं आपल्या बहिणीचा–मंगलेचा–विवाह एका सनातनी युवकाशीं केला. मनोहरपंत आपल्या भगिनीच्या विवाहास गेले नाहींत किंवा त्यांनीं तिच्या लग्नकार्यासाठीं पैशाची मदतहि केली नाहीं. बंधुद्वयामध्यें बोलाचालीही बंद झाली.

× × ×

श्रावण महिना नुक्ताच सुरू झाला होता. मंगला आपल्या सासरहून माहेरीं राहावयास आली होती. एके दिवशीं सायंकाळच्या समयीं मंगला आपल्या दाराच्या मागल्या बाजूस असलेल्या वडाच्या पारंब्यावर झोके घेत होती. त्याचवेळीं मनोहरपंत कांहीं कामानिमित्त तेथून जात होते. त्यांची मंगलेवर सहज नजर गेली. त्यांच्या बाजूला मंगलेची पाठ असल्यामुळें ती आपल्या बंधूला पाहूं शकत नव्हती. मनोहरपंत विचारमग्न स्थितींत तेथून जात असतांना त्यांच्या कानावर खालील गीत आदळलें. मंगला गात होती—

'चंदनकी पहुली, रेशमकी डोरी
कदम की शाखा पातली!
मनोहरभाई है मेरा भैया,
जिनकी बहिन मैं लाडली!'

मनोहरपंत उद्विग्न झाले.

'काय! ज्या बहिणीला मी जाणून बुजून विसरलों होतों तिनें माझ्याबद्दल प्रेमपूर्ण उद्गार काढावे ना! जिच्या नांवाचा मला तिरस्कार वाटत होता ती माझ्या नांवाचें प्रेमानें स्मरण करीत आहे!' असा मनांत विचार करून मनोहरपंतांनीं एक सुस्कारा सोडला.

ही ल्हानशीच गोष्ट; पण ती मनोहरपंतांना खटकूं लागली. त्यांचें अंतःकरणांत धुमसत असलेलें सारें शत्रुत्व हवेंत उडून गेलें. ते भगिनीसाठीं तळमळूं लागले, एक प्रकारच्या चिंतेनें त्यांच्या शरीरांत प्रवेश केला. त्यांचें खाणेंपिणें हळूहळू सुटूं लागलें. शक्ती क्षीण होत चालली. एके दिवशीं मनोहरपंतांची प्रकृति इतकी खालावली कीं, त्यांनीं आंथरूण धरलें.

आपला बंधु बराच आजारी असल्याचं मंगलेला एका आठवड्यानंतर कळलं. ती भीतभीत थोरल्या बंधूच्या म्हणजे माधवरावांच्या खोलींत गेली व हळूच म्हणाली

"दादा! आपला अण्णा फार आजारी आहे का रे?"

"मी पण एकलं आहे तसं." माधवराव उत्तरले.

"तूं त्याला पाहायला नाहीं गेलास?" मंगला म्हणाली.

"नाहीं" माधवराव बोलले.

"कां बरं! ज्याला तूं पुत्रासमान मानून आंगाखांद्यावर खेळवलंस, वकीलीपर्यंत शिकवलंस त्याला तूं पाहायला नाहीं गेलास?"

"त्यानें मला बोलावलं असतं तर मी गेलों असतों."

"त्यानं तुला नाहीं बोलावलं तर?"

"तर नाहीं जाणार!"

"मी त्याला पाहून येऊं का?"

"ज्यानं तुझ्या विवाहसमयीं लग्नमंडपांत पाय ठेवला नाहीं, त्यानं तुला बोलावल्याशिवाय तूं तेथें जाणें योग्य होईल काय? मानापमानाचा कांहीं विचार आहे कीं नाहीं?"

"मानापमान वारंवार येत जात असतात; पण भाऊ वेळोवेळीं मिळत नसतो." असें म्हणून मंगला रडूं लागली.

"अग, अशी रडतेस कां? मी तुला अडवीत नाहीं. तुला जावंसं वाटत असेल तर जा मनोहरला पाहायला. मी स्वतः तेथें जाणार नाहीं. मी गाडी मागवतों."

नोकरानें टांगा आणला. मंगला कपडे बदलून टांग्यांत जाऊन बसली. मनोहरपंतांचें राहण्याचें ठिकाण मंगलेला ठाऊक नसल्यामुळें, त्यांच्या नोकराला मंगलेबरोबर टांग्यांतून जावें लागलें.

मंगला मनोहरपंतांच्या घरीं गेली. तिला आपला बंधु अत्यवस्थ स्थितींत असल्याचें व बेशुद्ध असल्याचें कळलें. पलंगाच्या एका बाजूला त्यांची स्त्री उभी होती व दुसऱ्या बाजूला डॉक्टर उभे होते.

"केस होपलेस आहे; पण घाबरण्याचें कारण नाहीं." डॉक्टर बोलले.

"होपलेस! आणि घाबरण्याचें कारण नाहीं." कांहीं अर्थबोध होत नाहीं डॉक्टरसाहेब!" वकीलसाहेबांच्या पत्नीनें–अर्थात कमलेनें–भीतभीत म्हटलें.

"आहे एक उपाय!" डॉक्टर म्हणाले.

"कोणता बरं तो उपाय ! सांगा चटकन."

"मनोहरपंतांच्या शरीरांत रक्तच शिल्लक नाहीं."

"खरंच ! शरीराचा सांपळा झालेला आहे. आंगांत रक्तमांस नाहीं. बरं मग ?"

"या पहा, शरीरांतील सर्व शिरान् शिरा स्पष्ट दिसूं लागल्या आहेत." डॉक्टर म्हणाले.

"अलीकडे खाणें-पिणें सोडून दिलेलं आहे त्यांनीं. कधीं कधीं थोडाथोडा चहा घेतात." कमला म्हणाली.

"कधीं कांहीं बोलतात का ?" डॉक्टरांनीं विचारलें.

"खास कांहीं नाहीं. ' जिनकी मैं लाडली ' असें मधून मधून झोंपेंत बडबडतात."

"अर्थ काय त्या बडबडण्याचा !" डॉक्टरांनीं विचारलें.

"मला माहीत नाहीं."

"आय सी ! हें सन्निपाताचं लक्षण आहे खास !"

"आपण कोणता बरं उपाय सांगणार होतां ? माझ्यापाशीं जें कांहीं आहे; तें मी देण्यास तयार आहे; पण त्यांचे प्राण वाचवा, डॉक्टरसाहेब" कमला काकुळतीनें बोलली.

"प्राण वांचविण्याचें काम परमेश्वराचें आहे. आम्हीं फक्त प्रयत्नाची शिकस्त करूं. वकीलसाहेब माझे खास मित्र आहेत. मला तुमच्याकडून कांहीं नको" डॉक्टर शांत चित्तानें उद्गारले.

"उपाय सांगा."

"उपाय कठीण आहे. फारच कठीण आहे."

"कठीणाहून कठीण उपायही सरळ करतां येतो."

"एक छटाक शुद्ध रक्त पाहिजे !"

"तें कशासाठीं ?"

"वकीलसाहेबांच्या शरीरांत घालण्यासाठीं. बस, मग सर्व कांहीं ठीक होईल." डॉक्टर म्हणाले.

"माझ्या शरीरांतलं रक्त काढून घ्या."

"आपण गर्भवती आहांत, शिवाय कृश आहांत. गर्भवतीचं रक्त काढून घेणं योग्य नाहीं. तें आपणास व आपल्या उदरांत असलेल्या बालकास अपायकारक ठरण्याचा संभव आहे."

"मी चांगली धडधाकट आहे. माझें रक्त काढून घ्याना." मंगलानें पुढें होऊन आर्जवानें म्हटलें."

"तुम्ही कोण आहांत ?"

"वकील साहेबांची धाकटी बहीण मंगला !"

"आपण धडधाकट आहांत, शिवाय वकिलसाहेबांची बहीण असल्यामुळें आपल्या रक्तांमध्यें सजातीयपण आहे. अर्थात् आपलें रक्त शुद्ध व लाभप्रद असणार यांत संशय नाहीं. ?" डॉक्टर म्हणाले.

"आपलं रक्त नका देऊं वन्सं."

"नको कां म्हणतेस, वहिनी ?"

"आपल्या लग्नांत आम्ही सामील झालों नव्हतों."

"म्हणून काय झालं ?"

"आम्हीं तुम्हांला लग्नकार्यासाठीं म्हणून पैसा सुद्धां दिला नाहीं."

"म्हणून काय झालं ?"

"आमचा तुम्हांला तिरस्कार वाटत नाहीं ?"

"नाहीं !" मंगला उद्गारली.

"कां ?"

"कोणत्याशा चुकीसाठीं बंधूचा तिरस्कार करणें, हा कांहीं बहिणीचा आदर्श नव्हे. बंधु कसलाही असला तरी तो बंधूच आहे."

"वास्तविकपणें आमच्याकडून तुमची आगळीक झाली आहे."

"चुक पुन्हां दुरुस्त होऊं शकते; पण भाऊ कुठून परत मिळणार ? माझ्या बंधूनें मान दिला नाहीं किंवा धन दिलें नाहीं तरी तो माझा भाऊच आहे. देण्या-घेण्यापेक्षां प्रेम ही अपूर्व चीज आहे."

"आपण स्वखुषीनें आपलं रक्त देत आहांत का ?" डॉक्टर म्हणाले.

"म्हणजे ! अगदीं निःसंशय व निःस्वार्थ बुद्धीनें !" मंगला उतरली.

"एक छटाक रक्त ?"

"एक छटाक, एक पाव किंवा जेवढ्या रक्तानें माझ्या बंधूला संपूर्णपणें आराम वाटेल तेवढें !"

"शाबास ! बहीण असावी तर अशी असावी !" डॉक्टर म्हणाले.

"कोणत्या भागाचं रक्त घेणार ?" मंगलेनें विचारलें.

"हातांचं रक्त चांगलं असतं; पण त्यामुळें तुम्हांला थोडा त्रास होईल. म्हणून मी तुमच्या पायाचं रक्त काढून घेतों."

"पायाचं रक्त ? आणि माझ्या बंधूच्या शरीरांत ?" मंगला कातर स्वरांत म्हणाली.

"तर मग ?"

"माझ्या हृदयांतलं रक्त काढून माझ्या बंधूच्या हृदयांत घाला, डॉक्टरसाहेब."

"शाबास ! हा त्याग अपूर्व आहे !"

"आतां मुळींच विलंब लावूं नका."

"तुमच्या दोन्हीं हातांतलं मिळून एक छटांक रक्त काढून घेतों" डॉक्टर म्हणाले.

"चला आटपा लवकर"

"डॉक्टरनें विलंब न लावतां मंगलेच्या दोन्हीं हातांतलं मिळून एक छटाक रक्त काढून घेतलं. मंगला हूं किं चूं न करतां डोळे मिटून बसली होती. त्यानंतर लगेच मनोहरपंतांच्या शरीरांत एक छटाक रक्त घातलें गेलें."

× × ×

एका आठवड्यांत मनोहरपंतांची प्रकृति सुधारली. त्यानंतर एके दिवशीं ते आपल्या थोरल्या बंधूच्या म्हणजे माधवरावांच्या घरीं गेले. मंगलाही तेथें बसली होती. मनोहरपंतांनीं माधवरावांच्या चरणावर

आपलें मस्तक ठेवलें व ते लहान मुलाप्रमाणें रडूं लागले. माधवरावांनीं सजलनेत्रांनीं आपल्या बंधूस कवटाळलें !

"दादा ! माझ्या हातून मोठी चूक झाली. मला क्षमा कर. मी सुधारकाच्या भुताला गाढून टाकलें आहे."

"क्षमा केली बरं !" माधवराव म्हणाले.

"मला या घरांत राहण्यास परवानगी दे." मनोहरपंत म्हणाले.

"परवानगी ती कसली द्यायची ! घर तुझंच आहे. मी तुला घरांतून जाण्यास केव्हांच सांगितलें नव्हतें. तूंच घरांतून निघून गेला होतास." माधवराव म्हणाले.

"माझ्या हातून घोर अपराध झाला. तूंच मला उत्तम शिक्षण देऊन तयार केलंस."

"आजच ये, या तुझ्या घरांत आणि रहा आनंदानं."

"मंगला !" मनोहरपंत कातर स्वरानें उद्गारले.

"भाऊ !"

"तुझ्या नजरेला नजर भिडविण्यास मला लाज वाटते, मंगला."

"कां बरं ?"

"मी बंधूचें कर्तव्य विसरून गेलों होतों; पण तूं मात्र बहिणीचें कर्तव्य विसरली नाहींस."

"हिंदु संस्कृति डोळयापुढें ठेऊन बहिणीचें जें कर्तव्य आहे त्याचें मी यथोचित पालन केलें आहे. त्याबद्दल माझी तारीफ ती काय करायची ! हिंदू संस्कृतीची तारीफ केली पाहिजे ! मंगला म्हणाली.

× × ×

दुसऱ्या दिवशीं मनोहरपंत सहकुटुंब आपल्या घरांत राहावयास आले. तीन महिन्यानंतर मंगलेचें माहेरीं द्विरागमन झालें. वकीलसाहेबांनीं हजारों रुपये खर्च करून यांच्या आवडत्या बहिणीसाठीं दागिने, साड्या व चिटें आणलीं व आपल्या मेहुण्याशीं तासभर संभाषण करून त्याचें शंका समाधान केलें.

खरंच आहे. बहिणीच्या प्रेमाला सीमा नाहीं हेंच खरं !

– अखेर –



# वाचस्पति विष्णुजी क्षीरसागर यांच्या प्रवचनाचे कार्यक्रम

मागील अंकांत दिलेला श्रीरामकृष्ण परमहंस जयंतीचा कार्यक्रम हा कांहीं अडचणीमुळें मुंबईस साजरा न होतां तो गुरुवार दि. २०-२-५८ रोजीं नाशिक येथें डॉ. द. वि. देवळालकर यांच्या बंगल्यांत मोठ्या उत्साहानें साजरा झाला. वाचस्पतींचें श्रीरामकृष्ण परमहंसांच्या चरित्रावर तेथें प्रवचन झालें.

१. हितवर्धिनी सभा नौपाडा ठाणें यांच्या विद्यमानें उमानिळकंठ व्यायामशाळेच्या पटांगणांत दि. ८-३-५८ ते दि. १७-३-५८ पर्यंत रोज रात्रीं ९ वाजतां 'महाभारत' ह्या विषयावर प्रवचनें.

२. शुक्रवार दि. २१-३-५८ वर्षप्रतिपदेपासून ते गुरुवार दि. २७-३-५८ अखेर श्रीगणपुले दत्तमंदीर, धुळें, पश्चिम खान्देश, येथें प्रवचनें.

३. सोमवार दि. ३१-३-५८ गीताधर्ममंडळ चाळीसगांव यांच्या विद्यमानें रात्रीं ८ वाजतां श्रीलक्ष्मीनारायण मंदिर, चाळीसगांव येथें प्रवचन.

४. मंगळवार दि. १-४-५८ ते सोमवार दि. ७-४-५८ रोज रात्रीं ८ वाजतां नेताजी चौक, चाळीसगांव येथें श्रीहनुमान जयंती निमित्त प्रवचनें.

५. बुधवार दि. ९-४-५८ ला वाचस्पति आपल्या सहकार्यासह उत्तर भारताच्या दौऱ्यावर पंजाब मेलनें जात आहेत. गुरुवार दि. १०-४-५८ ला दुपारी ते मध्यभारतांत ग्वाल्हेर येथें पोहोंचतील. महाराष्ट्र ब्राह्मण सभेच्या विद्यमानें त्याच दिवसापासून रोज सायंकाळीं ६ ते ७ सभाभुवन, लालाचा बाजार, लष्कर, ग्वाल्हेर आणि रात्री ८ ते ९ श्रीमंत माधवराव जिनसीवाले यांचे श्रीराम मंदीर येथें प्रवचनें होतील.

ग्वाल्हेरच्या कार्यक्रमानंतर वाचस्पतींची प्रवचनें वृंदावन, दिल्ली व हरद्वार येथें होणार आहे. ह्या दौऱ्यानें वाचस्पतींचा कन्याकुमारी ते हिमालय हा व्याख्यानदौरा पूर्ण होत आहे.

( पान ९ वरून )

गोळा केले जातात. या सर्वांसाठीं त्यागाची जरुरी आहे. हिंदूधर्मांत तर सर्व भोग त्यागावर आधारलेला असावा "ईशावास्यमिदं सर्वं यत्किंच जगत्यां जगत् ! तेन त्यक्तेन भुंजीथाः" हें तत्व प्रामुख्यानें प्रतिपादिलें आहे. त्या तत्वाची शिकवण अप्रत्यक्षपणें फार खोलपर्यंत नेऊन पोचविण्याचें कार्य अनेक प्रकारें अनेक शास्त्रपुराणादि ग्रंथांनीं शेंकडों वर्षें केलें आहे. मला ती म्हातारी 'मावळलेल्या हिंदुस्तानचें प्रतीकशी' भासली. या अडाणी बाईच्या मनांत एवढा निःस्वार्थीपणा, आपल्या कुलाबद्दल एवढा अभिमान हे गुण कोठून आले ? आजकाल समान दर्जासाठीं, स्वतःच्या हक्कासाठीं जो तो भांडत असतांना ह्या म्हातारीच्या मनांत इतकी त्यागबुद्धि कशी निर्माण झाली ? हिनें इतकें दुःख कां म्हणून सोसावें ? इतके कष्ट कां करावे ? हीच का आपली भारतीय संस्कृति म्हणतात ती ? या बाईला चांगलें म्हणावें कीं मूर्खांत काढावें ? असे अनेक विचार माझ्या मनांत आले. माझ्या डोळ्यासमोरून अनेक सिनेमातारका चमकून गेल्या. स्त्रियांच्या हक्कासाठीं झुंजणाऱ्या एम्. एल्. एचें आणि विदुषींचें मला स्मरण झालें. शेवटीं, अधिकार कीं कर्तव्य ? सुख कीं त्याग ? इत्यादि समस्यांचा विचार ज्ञात्या विद्वानांवर सोपवून देऊन मी त्या म्हातारीला मनोमय प्रणाम करून पुढें निष्प्रयोजन भटकत राहिलों व कांहीं काळानें संध्याकाळचें फिरणें आटोपून घरीं परतलों. –अखेर

# धम्मपद—[ बालबोधिनीसह ]

सर्वतंत्र स्वतंत्र विद्यामार्तण्ड. **प्रो. माधवाचार्य्य.**

( जानेवारीच्या अंकावरून पुढें चालू )

९

यथापि रुचिरं पुष्पं वर्णवत् सगन्धकम् ।
एवं सुभाषिता वाग् सफला भवति कुर्वतः ॥ ९ ॥

रंग विरंगे सुहावने फूलो में आमोद न हो तो वे दूर से ही मोद प्रद होते हैं समीप में आने पर उनका कोई आकर्षण नहीं रह जाता। विद्वज्जन उनसे अरुचि पूर्वक प्रत्यावर्तित होते हैं।

यही बात विद्वान् प्रवक्ताओं के विषय में भी कही जाती है। उनके सुन्दर पाण्डित्य, वैदुष्यपूर्वक प्रवचन सर्व साधारण को आकृष्ट तो करते हैं पर वह सामीप्य में पाते ही अरुचि में परिवर्तित हो जाते हैं।

क्यों कि-उनकी निरूपणाएं कृतिरूपी सुगन्धि से विहीन रहती हैं। अतः वे अपनी ओर आकृष्ट हुए पुरुषों की भावनाएं सदा बनीं नहीं रख सकतीं।

शुक्लयजुर्वेद में कहा है कि—'अप्नस्वती वाचमश्विनाअस्मे, कृतं नो दस्रा वृषणा मनीषाम्—'

हे अश्विनीकुमारो ! हमारी बुद्धि को और मन को कर्मशील बनादो। 'जो हम संकल्प करें और निश्चय कर बैठें अवश्य कर डालें। हमारी वाणी जो भी कुछ' कहे अवश्य करे।' सत्य संकल्प और निश्चय अवश्य काम में आने चाहियें।

जिस वस्तु को हम उत्तम बतायें उसे हमें भी श्रद्धापूर्वक करना चाहिये। जो कहते हैं आचरण में नहीं लाते उनकी लबाडों में गिनती हुआ करती है।

शास्त्रोंने आचार्य का यही लक्षण किया हैं। निरुक्त ने भी कहा है कि–जो स्वयम् आचरण करे तथा शिष्यों से उपदेश देकर कराये उसीका नाम आचार्य्य है।

कृष्ण भगवान ने गीता में कहा है कि—मुझे कोई इच्छा नहीं है फिर भी मैं शुभ कार्य करना अपना कर्तव्य समझता हूँ।

ईशावास्य ने कहा है कि—'तू कर्म करता हुआ ही जीने की इच्छा कर।' आचरण के विना कभी मोक्ष मार्ग नहीं बनता। तरन और तारन दोनों ही होना चाहिये ॥ ९॥

१०

यथापि पुष्पराशिभ्यः कुर्यान्मालागुणे बहूनि।
एवं जातेन मर्त्येन कर्तव्यं कुशलं बहु ॥ १० ॥

विविध प्रकार के रंगविरंगे सुगन्धित पुष्पों में से चुनचुन कर अच्छे फूलों को माला में पिरोते हैं।

इसी प्रकार इस मरण शील मनुष्य को विविध प्रकार के पुण्य कर्म करने चाहिये। संसार के सभी महापुरुषोंने चाहा है कि—सत्कर्मों का संग्रह तथा असत कर्मों का त्याग किया जाय। क्यों कि—पुण्य कर्मों से पापों को काट दिया जाता है। इसी का नाम कर्म से कर्म का निर्हार है। पर भगवान कृष्ण, पुण्य कर्मों के करने में भी अनासक्ति चाहते हैं।

हमें पुण्य कर्म भी फल की इच्छा के त्याग के साथ करने चाहिये। कर्म त्याग में सन्यास नहीं है किन्तु फलकी इच्छा को त्याग कर कर्म करने में सन्यास समाया हुआ है ॥ १० ॥

११

न पुष्पगंधः प्रतिवातमेति, न चन्दनं तगरमल्लिकेवा ।
सतां च गन्धः प्रतिवातमेति, सर्वादिशः सत्पुरुषः प्रवाति ॥ ११ ॥

गन्ध का स्वभाव होता है। वह सदा वायुके साथ ही चला करता है। हवा के चलने की दिशा से प्रतिकूल नहीं चल सकता। चाहे वह चम्पक या पौण्ड्र का हो या चन्दन तगर अथवा मल्लिका का हो।

पर सज्जनों का यशोगन्ध वायुके सामने भी चला करता है। कोई दिशा ऐसी नहीं रह जाती जिसे यशोगन्ध परिपूरित न कर देता हो। सुयश का कहीं भी प्रतिबन्ध नहीं होता सर्वत्र फैलता है।

सज्जनों का यश ही सच्चा शरीर है। महाराजा दिलीपने सिंहसे कहा था कि—इस गऊके बदले में तूं मुझे खा ले। इस स्थूल देह पर दया न कर किन्तु मेरे अमर शरीर यश पर अवश्य कृपा कर दे। हमारे मित्र श्री. रा. नरेशजी त्रिपाठी ने एक स्थल पर कहा है कि—'सुयश है आयु सज्जन की।' सत्पुरुषों की आयु उनका यश है ॥ ११ ॥

१२

चन्दनं तगरं वापि उत्पलमथ वाशिका ।
एतेषां गन्धजातानां शीलगन्धोऽनुत्तरः ॥ १२ ॥

महामानव में—शील सुचरित्र का एक ऐसा सर्व श्रेष्ठ गन्ध है जिसकी समता चन्दन तगर नील कमल और वाशिका ( बियावाला ) का गन्ध भी नहीं कर सकता। ये ही क्यों ? शील का गन्ध, सबसे बड़ा है जो कि—सर्वत्र फैल जाता है ॥ १२ ॥

१३

अल्पमात्रोऽयं गन्धो योऽयं तगरचन्दनयोः ।
यश्च शीलवतां गन्धो वाति देवेषु उत्तमः ॥ १३ ॥

चन्दन और तगरादिक गन्धद्रव्यों में कितना गन्ध होता है ? इसकी व्याप्ति भूमी की अपेक्षा अतिलघु प्रदेश पर होती है। पूरी भूमि को भी नहीं व्याप सकता किन्तु सुशील संयमी महापुरुषों के शील की सर्वोत्तम सुगन्धि भूमि लोकको व्याप कर देव और देवलोकों को व्याप्त का लेती है।

शीलों का पालन परम तपस्या है इसके वायुवेग को इन्द्रासन हिलाने की भी शक्ति है। समय समय पर सन्तों के शील पालन से इन्द्र भी भयभीत हुआ है कि—'कहीं यह हमको भी दास न बनाये।' भगवान

बुद्ध की तपस्या से भी सब कांप गये थे। नर नारायण के शील गन्ध से स्वर्ग इतना खिचा था कि—बदरिकाश्रम स्वर्गीय देवी देवों का यात्रा धाम बन गया था। ॥ १३ ॥

१४

तेषां सम्पन्नशीलानाम्, अप्रमादविहारिणाम्।
सम्यग्ज्ञानविमुक्तानां मारो मार्गं न विन्दति ॥ १४ ॥

वे महापुरुष जिन्हें साधना के प्रभाव से सभी शील भली भांति प्राप्त हैं। जो कि—सदा जागरण में ही विहार करते हैं। सम्यग् ज्ञान ने जिन्हें संसार के सभी बन्धनों से मुक्त कर दिया है। काम वासनाएं उनके मार्ग को नहीं पा सकतीं।

जैन दर्शन ने भी सम्यक् चारित्र और सम्यग् ज्ञान को मोक्ष मार्ग माना है। शील और संयम से वासनाओं का विलय हो जाता है फिर कोई कारण नहीं है जो काम वासना भी प्रश्रय पा सके ॥ १४ ॥

१५

यथा संकरस्थाने उज्झिते महापथे।
पद्मं तत्र जायते शुचिगन्धं मनोरमम् ॥ १५ ॥

लोग राजमार्ग के पास नीचे स्थान में जहां कि–कोई नहीं आता जाता, कूड़ा कर्कट इकट्ठा कर देते हैं। समय पर उसी कीच में सबको सुन्दर लगनेवाला कमल उत्पन्न हो जाता है ॥ १५ ॥

१६

एवं संस्कारभूतेषु अन्धीभूते पृथग्जने।
अतिरोचते प्रज्ञायै सम्यक् संबुद्ध श्रावकः ॥ १६ ॥

इसी प्रकार जिन लोगों में ज्ञान नहीं है ऐसे लोगों के बीच, भगवान बुद्ध का श्रावक सम्यग् ज्ञान से शरीर के भीतरी तत्त्वों का संस्कार हो जाने पर बुद्धि को सबसे अधिक चाहता है।

सम्यग्ज्ञान एक वह वस्तु है जिसके प्राप्त होते ही मुखमण्डल विकसित हो उठता है। यह वह तेज है जिसे कोई भी फीका नहीं कर सकता। इसके लिये एक स्थल पर सायनाचार्य ने कहा है कि—'मुखकान्तिर्न नश्यति' ऐसे सम्यग् ज्ञानी के मुखमण्डल का तेज कभी एवं किसी भी कारण से अपहत नहीं होता। अज्ञानो पहत जनसमुदाय में इसी प्रकार खिला और सदा शोभायमान रहता है जैसे कि—पंकज, पंक में खिला रहता है ॥ १६ ॥

**पुष्पवर्गः समाप्त**



## ॥ ५ बालवर्गः ॥

( १ )

दीर्घा जागरतो रात्रिः, दीर्घं श्रान्तस्य योजनम् ॥
दीर्घो बालानां संसारः, सद्धर्ममविजानताम् ॥ १ ॥

यह एक नियम की बात है कि—विवश होकर जागरण करनेवाले पीडित एवम् आर्त के लिये रात, कल्परात्रि हो जाती है। थके हुए को योजन ८ मील चलना तो जहाँ तहाँ रहा दो दंग भी बड़ी होती हैं।

जिन बच्चों सरीखे मूढ़ अविवेकी जनों को धर्म (कर्तव्याकर्तव्य) का ज्ञान नहीं है उनके लिये यह भवसागर भी अपारावार है वे कभी इसे पार नहीं कर सकते। सदा संसार में ही डूबते रहते हैं।

किसी वियोगी की दशा वर्णन करते हुए किसी कवि ने कहा है कि—'रात्रिः कल्पशतायते विधिवशात् प्राणोऽपि भारायते उसके वियोग में उसे रात्रि' सौ कल्पों के बराबर हो गई है बिताये भी नहीं बीतती। अब उसे जीना भी एक बोझ बन गया है।

किसी परिश्रान्त पथिकने किसी अज्ञात द्वार पर पहुँचकर भी कह दिया कि—'चलते चलते थक गया मैं, रात स्वामी हो गई। ठहरूंगा तेरे द्वार पर यह बात स्वामी हो गई ॥

मैं थक गया हूँ इस कारण आपके ही द्वार पर ठरूँगा अब मैं कहीं अन्यत्र नहीं जा सकता।

बलवीर्य की ऊष्मा से तेजित भीम बन चला जारहा था। मार्ग में एक सत्व, मार्ग रोके पड़ा हुआ था। उसे देखकर भीमने कहा कि 'मार्ग, मुक्त करिये' तो सत्त्वने उत्तर दिया कि थक गया हूं वह भी इतना कि हिल भी नहीं सकता! परिश्रान्त का हिलना भी कठिनता से होता है तो योजन और चलने की तो बात ही कहां से हो सकती है ॥१॥

( २ )

चरं चेन्नाधिगच्छेत्, श्रेष्ठं सदृशमात्मनः।
एकचर्य्यं दृढं कुर्यात्, नास्ति बाले सहायता ॥ २ ॥

साथी सदा अपनेसे श्रेष्ठ रहना चाहिये नहीं तो अपने समान तो होना ही चाहिये। यदि ऐसा हो तो साथ करना चाहिये। यदि ऐसा साथी न मिले तो एकाकी ही विचरना चाहिये। क्यों कि–अपने से हीन एवम् बालकों के से स्वभाव के व्यक्ति कभी सहायक, सिद्ध नहीं हो सकते।

नीतिने भी ऐसा ही कहा है कि—

"सङ्गः सर्वात्मना त्याज्यः, स चेत् व्यक्तुं न शक्यते
स सद्भिः सह कर्तव्यः, सन्तः संगस्य भेषजम्।"

जहाँ तक संभव हो किसी का भी साथ न करना चाहिये। यदि ऐसी ही अनिवार्य स्थिति हो कि-संगमें कोई होना ही चाहिये तो सज्जनों का साथ करना चाहिए। क्यों कि-सन्तजनों का साथ, भव रोग के लिये औषधिका कार्य करता है।

कार्याचा गौरव करण्यांत आला होता. डॉ. कर्वे यांचें जीवन इतकें स्फूर्तिदायक व उज्ज्वल आहे की, तें कोणत्याहि भारतीयाचें अन्तःकरण भावनेनें भरून टाकील. मुख्यतः, हिंदू विधवांच्या दुःखविमोचनार्थ त्यांनीं आजन्म केलेले कष्ट व महिला शिक्षणाचें केलेलें कार्य यांचा उल्लेख करून "ऋषितुल्य तपस्वी" असा त्यांचा गौरव करण्यांत आला. अशा रीतीनें त्यांच्यासाठीं गौरवास्पद भाषणें झाल्यावर डॉ. कर्वे यांनीं उत्तर दिलें. शंभर वर्षें पुरीं झालेले अण्णासाहेब अद्यापीहि खड्या व खणखणीत आवाजांत उत्तर देतांना पाहून सर्वांना कौतुक वाटलें. ते म्हणाले—माझ्या आयुष्यांतील बराचसा काळ जरी पुण्यांत गेलेला असला तरी मुंबईमध्येंच माझें शिक्षण झालें आहे व समाज कार्याचे पहिले धडेहि मी याच शहरांत घेतले आहेत. म्हणून या शहराबद्दल मला नेहमींच आपलेपणा वाटतो. मुंबई हें केवळ महाराष्ट्राचेंच नव्हे, तर सर्व भारताचें स्फूर्तिस्थान होय." डॉ. अण्णासाहेब कर्वे यांना लहानपणीं विद्यार्थी दशेपासून आम्ही पाहिले असल्यामुळें, अशा वेळीं त्यांच्या सहधर्मचारिणी कै. सौ. आनंदीबाई कर्वे यांचे स्मरण झाल्याविना राहत नाहीं. या जोडप्यानें त्याकाळीं लोकांची निंदा सोसूनहि आपलें ध्येय डोळ्यांपुढें ठेवून जें सातत्यानें कार्य केलें त्यांचीं फळें आमचा महिला वर्ग आज चाखीत आहे. "जे कां रंजले गांजले त्यासि म्हणे जो आपुले। तोचि साधु ओळखावा" हें संत तुकाराम महाराजांचें वाक्य त्यांना तंतोतंत लागूं पडतें व त्यांना संतांचीच उपमा द्यावीशी वाटते. परमेश्वरानें त्यांना उदंड आयुष्य द्यावें व त्यांच्या हयातींत भारताच्या सर्वांगीण प्रगतीचें पाऊल पुढें पुढें पडलेलें त्यांनीं पहावें, अशी प्रार्थना!

× × ×

मागील महिन्याच्या शेवटच्या आठवड्यांत मुंबई येथें इंडो–पॅन-अमेरिकन असोसिएशनचें उद्घाटन करतांना अमेरिकन राजप्रतिनिधी एल्स्वर्थ बंकर म्हणाले—"अमेरिका कोणत्याहि राष्ट्राविरुद्ध केव्हांहि आक्रमण करणार नाहीं. आणि यूनोला पाठिंबा देऊन समर्थ करण्यासाठीं सतत प्रयत्न करीत राहील. भारताच्या पन्तप्रधानाचा उल्लेख करून ते पुढें म्हणाले—पंतप्रधान नेहरूंनीं व भारतानें न्याय्य शांततेसाठीं निरलसपणें व दृढ निश्चयानें प्रयत्न चालविले आहेत व त्यांच्याविषयीं अमेरिकेंत फार अनुकूल भावना निर्माण झाली आहे. भारत व अमेरिका हे दोन्हीहि देश लोकशाही मार्गांनीं जनतेच्या राहणीचा दर्जा सुधारण्यासाठीं झटत आहेत. नव्या समस्यांना तोंड देतां यावें, म्हणून आपापल्या राज्यकारभारांना योग्य वळण देण्याचे बाबतींत दोन्ही देशांनीं पुढाकार घेतला आहे. सर्व जनतेला समान संधि, समान दर्जा, व समान संरक्षण मिळवून देणें, हें या दोन्हीं देशांचें ध्येय आहे. भारत व अमेरिका हीं दोन्हींही राष्ट्रें शांततेसाठीं काम करून राहिलीं आहेत.' हेच विचार संयुक्त संघाचे प्रतिनिधी हनरी कॅबॉट यांनीं अन्यत्र व्यक्त केले. त्यांनीं १४ फेब्रुवारी १९५८ रोजी सप्रू हाऊस न्यू दिल्ली येथें भाषण केलें. त्यावेळीं आन्तरराष्ट्रीय परिस्थितीचा सर्वांगपूर्ण आढावा घेऊन शेवटीं ते म्हणाले—"भारत आणि अमेरिका हे दोन्हींहि देश दयापूर्ण ध्येयांनीं प्रेरित झालेले आहेत. सामान्य गरजांचे बाबतींत व्यक्तीविषयीं उन्नति हें त्यांचें समान ध्येय आहे. या गरजा म्हणजे अन्न, वसतिस्थान, उत्तम प्रकृति व शिक्षण. त्याबरोबरच त्यांच्या वैयक्तिक स्वातंत्र्याचीहि ते काळजी घेतात. अमेरिकेची प्रख्याति त्यांचें उद्योगधंदे किंवा सैन्यबल यावरच न राहतां त्याची कीर्ती 'स्वातंत्र्याच्या जाहीरनाम्यांतील ध्येयांना चिकटून राहणारें रा[ष्ट्र] म्हणून व्हावी. सर्व माणसें सारखींच उत्पन्न झालीं आहेत. व अमेरिके[चा] उद्देश 'न्यायाची स्थापना करणें' हा होय. आम्ही ज्या समानत्वासा[ठीं] खटपट करीत आहों, ते समानत्व म्हणजे 'सर्वांनीं सारखेच भिका[री] व्हावें!' हें नव्हें; तर सर्वांचें जीवनमान उत्तम प्रकारें असून सर्वां[ना] आत्मविकासाची सन्धि प्राप्त व्हावी. "**हें आमचें नैतिक का[र्य] आहे.**" या दोन्ही भाषणवांरून दोन्ही राष्ट्रांच्या समान ध्येयां[ची] कल्पना करता येते. हें कार्य सर्वांच्या सारखेच गळीं उतरलें पाहि[जे]. अमेरिकेंत निग्रो मुलांना श्वेतवर्णीयाच्या शाळेंत घ्यावया[स] श्वेतवर्णीय मुलें तयार नाहींत; तर भारतांत खालील वर्गांना [...] स्वातंत्र्य देण्यास भारतांतील प्रजा तयार नाहीं. अमेरिकेंत ज[से] अहंगड व न्यूनगंड ह्या कल्पना अद्यापि कायम आहेत, तशा[च] कल्पना भारतीय सनातनी वृत्तींच्या माणसांत आज हि दृ[ष्टि]गोचर आहेत. जोंपर्यंत मूळस्वभाव बदलत नाहीं, तोंपर्यंत [...] तात्विक ध्येयांचा उपयोग कितपत होईल? पण माणसानें काम करी[त] रहावें! "Knock knock and the door shall open un[to] thee"—हेंच खरें. त्याप्रमाणें प्रयत्न करीत रहावें व मानवा[च्या] हृदयाचें परिवर्तन करण्याचा यत्न करावा. भारत व अमेरिका यां[चा] पाठीराखा—"कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन" हाच होय ही सुबुद्धि सर्वांना सुचो ही सदिच्छा!

× × ×

१० मार्च रोजी ग्वाल्हेर येथे 'भारतीय दलित वर्गाच्या लीग[चें] पंधरावें अधिवेशन पार पडलें. या परिषदेचे अध्यक्षस्थानीं श्री. ए[न्]. एस्. काजरोळकर हे होते. मध्य प्रदेशचे राज्यपाल श्री. पाटसकर [...] उपस्थित होते. रेल्वे मार्ग मन्त्री श्री. जगजीवनराम हे प्रमुख पाहुणे होते. देशाच्या निरनिराळ्या भागांतून सुमारें ५०० प्रतिनिधी हजर होते. त्या वेळीं गृहमन्त्री पंडित पन्त म्हणाले–"राखीव जागेच्या बाबतींत १९६[...] पर्यंत फेरबदल करिता येणार नाहीं. फेरविचार करतांनाहि त्यावेळच[ी] परिस्थिति विचारांत घेतली जाईल. हरिजन आणि मागासलेल्या इत[र] वर्गांसाठीं मिशनरी वृत्तीनें सेवारत होणाऱ्या कार्यकर्त्यांचीं पथकें तयार कर[णें] आवश्यक आहे. त्यांचा प्रश्न "मानवतेचा प्रश्न" म्हणून त्याच एकमे[व] दृष्टिकोणांतून हाताळला पाहिजे. त्यासाठीं पक्षनिरपेक्षरीतीनें सर्व प्रका[रें] सहकार्य करावयास हवें." अशा या विचारपरिप्लुत भाषणाकडे किती लोकांनीं लक्ष दिलें? असें म्हणतात कीं, परिषदेचे स्थळीं पं. पंत आ[णि] इतर प्रमुख पाहुणे येतांच पिवळी बॅजेस व काळीं निशाणें घेऊन त्यांचे स्वागत झालें! हिंदू महासभेच्या लोकांनींहि निदर्शनें केलीं. एका बाजू[नें] हरिजनांनी बौद्धधर्माचा स्वीकार करूं नये, असें म्हणावयाचें, तर दुसऱ्या बाजूनें त्यांच्या हितविषयक प्रश्नांची चर्चा चालू असतांना सहानुभूति त[र] नाहींच उलट निदर्शनें करावयाचीं? या वृत्तीला कोणतें नांव द्यावें, हें[च] कळत नाहीं. खरोखर या लोकशाहीच्या राज्यांत लोकांनीं लोकशाह[ी] म्हणजे "मनःपूतं समाचरेत्" ह्याचा पुरस्कार करून दाखविल[ा] आहे. मानवतेचा प्रश्न सोडवितांना अमानवतेची वृत्ति दाखविणें, [हें] खरोखरच देशाचें दुर्दैव होय! अशा वेळीं हरिजनांनीं स्वीकारलेल[ा] मार्गच प्रशस्त आहे, असें वाटूं लागतें. पंडित पंतासारख्या आदरणीय व्यक्तींना काळीं निशाणें कां? सर्वच परिस्थिति बिघडली असू[न]

मनोवृत्तीचा कडवेपणा वाढत आहे. नैतिक मनोवृत्ति बद्धमूल करण्याचें ऐवजीं अनैतिक व अस्वाभाविक मनोवृत्तींना मोकाट सोडणें, हें एक राजकारण असेल; पण तें **हीन धर्मकारण होय**! अस्पृश्यांकडे पाहतांना स्वधर्मांत जर त्यांना समाधान मिळालें नाहीं, तर त्यांनीं बंडखोर कां होऊं नये, याचा विचार करण्याची आज वेळ आली आहे. ही गोष्ट देशांतील विचारवंतानीं मनांत बाळगावी !

× × ×

मागील महिन्याच्या शेवटच्या आठवड्यांत अशी एक बातमी आली कीं, मुंबई मद्रास मेलच्या तिसऱ्या डब्यांतून प्रवास करणाऱ्या कांहीं सैनिकांनीं रायचूर रेल्वे स्टेशनांत गोळ्या झाडल्यामुळें १४ इसम जखमी झाले. याला कारण म्हणजे ज्या डब्यांतून ते प्रवास करीत होते तो डबा रायचूर स्टेशनांत काढून घेऊन मद्रास पॅसेंजरला जोडण्याचा रेल्वे अधिकाऱ्यांचा बेत होता. पण सैनिकांतील लोकांनीं हरकत घेऊन सरळ गोळ्या झाडल्या. परिस्थिति जास्त चिघळू नये म्हणून तो डबा अखेर रायचूरला काढून न घेतां त्याच गाडीनें पुढें धाडण्यांत आला ! जखमी १४ झालेल्या लोकांत दहा रेल्वेचे नोकर आहेत. हें वाचून मनांत किती तरी विचार उत्पन्न होतात ? अगोदर रेल्वेच्या अधिकारावर हक्क गाजविणारे सैनिक शिस्तीला धाब्यावर बसवणार कोण ? बेशिस्तपणाच पर्यवसान गरीब माणसावर गोळ्या झाडण्यांत व्हावें; यावरूनच हे सैनिक लोकांचें जीवित व मालमत्ता संभाळण्यास किती लायक आहेत याची कल्पनाच करणें बरें ! हातांत शस्त्र असलें म्हणजे तें निर्वाणीला वापरावयाचें असतें, हें साधें तत्त्व ज्या सैनिकांना कळत नाहीं, त्यांना जबर शिक्षा कां होऊं नये ? त्यांचें वर्तन सर्वस्वी असमर्थनीय, समाजविद्रोही व स्वातंत्र्याच्या काळांत काळीमा आणणारें झालें, असें आमचें मत आहे. आणि इंग्रज सरकारच्या राज्यांत एखाद्या गौरकाय शिकाऱ्याच्या गोळीनें एखादा शेतकरी मेला तर त्याविरुद्ध केवढा गिल्ला केला जाई ! कारण ते परकी लोक होते; व त्यांना एतद्देशीय माणसाच्या जीवाची पर्वा नव्हती असें प्रतिपादिलें जाई. शिकार करतांना नेम चुकला म्हणून प्राण गेला तर त्याचें कांहीं तरी समर्थन करितां येईल; पण या ठिकाणीं आपल्याच लोकांनीं रागानें चिडून जाऊन, आपला अपमान झाला या खोट्या समजुतीनें आपल्या हातांतील बंदुकीचा दुरुपयोग करावा व आपल्याच बांधवांवर गोळ्या झाडण्यास प्रवृत्त व्हावें, ही केवढी दुर्दैवाची गोष्ट आहे ? ज्या सैनिकांत शिस्त, नम्रता, सामान्य माणुसकी, उदार मतवादित्व, समजुतदारपणा, दुसऱ्याच्या अडचणी समजून घेण्याइतका मनाचा तोल राखण्याची वृत्ति नाहीं, त्यांना मद्रासला पोहोंचल्यावर ताबडतोब निःशस्त्र करण्यांत आलें, हें योग्यच झालें ! शिस्तीनें वागणारे म्हणून ज्यांची ख्याती असावयास पाहिजे, त्यांच्यांत जर हा वावदूकपणा, लहरीबाजपणा, उच्छृंखळता, व अहंगंड वास करतो, तर सामान्य जनतेची काय अवस्था ? स्वातंत्र्योत्तर काळांत भारतीयांच्या जीवनाची नैतिकदृष्ट्या जी घसरगुंडी होत चालली आहे, त्याचें हें एक ताजें उदाहरण होय. यापुढें काय घटना होईल ती निराळी. पण सरकारनें याबाबतींत कडक उपाय योजून हा बेशिस्तपणाचा रोग मुळांतच उखडून काढावा, अशी त्यांना आमची विनंति आहे. "माणुसकीचा धर्म" न संभाळता येणाऱ्या लोकांनीं आमची भारतीय संस्कृति फार उच्च, उदार व सर्व संग्राहक आहे अशा बढाया मारण्यांत काय हंशील आहे ? सन्ताचा मार्ग, साधूंचा मार्ग, धर्मसंस्थापकांचा मार्ग, व आततायीपणाचा मार्ग हे अगदीं भिन्न मार्ग, होत. एकात **माणुसकी** आहे, दुसऱ्यांत **पशुत्व** आहे. आपण माणूस होणार कीं पशू बनणार, हा प्रश्न प्रत्येकानें सोडवावयाचा आहे. मग तो श्रेष्ठ असो कीं कनिष्ट असो. ही घटना नैतिक भूमिकेवरून पाहिल्यास काय विचार सुचतात, त्याचें विश्लेषण वर केलें आहे. चित्तशुद्ध करा व निर्विकार व्हा, हीच प्रार्थना.

× × ×

मुंबई येथें मागील आठवड्यांत तारीख २४ मार्च पासून ते २९ मार्च अखेर, 'आकाशवाणी' तर्फे एक व्याख्यानमाला उत्तम रीतीने जयहिंद कॉलेजच्या हॉलमध्यें पार पडली. ही व्याख्यानमाला कै. श्री. **पुरुषोत्तम मंगेश लाड** यांच्या स्मरणार्थ गुंफली होती. कै. लाड हे मराठी आणि संस्कृत भाषांचे गाढे विद्वान होते. माहिती आणि नभोवाणी खात्याच्या चिटणीस पदावर असतांनाच तारीख २४-३-१९५७ रोजीं त्यांचें निधन झालें. प्राचीन भारतीय विद्या, भक्तिवाङ्मय आणि प्राचीन भारताचा इतिहास व संस्कृति यांचा श्री. लाड यांचा सखोल व्यासंग होता. सन्तांची तर त्यांना अतिशय गोडी होती व त्यांतच तर तुकाराम त्यांचा अत्यंत आवडता कवि होता. कै. बाळासाहेब खेर यांच्या कारकिर्दीत त्यांनीं ह्याच सन्ताच्या अभंगांचें संशोधन करून सुष्ठु संपादित दोन भाग प्रसिद्ध केले होते व नंतर तुकारामाचें चरित्राचा पूर्वार्ध ( १४ प्रकरणांचा ) त्यांच्या मृत्यूनंतर बाहेर पडला. अशा सरस्वतीच्या कंठमण्याची स्मृति कायम ठेवण्यासाठीं मुंबई नभोवाणीनें सहा विद्वानांना सन्तांवर व्याख्यान देण्यासाठीं बोलावले होते. ज्ञानेश्वराची वाणी ( डॉ. शं. दा. पेंडसे ); एकनाथ-व्यक्ति आणि वाङ्मय ( प्रा. न. र. फाटक ); तुकारामाची अभंगवाणी ( डॉ. वि. भि. कोलते ); रामदासाचें जीवन कार्य ( तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी ); मराठी सन्त कवयित्री ( डॉ. कमलाबाई देशपांडे ); व शेवटचे "मराठी सन्तांचें सांस्कृतिक कार्य" ( प्रा. गं. बा. सरदार ). आरंभी एखादा अध्यक्ष बोलत असे व व्याख्यानास सुरुवात होई. प्रत्येक वक्ता आपण घेतलेल्या सन्तांचें कार्य मोठ्या साक्षेपानें वर्णन करीत होता. डॉ. पेंडसे यांनीं सांगितलें की, ज्ञानेश्वरांच्या वाङ्मयाचा हेतु 'आत्मनिष्ठ सात्त्विक कार्यकर्ते निर्माण व्हावेत' हा होता. प्रा. न. र. फाटक यांनीं सांगितलें कीं, नाथांनीं ज्ञानेश्वरांनीं पाया घातलेल्या इमारतीची वाढ केली. भक्तिमार्गी यात्रेकरूंना या इमारतीचा भरभक्कम आधार झाला. तुकारामांविषयीं बोलतांना डॉ. कोलते म्हणाले—'तुकारामाचे अभंगांत स्वतःच्या नि जनतेच्या उद्धाराचीच तळमळ दिसते. तर्कतीर्थ म्हणाले—'रामदासांनीं मध्ययुगांत अस्सल वैचारिक कार्य केलें.' डॉ. कमळाबाई देशपांडे यांनीं सन्तकवयित्रींना "आकाशगंगेचा आकर्षक पट्टा" असें विशेषण दिलें. तें समर्पक वाटलें. अशा रीतीने प्रत्येकानें आपापल्या सन्ताची तरफदारी केली. शेवटच्या व्याख्यानांत प्रा. सरदार यांनीं सांगितलें की 'दलितास दिलासा व नैतिक बळाची वृद्धि' हें मराठी सन्ताचे खरें कार्य होय. न्यायमूर्ति रानडे यांनीं सन्ताचें कार्य म्हणजे स्वराज्याची भूमि तयार करण्याचें होतें, असें प्रतिपादिलेलें आहे. 'महाराष्ट्र संतांनीं महाराष्ट्रास मेषपात्र केलें,' हा आरोप आता सुदैवानें कोणी करीत नाहीं. आमच्या

मतें सन्ताचें कार्य प्रथम स्वतःचा विकास करून घेणें व स्वतःस सन्त-पदवीला पोहोंचविणें, हें होय. व अशा रीतीने सन्ताचा विकास पूर्ण होऊन त्या सन्तानीं परमोच्चबिंदू गांठला म्हणजे आत्मजाणीवेचें विकेन्द्रीकरण करावयाचें व समाजाला कार्यक्षम बनवावयाचें. या सन्तांनी विशिष्ट गोष्ट केली असें म्हटल्यावर तुम्ही त्यांच्या विकासाच्या परमोच्चबिंदूला मुरड घालतां, हें विसरून चालायचें नाहीं. गीतेचें ज्ञान प्राकृतांत सांगणें व सर्वांना तें कळावें असला विचार ज्या सन्तांच्या मनांत आहे, त्यांचें कार्य 'जाणीव' ठेऊन केलेलें आहे. 'ज्ञानेश्वराचें पसायदान' ही खरी प्रार्थना आहे व त्यांत मानव जातीच्या अन्तरंगांतून अकुशलमनोवृत्तींचा बीमोड व्हावा, व कुशलमनोवृत्तींचा उदगम व विकास होऊन त्या योगानें त्याचें मन विश्वाकार व्हावें व अशा अवस्थेंत परसुख हेंच आपलें सुख असें समीकरण व्हावें, हेंच सन्तांच्या जीवनाचें प्राप्तव्य. ज्याप्रमाणें परिसाजवळ लोखंड गेल्याबरोबर परिसाच्या संगतींत तें **सोनें करणें हा परिसाचा धर्म आहे**, त्याप्रमाणें मानवी प्रजेच्या परमोच्च-विकासास उपयोगी वातावरण निर्माण करण्याचें कार्य करणें, हाच सन्तांचा धर्म आहे. राष्ट्रीय सन्त, जागतिक सन्त, विश्वमय सन्त असले फरक न करतां, खरे सन्त हेंच विश्वमय होत व त्यांची दृष्टि विश्वात्मक असते. ज्या सन्तांवर वरील व्याख्यानमालेंत विद्वानांनीं भाषणें केलीं, त्या सर्वांच्या जीवनाचा विकास होऊन त्यांची दृष्टि 'विश्वात्मक' झाली. ती जर नसती तर त्यांचें वाङ्मय आजहि सर्वांना सारखेंच प्रिय न होतें. या सन्ताचा विकास जसा विश्वात्मक आहे, तसाच तो लिंगभेदातीतीहि आहे. मानव्याचा विकास म्हणजेच सन्ताचा विकास. सन्ताच्या वाङ्मयाचा संकुचित दृष्टीनें अभ्यास केला कीं, त्यांच्या कार्याचें मूल्यमापन सदोष झालें म्हणून समजावें. अन्तरीं निर्मळ, वाचेचा रसाळ, त्याचे गाळीं माळ असो नसो—हें शब्द जगांतील कोणत्याही विश्वदृष्टीच्या सन्ताला लागूं पडतात. 'सन्तजीवन विकास शास्त्र' हें स्वतंत्र शास्त्र असून त्यांतील उपपत्ति व प्रक्रिया सर्व धर्मांतील सन्तांना सारख्याच लागूं पडतात. अशा रीतीनें सन्तांच्या वाङ्मयाचा अभ्यास करण्याची वेळ आतां आली आहे. त्याची पूर्वतयारी म्हणून 'आकाशवाणी'नें हा जो उपक्रम सुरू केला आहे तो ठीक असून त्याबद्दल आम्ही त्यांचें कौतुक करतों. ज्या विद्वान् व्यक्तीच्या नांवानें ही व्याख्यानमाला सुरू केली त्या व्यक्तीच्या प्रभावशाली कार्यानें या सन्तजीवनविकासशास्त्रांत उत्तरोत्तर जास्त संशोधन होत जाऊन ज्ञानोपासनेचें एक नवीन दालन उघडलें जावें, अशी येथें आम्ही आशा प्रदर्शित करतों.

× × ×

महाराष्ट्रांत आचार्य विनोबा यांनीं २३ मार्चला प्रवेश केला. आज इतकीं वर्षे पायानें यात्रा करीत देशांत भूदानाचा प्रचार, प्रथम सुरू करून भारतास नवीन विचाराचा धक्का देणारे विनोबा एक सन्त आहेत. २३ मार्चला महाराष्ट्राचे नेते त्यांना सामोरे गेले व कोल्हापूर जिल्ह्यांतील खडकेवाडा येथें त्यांचें भव्य स्वागत झालें. भारताचे आधुनिक महान् संत, असे ते विनोबा हे महात्मागांधींचे एकनिष्ठ सेवक वा अनुयायी आहेत. भूमिहीनासाठीं भूमीचें दान ते मागत आहेत. त्यांनीं सबंध भारताचा दौरा पायीं केला. त्यांचें महाराष्ट्रांतील पहिलें स्वागत श्री. यशवंतराव चव्हाण, श्री. एस्. एम्. जोशी, स्वामी रामानंद तीर्थ, श्री. हॅरीस आदि सर्व पक्षीय पुढाऱ्यांनीं केलें. त्यांची विचारसर[णी] पाश्चात्यांनाहि विचार करण्यास लावणारी आहे. संपत्तिदानाबरोबरच त्यां[नीं] ग्रामराज्याची घोषणा केली आहे. रत्नागिरी जिल्ह्यांत त्यांचा जन्म इ. [स.] १८९४ त झाला. असहकार चळवळींत त्यांनीं प्रवेश केला. गांधीजींबरोब[र] साबरमती आश्रमांत ते राहत. महात्माजींच्या आदेशानुसार त्यां[नीं] इ. स. १९२० मध्यें वर्ध्यास आश्रम स्थापन केला. मध्यंतरीं त्यां[ना] कारागृहवास भोगावा लागला. त्यांनीं गीतेचें सुरस मराठींत भाषां[तर] केलें आहे. त्यास 'गीताई' असें म्हणतात. त्यांची मतें पूर्ण विचारां[तीं] बनलीं असल्यामुळें त्यांत एकदेशीयता किंवा पक्षाभिनिवेश नाहीं. प[ण] त्यांचीं मतें एकदां त्यांनीं बनवलीं कीं, तीं सोडण्यास ते तयार नाहीं[त]. राजकारणाच्या क्षणोक्षणीं रंग बदलणाऱ्या प्रान्तांत वावरणाऱ्या लोकां[नीं] त्यांना आपल्या कार्यासाठीं जुंपण्याचा प्रयत्न करूं नये. निपाणी ये[थें] २२ मार्चला सकाळीं आठ वाजतां आचार्य विनोबा गेले तों त्यांच्[या] स्वागतास १०१९५ हजार लोक जमलेले! व सायंकाळीं तर तो जमा[व] २५–३० हजारावर गेला! निपाणी येथें कार्याचा अहवाल कानडींतू[न] वाचण्यास सुरुवात झाली तेव्हां संयुक्त महाराष्ट्राच्या लोकां[नीं] ओरडा सुरू केला. कानडीचा अनुवाद मराठींत व मराठीच[ा] अनुवाद कानडींत करण्यांत येईल, असें आश्वासन देऊनही लोकांच[ा] गिल्ला कमी होईना व भाषिक विकारवशता वाढत चाललेली पाहू[न] विनोबांनीं सभात्याग केला! हें असहिष्णुतेचें आविष्करण विनोबांच्[या] पुढें करून त्यांना दुखवूं नका. "दुसऱ्या भाषेच्या द्वेषामुळें आपली एक[ी] भस्मसात होईल. तुम्ही भाषा-भगिनींची ओळख करून घेऊन त्यांच्[या]वर प्रेम करण्यास शिकलें पाहिजे," असें ते म्हणाले. त्याप्रमाणेंच गडहिंग्लज येथें वार्ताहरांशीं बोलत असतांना ते म्हणाले—संयुक्त महाराष्ट्रासाठीं केलेला सत्याग्रह हा खरा सत्याग्रह नव्हेच. प्रेमानें आपणे कोणतेहि ध्येय साध्य करून घेतलें पाहिजे." पुढें ते म्हणाले "द्वैभा[षिकां]त कोणत्याहि एका भाषेच्या विकासाचा संकोच होतो, असें मल[ा] वाटत नाहीं. दोन भाषिक प्रान्त संपूर्ण एकत्र आल्यास त्यांत अन्याय होते असें मला वाटत नाहीं. द्वैभाषिकांत राहणें हा महाराष्ट्रद्रोह होतो, असें मानणें चुकीचें आहे." अशी त्यांचीं मतें उघडपणें बोलून दाखवून त्यांनीं आपलें स्वतंत्र व्यक्तिमत्व सिद्ध करून दाखविलें आहे. विगतस्पृह [व] पथ्यकर सल्ला देणारे विनोबा महाराष्ट्रांत प्रवास करणार आहेत. त्यांच्या ग्राम[-] राज्याला मदत करणें, हें आपलें कर्तव्य आहे. राजकारणांतील आंदोलनां[त] त्यांना ओढण्याचा प्रयत्न कोणीहि करूं नये. इतर प्रान्तांत विनोबांचा जो अभूतपूर्व सन्मान झाला व त्यांच्या कार्यांत जें अभूतपूर्व यश मिळालें त्यास महाराष्ट्रानें मात्र अपवाद ठरूं नये. महाराष्ट्र ही संतांची भूमि आहे व ज्ञानेश्वरादि सन्तांच्या भूमींत या संताला योग्य मानानें वागवावें. ज्या ठिकाणीं तुमचा त्यांचा मतभेद होतो असें वाटेल, तो प्रश्न त्यांना विचारूं नका. ज्यावर तुमचें मतैक्य होईल त्यांत त्यांना कायावाचामनें मदत करा, हीच विनंति. आम्ही या आधुनिक संतांचें नम्रतापूर्वक स्वागत करितों व अन्यत्र त्यांनीं केलेल्या कार्याप्रमाणेंच या भूमींतहि त्यांना नेत्रदीपक फळ प्राप्त होवो, अशी सदिच्छा या ठिकाणीं व्यक्त करीत आहोंत. विनोबासारखे पुरुषश्रेष्ठ सर्वत्र लाभत नाहींत. "दुर्लभो पुरिसाजञ्ञो । न सो सब्बत्थ जायति." या दुर्लभ पुरुषश्रेष्ठाला आमचे शतशः प्रणाम!

• • •

# गांधीजी आणि धर्माचें स्वरूप

[ खालील मराठी अनुवाद **गांधीमार्ग**-माघ १८७९ च्या अंकांतील हिंदी लेखावरून सौ. रतन दिवे यांनीं केला आहे. तो लेख श्री. जुगलकिशोर जरगर यांनीं लिहिला आहे. त्या **दोघांच्या** सौजन्यानें हा लेख खालीं देणें शक्य झालें आहे. ]

**—संपादक**

राजकारणामुळें गांधीजींचें सत्यस्वरूप जनतेला कळलें नाहीं. राष्ट्रांतील महापुरुषांच्या पंक्तीला त्यांना बसवूनहि त्यांच्या मनाचें आकलन आम्ही करूं शकलों नाहीं, हें आमचें दुर्दैव! राजकारण हें एक अत्यन्त लहान क्षेत्र आहे, असें गांधीजींनीं कधींच मानलें नाहीं. म्हणून राजकारणांत राहूनहि ते मोठेपण पावले. ते निव्वळ राजकारणीच नव्हते, तर 'मानवाचे उद्धारक' होते. जीवनांतील नव्या मूल्यांचे ते प्रवर्तक होते. महात्माजींच्या सत्य स्वरूपाबद्दल कोणाच्या मनांत कांहीं संदेह राहिला असेल, परंतु त्यांच्या स्वतःच्या मनांत मात्र त्याबद्दल बिलकुल संदेह नव्हता. धर्माचा बुरखा घेऊन वावरणारे अनेक राजकारणी पुरुष आहेत, परंतु भारताचा हा लोखंडी पुरुष शुद्ध धार्मिक पुरुष होता. धर्माचा खरा अर्थ म्हणजे 'जनतेची सेवा' असा असून आपल्या राजकारणांच्या द्वारें ते ती करीत होते.

गांधीजींच्या धर्मविषयक कल्पना व त्यांचीं मतें समजणें सोपें असतें तर विदेशी लोकांनींहि त्यांचा सन्मान केला नसता. त्यांचा धर्म म्हणजे कोणा गुरुच्या मुखांतून बाहेर पडलेला नव्हे. प्राचीन ग्रंथांतील प्राचीन अर्थहि ते जसाच्या तसा कधींच स्वीकारीत नसत. धर्माच्या बाबतींत एकदां गांधीजी म्हणाले—"अगदीं—अगदीं महाविद्वानांनींहि केलेली धर्माची व्याख्या जर नैतिक भावना व बुद्धि यांच्या विरुद्ध असेल तर तीसुद्धां मी मानणार नाहीं. माझा धर्म 'हिंदू' नाहीं; पण तो असा आहे कीं, तो हिंदू धर्माच्याहि पुढें गेला आहे. जो हिंदू धर्मांतील सत्यावर आधारलेला आहे, जो प्रत्येक क्षणीं पवित्र भावना निर्माण करतो, परमात्म्याशी एकरूप होईपर्यंत जो आत्म्याला बेचैन करतो, तोच खरा धर्म होय. संस्कृत ग्रंथामध्यें जें लिहिलेलें आहे, जें शास्त्र म्हणून छापून निघालें आहे, तें सर्व डोळे बंद करून स्वीकारावयाचें हा धर्म होय, असल्या धोक्यांत कोणीहि राहूं नये. नैतिकता व सुनियोजित बुद्धि यांच्या विरुद्ध असणारा धर्म "धर्म" म्हणून समजतां कामा नये. मग तो कितीहि पुरातन असो.

सांस्कृतिक परिवर्तनाची जी लाट भारतांत उत्पन्न झाली आहे त्यांचें ग्रहण गांधीजींनीं सर्व बाजूंनीं केलें. अदृश्य व बुद्धीला अप्राप्य अशा गोष्टीकडे विवेकी माणूस सहसा वळत नाहीं. परन्तु महात्माजींनीं अदृश्य व बुद्धीस अगोचर अशा गोष्टींनाच आपल्या धोरणाचे प्रवर्तक मानले व सर्व पेंचप्रसंगीं त्यांनीं अन्तर्अवाज ऐकूनच त्या अनुरोधानें मनाला शान्ति करून घेतली.

गांधीजींचीं सर्व धर्मविषयक मतें स्वतःच्या अनुभवावरून बनलीं होतीं. त्यामुळें जी सच्चाई व सरळपणा उपनिषदांत अनुभवतां येतो, तीच सच्चाई व प्रांजलपणा आपणास त्यांच्या भाषेंत आढळून येतात. बुद्ध, ख्राइस्ट, रामकृष्ण परमहंस यांच्या वचनांत जी ओतप्रोत भरलेली आपण अनुभवतों तीच सच्चाई त्यांच्यांत अनुभवतां येते. जें ज्ञान अनुभवानें प्राप्त होतें, त्यांत जी प्रखरता आढळते, ती प्रखरता पुस्तकी ज्ञानांतून कधींच आढळून येत नाहीं. धर्माचीं तत्त्वें किंवा सत्य गांधीजी पुस्तकांतून शिकले नाहींत. त्यांनीं अनुभूतींतून आपली शिक्षा घेतली. त्यामुळें केव्हां केव्हां त्यांच्या विचारांत विरोधाभास दिसतो; पण तसा प्रकार उपनिषदांमध्येंहि आढळतो. उदाहरणार्थ, गांधीजी द्वैतवादी कीं अद्वैतवादी? त्यांची भक्ति साकार कीं निराकार? हें समजणें कठीण आहे.

गांधीजी स्वतःस वैष्णव समजत असत. रामनामाचा जप व कथा-कीर्तन यांवर त्यांचा पूर्ण विश्वास होता. रामनामावर शेवटीं शेवटीं त्यांचा इतका विश्वास बसला होता कीं, त्या मंगल नामस्मरणानें पापच काय, पण शारीरिक रोगहि बरे होतात, असें त्यांना वाटे. जेव्हां शेवटच्या क्षणीं त्यांच्यावर गोळी झाडल्यावर त्यांच्यांत ती घुसली त्या क्षणींहि हे "राम!" हे दोन शब्दच त्यांच्या मुखांतून सहज बाहेर पडले!

त्यांचें सर्व जीवन म्हणजे परमेश्वरावर असलेल्या त्यांच्या अढळ निष्ठेचें एक चित्रच होतें. परमेश्वर म्हणजे सत्य, प्रेम, सदाचार, नीतिमत्ता असा त्यांचा विश्वास होता. जीवनामध्यें प्रकाश व 'उत्साह' देणारे हेच सद्गुण आहेत. 'ईश्वर म्हणजे आत्म्याचा अवाज'—ह्या शब्दांचा अर्थ फक्त 'बापूच' जाणूं शकले. जर त्यांच्यांत कांहीं कसर राहिली असेल तर ती त्यांच्या मृत्यूनें पुरी केली. परंतु ज्या रामनामाचा जप त्यांनीं जन्मभर केला व जें राम नाम घेतांनाच ते मृत्यु पावले, तो त्यांचा 'राम' कोण होता, हा एक विवाद्य विषयच आहे. प्रार्थनेचा 'राम' होता कीं रामायणांतला 'राम' होता? बापूंचा 'राम' सनातन होता कीं अजन्मा अद्वितीय होता?

गांधीजींनीं ह्या गोष्टीचें स्पष्टीकरण पुढीलप्रमाणें केलें आहेः—जो राम आहे त्याची मी पूजा करतो. त्याच्याचकडे मी सहाय्य मागतो. तो सर्वांचा आहे. त्याचें नामस्मरण करण्यांत इतकें कोणाला कठीण कां वाटावें? मुसलमान धर्मीय लोकांना 'राम' नाम घेणें इतकें कठीण कां वाटावें? ईश्वराला ते 'राम' मानीत नसतील. रामचंद्राऐवजीं ते अल्ला किंवा खुदाच नांव घेऊं शकतात." गांधीजींच्या रामाचें हें एक सुंदर विवेचन आहे.

पण प्रश्न असा उत्पन्न होतें कीं, बापूंचे 'राम' रामराज्यांतील राजा नव्हेत, तर मग त्यांच्या कीर्तनांत 'राजाराम' 'सीताराम' हें शब्द पुनः पुनः कां येतात?

हिंदूधर्म म्हणजे असंख्य आणि अनमोल रत्नांनीं भरलेला महासागरच आहे. ह्या धर्मांत ईश्वराची अनेक कामें आहेत. अनेक लोक राम आणि कृष्ण यांना ऐतिहासिक व्यक्ति मानतात; परंतु ते परमेश्वराचेच अवतार होते, असा त्यांचा दृढ विश्वास आहे. इतिहास, कल्पना, आणि सत्य ह्या तिन्हीं गोष्टींचा हिंदूधर्मांत सुंदर मिलाप झाला आहे. ह्यांच्यांतून एकही गोष्ट अलग करणें अशक्य आहे. ईश्वराचीं जितकीं रुपें आणि नांवें आपल्या धर्मांत आहेत त्याच सर्वांचें प्रतीक सर्वव्यापी 'राम' यामध्यें पाहावयास मिळतें. म्हणून **तें एक सर्वशक्तिमान तत्त्व आहे**. तत्त्व मनावर व हृदयावर पूर्ण बिंबलें असतां सर्व मानसिक, नैतिक व शारीरिक कष्ट एका क्षणांत दूर होतात.

गांधीजींच्या 'राम' ची ही दुसरी बाजू आपण पाहिली. ह्यावरून आपण असें अनुमान काढलें कीं, गांधीजींचा राम हा निराकार होता; परंतु ते स्वतः वैष्णव पंथीय होते. परमेश्वराला शरण गेले असतां तो मानसिक धैर्य देतो, ह्यावर त्यांचा पूर्ण विश्वास होता. म्हणून शुद्ध अंतःकरणानें ते रामाला शरण जात. व त्या निष्ठेवर आपलें जीवन व्यतीत करीत. ह्या गोष्टी पाहतां गांधीजी इतर वैष्णवपंथी भक्ताप्रमाणें द्वैतवादी होते, परंतु केंव्हां केंव्हां त्यांचे विचार अद्वैतवादाकडेही झुकल्याचें आपण पाहतो. ते म्हणत—मी अद्वैतवादी आहे; म्हणून अद्वैतवादाचा पुरस्कार करतो. ह्या संसारांत क्षणाक्षणाला बदल होतो आहे; तेंव्हां तो असत्य आहे. अस्तित्व कायम, अशाश्वत नाहीं. परंतु ह्या संसारांत असेही एक तत्त्व आहे कीं, त्यांत कांहीं परिवर्तन होत नाहीं; म्हणून संसार सत्य आहे असेंही आपण म्हणूं शकतो. विश्व सत्य आहे. ते आपल्या अंकित होईल तर मानसिक, नैतिक, शारीरिककष्ट एका क्षणांत दूर होतील.

एकदां ते म्हणतात—जो ईश्वर फक्त बुद्धीचेंच समाधान करूं शकतो, तो ईश्वरच नाहीं. परंतु रामाला निराकार मानूनही गांधीजी वैष्णव श्रेणीचे भक्त होते, हें आम्ही वर सांगितलेंच आहे.

'परमेश्वरानें ही सुंदर सृष्टि बनविली,' ह्या पुरातन प्रश्नावरही त्यांचे विचार द्वैतवादी होते. परमेश्वरानेंच ह्या सृष्टीची रचना केली असाही माझा विश्वास आहे व परमेश्वरानें स्वतः तटस्थ राहून तिची निर्मिति केली, ह्यावरही माझा विश्वास आहे. जैन धर्मांप्रमाणें परमेश्वराच्या तटस्थतेवरही माझा विश्वास आहे, व रामानुजाप्रमाणें ईश्वराच्या रचनाशक्तीवरही मला विश्वास वाटतो. खरें पाहता आपण **ज्ञानित** असलेल्या गोष्टीही **अज्ञेय-कठीण** करण्याचे प्रयत्न करतो. आमच्या शब्दांतच कांहीं सामर्थ्य नाहीं व म्हणूनच आपण परस्परविरोधी गोष्टी बोलतों. 'सर्वांठायीं परमेश्वर आहे,' असें मानणाऱ्या साधकाला फुलें, नद्या, पर्वत, लता, समुद्र वगैरे सर्व ठिकाणीं परमात्म्याचा साक्षात्कार झालेला दिसतो.

रहस्यवादी, अदृश्य वास्तविकतेला आपल्या एकाग्रतेंतून स्पर्श करतो. साकार परमेश्वराची भक्ति करणारे भक्त दगडामध्येंहीं ईश्वराच्या प्रतिमेचें दर्शन करतात. परंतु महात्माजींनीं सदाचारामध्येंच ईश्वराला पाहिलें. ईश्वर म्हणजे एक अवर्णनीय गोष्ट आहे. त्याचा अनुभव मिळूं शकतो. त्याला आपण प्रत्यक्ष जाणूं शकत नाहीं. माझ्या दृष्टीनें ईश्वर म्हणजे सत्य, प्रेम नीतिमत्ता आणि सदाचार आहे. तो जीवनाचा प्रकाश आहे. ईश्वर हा प्रत्यक्ष आत्म्याचाच आवाज आहे. तो नास्तिकाच्या नास्तिकतेमध्येंही आहे. परंतु शब्द आणि तर्क ह्यांच्या पलीकडे आहे. जो त्याच्या स्पर्शाबद्दल उत्सुक होतो त्याच्यासाठीं तो साकार होतो. जो भक्त श्रद्धावान् व अढळ विश्वास ठेवणारा आहे त्याच्यासाठीं तो जरूर अस्तित्वांत येतो.

भक्ति, आणि गूढवाद ह्या गोष्टींवरील श्रद्धा आजच्या युगांत लुप्त झाली आहे. तरी सुद्धां लोक बुद्धीला अपूर्ण समजूं लागले आहेत. परंतु प्रत्येक गोष्टीची पारख बुद्धीच्या कसोटीवरच केली जाते, कारण माणसांच्याकडे दुसरें कोणतें साधन नाहीं. बुद्धिही गूढवाद व भक्ति समजूं शकत नाहीं. बुद्धिवादी त्याला 'उन्मादिक अवस्था' समजून सोडून देतो. अशा शंकाकुल युगाला गांधीजींचा संदेश आहे कीं, तुम्ही ईश्वर सदाचाराच्या रूपामध्यें पहा, नीतिमत्तेनें वागा, म्हणजे भगवान तुम्हांला सहजच प्राप्त होईल.

जो आपल्या आयुष्यांत कांहीं अर्थ शोधून काढण्याचा प्रयत्न करतो, त्याच्या अंतःकरणांत श्रद्धा पाहिजे आणि आपल्या आयुष्यांतील कर्तव्यपालन त्यानें केलें पाहिजे. श्रद्धा आणि विश्वास ह्या गोष्टी बाह्य प्रमाणांनीं सिद्ध करतां येत नाहींत. म्हणूनच अशा व्यक्तींनीं सृष्टीच्या नैतिक शासनपद्धतीवर विश्वास ठेवणें आवश्यक आहे. ईश्वराचें ईश्वरत्व भक्ताच्या अंतःकरणावर प्रभाव करून त्यांत परिवर्तन घडवून आणते.

(पान १४ वर.)

# साभार स्वीकार :—

## (अ) मराठी विभाग

**(१) सोविएत देश,** २७ मार्च १९५८ (अंक ६ वा).

पुष्कळ दिवस या मासिकाचा परामर्ष आम्हास घेता आला नाहीं; म्हणून त्याचें वैशिष्ट्य, दिवसेंदिवस प्रगत होणारें त्यांच्यांतील विचार व सजावट-सौंदर्य याचा विसर आम्हास पडला नाहीं. मासिक कसें असावें व चालवावें या विषयीं हें मासिक म्हणजे उच्च नमुनाच होय. मुखपृष्ठावरील चित्र एका शिंपिणीचें आहे, हें कोणास खरें देखील वाटणार नाहीं. तिचे पहिले दिवस अतिशय हालांत गेले. पण हळूहळू तिनें आपलें बस्तान बसविलें. ह्या श्रमक स्त्रीचें आज आपण कौतुकच केलें पाहिजे. "सोविएत तुरुंगांतील जीवन" हा लेखहि उद्‌बोधक आहे. "साधा पेशा व साधीं माणसें" हा लेख आमच्या चोखंदळ पांढरपेशानीं अवश्य वाचण्याजोगा आहे. भगवान बुद्धानें "बहुजनहिताय बहुजन-सुखाय" जें कार्य केलें व सामान्य माणसासहि मानाचें स्थान दिलें, तसेंच कार्य रशियांत निराळ्या परिस्थितींत पण निराळ्या मार्गानें होत आहे. या मासिकांत पुष्कळ शिकण्यासारखें व अनुसरण्यासारखें आहे.

**(२) चित्रमय जगत्**—एप्रिल १९५८.

सजावटीच्या बाबतींत "चित्रमय जगत्" हें प्रगतिपथावर आहे, ही गोष्ट संपादकांना भूषणावह आहे. लेखाची निवडहि आज हवीशीच आहे. "आसामांतील आदिवासींचा प्रदेश" हा लेख अभिनव माहितीनें भरलेला वाटेल. संपादकीय वाचनीय आहे.

**(३) साईलीला**—एप्रील १९५८.

साई बाबांच्या लीला तर वाचनीय आहेतच. पण श्री. रेगे यांचा 'रामायणं' तील कांहीं मुद्यांवरील लेख नवीन दिशा दाखविणारा आहे. 'दासगणूं' चे बाबाविषयींचें अनुभवकथन सात्त्विक भावांना आवाहन करणारें आहे.

**(४) जनताजनार्दन**—मार्च १९५८

"उचनीच कांहीं न जाणें भगवंत" याच ध्येयानें प्रेरित होऊन गाडगे बाबानीं जनतेची सेवा केली व महाराष्ट्रांतील समाजसेवेचा नूर अजिबात बदलून टाकला! यांतील लेखहि बाबांच्या शिकवणीला अनुरुप आहेत.

**(५) प्रकाश**—ठाणें-पीपल्स एज्युकेशन सोसायटीच्या शैक्षणिक संस्थाचें मासिक. **अंक ११ वा.** जानेवारी १९५८

विद्यार्थ्यांनीं लिहिलेले लेख खरोखरच त्यांच्या भविष्यकालीन विकासाची साक्ष पटविणारे आहेत. संस्थेनें जो एवढा व्याप वाढविला व स्वतंःची इमारत बांधून आपल्या कर्तबगारीवर जो कळस चढविला तो खरोखरच चालकांना भूषणावह आहे. आम्ही संस्थेचें अभिनन्दन करतों.

**(६) महात्मा**—एप्रील १९५८

विनोबासंबंधी विविधरूपाची माहिती देणारा व त्यांचें विभूतिमत्त्व सिद्ध करून दाखविणारा हा अंक अथपासून इतिपर्यंत वाचनीय आहे. संपादक वर्ण्यविषयाशीं तादात्म्य पावल्यामुळें अंक हृदयंगम बनला आहे. हार्दिक अभिनन्दन!

**(७) संजीवन**—संजीवन कार्यालय-श्री. अरविंदाश्रम-पॉंडीचेरी २१ फेब्रुवारी १९५८ (अंक ३ रा)

या अंकास "श्री माताजींचा ८० वा जन्मदिन विशेषांक" असें नांव दिलें आहे. त्यांत माताजींच्या विकासास व त्यांना परमोच्चगतीस नेण्यास जें जें कारणीभूत झालें, त्याचा विस्तार केला आहे. माताजींचे एकच वाक्य महत्त्वाचें वाटतें व त्यांतच त्याची महनीयता समावलेली आहे. तें वाक्य असें—मी कोणत्याहि देशाची नाहीं; कोणत्याहि संस्कृतीची नाहीं; कोणत्याहि समाजाची नाहीं; कोणत्याहि वंशाची नाहीं; **केवळ भगवंताची आहे."**

**(८) पुरुषार्थ**—मार्च १९५८.

मार्च महिन्यांत 'तुकाराम बीज' झाली त्याला अनुरूप श्री तुकाराम महाराजांवर प्रकाश पाडणारे दोन लेख उल्लेखनीय आहेत. एक—'संत तुकाराम व समतावाद' (रानडे); व दुसरा—'श्री तुकाराम महाराजांची चरित्रगंगा' (पु. ह. गद्रे)—एकंदर अंक नेहमी प्रमाणेंच वाचनीय आहे.

## (आ) हिंदी विभाग :

**(१) कल्याण :**—भक्ति अंक-वर्ष ३२ अंक १ ला किं. रु.७-८-०

'कल्याण' मासिकाची वार्षिक प्रथा एकेक विशेषांक काढण्याची आहे. आतांपर्यन्त 'संक्षिप्त भारताङ्क,' 'नारीअङ्क,' 'हिंदू संस्कृति अंक,' 'संक्षिप्त नारद विष्णुपुराणाङ्क,' 'सन्तवाणी अङ्क,' 'तीर्थाङ्क' असे विशेषांक काढून

'कल्याणा'नें धार्मिक वाङ्मयांत महत्त्वाची भर टाकली आहे यांत शंका नाही. हे मासिक हिन्दी असल्यामुळें सर्वच मजकूर हिंदी भाषेंत असतो. बहुतेक विशेष अंक ८०० पृष्ठांच्यावर असून प्रत्येकांत तिरंगी चित्र, व शेकडोंशे लाईन चित्रें असून कविता व लेखांनीं विभूषित असतात. या त्यांच्या वार्षिक दानयज्ञाबद्दल संपादकांस कोणीहि धन्यवादच देईल. राष्ट्राची धार्मिक नाडी शाबूत राखल्याशिवाय राष्ट्ररूपी शरीर उत्तम रीतीनें जगणार नाहीं; म्हणून राष्ट्रांतील लोकांची धार्मिक प्रकृति निकोप ठेऊन तिच्या देहाकडून धर्म साधन करून घेण्याचें पवित्र कार्य अखंड चालूं असतें. त्या परंपरेला अनुसरूनच हा धार्मिक अंक काढला आहे. या अंङ्काची ७०८ पृष्ठें असून, "भक्ति अंकाचें परिशिष्ट" म्हणून एकूण 'भक्ति अङ्काची पृष्ठसंख्या ७७२ झाली आहे.' यांतील लेखसंख्या २२३ + १३ असून, पद्यसंख्या २०; संकलित पद्य १८, संकलित गद्य ४०, एक मलपृष्ठावरील दुरंगी चित्र व शिवाय १४ तिरंगीं चित्रें. एकूण एकरंगी चित्रें ४५; व परिशिष्टांतहि मलपृष्ठावरील एक दुरंगी, व तिरंगी एक-असा या विशेषांकाचा जमान आहे. हें सर्व अवाढव्य कार्य व तेंहि उत्तम रीतीनें कसें चालविलें जातें याचें चित्र डोळ्यापुढें उभें राहिले की, आश्चर्यानें हृदय भरून येते व भारतांत अद्यापि धार्मिक वाङ्मयाला भाव आहे याची साक्ष पटते. धन्य "कल्याण" संस्था व धन्य ते संपादक व त्यांचे साथी! असे उद्गार बाहेर पडल्याविना राहत नाहींत.

या 'भक्तिअंकां'चा उद्देश भक्तीचें स्वरूप व महिमा, शक्ति व फल, भक्तीचा ज्ञान, कर्म, व योग यांच्याशीं संबंध, भक्तीची सुलभता तशीच दुर्लभता, भक्तीचें लक्षण व वैशिष्टय, भक्तीची अनादिता, वेद वगैरे आदि ग्रंथातील भक्तीचें स्थान, भक्तीची आस्वाद्यता, भक्तीचे महान् आचार्य, भक्तीचें साधन व भक्तीचे मनोविज्ञान, भक्तीच्या संबंधी कांहीं आलोचना व त्यांचीं उत्तरें, भक्तीचे विविध भाव, भिन्न सांप्रदाय, उपासना पद्धति, विशिष्ट देवता भक्तीची पद्धति, विश्वभक्ति, देशभक्ति, समाजसेवा, गुरु-माता-ब्राह्मण यांची भक्ति निरनिराळ्या धर्मांतील भक्तीचें स्थान, भारतांतील भिन्न प्रान्तीय भक्तीची पद्धति. प्रार्थनेचें स्वरूप व महत्त्व, भगवन्नाम महिमा, वैष्णवाचे स्वरूप, यज्ञादि विषयावर विद्वानांनीं लिहिलेले लेख इत्यादि संग्रहित करून भक्तीविषयक हा 'ज्ञान-कोषच' करून ठेवला आहे. याबद्दल आम्ही संपादकाचें अभिनन्दन करतों. कथांचा विस्तार, सजावट व उत्तम छपाई पाहिली म्हणजे रु. ७-८ किंमत वाजवी आहे; आतां तर हिंदी मातृभाषा राष्ट्रभाषा झाली आहे म्हणून प्रत्येक भाषिकानें ही प्रत जवळ ठेवावी, अशी आमची त्यांना विनंति आहे.

(२) **गुरुकुलपत्रिका :** संपादक श्री धर्मदेव विद्यामार्तण्ड, कांगडी. यांतील लेखसंपदा व कविता उच्च अभिरुचीची द्योतक आहे. "मध्यकाल की दार्शनिक भित्ति," "फाह्यान की भारतयात्रा, "जातिभेदका अभिशाप," हे लेख वाचनीय असून "सम्पादकीय" तर फारच उद्बोधक आहे. संपादकजी अभिनन्दनास पात्र आहेत. दर्शनीचें चित्र ही भावनीय आहे.

(३) **कल्पवृक्ष :** उज्जैन—मार्च १९५८

अध्यात्म विद्येचें हें मासिक उच्चदर्जाचे आहे. "वेदका मन,

प्राण, और वाकसे संबंध," "मनुष्यका स्वाभाविक आयु," "आनन्दमें रहनेका उपाय" "बुद्धिकी खेती," वगैरे लेख पठनीय आहेत.

(४) **सत् सन्देश** : देहली—मार्च १९५८

यांत "सत्संग में क्या मिलता है ? या प्रश्नाचें उत्तर श्री संत कृपालसिंहजी महाराज यांनीं दिलें अन्यत्र आहे. नारदांनीं सत्संगाचा महिमा उत्तमरीतीनें वर्णन केला आहे. लेख फारच सुंदर वठला आहे. "पारस और सन्त मे बड़ा भारी फर्क है। पारस लोहेको सोना बनाता है, पारस नहीं बनाता; सन्त आपको सन्त बना देता है—" हा लेख इतर भाषांतून भाषांतरित झाला पाहिजे.

(५) **गोरक्षण**—रामनगर-बनारस-वर्ष ६ वें अंक २ रा.

गोरक्षणाची आवश्यकता व महत्त्व यांच्या ज्ञान प्रसारासाठीं वाहिलेलें हें मासिक एकंदरींत अवलोकनीय आहे. "गोरक्षाकी आवश्यकता" "जैन धर्म और गोरक्षा" व लोककथा यांत पुष्कळ शिकण्यासारखें आहे.

(६) **ऋषि जीवन**—अंक ३ रा.-मार्च १९५८-वृंदावन.

नेहमींप्रमाणें "सत्संगसुधा" "प्रियवाणी और प्रेम" "इस्लामधर्म में भक्ति" "माया के चक्कर में कौन सुखी ?" इत्यादींच्या वाचनानें बुद्धीला चालना व भावनेला आवाहन खास मिळेल.

(७) **विश्वज्योति**—होशिआरपुर-अप्रैल १९५८.

आरंभीचें दाशरथी रामाचें चित्र लढाऊवृत्तीचें द्योतक आहे. यांत "राम की राजनीति और उनका साम्राज्य," "सन्त आगस्टीन," "कपिल और षष्टितन्त्र," "भारत का भविष्य", "उन्मत्तभूतं जगत्" वगैरे लेख विश्वज्योतीच्या उद्देशानुरूप आहेत.

● ● ●

## घाई !

(अष्टाक्षरी)

आज आगळी नवीन  
साद ऐकली दुरून  
'काय विचार चालला—  
चार भिंतींत दडून ?'  
मोह मागे सारावया  
होतें आगळें आह्वान  
अति विचारांनीं पण  
होतें बधिरलें कान

नद्यासागरांमधून  
नभानगांच्या आंतून  
...साऱ्यासाऱ्या सृष्टींतून  
होतें नवें निमंत्रण !

पण, पाठ फिरवली  
नाही स्वीकारिलें कांहीं  
दूर गेलें, त्याच्या आतां  
स्वागताची मला घाई !

—प्रा० भाऊ मांडवकर

## मानवता

जगिं धर्म पहा मानवता—साधितो श्रेष्ठ इहपरता ॥ ध्रु० ॥  
स्वपर कार्य साधित असतां—पाळावी साधनशुचिता ।  
धर्माकर्माची एकता—तेथ देत कां फारकतां ? ।  
कर्मीं नीति-अनिति सोडतां—जळली ती श्रेष्ठ आर्यता ।  
देखा अज्ञान दशा भारता—बुद्धिभेद कां मग करितां ? ।  
फळली ही दारिद्र्यता—करा स्वामित्व विसर्जितां ।  
भूहीना भूमी देतां—होइल तो रक्षण कर्ता ।  
सर्वां हो सन्तोषता—द्या निपटुनि अस्पृश्यता ।  
जीवाचा क्षोभ न परता—नाश झाला हो सर्वथा ।  
कां लाजवितां भगवन्ता—'सर्वे, सुखिनः सन्तु' म्हणतां ।  
मानवा ! धरी मानवता—विश्व कार्य करण्याकरितां ।  
या स्वरूप जरी आचरितां—तारि तो सांगते 'गीता' ॥

ब. वि. जामखेडकर

## – श्री तुकाराम विश्वविद्यालय संघ, पुरवणी –

तारीख ७ मार्च रोजीं–तुकाराम बीजेच्या दिवशीं–श्री. तु. वि. वि. संघाच्या विद्यमानें जे दोन समारंभ तळेगांव येथें पार पडले त्याची हकीकत खालील दोन पत्रांत प्रसिद्ध झाली आहे :—

**( १ ) सकाळ-पुणें**

### तुकाराम बीजेनिमित्त तळेगांव दाभाडे येथें स्पर्धा

तळेगांव दाभाडे, दि. ८–श्रीसंत तुकाराम महाराजांच्या बीजेनिमित्त येथें 'श्रीतुकाराम विद्यालय संघ' या संस्थेच्या विद्यमानें विविध कार्यक्रम झाले. सकाळीं ९ वाजतां जनरल हॉस्पिटलजवळ उपस्थान शाळेचा भूमिपूजन व उत्खनन समारंभ झाला. त्यानंतर सायंकाळीं गांवांतील विठ्ठल मंदिरासमोर विद्यार्थीनींच्या वक्तृत्वस्पर्धा झाल्या.

नगराध्यक्ष डॉ. शं. वा. परांजपे यांच्या प्रास्ताविक भाषणानंतर वक्तृत्वस्पर्धेस सुरुवात झाली. अियत्तेवार वेगवेगळे विषय ठेवण्यांत आले होते. त्यांतील यशस्वी उमेदवारांना बिल्ले व पुस्तकें वाटण्यांत आलीं. पारितोषिक वितरण समारंभ, साहित्यिक. श्री. गो. नी. दांडेकर, यांच्या हस्तें झाला. वाचस्पती श्री. क्षीसागर व प्रा. ना. के. भागवत हे परीक्षक होते. प्रभाकर गुंड, वीणा दांडेकर, कमल दाभाडे, दगडू माळी व कुमार लिमये यांचीं भाषणें उल्लेखनीय झालीं.

वक्तृत्व चढाओढीनंतर श्री. क्षीरसागर यांचें प्रवचन व कु. अनसूयाबाई धुंयें यांचें कीर्तन झालें. रात्रीं तळेगावकरांचें भारूड झालें.

यावेळेपेक्षांहि पुढील वर्षीचा कार्यक्रम नाविन्यपूर्ण व मोठा करूं, असा आशावाद संस्थेचे कोष्याध्यक्ष श्री. क्षीरसागर यांनी आपल्या भाषणांत बोलून दाखविला.

**( २ ) तरुण भारत—पुणें :**

## तुकाराम विश्वविद्यालयाचे

**नव्या इमारतीची पायाभरणी-संत 'वाङ्मय' संशोधनाची सोय**

तळेगांव दाभाडे, ता. ८–येथील तपोधाम वसाहतीमध्यें तळेगांव स्टेशनजवळ तुकाराम विद्यविद्यालय संस्थेतर्फे एक इमारत होणार असून त्याचे पायाभरणीचा समारंभ त्या संस्थेचे संचालक मुंबईचें प्रा. भागवत यांचे हस्तें काल (शुक्रवारीं) सकाळी ९ वाजता पार पडला. संत तुकारामाचे वाङ्मयाचा डॉक्टरेटकरता पोस्टग्रॅज्युएट विद्यार्थ्यांना अभ्यास करतां यावा व संत वाङ्मयाचे अधिक संशोधन व्हावें या हेतूनें ही संस्था मुंबईस स्थापन झाली असून इमारत दोन मजली होणार आहे. अशा अभ्यासू लोकांची येथें रहण्याची सोय होणार आहे.

संध्याकाळीं ६-३० वाजता प्रसिद्ध साहित्यिक गो. नी. दांडेकर यांचे अध्यक्षतेखाली येथील प्राथमिक हायस्कूलमधील विद्यार्थ्यांच्या "तुकाराम व त्यांचें कार्य" या विषयावर वक्तृत्वाच्या चढाओढी होऊन यशस्वी विद्यार्थ्यांना बक्षिसें देण्यांत आली. रात्रीं श्री. क्षीरसागर इंजिनियर यांचें श्री विठ्ठल मंदिरांत प्रवचन होऊन, मुंबईच्या कु. धुंयें यांचे कीर्तन व नंतर तळेगांवकर आणि मंडळीचे भारूड होऊन श्री तुकाराम बीजेनिमित्त मुद्दाम केलेला हा कार्यक्रम संपला. समारंभास तेथील व आसपासचे बरेचसे नागरिक उपस्थित होते.

× × ×

( पान १० वरून )

आपल्या भक्तांच्या अगदीं क्षुल्लक कार्यांतही परमेश्वर आपल्या अस्तित्वाची आणि सामर्थ्याची चुणूक दाखविता.

गांधीजी वैष्णव होते, तरी नामकीर्तनावर त्यांचा अढळ विश्वास होता. गांधीजी म्हणत—मनुष्य कोणत्याही असाध्य रोगानें पीडलेला असला तरी त्यानें अंतःकरणपूर्वक जर रामनाम घेतलें तर त्यांचा सर्व रोग परिहार होईल. मी कोणी सिद्धान्त मांडणारा मनुष्य नाहीं. परंतु मी जे कांहीं सांगतों तें सर्व माझ्या स्वतःच्या अनुभवावरून सांगतों. माझें जीवन आतां ह्या स्थितीला येऊन पोहोंचलें आहे कीं, आतां जीवनाचा प्रवाह एक वेळ थांबेल, परंतु प्रार्थना थांबणार नाहीं.

गांधीजींच्या मतें नामकीर्तन करूनच आपला धर्म व्यक्त करण्याची गरज आहे असें नाहीं. भक्त कीर्तन करणारच, परंतु त्यांच्या मतें सदाचारच धर्माचें खरें व्यक्त स्वरूप होय. जो सदाचारी नाहीं, तो मनुष्य म्हणवून घ्यावयाला पात्रच नाहीं, असें तें समजत.

नीतिमत्ता आणि धर्म ह्यांवर गांधीजींचे विचार वैशिष्ट्यपूर्ण आहेत. जीवनामध्यें ईश्वराचा स्वीकार करण्यास धर्म सांगतो. ईश्वराचा स्वीकार म्हणजेच प्रेम, सत्य विवेक ह्या गुणांना आपल्या हृदयांत स्थान देणें; स्वार्थपरायणता, अज्ञान, वाईट इच्छा, अविवेक, काम क्रोध यांचा त्याग करणें. नीतिमत्तेचें पालन करणें, हेंच धर्माचें खरें स्वरूप आहे. माझा सिद्धान्त असा आहे कीं, जमिनींत पेरलेल्या धान्याला पाण्याची जितकी अवश्यकता आहे, तितकीच आवश्यकता नीतिमत्तेचें पालन करण्यासाठीं धर्माला आहे. नीतिमत्तेच्या विकासानेंच धर्माची वृद्धि होते. मी माझ्या मनांत जितकी जास्त पवित्रता निर्माण करूं शकतो, तितका जास्त मी ईश्वराच्या जवळ जातो.

रामनामाचा जप कितीही करा; पण जर त्यामुळें तुमच्या आत्म्यांत जर संवेदना निर्माण झाल्या नाहींत, तर तें रामनाम व्यर्थ आहे.

प्रार्थना निःशब्द झाली तरी चालेल; पण ती हृदयापासून बाहेर आली पाहिजे. ज्या शब्दांत आपलें अंतःकरण नाहीं, अशा नुसत्या शब्दांची प्रार्थना करण्यांत काय फायदा ? उपाशी माणूस ज्याप्रमाणें अन्नग्रहण करूनच आनंद होतो, त्याचप्रमाणें उपाशीं आत्म्याला प्रार्थनेनें आनंद होतो. खरं पाहिलें असतां, 'गांधी धर्म' हा एक निराळाच प्रकार आहे. प्रचलित धर्मांहून तो अगदीं वेगळा आहे. गांधी–मार्गी मनुष्य हा उत्तम हिंदू होऊं शकतो, त्याच प्रमाणें तो उत्तम मुसलमान, शीख, पारशी पण होऊं शकतो. त्याचा धर्म **मानवता** आहे, व त्या धर्मांचें पालन सदाचारानेंच होऊं शकते.

● ● ●

# दोन संत

जेव्हां धर्माची ग्लानि होते व अधर्माचे अभ्युत्थान होते तेव्हां ईश्वर पृथ्वीवर अवतार घेतो, असें भगवद्गीतेंत म्हटलें आहे. हें झालें भाविकांसाठीं. पण आजकालच्या शास्त्रीय व भक्तिहीन जगांत ईश्वराची कल्पना म्हणजे भोळ्या व कंगाल लोकांना गुलामगिरींत कायमचे डांबून ठेवण्यासाठीं भांडवलशाहीनें बनविलेली अफूची गोळी आहे, असा प्रचार केला जातो. तथापि ईश्वरावर ज्यांचा भरंवसा नाहीं, अशांना देखील क्रिया आणि प्रतिक्रिया विरुद्ध व समान असतात, हें भौतिक तत्व मान्य असतें. नीतीशास्त्रांनही तें खरें दिसतें. पाहिजे तर असें म्हणावें कीं, अधर्माची व अनीतीची परिसीमा झाली म्हणजे लोकांत प्रतिक्रिया सुरूं होते, आणि धर्म व नीतितत्वांचा अभ्युदय सुरूं होतो. अशा प्रतिक्रियेच्या लाटा एकसमयावच्छेदेंकरून पृथ्वीवर भिन्न भिन्न ठिकाणीं निर्माण होत असाव्यात.

चीनमध्यें लाओत्से आणि कॉनफुशियस, हिंदुस्तानांत गौतमबुद्ध, जुडियामध्यें इसाया आणि कांहीं काळानंतर ग्रीसमध्यें सॉक्रेटीस आणि प्लेटो हे सर्व इसवीसनापूर्वी * सहावे शतकांत निर्माण झाले. इसवी सनानंतरचें तेरावें शतक हाही अशाच प्रकारचा काळ दिसतो. या काळांत 'तेराव्या शतकांतील महात्मा' चक्रधर यानें महानुभाव पंथाची स्थापना केली. या संन्यास पंथाचा खूप प्रसार झाला. त्याची तत्त्वेंही फार उच्च आहेत. या पंथाचे पुष्कळ वाङमय आतां प्रकाशित झालें आहे. याच शतकांत इराणांत जलालुद्दीन रूमी वसादी यांनीं सूफी पंथाच्या तत्वांचा प्रसार केला. याच शतकांत ज्ञानेश्वरानें आपला सर्वोत्कृष्ट 'ज्ञानेश्वरी' हा मराठींतील ग्रंथ लिहून पवित्र भागवत धर्माचा पाया घातला. आणि याच सुमारास इटलींतील अंब्रिया प्रातांत ऍसीसी ह्या गांवीं एक महात्मा निर्माण झाला. त्यानेंही ख्रिस्ती धर्मांतील लुप्तप्राय उच्च नीतितत्वांचें पुनरुज्जीवन केलें. त्याचें नांव **संत फ्रान्सिस.** ज्ञानेश्वर व चक्रधराबद्दल मराठींत पुष्कळ वाङ्मय उपलब्ध आहे. प्रस्तुत लेखांत ऍसीसीचा संत फ्रान्सिस व त्याच्या प्रेरणेने वैराग्य प्राप्त होऊन साधु झालेली **संत क्लेअर** ह्या दोघांसंबंधानें थोडेंसें लिहिण्याचें योजलें आहे.

युरोपांत १४-१५ व्या शतकांत जे (Renaissance) संस्कृतीचे पुनरुत्थान झालें त्याचा संत फ्रान्सिस हा प्रभात तारा गणला जातो. आधुनिक विचारसरणींत प्रगतीपर व मानव्याबद्दल सहानुभूतीपूर्ण असें जें जें कांहीं आहे त्या सर्वांचें पूर्ण भान संत फ्रान्सिसला होतें, असें दिसतें. निसर्गप्रेम, भूतदया, समाजसेवेची आवड, संपत्तीमुळें लोकांत निर्माण होणारे कपट, मद, मोहादि दुर्गुणांचें प्राबल्य, ह्या सर्वांची फ्रान्सिसला उत्तम प्रकारें जाणीव होती. पुढें अनेक शतकानंतर वर्डस्वर्थनें आणि टॉलस्टॉयनें जीं सदाचाराचीं तत्वें प्रतिपादन केलीं, तीं सर्व ग्रहीत धरून फ्रान्सिस त्याप्रमाणेंच वर्तत असे.

एका श्रीमंत व्यापाऱ्याच्या घरीं त्याचा जन्म झाला होता. आणि तरुणपणीं तत्कालीन फॅशनेबल तरुण ज्याप्रमाणें मौज मजा करीत, रंगेल जीवन कंठीत असत, त्याप्रमाणें सुरुवातीला तोही करीत असे व त्या सर्वांचा तो म्होरक्या मानला जात असे. पण या काळींही त्याच्या अंगीं वैराग्य आणि साधुत्व यांचीं बीजें सुप्तावस्थेंत होतीं. बापाच्या दुकानावर बसला असतांना एक दिवस एक खूप श्रीमंत व एक अत्यंत भिकारी असे दोन इसम दुकानावर आले. त्या श्रीमंत गिऱ्हाइकाशीं बोलण्यांत हा गुंतलेला असल्यामुळें ह्याला त्या भिकाऱ्याकडे लक्ष देतां आलें नाहीं. त्यामुळें कंटाळून तो भिकारी तेथून निघून गेला. ही गोष्ट लक्षांत येतांच श्रीमंत गिऱ्हाइकाबरोबरचे आपलें काम आटोपून तो दुकान सोडून दूरवर धांवत धांवत त्या भिकाऱ्याचा पाठलाग करीत गेला आणि त्याची क्षमा मागून त्यानें त्याला पुष्कळ द्रव्य दिलें. एकदां उंची पोशाक करून तो घोड्यावर बसून रपेटीला जात असतांना समोरून एक महारोगानें अत्यंत विद्रूप बनलेला मनुष्य येतांना त्याला दिसला. त्यानें ह्याला नमस्कार केला व हात पसरून भीक मागितली. क्षणभर ! फ्रान्सिसच्या मनांत शिसारी आली व घोड्याला टांच मारून तेथून निघून जाण्याचा विचार त्याच्या मनांत आला. पण तो केवळ क्षणभरच ! लगेंच त्याची स्वतःची स्वतःलाच लाज वाटली. तो घोड्यावरून खालीं उतरला. भिकेसाठीं पुढें केलेल्या त्या महारोग्याच्या हाताचें त्यानें चुंबन घेतलें व त्यानंतर त्याला कडकडून मिठी मारली व जवळ होतें नव्हतें तें सर्व द्रव्य त्याला देऊन टाकलें. ह्या क्षणापासून त्याच्या मनांत दृढ वैराग्य प्रतिष्ठित झालें. त्याची वृत्ति पार पालटून गेली. पूर्वीचा तो शोकीन, रंगेल, हंसणारा खिदळणारा व चैन करणारा फ्रान्सिस नाहींसा झाला. त्याच्या गांवाशेजारचें एक देऊळ ( सान दामियानो ) पडून गेलें होतें. त्याची दुरुस्ती करण्यास त्या देवळाच्या पुजाऱ्याजवळ द्रव्य नव्हतें. फ्रान्सिसच्या मनानें तें देऊळ दुरुस्त करणें हें आपलें कर्तव्य आहे, असें घेतलें. आपला बाप बाहेरगांवीं गेला असतांना एक दिवस फ्रान्सिसनें दुकानांतील उंची उंची माल घोड्यावर घालून बाजारांत नेला आणि केवळ तो मालच नव्हे तर घोडाही पण-आलेल्या किंमतीला विकून टाकला. देवाचे देऊळ-प्रार्थनेची जागा-अशा तऱ्हेनें पडीत राहूं देणें योग्य नाहीं. म्हणून तें देऊळ दुरुस्त करण्यासाठीं तो सर्व पैसा त्यानें देवळाच्या पुजाऱ्याच्या स्वाधीन केला. इतकें द्रव्य हा विक्षिप्त मनुष्य आणून देतो तें घ्यावें कीं

* **टीप**—Horace shipp ह्यांच्या 'Faiths that move the world' या ग्रंथांतील. पृ. ३२

नाहीं ह्या शंकेनें पुजाऱ्यानें तें घेण्याचें नाकारलें. फ्रान्सिसनें तें सर्व द्रव्य देवळांतील एका कोनाड्यांत फेकून दिलें व तो तेथून निघून गेला. पुढें थोडे दिवसांनी घर सोडून एक दोन दिवस तो देवळांतच रहायला गेला. गुरु नानकाच्या चरित्रांतील अशीच गोष्ट वाचकांच्या लक्षांत येईल.

फ्रान्सिसच्या बापाला अर्थात्च हें मुळींच आवडलें नाहीं. त्याच्या मनांत फ्रान्सिसनें आपल्या मागें आपला व्यापार धंदा उत्तम सांभाळून नांवलौकिकास चढावें, अशी दृढ इच्छा होती. पण मुलाचे गुण वेगळेच होते. तो अत्यंत मोठ्या नांवलौकिकाला चढला खरा—त्याचें नांव ख्रिस्ती धर्माच्या इतिहासांत अजरामर झालें ! पण बापाला जो नांवलौकिक हवा होता तो वेगळा. फ्रान्सिस बापाला फार भीत असे. तेव्हां त्याच्या बापाच्या मनांत आशा होती कीं, एकदां चांगली खरडपट्टी काढली किंवा एकादी मुस्कुटांत दिली कीं, मुलगा आपोआप ताळ्यावर येईल. त्यानें मुलाला रागावून, धाकदपटशा दाखवून 'कांहींच वळत नाहीं' असें पाहिल्यावर मुलावर चोरीची फिर्याद दिली. प्रकरण इतकें विकोपास गेलें कीं, सर्व लोकांसमक्ष फ्रान्सिसनें बापाचे नुसते सर्व पैसे परत केले–एवढेंच नव्हे, पण अंगावरचे सर्व कपडेही बापाचे होते म्हणून उतरून ठेऊन बापाच्या स्वाधीन केले. इतःपर 'आकाशांतील बाप' हाच माझा बाप–हा माझा बापच नव्हे असें त्यानें लोकांस ओरडून सांगितलें, व तो उघड उघड घर सोडून त्या पडक्या देवळांत जाऊन राहूं लागला. ज्या गांवांत तो मोठमोठ्या मेजवान्या देत असे, राग रंग करीत असे व सर्व श्रीमंत लोक स्वतःभोंवतीं गोळा करीत असे, त्यांच गावांत तो पोटासाठीं भाकरीचा कोरडा तुकडा भीक मागून गोळा करूं लागला. त्यानें देवळासाठींही लोकाजवळून दगड वगैरे मागून अंग मेहनतीनें तें पडकें देऊळ दुरुस्त केलें. तेव्हां गांवांतील एक दोन सद्गृहस्थ त्याला थोर व विरक्त मानू लागले. कांहींजण त्याला वेड्यांत काढीत; पण हळूहळू त्याच्या वैराग्याची व लोकसेवेची लोकांवर चांगलीच छाप बसली. पुढें त्याचा मोठा पंथ झाला व त्या पंथाला पोपकडून मान्यताही मिळाली. असीम अपरिग्रह, ब्रह्मचर्यव्रत व आज्ञापालन हीं त्याचीं तीन व्रतें होतीं व या व्रतांचें अत्यंत कडकडीतपणें त्यानें आजन्म पालन केलें.

हळूं हळूं त्यानें आपले तीन प्रकारचे शिष्यवर्ग स्थापन केले–पहिला फ्रायर्स मायनर्स–हे कडक संन्यस्त अनुयायी; दुसरा स्त्रियांसाठीं–तो त्याच्या व त्याची पहिली स्त्री अनुयायी संत क्लेअर हिच्या प्रयत्नानें स्थापित झाला; व तिसरा संसारांत राहून शक्य तेवढे संत फ्रांसिसच्या तत्त्वांचें आचरण करणारे सर्वसाधारण लोक. पहिल्या वर्गांतील अनुयायांना आज्ञाधारकपणा, ब्रह्मचर्य व अपरिग्रह ही व्रतें कडकपणें पाळावीं लागत. दुसऱ्या वर्गाची म्हणजे—स्त्रियांच्या पंथाची स्थापना करणारी संत क्लेअर—ही तरुणी ऍसिसीच्या आसपासच्या एका फार श्रीमंत व उच्च घराण्यांत जन्मलेली होती व श्रीमंतींत कालक्रमणा करणाऱ्या तत्कालीन तरुणींप्रमाणेंच तिचा जीवनक्रम असे; पण तिचा स्वभाव मोठा करारी व निश्चयी असल्यामुळे घरांतील वृद्ध माणसेंही तिला वचकून असत. तिला फुलांची व संगीताची फार आवड होती; परंतु तिच्या मनांत दृढ वैराग्य होतें. ती जेव्हां प्रथम संत फ्रान्सिसला भेटली, तेव्हां तिचें वय केवळ १८ वर्षांचें होतें. ह्या भेटींतच एकमेकांच्या पवित्र हृदयाची साक्ष एकमेकांना पटली. त्यापूर्वी वडिलांनीं तिचें लग्न करण्याबाबत पुष्कळ वेळा तिला आग्रह केला होता, पण तिनें प्रथमपासूनच ह्या बाबतींत टाळाटाळ केली व ती लग्नाला कबूल झाली नाहीं.ती संत फ्रान्सिसला मधून मधून भेटत असे. एका सणाच्या रविवारीं रात्रीं ती आपल्या विश्वासू मित्रांबरोबर, लग्नप्रसंगीं करतात तसा उत्तम पोषाख करून, बापाच्याघरांतून मागील दरवाजानें निसटून गेली व संत फ्रान्सिसच्या पंथास मिळाली. संत फ्रान्सिस व त्याचे भिक्षुक जेथें होते त्या देवळांत ती गेली. तेव्हां तिचें स्वागत करण्यासाठीं ते सर्व पेटलेल्या मशाली घेऊन उभे होते व फार प्रेमानें सर्वांनीं तिचें स्वागत केलें. त्या रात्रीच्या वेळीं तिनें स्वतःला देवाला वाहून घेऊन दीक्षा घेतली आणि जे नियम व जीं व्रतें फ्रान्सिसच्या पंथांतील पुरुषांनीं मान्य केलीं होती, तींच सर्व तिनेंही मान्य केलीं. तिच्या अंगीं कडकडीत वैराग्य होतें. बापाच्या घरीं एवढ्या श्रीमंतींत राहिलेली पण आतां तिनें भिक्षान्नावर निर्वाह करण्यास व अत्यंत वैराग्यानें हालांत राहण्यास सुरुवात केली. संत फ्रान्सिसनें तिचा सुंदर केशकलाप सर्व कापून टाकला व ती एकटीच जवळच्या एका मठांत राहूं लागली. कांहीं दिवसांनी तिची धाकटी बहीणही अशीच तिच्याकडे पळून आली. घरच्या माणसांनी तर आतां फार आकांत केला. धाकट्या बहिणीला ते फराफरा ओढून नेऊं लागले. तेव्हां क्लेअर तिच्या पाठीशीं उभी राहिली. तिच्या निश्चयी मुद्रेला भिऊन घरची मंडळी या दोघींचा नाद सोडून निघून गेली.

या दोघी बहिणींना दुसऱ्या पुष्कळ स्त्रिया येऊन मिळाल्या. व त्यांनीं फ्रान्सिसच्या पंथाची दीक्षा घेऊन स्त्रियांसाठीं (दुसरा वर्ग) एक निराळा मठ स्थापन केला. पण त्यालाही सर्व नियम फ्रान्सिसनेंच घालून दिले व पोपची मान्यता मिळवून दिली. तिसरा संसारी लोकांचा वर्गही आपआपल्या शक्तीप्रमाणें फ्रान्सिसच्या उच्च नीतितत्वांचे परिपालन करीत असे. फ्रान्सिसचें चरित्र अत्यंत मनोरम आहे. क्लेअरच्या वैराग्याला मिराबाईच्या वैराग्याचीच उपमा देतां येईल. याप्रमाणें या पंथानें नीतितत्वांचा व धर्मबुद्धीचा फार झपाट्यानें प्रसार केला. फ्रान्सिस १२२६ सालीं, आक्टोबर महिन्यांत, दिनांक ४ रोजी मरण पावला. त्याचें कार्य नीतिप्रसाराच्या दृष्टीनें अमोल होतें. त्याचें यथायोग्य मूल्यमापन जी. के. चेस्टर्टन यांनी आपल्या St Francis of Assisi नामक ग्रंथांत सुंदर केलें आहे. पण फ्रान्सिसचें सविस्तर चरित्र व पवित्र जीवनक्रम जाणण्याची ज्यांना इच्छा आहे, त्यांना Father Cuthbert यांचा St Francis of Assisi या नांवाचा ग्रंथ फार उपयुक्त वाटेल.

—अखेर

# संपादकीय

भारत गण राज्याचें उपाध्यक्ष डॉ. एस्. राधाकृष्णन् यांचीं कित्येक भाषणें उत्स्फूर्त, विचार-परिफुल्ल, मनाला विचार करावयास लावणारीं व म्हणून मोहून टाकणारीं अशीं असतात. लहानपणीं कॉलेजांत आम्ही विद्यार्थी असतांना त्यांनीं फर्ग्यूसन कॉलेजच्या अँफीथिएटरांत बरोबरच ४५ मिनिटें भाषण केलें. त्यांची मुद्देसूद मांडणी, उत्तम इंग्रजी भाषा, कृत्रिमतेचा अभाव व संथ वाहणारा वक्तृत्वप्रवाह, त्यांची शान्त व स्थिर भासणारी मूर्ति वगैरेनीं त्यावेळीं त्यांच्या भाषणानें फार मोठा परिणाम झाला. त्यांचीं भाषणें, व ग्रंथ हीं मुख्यतः तत्वज्ञान व जीवन-मीमांसा यावर केलेलीं असल्यामुळें त्यांचें महत्त्व प्रासंगिक नसून चिरकालीन असतें. 'अरुणोदय संगीत नाट्य मंडळीचें' विजय वाडा येथें मागील महिन्यांत झालेलें संमेलन प्रसंगीं अध्यक्ष स्थानावरून त्यांनीं जें भाषण केलें तें विचारार्ह आहे. जगांतील ज्या मोठमोठ्या कलाकृति आज उपलब्ध आहेत त्या सर्व वर्ण्यविषयांशी पूर्ण तादात्म ऊर्फ समाधि लागल्याविना झालेल्या नाहींत, असा त्यांच्या भाषणाचा मुख्य मुद्दा होता. सविकल्प व निर्विकल्प समाधि असले शब्दप्रयोग आपण वारंवार करतों. तात्यासाहेब केळकरांनीं वाङ्मयाची व्याख्या करितांना "सविकल्प समाधि" हा शब्द वापरला आहे. उपाध्यक्ष म्हणाले–कितीहि मोठे, विद्वान् किंवा उच्चस्थानापन्न गृहस्थ प्लॅटफार्मावर भाषणें करोंत, पण त्यांच्या भाषणांनी आपल्या देशाच्या उन्नतीस मदत होणार नाहीं. प्रत्येक माणसाला कांहीं तरी नियतकार्य करावयाचें असतें व भगवान् कृष्णाना जरी लोक ईश्वर मानतात, तरी त्यांनांसुद्धां तें कर्तव्य करावें लागलेंच. निव्वळ देवाची पूजाकरणारा तोच परमेश्वराचा भक्त म्हणतां येणार नाहीं. पण त्याबरोबर आपण मनुष्य प्राणी म्हणून आपलं वैयक्तिक कर्तव्य केल्या शिवाय त्याला तरणोपाय नाहीं. शिक्षण ही जगांतील अत्यन्त महत्वाची गोष्ट आहे तुम्ही कितीहि मोठी धरणें बांधा, नागार्जुनी कोंडासारखें पाणी सांठवा, नवीन नवीन यंत्रें बनवा; पण जर तुम्हाला मानवी प्राण्याच्या गुणांमध्यें इष्ट तो फरक करवितां येणार नाहीं, तर त्या राष्ट्रीय योजनांचा कांहीं उपयोग नाहीं. आज रशिया किंवा अमेरिका काय करून राहिलीं आहेत. ? तिकडे दृष्टिक्षेप करा. त्यांच्या शास्त्रीय प्रगतींत कोणती उणीव आहे ? त्यांनीं कृत्रिम चंद्र अन्तराळांत सोडले आहेत. अणुशक्तीला विविध स्वरूपांत कार्याला जुंपली आहे; व दैनंदिन गरजा भागविल्या आहेत. पण ते सर्व लोक आज भीतिग्रस्त जगांत वावरत आहेत व उद्यां काय होणार आहे, याची त्यांना जाणीव नाहीं. जर आपण आपली झालेली शास्त्रीय प्रगति योग्य मार्गानें चालू ठेवली तर जगाच्या अन्नाचा प्रश्न सहज सुटेल. धंदेशिक्षण आणि विज्ञान यांतील प्रगतीचें रूपान्तर मानवी प्रजेच्या हितार्थ करण्याची इच्छा दर्शविली तर आमच्या सुधारणेला दुसरी जोड राहणार नाहीं. आणि इतकें करूनहि आपण स्वयंपूर्ण होऊं काय ? नाहीं. माणसाच्या स्वभावामध्यें एक प्रकारचा हतभागीपणा करंटेपणा, व हट्टीपणा आहे. जीवनाच्या उपमानापासून च्युति झाली असून बेशिस्तपणा सर्वत्र नंगानाच घालीत आहे ! जगांतील सुधारलेल्या राष्ट्रांत एकमेकाविषयीचें वैर व भीति हीं दिसून येतात ! जर मानवाचा धर्म व मन संपूर्णतया बदलावयाचें असेल तर शिस्तवारपणा व शिक्षण यांची जाणीव मनांत बिंबवली पाहिजे. आमच्या घरांत जर आम्हीं पंचशीलें पाळूं शकलों नाहीं तर बाहेरच्या जगाला त्यांचे पाठ देण्यांत काय स्वारस्य आहे ? अंतरराष्ट्रीय नीतीचें पुस्तक भगवान बुद्धानीं लिहिलें नाहीं. त्यांनीं फक्त पांच शीलें पाळावयास सांगितलीं. जीवनाचा सर्व नूर बदलला पाहिजे. आपण प्रत्येकांत विसृजनशक्तीचा अंकुर आहे; पण आमच्यांतील **स्वार्थबुद्धि** सदैव खेळती आहे, म्हणून आज समाजसेवेची वृत्ति आमच्यांत नाहीं, सार्वजनिक नीतिमत्ता खालावली आहे व सर्वत्र डांवपेच व उलाढाली बोकाळल्या आहेत. जर लोकांनीं हीच परिस्थिति कायम ठेवली; तर भविष्यकाळीं आत्मनाश निश्चित आहे." डॉ. राधाकृष्णन् यांनीं आजच्या परिस्थितीची जी कठोर चिकित्सा केली ती वाचून प्रत्येक विचारी माणसाचे डोळे उघडले पाहिजेत. स्वातंत्र्याचीं ११ वर्षें भोगून आम्ही काय मिळविलें ? अजून विचार करा, शुद्धीवर या व विनाश टाळा, असाच सरळ उपदेश डॉ राधाकृष्णांनीं केला आहे. विचारी माणसाचें अन्तरंग पिळवटून टाकणारी ही परिस्थिति आहे ! भारत दुर्दैवी कीं सुदैवी !

× × ×

जून महिन्याच्या शेवटच्या आठवड्यापासून मुंबईवर वरुण राजानें वाजवीपेक्षां ज्यास्त मेहेरनजर फेंकली आहे व ती अद्यापहि कमी झाली नाहीं. जून महिन्यांत एकंदर ३३·९६ इंच पाऊस झाल्याची नोंद आहे. ३१ वर्षांत जून महिन्यांत एवढा पाऊस पडला नव्हता ! अझूनहि पावसाचा जोर कमी झाला नाहीं. २४ जूनला मुसळधार पाऊस पडत असताना मुंब्रा व दिवा या स्टेशनच्या दरम्यान एक वीज गाडी सिग्नलची वाट पहात होती. तोंच त्याच रूळावरून कल्याणकडे भरवेगांत जाणारी दुसरी वीजगाडी पहिलीवर आदळली ! मागच्या वीजगाडीचा तरुण ड्रायव्हर श्याम आपटे जागच्या जागी ठार होऊन त्याचे तुकडे झाले ! ४ इसम ठार झाले. ३३ जखमी झाले. अशा अपघाताच्यां नांदीत पावसाळा सुरू होऊन रत्नागिरी, कुलाबा, उंबरगांव, डहाणू, ठाणें, येथें अजूनहि तो थैमान घालीत आहे. गाड्यांची खोटी, रूळावरून पाणी, लोकांचे हाल व पाण्यातून चालणें वगैरे गोष्टी नेहमींच्याच होऊन बसल्या आहेत ! मुंबईला जो पाऊस कोसळत आहे, त्याचीच एक पुरवणी म्हणून पायधुणी भागांत काल ( ९ जुलै ) एक इमारत कोसळली व आणखीहि ५ इमारती पडल्या ! दोन लोक ठार व ३ जखमी झाले ! मुंबईतील पावसाळयांची दुःखें कमीं कशी करतां येतील,

हा मोठा प्रश्न सरकार व नगरपालिका यांनी सोडवावयाचा आहे. मुंबईची वस्ती अफाटपणें वाढत आहे, व जागा अपुरी झाली आहे. त्यामुळें गरीब जनतेनें किती हाल अपेष्टा सोसावयाच्या, त्याला कांहींतरी परिमिति पाहिजे. यांतच लोकांची संपाची धामधूम व तज्जन्य सर्व प्रकार ! अशावेळीं असें वाटावयास लागते कीं, निसर्ग हा माणसांवर सूड घेत आहे कीं काय ? त्याला कारणें कोणतीं ? निसर्गाच्या सुव्यवस्थेंत माणसानें प्रकाण्ड बिघाड करण्याचा अवास्तव प्रयत्न चालविला. त्यामुळें निसर्गाचा कोप पृथ्वीवर थैमान घालून माणसाच्या अहंभावाला उत्तर देत आहे ! माणूस, निसर्ग, व मानसिक सृष्टि यांचे संवादन झाल्याविना सृष्टीची विसकटलेली घडी बसणार नाहीं ! पण हें घडून येणार कसं ? भविष्य काळावरच दृष्टि दिली पाहिजे.

× × ×

हंगेरीचे भूतपूर्व प्रधान मंत्री **इम्रे नागी** यांना, त्यांचे बरोबरच्या कांहीं सहकाऱ्यांसह फांशी देऊन हंगेरीच्या साम्यवादी राज्यकर्त्यांनीं लोकशाही व मानवीमूल्यें यांना पायाखालीं तुडविलें आहे. या हत्याकांडाचा निषेध सर्व जगांत सर्व पक्षांनीं व सर्व देशांनीं असंदिग्ध भाषेंत केला आहे. " Cougress for Cultural Freedom " या संस्थेनें या बाबतींत विश्वसनीय हस्तपत्रकें काढून या अंधारांतील कृत्यावर विदारक प्रकाश टाकला आहे. या हस्तपत्रकांत प्रथम इम्रेनागी व त्याचा सेनाधिपति यांना फांशी देण्यांत आलें. तो वृत्तान्त संपूर्णतया दिला आहे. नंतर "इम्रेचें इतिहासांतील स्थान " हा उतारा दिला आहे. त्यांतील शेवटचें वाक्य असें आहे :—

"He has shown himself a brave and honest man and a true patriot, unusual qualities in a leading Communist. He will have his place in the history of his own country and of Europe."

राजकारण हा " धर्मचक्रा " चा प्रान्त नाहीं. पण नैतिक मूल्यांच्या दृष्टीनें राजकारणाचें मूल्यमापन करणें, ही गोष्ट त्याच्या कक्षेंत येऊं शकते. साम्यवादी राष्ट्रांबद्दल अगोदरच लोकांच्या मनांत विपरीत भाव आहे, ही गोष्ट लपवून ठेवण्यांत हंशील नाहीं. साम्यवादी लोकांची विचारसरणी व तिचें ध्येय याबद्दल पुष्कळांच्या मनांत आदर आहे; पण त्यांचें मार्ग व ते वापरीत असलेलीं साधनें हीं सुधारलेल्या राष्ट्रांना—मानवी जीवनाची उदात्तता व त्याची भव्यता पटणाऱ्या सर्वांना—मान्य नाहींत. वैयक्तिक स्वातंत्र्य व वैयक्तिक विचार करण्याची मुभा हीं मानवास मिळालीच पाहिजे. लोकशाही राष्ट्रें व समाजसत्तावादाचा पाठपुरावा करणाऱ्या राष्ट्रांत या अमानुष कृत्यानें शिसारी उत्पन्न होऊन धक्का बसला आहे. इम्रे नागीची फांशी कितपत नैतिक मूल्यांच्या दण्डकानें समर्थनीय आहे, हा महत्वाचा प्रश्न आहे. सोविएट रशिया संबंधी कुठें हळूहळू या देशांत एक प्रकारची आपुलकी वाटावयास लागली होती. भारताचे पंत प्रधान पंडित जवाहरलाल नेहरू हे रशियांत जाऊन यशस्वी दौरा करून आल्यापासून व बुल्गानिन यांनीं भारताला भेट दिल्यापासून भारत व रशिया हे **सांस्कृतिक दृष्ट्या** जवळ येण्याचा प्रयत्न करूं लागले आहेत. आमची शिष्टमंडळें व कलावंत रशियांत जाऊन तेथील जनतेची मैत्री संपादन करीत आहेत. पण मागील वर्षांची हंगेरींतील घटना व आज इम्रे नागीचा वध या योगानें सोविएत यूनियनशी वागतांना भारत " सावध " पणानें वागून राहील !

अर्थात खरें काय व खोटें काय हें ओळखणें शक्य नाहीं. पण Stephen Spender या लेखकांचीं खालील वाक्यें उद्बोधक वाटतात:—

"In the very difficult times in which we live, we have to be grateful to every one who tells or who points to us the Truth. And for this reason besides feeling the horror of the death of Imre Nagy and his colleagues, and the horror of our refusal or inability to save them, we also have to thank them. **They have shed a very bright light indeed on the minds of the rulers of the Neo.-Stalinist regimes.**"

आमच्या भारतीय तत्वज्ञानाप्रमाणें आत्मा स्वतंत्र व अमर आहे. इम्रे नागी यांचा पंच भौतिक देह गेला असेल; पण त्याचा आत्मा व त्यानें दाखविलेलें मानव्याचें उज्ज्वल स्वरूप हीं अविस्मरणीय राहतील. नैतिक दृष्टया हें मूल्यमापन सम्यक् ठरेल !

× × ×

शनिवार, ५ जुलै रोजीं " महापौरांच्या स्वातंत्र्य वीर सावरकर अमृत महोत्सव समिती " च्या विद्यमानें एक प्रकट सभा कावसजी जहांगिर हॉलमध्यें सायंकाळीं भरली होती. त्यावेळीं श्री. मिरजकर महापौर हे अध्यक्षस्थानीं होते. त्यावेळीं स्वातंत्र्यवीरांना रु. ११, १११ ची थैली अर्पण करण्यांत आली. तेथें त्यांनीं केलेलें भाषण फारच मननीय आहे. ससैनिकीकरणाचें ध्रूपद गाळून राष्ट्रांतील लोकांनीं काय करावयास पाहिजे, हें त्यांनीं आपल्या भाषणांत सांगितलें. ते म्हणाले—आपण माझा 'वीर' म्हणून जो सत्कार केलांत, त्या प्रसंगानें मला स्पार्टन लोकांची आठवण होते. एका स्पार्टन वीरानें आपल्या मरणसमयीं असें लिहून ठेवलें होतं कीं, " माझ्यापेक्षां जास्त योग्य देशभक्त हा देश खात्रीनें उत्पन्न करील. " माझें मन हि त्याच विचारानें धांवत आहे. स्वातंत्र्याच्या युद्धाचे कामीं माझ्या पिढींतील लोकांनी आपला वाटा उचलला होता. वर्तमान व भविष्यकाळांतील तरुण पुरुष व स्त्रियांनीं आमच्याकडून स्फूर्तीची अपेक्षा करू नये. त्यांनीं आम्हाला आज एवढें आश्वासान द्यावें कीं, आज जें स्वातंत्र आम्हीं मोठ्या श्रमानें मिळविलें आहे, तें राखून संघटित करण्याचें कामीं कोणताहि प्रयत्न केल्याविना आम्हीं राहणार नाहीं. व भारताला जगांतील 'पहिल्या दर्जाचें राष्ट्र' म्हणून बनऊन दाखूं. एवढें आश्वासन जरी आज आम्हांस त्यांचेकडून मिळालें तरी आमच्या श्रमाचें भरपूर सार्थक झालें असें मी समजेन.' भारत सरकार देशाचें संरक्षणासाठीं भरभक्कम सशस्त्र दल तयार करण्यांत यशस्वी झालें नाहीं, याबद्दल त्यांनीं खेद व्यक्त केला. तरुणपिढीनें सैन्यांत प्रवेश करून देशाच्या संरक्षणास मदत करावी, असा त्यांनीं तरुणांना उपदेश केला. बॅ. सावरकर यांनीं आपल्या ७५ वर्षांच्या अनुभवानें केलेलें निदान बरोबर आहे. तरुणपिढी कार्यक्षम व कर्तव्यदक्ष झाल्याविना देशाचें भवितव्य उज्वल होणार नाहीं. त्याबरोबरच दुसऱ्याच्या शिकवणीची अपेक्षा न करितां आत्मोद्धार करून घेतला पाहिजे. "उद्धरेदात्मनात्मानं नात्मानं अवसीदयेत्" देशाचें मोठेपण तरुण पिढीवर अवलंबून आहे. राष्ट्राच्या प्रगतीची नौका या शिडांनींच पुढें आक्रमण करीत असतें. राष्ट्रासाठीं त्याग, सर्व राष्ट्र समता, बंधुभाव, जीवनशुद्धि व त्याग करण्याची तयारी दाखवली तर सावरकरांची आशा सफल होईल! आम्हीं अशी प्रार्थना करतों कीं, ते आपली आशा सफल झाली, हें पाहण्यास निकोप राहोत !

× × ×

'श्री तुकाराम विश्वविद्यालय संघानें' श्रीतुकाराम महाराजांच्या जीवनाकडे व जीवन कार्याकडे पाहण्याचा निराळा दृष्टिकोन स्वीकारल्यापासून सांप्रदायिकतेला बराच पायबंध बसला आहे. श्री तुकाराम महाराजाचें जीवन कार्य म्हणजे विश्वधर्मीच्या तत्त्वांची शिकवण देणें हें होय. त्यांचें साक्षात्कार शास्त्र म्हणजे सर्वधर्मांतील सर्व संतांच्या साक्षात्कारशास्त्राचें दालन उघडण्याची गुरुकिल्ली होय, ही आमची निष्ठा दिवसेंदिवस अभिमत होत चालली आहे. "महाराष्ट्र"च्या मे च्या अंकांत "साधुसंताची शिकवण" याशीर्षकाखाली एक लेख आला आहे. त्यांतील आरंभीचें चित्र उद्बोधक आहे. त्यांत तुकाराम, रामदास याबरोबर येशूखिस्त व गौतमबुद्धही गोंवला आहे. ही अभिनव घटना आहे. याशिवाय सांप्रदायिकतेवर आघात करणारी दुसरी घटना म्हणजे श्री. वा. सी. बेंद्रे यांचें तुकोबांच्या संबंधाचें संशोधन होय. "तुकाराम महाराज यांचे संत सांगाति" ह्या आपल्या ग्रंथांत त्यांची ऐतिहासिक दृष्टि व शास्त्रशुद्ध चिकित्सा करण्याचा संकल्प अभिनिवेशानें दिसून येतो. सांप्रदायांत शिरलेल्या खुळचट दंतकथा, अश्रद्धेय निष्ठा वगैरे वर प्रहारकरण्यासाठींच हें संशोधन आहे कीं काय, असें वाटतें. श्रीतुकाराम महाराजांच्या जीवनावर जर खराखुरा व यथार्थ प्रकाश पडावयाचा असेल, तर आम्हीं वारंवार म्हटल्याप्रमाणें "सन्तजीवन विकास शास्त्र" हें दालन उघडलें जाऊन त्यांत सर्वधर्मीय संतांच्या जीवनाचें सम्यक् विश्लेषण होऊन त्यापासून या शास्त्रांतील सामान्य सिद्धांत व बिनचूक नियमनें हीं शोधून काढलीं पाहिजेत. या साठीं या सर्वधर्मीय सन्तांचें संपूर्ण व अद्यावत् वाङ्मय येथें एकत्रित झालें पाहिजे. असें व्यापक ग्रंथालय प्रस्थापित झालें पाहिजे. व हाच उद्देश श्रीतुकाराम विश्वविद्यालयाचा आहे. अशा उद्देशाच्या सिद्धीसाठीं मदतकरणें हें प्रत्येक उदार संतप्रेमी सज्जनांचें कर्तव्यच ठरतें! कल्पना प्रथम कोणाची? हा प्रश्न गौण आहे!

× × ×

भारत स्वतंत्र झाल्यामुळें आतां आपल्या समाजाच्या सर्व थरांची संपूर्ण माहिती आपण मिळविण्याचा प्रयत्न केला पाहिजे. आज पर्यंत आम्ही फक्त "पांढरपेशा" वर्गाकडेच आकृष्ट होत होतो. पण ज्यांना "उपेक्षित" "अवहेलित" "परित्यक्त", अशा विशेषणांनीं संबोधत होतों त्या समाजांतील माणसेंहि आमच्या सारखींच आहेत. त्यांनाहि जीवन कर्तव्य आहे, व त्यांची उत्तम समीक्षा करून त्यांच्या उन्नतीसाठीं व त्यांना उच्च पातळीवर आणण्यास काय करता येईल, हाही विचार आम्हीं सर्वांनीं करण्याची वेळ आतां आली आहे. या दृष्टीनें "सोलापूर समाचार" मध्यें "वडार समाजाचा परिचय" हा एक फार वाचनीय लेख प्रसिद्ध झाला आहे. ते लोक अनादि कालपासून भारतांत रहाणारे असून ते शिवोपासक आहेत असें समजतें. पूर्वी या लोकांनीं राज्यहि केलें. बालनागम्मा या बंदीवान् राणीच्या पुत्रानें, जादूगारास ठार करून आईची सुटका केली व तो एक सर्व श्रेष्ट राजा झाला! नागम्मा देवी बनली व तिची लोक पूजा करूं लागले. त्यांची संस्कृति पुढें लुप्त होऊन ते परागन्दा झाले, कंगाल बनले, गावोगांव भटकूं लागले, व्यसनाधीन झाले. खाणकाम, घडईकाम, व पाथरवट असलीं कामें ते आज करीत आहेत. हे काबाडकष्ट करणारे पण प्रकृतीनें निकोप आहेत. त्यांच्यात शीलसंवर्धनाची काळजी घेतली जाते. पुरुष व स्त्री यांचें सहजीवन आज दिसत असले, तरी त्यांच्यांत स्त्री-पावित्र्य व पातिव्रत्य उच्च प्रकारचें आहे. त्यांच्यांत पुष्कळ पतिव्रता होऊन गेल्या. त्यांच्या मागासलेल्या जीवनाची सुधारणा करण्यासाठी त्यांच्यांतील कांहीं सूज्ञ व पुढारी लोक पुढें येत असून त्यांनीं 'भजनी मंडळें' स्थापन केलीं आहेत. ज्ञानार्जनाचें कार्य सुरू केले आहे. इ. स. १९२० मध्यें 'वडार सभा संस्था' निर्माण झाली. पंढरपुरास त्यांची वाडी जाते. तेथें त्यांनीं एक मठ स्थापन केला आहे व्यायामशाळा स्थापून शरीराचें बल वाढविण्याचे प्रयत्न सुरू आहेत. हा वडार समाज उन्नत होऊन एकसंधी झाला. म्हणजे तो राष्ट्राला भूषणभूत होईल. सरकारनें अशा जमातीना त्याची जाणीव करून दिली पाहिजे. उदा०— साताऱ्यांतील जलमंदीरांतील देवांची मूर्ति चोरणारे हें "बावरी" कोण? त्याचाहि समाजशास्त्रीनें एकाकाळीं वजनदार असला पाहिजे. समाज सेवक व समाजशास्त्रज्ञ यांनीं ह्या समाजांना मानवांत आणून त्यांना माणसाचें स्थान कसें प्राप्त होईल असे प्रयत्न जर चालविले तर राष्ट्रांतील ही उपेक्षित प्रजा राष्ट्राला उपकारक व राष्ट्राच्या भरभराटींत भाग घेणारी अशी ठरेल. या दृष्टीनेंच आम्हीं वडार समाज संबंधीच्या या लेखाचें स्वागत करतों.

× × ×

पूज्य विनोबांची पदयात्रा आतां मराठवाड्यांतून सुरू असून ती खानदेशांत जाणार. मागील अंकांत त्यांचीं विचारपुष्पें आम्हीं वाचकांना सादर केलीं आहेत. पण त्यांचीं वाचा इतकी सरस सरस वाक्यें उच्चारतें कीं, त्यांनां 'बोलवितां धणी वेगळाची' असेंच वाटूं लागतें. नांदेड येथील त्यांचें मुक्कामांत एका प्राध्यापकानीं त्यांना असा प्रश्न विचारला कीं, शान्ति आणि सैनिक हे दोन शब्द परस्पर विरोधी आहेत; तेंव्हां त्यांनां एकत्र कसें आणावें? "विनोबाचें उत्तर संपूर्णतया दिल्यावाचून आमच्यानें राहवत नाहीं. विनोबाजी म्हणाले—" हे जे परस्परविरोधी शब्द आहेत त्यांनां एकत्र आणणें हाच आपला धर्म आहे. 'त्यक्तेन भुंजीथाः' यांत त्याग आणि भोग हे अगदीं परस्परविरोधी शब्द आहेत. त्यांना एकत्र आणायचे हाच परमार्थ आहे. विष्णूचें वर्णन 'शांताकारं भुजगशयनम्' सर्पाच्या बिछान्यावर निजला असून शांत, असें केलें आहे. चारी बाजूंनीं निर्भयता करून, दारावर पहारेकरी ठेऊन, मऊ बिछान्यावर शांत झोंपण्यांत खरी शांति नाहीं. शेषाच्या बिछान्यावर निजूनहि शान्त राहण्यांत खरी शान्ति आहे. तशी शांति-सैनिकांत असली पाहिजे. वेदामध्यें म्हटलें आहे कीं, 'जे एकत्र येतात व एका बंधनानें भारले जातात त्यांची सेना बनते,' याप्रमाणें एकत्र येऊन काम करण्याचा गुण शांतिसैनिकांत हवा आहे. आणखी एक मुद्दा असा कीं, सेना ही आक्रमक असते. तुम्ही माझ्यावर प्रेम कराल तर मीहि तुमच्यावर करीन, यांत विशेष काय आहे? हें तर जनावरांत देखील असतें. पण समोर द्वेष दिसत असतांना त्यांच्यावर प्रेमाचा हल्ला केला तरच तें खरें प्रेम होईल. मंबाजीनें तुकारामाला दंडुकी घेऊन मारलें. त्या रात्रीं तुकाराम मंबाजीकडे गेला व म्हणाला, 'हातांत दंडुका घेऊन मारण्यानें तुमचा हात दुखावला असेल; मी हात चेपून देऊं का?'—मलाहि हा अनुभव आहे. हातांत कुदळ घेऊन लांकडे फोडतांना फक्त लांकडेच फोडलीं जात नाहींत, तर हाताचीं सालडीं पण निघतात. म्हणून तुकारामाला वाटलें कीं, मंबाजीची इच्छा फक्त मला मारण्याचीच होती; स्वतःच्या हाताला तकलीफ देण्याची नव्हती. तरीहि पण मारतांना ती झाली. म्हणून तुकाराम हात चेपायला गेला. हें प्रेमाचें आक्रमण आहे. आम्ही अजून असें आक्रमण करीत नाहीं.

"लहानपणीं आई मला म्हणायची, 'विन्या तूं सारखा गडबड करत असतोस. तो शेजारचा मुलगा पहा कसा निमूटपणें बसलेला असतो.

कुणाच्या अध्यांत नाहीं कीं मध्यांत नाहीं. ' मी आईला म्हटलें कीं, मेलेला माणूसहि तसाच असतो. कुणाच्या अध्यांत नाहीं कीं मध्यांत नाहीं. आम्ही शेजाऱ्याच्या घरावर दगड मारत नाहीं. एवढीच आमच्यांत शांती असते. पण शांतिसेनेनें अशांतीवर आक्रमण केलें पाहिजे. आज तर अशांतीचेंच आक्रमण चाललें आहे. म्हणून आतां प्रेमाचें द्वेषावर आक्रमण झालें पाहिजे. "

× × ×

हा जुलै १९५८ चा " धर्मचक्रा "चा अंक वाचकाचे हातांत पडला कीं, " धर्मचक्रा"ची **दहा वर्षें** पुरीं होतील. अंगीकृत कार्य येथपर्यंत आल्याचें समाधान संपादकाला मिळेल. त्याशिवाय वाचकांनाहि आपण एक वर्ष अविरतपणें दर महिन्याला भेट देऊं शकलों, ही कर्तव्यपूर्ति व तिनें उत्पन्न केलेला आनंद, हाहि और आहे. मागील वर्षीं ज्या मनाच्या अवस्थेंत तीन महिन्यांचा जोड अंक काढण्याची आपत्ति संपादकावर गुदरली, ती आपत्ती यावर्षी तरी टळली, हीहि सर्वांची कृपा होय. यावर्षी जें वाङ्मय आम्ही वाचकांना वाचावयाला दिलें त्यांत खात्रीनें उच्च विचारसरणी आहे. जर अशा उच्चविचारसरणीचे वाङ्मय वाचण्याच्या मनाच्या अवस्थेंत महाराष्ट्र असेल, तर त्याला खात्रीनें " धर्मचक्र " प्रगत होत आहे, हें आढळून येईल. धर्मचक्र बंद पडूं नये, ही इच्छा अंशतः तरी सफल व्हावी, असें वातावरण आज खास आहे. धर्मचक्राचें वाचनीयमूल्य आम्हीं ठरविण्यापेक्षां मुंबई विभागाच्या " क्यूरेटर ऑफ लायब्ररीज " या अधिकाऱ्यानें तें करून हें मासिक सर्व ग्रंथालयांतून घेतलें जावें अशी शिफारस केली आहे, ह्याबद्दल आम्ही त्याचे आभारी आहोंत. शाळा, कॉलेजें व जिल्हा व तालुका वाचनालयांत जर धर्मचक्राचा प्रवेश झाला, तर ती विचारसरणी प्रसृत होण्यास खात्रीनें मदत होईल, वाचनालयांच्या सांपत्तिक स्थितीची आम्हाला जाणीव आहे;म्हणूनच निम्या वर्गणींत हें मासिक त्यांनां कसं देतां येईल याबद्दलची योजना आम्ही आंखीत आहोंत; जर ती सफल झाली तर नवीन वर्षापासून सर्व वाचनालयांतून धर्मचक्राचा प्रवेश होईल, अशी उमेद आहे. धर्मचक्र हें सांप्रदायनिरपेक्ष आहे, विशिष्टपंथीय नाहीं; त्याची विचारसरणी एकदेशीय नाहीं. म्हणूनच त्याला विषम परिस्थितीला तोंड देणें भाग पडतें. पण आमची भूमिका जगाला पटावयास लागली आहे व त्याच विचारसरणीनें जगाचें पाऊल पडत आहे. विकृति ही तात्पुरती अवस्था आहे. ती आज तरी विद्यमान असली तरी ती चिरकालीन नाहीं. मानवजातीची अविभाज्यता, सत्य व अहिंसेची प्रचळ शक्ति, व मानवजीवनांत नैतिक मूल्यांचें सार्वभौमत्व हीं धर्मनिष्ठांचीं ध्येयसूत्रें आहेत; किंवा संताचा मार्ग धर्मचक्रानें चोखाळला आहे. विश्वसंत हेच जगाचें उपकारकर्ते व निरपेक्ष सेवक आहेत, ही त्याची श्रद्धा आहे. जात, वर्ण, भाषा, संप्रदाय यांना मागें टाकून सार्वत्रिक व सर्व संग्राहक भूमिका मिळविणें व भारताच्या नवीन मिळविलेल्या स्वातंत्र्यास याच साधनानीं पुष्ट करणें, हीच त्याची आकांक्षा व तीव्र इच्छा. ' सत्य संकल्पाचा दाता भगवान् ' हें त्रिवार सत्य आहे. पण तें पटण्यास अवधि लागेल. तोंपर्यंत थांबलें पाहिजे. शेवटीं ज्यांच्या सहानुभूतीनें, प्रेमानें, सदिच्छेनें व आशीर्वादानें धर्मचक्रानें ही यात्रा आक्रमिली, त्यांच्याच प्रेमानें, सदिच्छेनें व आशीर्वादानी पुढील यात्रा चालविण्यास धर्मचक्र समर्थ होवों, अशी आशा प्रदर्शित करून पुन्हां एकवार सर्वांचे आभार मानून त्वांना धन्यवाद देतों. भारताचे सर्वांगीण कल्याण व्हावें, हीच प्रार्थना ! सर्वे भद्राणि पश्यन्तु मा कश्चिद् दुःखमाप्नुयात् !"

• • •

# रत्नद्वीपाची कीर्तिगाथा

लेखिकाः—कुमारी कीर्तिदा. य. कॉन्ट्रॅक्टर, अंधेरी

आजचें सिलोन हें फार प्राचीन-काळीं, भारताचाच एक भाग होता, असें जर आज कोणाला सांगितलें तर खरें देखील वाटणार नाहीं. परंतु कांहीं विशिष्ट वनस्पतींच्या साम्यावरून आतां ही गोष्ट सिद्ध झाली आहे. त्याचप्रमाणें दक्षिण भारतांतील मूळ रहिवासी टोडा आणि सिलोनमधील वेद्दा या दोन जमातींतील साम्यावरूनही एकत्वाच्या कल्पनेस अधिक पुष्टी मिळते.

रामायण-कालीं प्रसिद्ध असलेली लंका हेंच आजचें सिंहलद्वीप. सिंहली लोकांची वस्ती बहुसंख्येनें असल्यानें या बेटास 'सिंहलद्वीप' म्हणण्यांत येऊं लागलें, असेंही कांहींचें मत आहे.

ग्रीकांच्या काळीं या बेटाचा 'टेपोब्रान' नांवानें उल्लेख करण्यांत येत असे. टॉलेमी या बेटाचा उल्लेख 'सिमुन्डु' या नांवानें करतो. कालान्तरानें हीं नांवें बदलत गेलीं आणि सेलेडिबा, सेरेन्डीन, सेईलावं, झेईलौ आदि नामाभिधानें धारण करीत करीत शेवटीं सिंहलद्वीपाचे सिलोन झालें.

उत्तर अक्षांश ५° ५५′ ते ९° ५५′ आणि ७९° ४२′ ते ८१° ५३ पूर्व रेखांशामध्यें या बेटाचा विस्तार आहे.

इ. स. पूर्वी ५४३ पासून म्हणजेच राजा विजयाच्या कारकीर्दीपासून सिंहलद्वीपाच्या खऱ्या इतिहासाला सुरवात होते.

कालमानाप्रमाणें आणि नामाभिधानाप्रमाणें सिंहलद्वीपाची राजधानी बदलत गेली. प्रथम अनुराधापूर, पोलोन्नारुव, सिगीरीया, कॅन्डी आणि शेवटी इंग्रज राजवटींत कोलंबो हें राजधानीचें शहर होतें.

इ. स. पूर्वी ४३७ मध्ये राजा पांडुकाभयानें अनुराधापुर शहर वसविलें; परंतु या नगराची सुंदर आणि सुव्यवस्थित मांडणी आणि रचना करण्याचें श्रेय मात्र अशोकपुत्र महेन्द्र यालाच मिळतें. या नगरीची प्रसिद्धी सर्व जगभर पसरली होती. आजही त्या ठिकाणीं इतस्ततः पडलेले प्राचीन अवशेष तत्कालीन शिल्पकला आणि वास्तुकला यांची जाणीव करून देत आहेत. या सुंदर शिल्पावरून आपणांस त्यावेळच्या संस्कृतीचा प्रसार आणि प्रगति यांचा चांगलाच अंदाज बांधतां येतो.

सिंहलद्वीपांत डागोबाची मूळ कल्पना राजा देवानं पियतिस्स यानेंच दाखल केली. हा राजा भारतीय सम्राट् अशोक याचा समकालीन होता. या काळांतील थूपाराम डागोबा हा एक उत्कृष्ट कारागिरीचा नमुना आहे. इ. स. पूर्वी ४ थ्या शतकांत होऊन गेलेल्या राजा महासेनानें अभयगिरी डागोबा बांधला. या डागोबाचें महत्व केवळ डागोबा म्हणूनच नसून तेथूनच अभयगिरी-विचार प्रणालिकेला सुरवात झाली. या विचारप्रणालिकेचें तें एक महत्वाचें केंद्र होतें. इजिप्त येथील तिसऱ्या नंबरचा पिरॅमिड सोडून दिला तर सर्व पिरॅमिडस् पेक्षां हा डागोबा मोठा आहे. अनुराधापुरांतले बुद्धधर्मीयांचे दुसरें एक आदरणीय स्थान म्हणजे रुवनवेली सिमा डागोबा हें होय. या ठिकाणी राणीमंडपांत चंद्रकला (moon stone) असून ते एक सिंहली वास्तुकलेचें विशेष अंग म्हणून ओळखलें जातें. महेंद्राबरोबर आलेली त्याची बहीण संघमित्रा हिनें याच अनुराधापुरांत इ. स. पू. २८८ मध्यें बोधिवृक्षाच्या फांदीचें रोपण केलें.

पुराणतत्वीयदृष्ट्या सिंहल द्वीपांतील पोलन्नारुव हें एक अतिशय महत्वाचें शहर आहे. जरी आज तें ओसाड असलें तरी एका काळीं तें वैभवाच्या शिखरावर होतें. या प्राचीन शहराची कोणी आणि केव्हां रचना केली याबाबत अजून नक्की पुरावे मिळत नाहींत. परंतु ८ व्या ते १० व्या शतकापर्यंत अनुराधापूरचे राजे पोलोन्नारूवाचा उपयोग राजगृह म्हणून करीत असत.

कोलंबोच्या ईशान्येस जवळ जवळ १५८ मैलांवर हें गांव वसलेलें आहे. दक्षिण भारतांतील चौल राजानीं अनुराधापुराचा नाश केला आणि त्यानंतर सिंहलद्वीपीयांची राजधानी पोलन्नारुवा बनली. पुढें राजा पराक्रमबाहूच्या (इ. स. ११५३ ते ११८५) पश्चात् तामीळांनीं या बेटावर हल्ले केले आणि हें सुंदर शहर नाश पावलें.

राजा पराक्रम बाहूची आजही स्मृति देणारा सुंदर शिल्पकलेचा नमुना, असा एक खांब त्या ठिकाणीं आपणांस पाहावयास मिळतो. पराक्रम बाहू म्हणजेच पोलोन्नारूव असें समीकरण त्या काळीं करण्यांत येत असे. या गांवीं उभा असलेला डागोबाही आपणाला तत्कालीन बुद्ध-धर्म-प्रसाराची चांगलीच कल्पना आणून देत आहे. याच ठिकाणीं पराक्रम-बाहूनें बुद्धाच्या दांतावर एक सुंदर मंदीर बांधले होतें. परंतु हल्लीं तो दांत कॅंडी येथें आणण्यांत आला आहे.

येथील प्रेक्षणीय स्थळांत पराक्रमबाहूचा मंडप, लंकातिलक मंदीर, वडाडगे विहार आदि स्थळांचा स्थापत्यकलेचा एक उत्कृष्ट नमुना या दृष्टीनें जरूर उल्लेख करावा लागेल. बुद्धाच्या परिनिर्वाणाची कोरलेली एक सुंदर भव्य मूर्ति देखील येथेंच पाहावयास मिळते. या बुद्धाच्या मूर्तीजवळ एक दुसरी मूर्ति उभी आहे. आणि ती शिष्य आनंदाची असावी असें तेथील बौद्धधर्मीय मानतात. मूर्तीच्या चेहऱ्यावरील भाव पाहिले कीं जणू मूर्ति जिवंतच आहे, असें वाटतें !

इ. स. च्या ५ व्या शतकांत राजा कश्यपानें सिगिरीया जवळील एका डोंगरावर सिगिरीयाचे संरक्षणार्थ एक किल्ला बांधला.

सिगीरीयापासून १० मैलावर डाम्बुल्ल नांवाचें सुंदर गुंफा मंदीर आहे. त्यांत इ. स. पूर्वी १ ले शतक आणि दुसऱ्या शतकांतील शिलालेख वाचावयास मिळतात. शिलालेखांत या गुंफा राजा वलगम यानें बांधल्याचा उल्लेख मिळतो. आणि वैशिष्ट्य हें कीं या शिलालेखांची लिपी आणि अशोक कालीन लिपी यांत आपणांस बरेंच साम्य पाहावयास मिळतें.

डाम्बुल मध्यें एकूण पांच गुंफा मंदिरें आहेत. देवराज विहार, महा-विहार, महाअलुविहार, पश्चिमविहार आणि देवनी अलु विहार. देवराज विहारांत परिनिर्वाण स्थितींतील बुद्धाची ४७ फूट लांबीची सुंदर मूर्ति पहावयास मिळते. महाविहारांत जातक कथांचे सचित्र दर्शन घडतें. तर महाअलुविहारांत १००१ बुद्धांचीं चित्रें पहावयास मिळतात. या विहारांचा काळ जरी दोन हजार वर्षांपूर्वीचा असला तरी तेथील चित्रकाम मात्र इ. स. ८ व्या शतकांतीलच आहे.

कँडींत बुद्धाच्या दांतावर बांधलेलें प्रख्यात 'डालडा मालिगाव' नांवाचें मंदीर पाहावयास मिळतें. या मंदिरांतील कोरीव काम तर आपलें मन थक्क करून सोडतें. ज्या मंदिरांत बुद्धाचा पवित्र दांत ठेवण्यांत आला आहे त्या मंदिराचा दरवाजा सुवर्णाच्या आणि चांदीच्या कोरीव कामांनीं भरलेला आहे. आणि दरवाजाच्या दोन्ही बाजूस हत्ती-दंत लावलेले आहेत. देवमंदिरांत चांदीच्या टेबलावर, सोन्याचें गिलीट दिलेला चांदीचा डागोबा ठेवलेला आहे आणि शेवटच्यांत करंडकांत बुद्धाचा दांत ठेवण्यांत आला आहे.

ऐतिहासिक दृष्टीनें पहाण्यालायक कँडींत 'प्रेक्षक–गृह' असून त्या ठिकाणीं पूर्वी राजे लोक सभा भरवीत असत. या प्रेक्षकगृहाच्या भिंती आणि खांब या वरील कोरीव काम फारच प्रेक्षणीय आहे.

कँडींतील कांहीं इतर मंदिरेंही पहाण्यासारखीं आहेत. मालवत्थ मंदिरांत २९ फूट उंचीचा एक अतिशय सुंदर कोरीव काम केलेला खांब आहे. तर गालमाडुवा मंदिर हें हिंदूधर्तीवर बांधलेलें आहे. या मंदिराचें वैशिष्ट्य म्हणजे दरवाजे आणि खिडक्या यांच्या कमानी हें होय. डेगाल-डोरूवा हें मंदिर सिलोनमध्यें सर्वांत प्रसिद्ध मंदीर म्हणून गणलें जातें. या मंदिराच्या भिंतीवर अतिशय सुंदर चित्रें रंगविलेलीं आहेत. मंदिराच्या दरवाज्यावर हत्ती आणि नृत्याच्या विविध आकृति कोरलेल्या आहेत.

कँडींतील मंदिरसमूहांत लंकातिलकाचें मंदिर अतिशय सुंदर आहे. या मंदिराचें वैशिष्ट्य म्हणजे बाहेरची रचना ख्रिश्चनचर्च सारखी आहे आणि दिसण्यांत देखील ती क्रूसाप्रमाणें दिसते. मुख्य मंदिरांत बुद्धाची मोठी मूर्ति बसविलेली आहे. भिंतींवर बुद्धाच्या जीवनांतील विविध प्रसंग रंगविलेले आहेत. आणि छतावर भूमितींतील आकृत्या सुंदर रीतीनें काढलेल्या आहेत.

सिंहलद्वीपांत ठिकठिकाणीं बुद्ध विहार आणि बुद्ध मंदिरें पाहावयास मिळतात. यावरून या बेटांत बुद्ध धर्माचा प्रसार आणि प्रचार किती जोरानें झाला होता याची साक्ष पटते. आणि अजूनही देखील ही गोष्ट तितकीच खरी कीं इतर धर्मीयांपेक्षा बौद्ध धर्मीयांची संख्या तेथें जास्त आहे. आणि त्यामुळें स्वाभाविकपणेंच बुद्धजयंतीला महत्त्व प्राप्त झालें आहे.

बुद्ध जयंतीच्या दिवशीं ठिकठिकाणीं बुद्धाच्या जीवनांतील विविध प्रसंगांचीं चित्रें लोक आम रस्त्यावर लावतात. रस्त्यावर पांढऱ्या शुभ्र कमानीच कमानी पाहावयाला मिळतात. त्याच प्रमाणें घरोघर तोरणें आणि गुढ्या उभारतात. यां दिवशीं लोकांचा असा रिवाज आहे कीं, सर्वांना मोफत भोजन घालायचं. रस्त्यांतून अन्न घेऊन जाणाऱ्या गाड्या फिरत्या असतात. या दिवशीं अन्नदान फार मोठ्या प्रमाणावर होतें. लोकांचा उत्साह या प्रसंगीं खरोखरीच अवर्णनीय असतो.

ऑगस्ट महिन्यांत कँडी येथें एक मोठी यात्रा भरते. बुद्धाच्या दातांची स्वारी हत्तीवरून काढतात. हा सोहळा पौर्णिमेच्या दिवशीं होतो. या स्वारीला ते 'पेरेरा'ची स्वारी म्हणतात. मिरवणुकींत लोक बहुसंख्येनें हजर राहून बुद्धाबद्दलची आपुलकी व्यक्त करतात. या मिरवणुकीचें सर्वांत महत्वाचे अंग म्हणजे नृत्य. कँडीयन नृत्य हें सर्व सिलोनमध्यें विशिष्ट म्हणून गणलें जातें.

या नृत्यांत विशेष भर भावांवर असतो. सुंदर पेहराव हें या नृत्याचें दुसरें वैशिष्टय सांगतां येईल. नृत्याच्या वेळीं ढोलकाशिवाय इतर कोणतींही वाद्यें वाजविलीं जात नाहींत. ढोलकाच्या तालावरच या नृत्याचा भर आणि भार अवलंबून आहे.

सिलोन देशाचें पर्यटण केल्यानंतर भारतीय संस्कृतीशी बरेंच साम्य आढळून येतें. बहुसंख्य लोक हे तामीळी आहेत. त्यांचा पेहेराव आणि भारतीय तामीळांचा पेहेराव यांच्यात कांहींही फरक नाहीं. त्यांची नेसण्याची पद्धत आणि विशेषतः स्त्रीपेहेराव हा आपल्या गुजरायेंतील स्त्रीपेहेरावाशी बराचसा जुळता आहे. मात्र स्त्रियांच्या अलंकारांत बांगड्यांना विशेष स्थान असलेलें दिसत नाहीं.

एकूण लोकांचें जीवन साधें आणि धार्मिकच आढळतें. लोकांच्या जीवनावर बुद्धाच्या साध्या राहणीचा परिणाम फारच जोरदार रीतीनें झालेला आहे.

क्षेत्रफळाच्या दृष्टीनें छोटेसेंच असलेलें सिंहलद्वीप मनानें मात्र फारच मोठें असलेलें आढळतें.

( मुखपृष्ठावरील चित्र पहा. )

• • •

# –अनित्य–अनित्य–

( एक श्रुतिका )

लेखिका : अध्यापक कुमारी मीना साळवी

[ आकाशवाणी मुंबईच्या सौजन्यानें ही श्रुतिका ता. १९।६।५८ रोजी रात्रौ ९॥ वाजतां मुंबई केंद्रावरून ध्वनिक्षेपित करण्यांत आली होती.
—संपादक ]

**निवेदक :** सुमारें २५०० वर्षांपूर्वीची गोष्ट. आज ज्येष्ठ मूलनक्षत्राचा दिवस आहे. सर्व श्रावस्ती नगरी उल्हासानें फुलून उठली आहे. ठिकठिकाणीं जत्रा आणि जुलूस भरविले गेलेले आहेत. गायकांचे मधुर आलाप, नूपुरांचे झणत्कार, वाद्यांवर छेडलेले कर्णमधुर ध्वनि, त्यांतच युद्ध संगीताचे कर्णकर्कश संगीत ऐकूं येत आहे. सर्व वातावरण जल्लोष आहे. सुमनश्रेष्ठी आपल्या प्रासादाच्या सज्जांत येऊन बसले आहेत.

**सुमनश्रेष्ठी :** ( भारावलेल्या आवाजानें ) काय धनश्रेष्ठी, केव्हांशी येऊन बसलांत ?

**धनश्रेष्ठी :** आज मूल नक्षत्राचा उत्सव. म्हटलं भेटून यावं तुम्हां उभयतांना.

**सुमनश्रेष्ठी :** बरं झालं तुम्ही आलांत ते ( हांक मारून ) बाळ आनंदा, इथं ये. सुंदरच्या मातेला म्हणावं तुमचे बंधु आले आहेत भेटायला. आणि हें बघ; त्यांना म्हणावं बाहेर सज्जांतच आहोंत आम्ही. जा. ( स्वतःशींच पुटपुटतात ) तेवढंच बिचारीचं मन रमेल हा रस्त्यावरचा सोपस्कार पाहून )

**धनश्रेष्ठी : समुद्राचा** कांहीं ठावठिकाणा लागला का ?

**सुमनश्रेष्ठी :** छे, तो राजगृहाला असतो एवढंच कळलं मैत्रेयस्थविराकडून. पण आतां तो परत येईल असं मला तरी वाटत नाहीं. ( सुस्कारा सोडतात, रुद्ध आवाज ) तो गेला... तो कायमचाच गेला !

**आनंद :** महाराज, मातोश्री आल्या आहेत.

**सुमनश्रेष्ठी :** ( आपल्याच तंद्रीत ) अं...हं ( हळूवारपणें ) ये विशाखा, बैस ह्या मंचकावर. आज धनश्रेष्ठी भेटायला आले आहेत. मुद्दामच इथं बोलावलं तुला. जरा श्रावस्ती नगरीकडे नजर तरी टाक. पहा कशी आनंदांत आहे.

**धनश्रेष्ठी :** खरंच विशाखा, तुला सांगितलं माझ्या घरीं येऊन रहा चार दिवस. पण तेंहि तुझ्याच्यानें होत नाहीं ना ?

**विशाखा :** ( आवाजांत मार्दव ) तसं नव्हे रे दादा, सवडच होत नाहीं बघ ह्या रामरगाड्यांत.

( दहा बारा माणसांचा हास्यकल्लोळ. आवाज 'प्रणाम, सुन्दरच्या मातापित्यानों प्रणाम.' )

**सुमनश्रेष्ठी :** ( शुष्क आवाज ) प्रणाम, सुंदरच्या बालमित्रांनो प्रणाम ( क्षणभर शांतता. स्वगत. अतिरुद्ध आवाज ) विशाखा, तुझं मातृहृदय तडफडतांना आतां माझ्याच्यानें पहावत नाहीं ग. सारे भरभरून येताहेत तुझे डोळे... तुझे डोळे... आपल्या सुंदरचे डोळे सुद्धां थेट तुझ्याच सारखे... समुद्रासारखे नीलवर्णी, विशाल अन् शांत म्हणूनच मोठ्या हौशीने नाहीं का आपण बाळाचं नांव ठेवलं **समुद्र सुंदर.** पण...आज...आज कुठं असेल माझा राजस बाळ ?

**विशाखा :** ( स्वतःशीच कांपऱ्या, अस्पष्ट आवाजांत पुटपुटे ) कुठं असेल माझा बाळ.

**धनश्रेष्ठी :** खालून आतां गेले ते कोण ? सुन्दरचे मित्र वाटतं ( क्षणभर थांबून अचंब्यानें. अरेच्या, ती कोण आपल्याकडे पहात उभी आहे. विशाखा, ओळखलंस का तिला तूं ? ती आपल्या श्रावस्ती नगराची 'जनपदकल्याणी'चा किताब मिळवणारी महान् नर्तिका आहे अनुराधा आहे तिचं नांव. विशाखा, पहा, ती तुझ्याचकडे पहात आहे निश्चित.

**विशाखा :** नाहीं, मी तिला ओळखत नाहीं. गेलीं कित्येक वर्षं मी घराबाहेर पडलेली नाहीं.

**धनश्रेष्ठी :** विशाखा, ती पहा मागं फिरली. ती आपल्याच दिशेनं येत आहे. ( क्षणभर शांतता ) बघ, आलीच ती प्रासादाच्या आवारांत.

( नूपुरांचा आवाज जवळजवळ येऊन ठेपतो )

**अनुराधा :** ( विनयानें ) देवी, मला आपल्याशीं कांहीं बोलायचं आहे.

**सुमनश्रेष्ठी :** चला, धनश्रेष्ठी आपण आंत बसूं या. विशाखा इथंच बसा तुम्ही.

( जातात )

**विशाखा :** ( आवाजांत मार्दव ) मुली, बैस या आसनावर. काय सांगायचंय तुला ?

**अनुराधा :** मातोश्री, मी एक प्रश्न विचारूं का तुम्हांला ?

**विशाखा :** विचार बाळ .

**अनुराधा :** आज मूल नक्षत्राचा उत्सव. सर्व श्रावस्ती नगरी आनंदांत आहे. पण अशा आनंदाच्या प्रसंगीं आपण दुःखी दिसतां. मघा-पासून पहात आहे मी. आपले डोळे पुन्हा पुन्हा भरून येताहेत, असं कां ?

**विशाखा :** ( आवाजांत कारुण्य ) बाळ, मुलाशिवाय मातेचें जीवन व्यर्थ ठरतं !

**अनुराधा :** मातोश्री, आपली हरकत नसेल तर आपल्या दुःखाचं कारण मला सांगू शकाल काय ? मला शक्य असेल तर मी थोडीफार मदत करीन.

**विशाखा :** कारण ( सुस्कारा सोडते ) ऐक मुलो. २५ वर्षांपूर्वी माझं समुद्रच्या पित्याबरोबर लग्न झालं. त्यावेळेस मला कसलीच उणीव नव्हती. माझे पति सर्वगुणसंपन्न होते. विद्याभ्यासांत प्राविण्य मिळविलेले होते, अन् जोडीला ४० कोटींचं धन होतं. दुःख म्हणून, एखादी चीज या जगांत वावरत आहे, याची मला जाणीवहि नव्हती. असा आनंदाचा काळ उपभोगीत असतां मला मुलगा झाला.

( फ्लॅश बॅक )

**सुमनश्रेष्ठी :** हं...मग काय म्हणत होत्या तुमच्या भद्रादेवी ?

**विशाखा :** म्हणत होत्या—विशाखा, तुझा बाळ तुझ्यासारखाच स्वरूपवान् आहे. आणि पित्यासारखा बुद्धिमान होणार म्हणे.

**सुमनश्रेष्ठी :** अस्सं, भद्रादेवी मोठी चतुर स्त्री दिसते. बाकी कांहीं म्हण विशाखा, आपला समुद्र म्हणजे लाखांत एक आहे.

**विशाखा :** आणि म्हणत होत्या, कीं नांव पण फारच सुंदर ठेवलं आहे म्हणून.

**सुमनश्रेष्ठी :** मग तूं काय सांगितलेंस ?

**विशाखा :** मी म्हणाले, जसा समुद्र उन्हाळयांत पहा, पावसाळयांत पहा—ओहोटो असो वा भरती असो—मध्यान्हीचा सूर्य असो, अगर पौर्णिमेचा चंद्र असो, नेहमींच सुंदर दिसतो ना ? तसाच आहे आमचा बाळ. म्हणूनच त्याचं नांव आम्ही समुद्रसुंदर ठेवलं आहे.

**सुमन श्रेष्ठी :** छे, आपण तर बुवा अशासाठीं हे नांव पसंत केलेलं नाहीं, त्याला वेगळंच कारण आहे.

**विशाखा :** ( आश्चर्यानें ) ते कोणतं ?

**सुमन :** अग त्याचे डोळे. ते आहेत समुद्रासारखे नीलवर्णी, विशाल आणि अथांग. म्हणूनच हें नांव सुचलं मला. वास्तविक पहाता हें नांव, अगोदरच एका व्यक्तीला बहाल करणार होतों.

**विशाखा :** तें कुणाला ?

**सुमन श्रेष्ठी :** ( हंसून ) अहो वेडाबाई, आपल्यालाच. त्याचे डोळे हुबेहूब तुझ्याचसारखे आहेत.

**विशाखा :** इश्श्...तुमचं आपलं कांहींतरीच.

**विशाखा :** आमचा बाळ मोठा होत चालला. उत्तरोत्तर आम्हां उभयतांच्या आनंदांत भर पडत होती. लग्नाचं वय झालं. मागण्या येवूं लागल्या.

( क्षणभर शांतता )

**अनुराधा :** ( उत्सुकतेनें ) मग ? पुढें काय झालं ?

**विशाखा :** ( खिन्नतेनें ) पुढें काय झालं ? वैशाखपौर्णिमेचा दिवस होता. श्रमण गौतमाची धर्मदेशना होती जेतवनांत. समुद्र गेला सोबत्यांबरोबर. समुद्रनें धर्मोपदेश ऐकला मात्र ! शास्त्याकडे जावून म्हणाला,'मला तुमच्या धर्माची दीक्षा द्या.' तो महापुरुष म्हणाला, 'मातापित्यांच्या अनुमतीशिवाय आम्ही संन्यासधर्माची दीक्षा देत नाहीं. समुद्र घरीं आला. आणि त्याचा तोच एक हट्ट. मी खूप सांगितलं, पित्यानं चार गोष्टी सांगून पाहिल्या. पण छे, त्याचं मन कशांतच रमेना, वैराग्य जाईना. निश्चयापासून तिळभर ढळेना. शेवटीं कंटाळून समुद्राच्या पित्यानं संमति दिली. त्या दिवसापासून दुःखानें आमच्या आयुष्यांत जो प्रवेश मिळविला तो आजतागायत. समुद्र गेला, तो कायमचाच गेला...

( निःस्तब्ध शांतता )

**अनुराधा :** आज तुमचा मुलगा कुठं असतो ?

**विशाखा :** तो राजगृह नगरांत आहे, असं मी ऐकते.

**अनुराधा :** ( निश्चयी स्वरांत ) मातोश्री, तुम्ही मला थोडी मदत केलीत तर मी आपल्या मुलाला परत आणूं शकेन.

**विशाखा :** ( अत्यानंदानें ) काय ? काय म्हणालीस ? माझा बाळ परत आणशील ? मग माझं सर्वस्व घे, माझे दागिने, जडजवाहिर, धन दौलत, सगळं सगळं घे. पण माझा बाळ...( हुंदके देत ) अनुराधे, जा. माझा बाळ मला परत आणून दे. माझा बाळ...

( फेड आउट )

**अनुराधा :** सखे नंदे, आज तुझा चेहरा असा कावलेला कां ? कसला राग आलाय स्वारीला ?

**नंदा :** राग ? बये, या राजगृहांत येऊन दोन महिने झाले, पण तुझा कांहीं जाण्याचा विचारच दिसत नाहीं. माझा जीव तरी अगदीं कंटाळून गेलाय. किती दिवस ग हा तुरुंगवास भोगायचा !

**अनुराधा :** सखे, अग ही एक प्रकारची माझी तपश्चर्याच आहे.

**नंदा :** छान...तपश्चर्या म्हणे. तिकडे तो बैरागी तपश्चर्या घेऊन बसलाय, आणि तुझी इकडे ही तपश्चर्या. पण तुमच्या या तपश्चर्येचा ताप मी किती दिवस सहन करायचा ? मला अगदीं उबग आला आहे या गोष्टीचा. वाटतं जावं निघून श्रावस्तीला.

**अनुराधा :** ( हंसून ) अग, मग जा की. तुला का मी अडवून ठेवलंय थोडंच.

**नंदा :** बरोबर, तूं असं म्हणायचीस. तुला पुरतं ठाऊक आहे की तूं जा म्हणालीस तरी माझा पाय कांहीं उचलायचा नाहीं. कसला मेला हा जीव तरी तुझ्यांत अडकून पडलाय. कित्येकदां निश्चय करून बाहेर पडले. गांवच्या सीमेपर्यंत जावं, आणि तिथून परतावं. मेल्याशिवाय सुटका नाहीं ग बाई, माझी तुझ्या कचाट्यांतून.

**अनुराधा :** ( गंभीरपणें ) सखे नंदे, तुझे हाल का मला पहावतात ? तूं जिवाचा त्रागा करून घेतेस, ते उघड्या डोळ्यानें मी पहातें. पण काय करूं, माझा नाईलाज आहे.

**नंदा :** पण तूं श्रावस्तीला का परतत नाहींस ? इकडे वनवासांत किती दिवस रहायचं ? चांगलं ऐश्वर्य वैभव, दासदासी, सोडून इकडे हें अज्ञातवासाचं जीणं जगण्याची कसली मेली हौस तुझी ? कुणाशीं ओळख करण्याची चोरी, कुणाशीं बोलण्याची चोरी, 'श्रावस्तीचा महान् किताब मिळविणारी जनपद-कल्याणी, राजगृही आहे' हें लपवून ठेवणं किती कठीण पडते मला !

**अनुराधा :** ( खिन्नतेनें ) सखे नंदे, याची पूर्ण जाणीव आहे मला. तुला फार त्रास होतो ना ग माझ्यामुळें?

**नंदा :** ( आवाजांत मार्दव ) तसं नव्हे ग . तुझ्यासाठीं कांहीं करायला माझी तयारी आहे. त्याचा त्रास नाहीं होत मला. पण राग येतो तो—

**अनुराधा :** कुणाचा ?

**नंदा :** त्या भिकारड्या समुद्रस्थविराचा ?

**अनुराधा :** असं बोलू नये नंदे.

**नंदा :** तूं करत असलेला त्याग त्याच्या खिजगणतींत तरी आहे कां ? घरीं हजारो दास दासी राबतात तुझ्यासाठीं. आणि आज तूं आपल्या हातानें रांधून त्याला वाढतेस. भोंदू मेला, 'निबद्ध दान' देऊं केलेस त्याला तर त्या गोष्टीला संमति द्यायला एक महिना ? मग काय तर घराबाहेर जेवायचं. खोलींत जायला भीत होता कालपरवां पर्यन्त ढोंगी... माझा जीव तळमळतो तो तुझ्यासाठीं. सोन्यासारख्या रूपाची माती का करून घेणार आहेस तूं ? एवढं करून ढुंकून त्यानं एकदा तरी तुझ्याकडे पाहिलं कां ?

**अनुराधा :** (आवाजांत गांभीर्य) नंदे, अग आम्हां दोघांचे मार्ग अतिशय भिन्न आहेत.

**नंदा :** तेल आणि पाणी एकत्र करण्याचा अट्टाहास आहे तुझा. हा मूर्खपणा नव्हे कां ?

**अनुराधा :** नाहीं सखे, हा मूर्खपणा नव्हे. जीवनांत जीं तत्वं उराशी बाळगलीं त्यांची कसोटीची वेळ आहे. आजपर्यन्तच्या आयुष्यांत पराभव मी कधींच पत्करलेला नाहीं. या वेळेस मी पराभूत ठरले, तर माझं आयुष्य विफल ठरेल, फोल होईल. सखे...नुसत्या कल्पनेनें माझा स्वाभिमान थरारून उठतो. माझं मानी मन पेट घेतं. हा सामना मला जिंकलाच पाहिजे. सखे, मला जिंकलाच पाहिजे. संन्याशाकडे तपश्चर्या आहे तर माझ्याकडे सौंदर्य आहे. त्याच्याकडे निर्धार आहे, तर माझ्यापाशीं मोह आहे. त्याच्या जवळ वैराग्य, तर माझ्यापाशीं आकर्षण आहे. मोह आणि तपश्चर्या, सखे मोह आणि तपश्चर्या...

(फेड आउट)

**अनुराधा :** अग नंदे, अशी काय उभी आहेस माझ्याकडे मघांपासून पाहत ? सांगते आहे तो आरसा जरा इकडे घे.

**नंदा :** काय करूं ? तुझं वेड लावणारं गोजिरवाणं रूप पाहिलं की सारखं पहात रहावसं वाटतं. आज कित्येक महिन्यानं हे साजिरं रूप पहात आहे मी. थांब, अशीच उभी राहा. हो कुसुम्री रंगाची बनारसी साडी किती खुलून दिसते तुझ्या केतकीवर्णाला. ही माणकांची कर्णफुलं तुझ्या गालावरील गुलाबांशी प्रेमचेष्टाच करताहेत जणूं. ही कपाळावरची बिंदी तुझ्या काळ्याभोर केशसभारांतून धांवत येवून तुझ्या रूपाकडे पुनः पुन्हां डोकावून पहात आहे. तुझ्या डोळ्यांत...

**अनुराधा :** (हंसून) अग सखे, भलता सलता प्रांत कुठें पादाक्रांत करायला धांवतेस.

**नंदा :** खरंच ग बाई, एखाद्या कवीनें केवळ तुझ्या सौंदर्यावर महाकाव्य रचलं असतं.

**अनुराधा :** सध्यां, तें राहूं दे. बरा तो आरसा इथं दे पाहूं.

**नंदा :** खरंच, विसरलेच कीं, हं, हा घे.

**अनुराधा :** (समाधानानें विश्वास टाकीत) हं...एकंदरींत साजशृंगार चांगला जमलाय.

**नंदा :** हो साज तर जमलाच. पण शृंगार मात्र...

**अनुराधा :** चल चावट कुठली...

**नंदा :** बाकी, कांहीं म्हण. तूं आज जिंकणारच.

**अनुराधा:** (गंभीरपणें) आज माझ्या जीवनाची कसोटीची वेळ आली आहे. सखे, आज हरले तर या जीवनांला कायमची मुकलें बघ.

**नंदा :** छे, असं मनात सुद्धां आणू नकोस. साक्षात् वैराग्य कातीर करण्याचं सामर्थ्य आहे तुझ्या सौंदर्यात. आणि तो सुंदरस्थविर थोडा फार चळलाय बघ. तो दाखवीत नाही, पण त्यानें जाळ्यांत मात्र प्रवेश केला नक्कीच.

**अनुराधा :** (गांभीर्यानें) ठीक आहे. मृदुंग बैठकीवर ठेवलाय ना ? भिक्षू येण्याची वेळ होत आली, सर्व गोष्टी लक्षांत आहेत ना तुझ्या ?

**नंदा :** नीट लक्षांत आहेत. भिक्षू येणार. तूं माडीवर घेवून जाणार. जाताजातां वाटेंतच मूर्च्छित होऊन पडणार. मग पुढें काय करायचं ते मी बरोबर करीन. तूं कांहीं काळजी करुं नकोस.

**अनुराधा :** हं (निश्वास सोडते. क्षणभर स्तब्धता—खडावांचा आवाज) अगबाई, आलेच वाटतं ते. नंदे, मी पुढें होते, तूं तयारीनं रहा. (नुपूरांचा आवाज खडावांच्या आवाजापाशीं थबकतो) यावं. स्वामीजी आंत या. आज आपली जेवणाची सोय माडीवरील खोलींतच केली आहे. चलावं...

**समुद्रसुंदर :** (आवाजांत कठोरता) उपासिके, इतके दिवस आम्हीं घराबाहेर ओटीवर अन्न ग्रहण करीत होतों. बाहेर मुलांचा फार गोंधळ, आरडा ओरड म्हणून आपण मला घरांत यायला लावलंत, आणि आज (आवाज चढवून) माडीवर सोय केली आहे म्हणतां ?

**अनुराधा :** (अति कोमल आवाज) स्वामीजी, बालकांच्या हातून चूक झाली असेल तर क्षमा असावी. पण...

**समुद्र :** (कठोरता कायम) पण...पण काय ?

**अनुराधा :** आम्ही उपासकवर्गानें संघाच्या सुखसोयी पहायच्या नाहींत तर कोणी ? तुम्ही सुखानें चार घांस खाल्लेले पाहून आम्हांला कृतकृत्य वाटतं. संसाराच्या जंजाळांत सांपडलेल्या आम्हां संसारी माणसांचा एवढाच काय तो अध्यात्मिक आनंद असतो. म्हणूनच मी आपल्याला...

**समुद्र :** ठीक आहे, ठीक आहे. उपासिके (आवाजांत मार्दव) पण तुमची ही माया वेडी असते. आम्हांला काय झाडाखालीं बसून चार घांस खाल्ले काय, आणि राजमहालांत बसून खाल्ले काय, सारखेंच. त्या बद्दल आम्हांला यत्किंचितहि आत्मीयता नसते.

**अनुराधा :** हो ना...मग...स्वामीजी माडीवरील खोलींत जेवलें काय किंवा ओटीवर जेवले काय, सारखेंच नव्हे कां ?

**समुद्र :** उपासिके, तूं मोठी चतुर आहेस. आम्हांला शब्दांत पकडलेंस. ठीक आहे.

**अनुराधा :** (आनंदानें) नंदा, ताट घेऊन चल माडीवर.

**नंदा :** चला, आलेंच मी.

**अनुराधा :** चलावं स्वामीजी.

(खडावा व नुपूरांचा आवाज—नुपूरांचा आवाज अचानक बंद. ताट पडल्याचा आवाज)

**नंदा :** ( किंचाळून ) अनुराधे....हिला भोंवळ आली वाटतं ( भयाकुल सुरांत ) स्वामीजी, पहा हो हिला काय झालं ?

**समुद्रा :** अं...का—य ?

**नंदा :** आज गेले तीन दिवस अन्नाचा कण नाहीं हिच्या पोटांत. आज आपण जेवल्यानंतर उपवास सोडणार म्हणत होती. आणि ( रडव्या सुरांत ) एकाएकीं हें झालं हो !

**समुद्र :** हे बघा, रडत बसण्यांत अर्थ नाहीं. खालीं जाऊन पांणी आणि मात्रा उगाळून घेऊन या. तोंपर्यंत मी यांना बाजूच्या खोलींत नेऊन ठेवतो.

**नंदा :** ही निघालेंच मी.

( पार्श्वसंगीत )

**समुद्र :** छे छे, काय करून बसलों मी हें. विसरलों का मी माझ्या निर्धाराला. ( कांपरा आवाज ) भगवान्...मी काय करूं ? ह्या स्त्रीला इथेंच टाकून पळून जावूं कां ?......अरे भ्याडा, ह्या स्त्रीला अशा असाहाय्य स्थितींत तसंच टाकून तूं पळणार ? भगवन्तांनी विचारलं तर काय सांगशील ? एका असहाय्य स्त्रीस मदत लाथाडून तूं पळून आलास म्हणून. ज्यांनीं तुला करुणा शिकविली त्यांना तूं हेंच कां ऐकविणार ? आणि...आणि हे सर्व कशामुळें ? तर स्वतःच मन कमकुवत आहे म्हणून ? स्वतःवर विजय मिळविण्याचा हा मार्ग नव्हे. नाहीं. नाहीं...समुद्रा नाहीं...स्त्रीला स्पर्श करणं पाप नव्हे कां ? ( अति रुद्ध आवाज ) आपल्या प्रिय मातेचे करुण आर्त स्वर तुला विनवित होते—बाबा समुद्रा, निष्ठूर होऊं नकोस. माझ्याकडे पहा. बाळ तूं आम्हांला सोडून जावूं नकोस. ते लाथाडून तूं घराबाहेर पडलास, तेव्हांचा तुझा मनोनिग्रह आज कुठें गेला ? तेव्हांच आत्मबल आज अपुरं कां पडतंय ? तुझं मन असं विचलित कां होतंय ? ...समुद्रा, स्त्रीला स्पर्श करणं पाप आहे. हा मोह आहे. समुद्रा, मर्यादा सोडूं नकोस ( पार्श्वसंगीताचा आवाज मोठा होत जातो...समुद्राचे शब्द अस्पष्ट होतात )

**नंदा :** हें काय स्वामी ? तुम्ही अजून इथंच. कसला विचार करतां ? (कळवळीनं) माझ्या अनुराधेला तुम्हीं असंच का मरूं देणार ? स्वामीजी, दया करणं हा तुमचा धर्म ना ? मग तो आतांच कुठं लोप पावला ?

**समुद्र :** कुठें ठेवायचं सांगा.

**नंदा :** या बाजूच्या खोलींत मंचक आहे, तिकडेच चलावं...

( खडावांचा आवाज ) हं... इथं ठेवा. हें पाणी इथं ठेवते. खाली जाऊन मात्रा उगाळून घेऊन येते.

( क्षणभर शांतता )

**समुद्र :** ( थकलेल्या रूद्ध स्वरांत ) भगवन्ता, मला मार्ग दाखव. मला मार्ग दाखव. ( कण्हण्याचा आवाज ) ही स्त्री तर कण्हू लागली. काय हवंय हिला. उपासिके काय हवंय तुला ?

**अनुराधा :** ( क्षीण आवाज ) मला... पा... णी...

**समुद्र :** हं. हें घे पाणी. पहा पहा समुद्रा, हिचे नाजुक ओठ पाणी पिण्यासाठीं विलग झाले आहेत बघ. द्याव एक घोटभर पाणी हिच्या मुखांत. तुझे हात कां कांपताहेत ? पाहिलंस, पाणी समजून तिनें तुझं बोटच आपल्या लहानग्या ओष्ठद्वयानें धरून ठेवलें.

**अनुराधा :** पाणी...

**समुद्रा :** नाहीं इथं मला क्षणभरहि थांबतां येणार नाहीं. हिच्या एका ओझरत्या स्पर्शांत माझं सर्वांग जाळून टाकण्याचं सामर्थ्य आहे.

**अनुराधा :** पाणी ..पा...णी...

**समुद्र :** ( हताशपणें ) नाहीं. सुंदरी तुझ्या मुखांत घोटभर पाणी घालण्याचं सुद्धां सामर्थ्य माझ्यापाशीं नाहीं ( स्तब्धता )...समुद्रा ऊठ तहानलेल्याची तहान भागविण्यासाठींच ना तूं हा मार्ग आचरलास ? मग असं घाबरून कां तूं स्वतःवर विजय मिळविणार आहेस ? ऊठ. समुद्रा उठ ( दोन पावलं खडावांचा आवाज ) अरे, ही तर उठूं पहात आहे. किती निर्दय मी. पाण्यासाठीं बिचारीचा जीव तडफडतो आहे. उपासिके थांब, तुझा तोल जाईल. बघ. ही तर माझ्याच बाहुपाशांत पडली...

( पार्श्वसंगीत )

हिची फुलासारखी कोमल काया...छे छे, उपासिके पाणी हवंय ना ? सुंदरी ऊठ, पाणी घे.

**अनुराधा :** कुठं आहे मी ?

**समुद्र :** घाबरू नकोस सुंदरी. तूं माझ्याच पाशीं आहेस. तुला आतां बरं वाटतं कां ? डोळे उघडून पहा बरं. इथं, हं असं...

**अनुराधा :** हे काय महाराज ? असे अविचलित नजरेनें काय माझ्याकडे पाहातां ?

**समुद्र :** सुंदरी, तुझं सौंदर्य अंगप्रत्यंगांतून फुलून उठलं आहे. पाहूं दे असंच अनिमिष नेत्रानं मला पाहूं दे ( क्षणभरानें ) सुंदरी हें पाणी पी. तुझी सखी आतांच येईल बघ मात्रा घेऊन.

**अनुराधा :** ( लाघवी स्वर ) हें जीवन मिळाल्यावर आतां मात्रा कशाला ? ( नंदेचा आवाज–येऊं का मी आंत ) ये नंदे, आंत ये.

**नंदा :** हं, ही तुझी मात्रा. आणि हें स्वामीजींचें ताट.

**अनुराधा :** हें बघ सखे. मात्रेचा आतां उपयोग नाहीं. ताट या आसनासमोर ठेव.

**नंदा :** ( मिष्कीलपणें ) बरं आहे बाई जाते तर मी.

**अनुराधा :** महाराजांनी इथं बसावं गडे. जेवायचं नाहीं कां ?

**समुद्र :** सुंदरी, तुझं सौंदर्य पाहून मी तृप्त झालोंय, आणि हें पहा, आज तीन दिवसाची उपाशी तू, तूंच जेवून घे पाहूं.

**अनुराधा :** इश्श, मी नाहीं गडे आपण जेवल्याशिवाय जेवणार.

**समुद्र :** ( हंसून ) अस्सं; हं आतां तोंड उघड पाहूं. हं खा बघूं मुकाट्यानं.

**अनुराधा :** इश्श, हें काय ( क्षणभर स्तब्धता ) खरंच नाथ, आपण दिलेल्या घासानें मी अगदीं धन्य धन्य झालें ( लडिवाळपणें ) नाथ...

**समुद्र :** बोल, प्रिये बोल. तुझे मंजुळ शब्द ऐकायला माझे कान आतुर झाले आहेत.

**अनुराधा :** नाथ, समोर पाहिलंत काय आहे तें ?

**समुद्र :** ओ–हो... मृदुंग, तुला ठाऊक आहे प्रिये, मृदुंग हें माझं अत्यंत लाडकं वाद्य ( गंभीर होत ) आज कित्येक वर्षांनीं मी पहात आहे. हं... ( शांतता )

**अनुराधाः** (आतुरतेनें) हें काय ? तुम्ही तर नुसतें गोंजारत बसलां. मृदुंग वाजवा कीं.

**समुद्रः** मृदुंगला नुपूरांची जोड लागते म्हटलं सुंदरी.

**अनुराधाः** (आनंदानें) एवढंच ना. मीं तयार आहे. होऊं द्या सुरू. (मृदुंगावर थाप–नुपूरांचा झंकार) अनुराधेचे शब्द हळूंहळूं स्पष्ट होत आहेत... )

**अनुराधाः** नाथ, अशीच साथ मला जीवनभर द्याल कां ?...सोडून द्या हें बैरागी जीवन. लाखों मोलाचं आयुष्य असं भणंग भिकाऱ्यासारखं दवडूं नका...तुम्ही तरुण आहांत. मीहि तरुण आहे...मी रूपवती आहे.. तुम्ही माझे अन् तुमची मी...मी तुमची, अन् तुम्ही माझे... हीं व्रत वैकल्यं आतांच कशाला ? ही कठोर तपश्चर्या आजच कशाला ? ...ये...सुखाचा आस्वाद घे...मग उद्यां दोघे म्हातारे झालो कीं, काठी टेकीत टेकीत आपण आश्रमांत जाऊन दीक्षा घेऊं. सर्वसंगपरित्याग करूं. पण आज नको...तारुण्य आज आहे तर उद्यां नाहीं...तारुण्य आज आहे, तर उद्यां नाहीं...तारुण्य...

(मृदुंग थांबतो...नुपूरांचा झंकार वेगानें चालूच)

**समुद्र** : काय म्हणालीस ? 'तारुण्य आज आहे, तर उद्यां नाहीं.' तारुण्य आज आहे तर उद्यां नाहीं...तारुण्य आज आहे तर उद्यां नाहीं. उपासिके...पहा. पहा तुझे काळेभोर रेशमासारखे मऊ मऊ केस तागासारखे राठ आणि खरखोत झाले आहेत. तुझे बोलके, टपोरे डोळे पाषाणासारखे निस्तेज आणि प्रेतासारखे निःसत्व नि भयानक भासूं लागले आहेत. तुझी लोण्यासारखी मृदू आणि सतेज अंगकांती...तारुण्यानें मुसमुसलेली काया, तर त्वचा, स्नायु, अन् हाडांची एके ठिकाणीं बांधलेली मोटच जणूं, नाहीं नाहीं, मला हें बघवत नाहीं.

**अनुराधा** : (आपल्याच नादांत) तूं उद्यां म्हातारा होशील आणि मीहि होईन. तारुण्य आज आहे तर उद्यां नाहीं...आज आहे तर...

**समुद्र** : बस्स, बंद कर. उपासिके बंद कर. तुझे स्वर माझे कानाचे पडदे फाडून हृदयावर जाऊन आदळत आहेत. माझा अंतरात्मा हेलावून सोडीत आहेत. बंद कर (क्षणभर शांतता) (शांत होत) उपासिके, खरे आहे.तारुण्य आज आहे तर उद्यां नाहीं, सर्व जग अनित्य आहे, दुःखमय आहे. भगवान म्हणतातचः–सब्बे संखारा अनिचा, सब्बे संखारा दुखा... सब्बे संखारा अनत्ता... (खडावांचा आवाज. नृत्य चालूच. भिक्षू घोषवाक्ये बोलत बाहेर पडतो) सब्बे संखारा अनिचा, सब्बे संखारा दुखा. सब्बे संखारा अनत्ता.....

# बौद्धधर्म की पुण्यविभूति

( लेखक—**प्रोफेसर शिवसहाय पाठक " शिव "** )

गतवर्ष भगवान बुद्ध की द्विसहश्र पंचशती जयंती के अवसर पर विश्वव्यापी समारोह मनाया गया है। विशेषतः भारतवर्ष तथा एशिया खण्ड के विभिन्न देशोंमें कोटि कोटि मनुष्योंद्वारा श्रद्धाञ्जलि निवेदन की गई है। यह प्रत्यक्ष है कि तथागत भगवान बुद्ध की अमृतवाणी, देशकाल से परे सर्व व्यापी मंगल जनक आदि कल्याण, मध्य कल्याण तथा अन्त कल्याण सिद्ध होती है। भगवान बुद्ध की वाणीमें वर्तमान जगत के लिये महान सन्देश पाया जाता है।

वर्तमान संसार के संक्रमण काल में, जो घात प्रतिघात संघर्ष पाया जाता है, उनका निदान बुद्ध धर्म तत्वज्ञान है। तथागत की अमर भूमिका उसकी वाणी में, महान जीवन दर्शन निहित है। उनकी भावना महान मैत्री, करूणा, मुदिता तथा उपेक्षा भावना में, जो शाश्वत सत्य पाया जाता है, वह मानवता का पोषक उपेक्षणीय पलायनवाद नहीं है।

वर्तमान प्रजातंत्र के युग में जो सेवा और त्याग का महत्व स्वीकार किया जाता है; यह बौद्ध धर्म की महान सम्पदा है। समस्त संसार सचराचर प्राणीमात्र के प्रति अनुकम्पावश मैत्री, करुणा, मुदिता, उपेक्षा भावना महान विभूति है, जिसकी प्रजातंत्र के युग में बड़ी आवश्यकता है। यह भावना किसी न किसी रूप में, सभी धर्मों में पाई जाती है, जिसका मूल श्रोत पतंजलि का योग दर्शन है।

आज बौद्धधर्म की सत्य, अहिंसा, त्याग तथा सेवा की भावना की प्रतिध्वनि सर्वत्र गूंज रही है। सेवा भावना को लक्ष्यकर महर्षि भर्तृहरिनें अपने नीतिशतक में कहा है,—

"सेवा धर्मः परम गहनो; योगिनामप्यगम्यः"

इस सेवा के मूल में ब्रह्मविहार की भावना पाई जाती है, जिसमें मैत्री और करूणा की भावना प्रधान है।

यही करूणा की भावना महर्षि वाल्मीकि की महान रचना रामायण का मूल श्रोत है, जिससे प्रभावित हो उनकी काव्य प्रतिभा प्रकट हुई, शरविद्ध क्रौञ्चके विव्हल आर्तस्वर को श्रवण कर उनके मुख से अचानक निकल पड़ा,—

"मां निषाद प्रतिष्ठां त्वमगमः शाश्वती समाः।
यत् क्रौञ्चमिथुनादेकमवधीः काममोहितम् ॥"

कवि भवभूतीने इस करुण रस के सम्बन्ध में कहा है,—

"एको रसः करूण एव निमित्तभेदात्।
भिन्नाः पृथक पृथक इव आचरते विवर्तान् ॥"

कवि मैथिली शरण गुप्त ने साकेत काव्य में उर्मिला के चरित्र चित्रण में सेवा भाव और करूणा का आधार लिया है। यह साकेत अवलोकन कर जाना जा सकता है। यह काव्य भी रामायण का एक प्रकरण है।

पतंजलि के योग दर्शन के अतिरिक्त, उपनिषद तथा उपनिषद्-कालीन साहित्य में चतुर्विध ब्रह्मविहार की उज्वल भावना है, जो आध्यात्मिक क्षेत्र में साधना का अवलम्बन और जीवन्मुक्ति का मूलाधार है।

भगवान बुद्धने साधना पूर्ण होने पर करूणावश सद्धर्मका उपदेश दिया था। उन्होंने दुखिया जगत को दुखसे मुक्तिका मार्गदर्शन किया, जिस चार आर्यसत्यों के साथ अष्टांगमार्ग पाया जाता है, वह करुणा-दया मैत्री अनुकम्पा भावना का परिणाम है। इसमें सेवा भावना की प्रधानता पाई जाती है।

संतपरम्परा में हम पाते हैं कि ऐसेही जीवन्मुक्त पुरुषोंने करूणावश धर्मोपदेश किया है। इन महापुरूषों में दिव्य चक्षु पाया जाता है, अज्ञानका आवरण नहीं। वे ही उपदेशक अधिकारी पुरूष हैं। वेही सच्चे गुरू और सेवा भावी करूणा प्रधान तारणहार हैं। यह प्राचीन परम्परा अखण्ड पाई जाती है।

यह सेवा भावना का संस्कार ऐसे लोगों मे पाया जाता है, जो संसारी होनेपर भी हृदयवान करूणा प्रधान होते हैं। जिनके हृदय में मानवता का बीज सेवाभावना के रूपमें अंकुरित होता है, वे सेवाभावको ही भक्ति मानते हैं।

ग्राहकता यावी, त्यांत अकुशलमनोवृत्तींचा बीमोड होऊन कुशलवृत्तींचा प्रभाव पसरत जावा, जात, गोत, पंथ, लिंग, वर्ण, भाषा यांच्या योगानें उदभवलेली कटुता नाहीशी व्हावी व उदार विश्वधर्माची योग्यता व सौंदर्य त्यांना कळावें, हा होय. त्यांचीं भाषणें स्फूर्त पण समंजसपणाची, विचारांचा बुरसटपणा घालवणारी, मानवाच्या अंधश्रद्धेला धक्का देऊन त्याला जागे करणारीं, व त्याना कार्यक्षम करणारी अशीं असतात. ठरावीक चाकोरींतील वाङ्मयमूल्यें पारखण्याची ज्यांना संवय झाली आहे, त्यांना तीं भाषणें आवडणार नाहींत. असल्या अहंगडयुक्त साहित्यिकांची कदर आतां समाजानें करितां कामा नये. म्हणून या वर्षांतील अत्यन्त प्रामुख्यानें उल्लेखनीय अशी जर गोष्ट असेल, तर विनोबांची पदयात्रा व त्या योगानें महाराष्ट्रांत उत्पन्न झालेला वैचारिक उठाव. धर्मचक्राच्या मूळच्या उद्देशाला परिपोषक अशी ही घटना होय. म्हणून तिचा उल्लेख इतक्या सोपस्कारानें करून विनोबांना दर्शनी चित्रांत स्थान दिलें आहे.

× × ×

धर्मचक्राचा वार्षिक आढावा घेतांना "श्री तुकाराम विश्वविद्यालय संघा" च्या इतिहासाची या वर्षाची प्रगतिहि उत्साहवर्धक आहे, असें दिसून येईल श्री तुकाराम विश्वविद्यालय संघाची उपयुक्तकता पटत चालली असून त्या अनुरोधानें संघाचें पाऊल पुढें पडत आहे. संघाचे अध्यक्ष श्री. विष्णूपंत निंबकर यांच्या नेतृत्वाखालीं संघाची घटना व त्याप्रमाणें पदाधिकारांच्या नेमणुकी, व कार्याला सुरुवात झालेली आहे. खार येथील प्रवचनांचें कार्यक्रमाची माहिती वेळोवेळी "पुरवणी" तून दिली आहेच. याबाबतींत श्री वाचस्पति विष्णूजी क्षीरसागर यांचे आभार संपूर्णतया कसें मानावेत हें कळतच नाहीं. त्यांनीं यावर्षांत उत्तरहिंदुस्थान, ग्वाल्हेर, इंदोर, दिल्ली, हरिद्वार वगैरे ठिकाणीं दौरा करून 'वेदांतवर्धिनी' सभेच्या कामाचा बराच प्रचार केला. तसेच खानदेश, औरंगाबाद, मराठवाडा, हैद्राबाद वगैरे ठिकाणी जाऊन त्यांनीं आपल्या रसाळ प्रवचनांच्या द्वारें लोकांत बरीच जागृति केलेली आहे. त्यांच्या संगतींत आम्ही तळेगांवला यावर्षी तुकाराम बीजेच्या दिवशीं (७ मार्च १९५८) उपस्थानशालेचा पाया घातला व त्याच दिवशीं खुद्द गांवांतील विठ्ठलमंदीरासमोर उभारलेल्या मंडपांत रात्रौ विविध कार्यक्रम पार पाडला. ही हकीकत वाचकांना विदितच आहे. मध्यंतरी चॅरिटीकमिशनरकडे संस्थेचा तळेबंद सादर केला आहे. तसेच घटनेची एक प्रत त्यांचेकडे पाठविली आहे. सप्टेंबर महिन्याच्या शेवटच्या आठवड्यापासून आक्टोबर ११ पर्यंत वाचस्पतींचीं कृष्णचरित्रावरील प्रवचनें खार येथें होणार आहेत. अशावेळीं महाराष्ट्रानें श्री. तुकाराम महाराजांच्या कार्यास मदत करणें, हें त्याचें पवित्र कर्तव्य ठरते. विनोबांनीं तुकोबाची माहिती धर्मचक्राच्या उद्देशाप्रमाणेंच आपल्या पंढरपूर येथील प्रवचनांत सादर केली आहे! पावसाळा संपला म्हणजे इमारतीच्या कार्यास आर्थिक सहाय्य मिळविण्यास संघ चालक बाहेर पडणार आहेत. एकंदरींत संघाचें पाऊल पुढें पडत असून मागील तुकाराम बीजेस जो कार्यक्रम तळेगांव येथें झाला त्यायोगें स्थानिक तसाच बाहेरही त्याचा बराच बोलबाला झाला आहे. तळेगांव येथें अखिल जागतिक धर्मांतील संतांचें वाङ्मय एकत्रित करून "संतजीवन-विकास-शास्त्रां" त संशोधन करण्यास योग्य अशी संशोधनसंस्था काढण्याचें ध्येय म्हणजेच **श्री तुकाराम महाराजांचें स्मारक** अशी संचालकाची निष्ठा आहे. त्याकडे लक्ष देणें आवश्यक आहे. "सत्य संकल्पाचा दाता भगवान्" हें महाराजांचें वाक्य आम्ही उराशीं बाळगून बसलों आहों! इ. स. १९५४ सालीं जपानाहून परत आल्यावर देहूचा नाद सोडून जे तळेगांवला आलों, तें तेथें कांहींतरी नेत्रदीपक कामगिरी करता येईल अशी आशा बाळगून, श्री तुकाराम महाराज म्हणजे '**विश्वधर्माचे प्रणेते**' ही श्रद्धा ठेऊनच कार्यास हात घातला आहे.

× × ×

धर्मचक्राच्या सांपत्तिक स्थितीबद्दल विशेष काय लिहिणार? धर्मचक्राची परिस्थिति हळूं हळूं सुधारत आहे. 'क्यूरेटर ऑफ लायब्ररीज' यांच्या परिपत्रकाप्रमाणें सर्व वाचनालयांतून तें वाचलें जावें अशी इच्छा असेल तर सरकारनें कांहीं आर्थिक मदत केल्याविना त्याचा प्रसार करतां येणार नाहीं. वर्गणीदारांची संख्या वाढली नसून कांहीं कांहीं वर्गणीदारांनीं वर्गणीचे बाबतींत सच्चेपणा दाखविला नाहीं, असें दुःखानें म्हणावें लागतें. १२ महिने अंक घेऊन, तो परत न करणें याचा अर्थ त्यांना तो हवा असे मानले, तर तें अवास्तव आहे, असें मानतां येणार नाहीं. पण वर्गणी मागीतली तर आमचा अंक बंद करा असें म्हणायचें व मागील वर्गणी देण्याची वार्ताच नाहीं! कांहीं वर्गणीदारांची अशी मनोवृत्ति पाहिली म्हणजे समाजाच्या वरच्या थरांतहि नैतिक समुदाचाराचा अभाव आढळावा, ही दुर्दैवाची गोष्ट आहे. वर्गणीदार वाढले तर अंकाची पृष्ठ संख्या वाढवितां

येऊन त्यांत विशेष सुधारणा करतां येईल. सर्वच समाजांत एकप्रकारचा तटस्थपणा, बेफिकिरी, कार्याचा गौरव जाणण्याची अपात्रता, हें चित्र दिसून येतें. त्याला कारण आमचे ज्ञातिबांधव–साहित्यिक व वृत्तपत्रकार हेच होत. ज्याठिकाणीं मोठमोठ्या वृत्तपत्रांवर पत्र बंद पडण्याचा प्रसंग येतो, त्याठिकाणी **आमची दिवली** तेवत राहिली तरी पुरे, असें आम्ही समजतों ! हीच सर्वांची कृपा कायम टिको, ही प्रार्थना.

× × ×

यावर्षी सर्व अंक नियमितपणें बाहेर पडून छपाईचे बाबतींत " मुंबई वैभव प्रेस "नें धर्मचक्रास फार मदत केली, हें येथें नमूद करणें आवश्यक वाटतें. त्याचे मॅनेजर श्री. राजाराम, त्यांचा एकनिष्ठ सहकारी वर्ग व कामगार बंधू यांचे "धर्मचक्रा "वरील प्रेम पाहून संपादकाचें हृदय गहिंवरून येतें! अंक वेळेवर बाहेर पडावा याबद्दलची काळजी आमच्या पेक्षां मॅनेजरला जास्त असते, ही भूषणास्पद गोष्ट आहे! पेपरचे बाबतींत गणात्रा आणि कंपनी यांचे आभारी आहोंत. पेपर मिळण्याचे बाबतींतील समस्या इंपोर्ट लायसेन्स मिळाल्यामुळें दूर झाली, हें धर्मचक्राचें सद्भाग्य होय.

× × × ×

" धर्मचक्रा "चा कारभार पाहण्याचे बाबतींत स्वतःवरच सर्व जबाबदारी पडली आहे. तथापि याबतींत माझे मित्र श्री. पी. आर. कर्णिक, श्री. तु. वि. संघाचे उपकार्यवाह, यांचा उल्लेख केल्याविना राहवत नाही. मुख्यतः, संघाचा हिशोब पुरा करणें, व चॅरिटीकमिशनरकडे पाठविण्यासाठीं, टँड्रे कंपनी कडून तो तपासून घेणें, या कामीं त्यांची मदत बहुमोल आहे. त्याचप्रमाणें " गांधी स्मारक निधी ", प्रेस रजिस्ट्रार यांचेकडे पाठविण्याची माहिती पद्धतशीर व बिनचूक पाठविण्याचे कामींहि त्यांचा उपयोग संपादकास फार झाला. ते स्वतःच ऑडिटर असल्यामुळें त्यांचें विशेषज्ञान 'धर्मचक्रा' ला लाभलेलें आहे. त्याप्रमाणेंच हिंदीचे संपादक श्री. शिवसहाय पाठक यांचेहि संपादनाचे कामी बहुमोल सहाय्य झालें. याशिवाय सिद्धार्थ कॉलेजांतील हिंदीचे प्राध्यापक व श्री. काशीनाथ मालवीयजी यांचा उपयोग मासिकाचा दर्जा वाढविण्याकडे होतो, या गोष्टीचा निर्देश करणें आवश्यक वाटतें. लौकरच श्री. के. र. काशीकर यांचीहि जोड धर्मचक्राला होईल. "इंडोजपानीज असोसिएशन" या संस्थेनें भगवान् बुद्धाच्या २५०० व्या वाढदिवसाच्या निमित्तानें काढलेल्या विशेषांकांच्या ५० प्रती खरेदी करून धर्मचक्राचा गौरव केला ही गोष्ट उल्लेखनीय आहे. धर्मचक्राचा प्रचार भारताच्या बाहेरील बौद्ध देशांत होत चालला असून जर्मनी व कोरिया येथें तो जातो. जपानांतील सोटोपंथ व अनानाईक्यो पंथ यांचे प्रेम धर्मचक्रावर पहिल्यापासून आहे. "धर्मचक्रा" वर अमेरिकेंतील " Golden Lotus " या मासिकांत उत्साहवर्धक अभिप्राय आला आहे, ही गोष्ट भारतीयांना अभिमानास्पद आहे. श्री. बोरकर महाराज यांचा आशीर्वाद येथें छापला आहेच. श्री. केसकर महाराज यांची प्रकृति समाधानकारक नाहीं, ही गोष्ट संपादकांना वेदना उत्पन्न करणारी आहे. त्यांचे छत्र संपादकांवर आहे, ही निष्ठा संपादकांनीं उराशीं बाळगली आहे. परमेश्वरानें त्यांना आराम द्यावा ही, प्रार्थना.

× × ×

अशा रीतीनें १० वर्षे पुरीं होऊन धर्मचक्रानें ११ व्या वर्षांत पदार्पण केलें आहे. विश्वसंतांनीं शिकविलेला नैतिक मार्ग जनतेंत प्रसृत करून जनतेचें मन उदार, विशाल, नैतिकदृष्ट्या सोज्वळ, विश्वात्मक देवाची उपासना करणारें असें व्हावें, हीच शिकवण भारतीयांना द्यावी, अशी संपादकांची इच्छा. त्यांचाच मार्ग आजच्या जगांत हळूंहळूं संमत होणार ही त्याची निष्ठा. " यादृशी भावना यस्य सिद्धिर्भवति तादृशी, " याप्रमाणें धर्मचक्राकडून अपेक्षित कार्यांत सिद्धि मिळो, हीच प्रार्थना केल्याशिवाय हें निवेदन पुरे करतां येणार नाहीं. भारतानें आपल्या उज्वल परंपरेला जागावें व विस्तृत विशाल कोन परिणत करून सर्वोदयाचें ध्येय साध्य करून स्वातंत्र्याला बळकटी आणावी. हें सर्व जीवनशुद्धीच्या जोरावर. ही सदिच्छा व्यक्त करून भारतीयाचे त्रिविध कल्याण व्हावें, व ते साधण्यास संताचा मार्ग उपयोगी पडेल अशी ध्येयनिष्ठा व्यक्त करून, हें निवेदन संपवितों. सर्व्वेव भूता सुमना भवन्तु। सर्व प्राणीमात्र शोभनमनाचे होवोंत !

# पूर्व व पश्चिम

**पूर्व व पश्चिम :** अर्धसत्यांनीं विभागलेलें जग.

[ हा लेख उस्मानिया विद्यापीठांतील भूतपूर्व प्राध्यापक विल्यम **मूल्डर** यांचा. हे अमेरिकन वाङ्मयाचे प्राध्यापक होते. युटा विद्यापीठांत ते इंग्रजीचे प्राध्यापक व "वेस्टर्न ह्युमॅनिटीज रिव्ह्यू"चे संपादक आहेत. त्यांच्या वरील शीर्षकाखालील मूळलेखांतील उतारे 'युनायटेड स्टेटस् इन्फर्मेशन सर्व्हिस मुंबई', नें 'अमेरिकन जीवनां'त दिलेले आहेत. ते खरोखर वाचनीय आहेत. म्हणून **त्या संस्थेच्या सौजन्यानें** धर्मचक्राचे वाचकासाठीं ते खालीं देत आहोंत.—**संपादक** ]

मानव हें एक संपूर्ण सत्य आहे. त्याच्यावर जे निरनिराळे शिक्के मारण्यांत येतात तीं अर्धसत्यें होत. तो कम्युनिस्ट वा भांडवलशहा आहे, असें म्हणणें किंवा तो हिंदु वा मुसलमान आहे असें म्हणणें, हें अर्धसत्यच आहे. तो मानव अखिल मानव जातींतला एक आहे. शेक्स्पीयरच्या शायलॉकप्रमाणें नर्म विनोद केल्यावर हंसणारी नी जखम झाल्यावर रक्ताळणारी ती एक व्यक्ति आहे, हेंच खरें.

'पूर्व ती पूर्व, पश्चिम ती पश्चिम' हें सुद्धां अर्धसत्यच. "पाश्चात्य मानव" व "पौर्वात्य मानव" अशी खरोखरच कांहीं चीज आहे का? पूर्व ही निष्क्रिय, प्रकृतीनें थंड व पश्चिम कृतिशील असें कांहीं आहे? पूर्वेतील सगळा गूढवाद पश्चिमेंत बुद्धिप्रामाण्यवादी बनून येतो, असें कांहीं आहे?

पूर्व व पश्चिम या शब्दांतून ध्वनित होणारे निरनिराळे अर्थ मान्य केल्यावरहि कांहीं आश्चर्यजनक फरक रहातातच. पूर्व व पश्चिम या मूलभूत विसदृश्य असल्याचें ज्यांच्या आधारें किप्लिंग म्हणाला, ते हे फरक. कोनी आयलंड या न्यूयॉर्कच्या प्रसिद्ध किनाऱ्यावर पोहायला येणारे सुखासीन वृत्तीचे लोक व गंगेच्या घाटावर स्नानसंध्या नी जपजाप्य करणारे लोक यांची संख्या सारखी असली तरी त्यांच्यांत कोणती गोष्ट समान आहे? पण तसें पाहिलें तर या फरकांमुळें–म्हणजे त्यांचें यथार्थतेनें मूल्यमापन केलें तर–पूर्व आणि पश्चिम हीं अगदीं परस्पर विरोधी वाटण्यापेक्षां तीं एकमेकांना पूरकच ठरायला हवींत. वृत्तपत्रांत ज्या त्याच त्या कंटाळवाण्या राजनैतिक वाटाघाटींना अगदीं अटीतटीची व ठळक प्रसिद्धि मिळत असते, त्या वाटाघाटींबाहेर पूर्व–पश्चिमेला जर कधीं एकत्र यायचें असलें तर दोन्ही टोकें वगळून, दोहोंच्या मध्येंच कुठेंतरी त्यांनीं भेटलें पाहिजे. आपणाला एकमेकांची गरज आहे, एकमेकांना शिकवितां येण्याजोगीं कांहीं निर्विवाद्य सत्यें आपणांशीं आहेत, असें वाटायला लावणाऱ्या मानवी परिस्थितीच्या मर्मस्थानीं ही भेट घडली पाहिजे. भूक आणि भावना–भाकरी आणि सौंदर्य यांचा आम्हाला समन्वय साधावयाचा असल्यास पश्चिमेच्या उपक्रमशील व प्रभावी अशा तंत्रविज्ञानाप्रमाणेंच पूर्वेच्या सौंदर्यशाली नी अंतःस्फूर्त अशा प्रज्ञेचीहि नव्या जागतिक संस्कृतीला गरज भासेल. व्हेरा मायकेल्स डीननें म्हटल्याप्रमाणें "दोघांनाहि कल्पकता दाखवावी लागेल." परस्परांना त्यांनीं एकमेकांच्या डोळ्यांनीं पाहिलें पाहिजे.

## पूर्वग्रह

पश्चिमेनें समग्र जागतिक दृष्टिकोनांतून पहाण्याची वेळ आली आहे. पूर्वेकडे वरच्या चष्म्यांतून पहाण्याची पश्चिमेची संवय जायला फार वेळ लागत आहे. ( उलटपक्षीं पूर्वेची पश्चिमेविषयींची भावनाहि एक प्रकारच्या तुच्छतेची आहे. ) "जागृत पूर्वेची" पश्चिम जी तारीफ करते तींतहि पश्चिमेची वरील वृत्ति प्रगट होते. या स्तुतींतील गर्भित आशय असा कीं, पाश्चिमात्य प्रमाण–मूल्यांची जाणीव आतां पूर्वेला होऊं लागली आहे.

## पूर्वेकडील तिहेरी क्रांति

तथापि जगाच्या विविध संस्कृतींत आज एका मोठ्या क्रांतीची लाट आली असल्यानें त्यांतील समतोल बदलला आहे. पूर्व नी पश्चिम यामुळें एका समान पातळीवर आलीं आहेत. पश्चिमेला यापुढें अहंगंड बाळगणें सोयीचें नाहीं. पाश्चिमात्य जगांत कित्येक शतकें ज्या सामाजिक, राजकीय व आर्थिक सुधारणा उत्क्रांत होत गेल्या तें पौर्वात्य जग आज एका हयातींत साध्य करूं पहात असून अशा रीतीनें तेथें तिहेरी क्रांति होऊं घातली आहे. या क्रांतीमुळें पूर्वेकडे आपण सादर सहिष्णुतेनें पहाण्यास शिकलें पाहिजे.

## वैयक्तिक पातळीवरून

सरंजामशाही व प्राथमिक अवस्थेंतील शेती प्रबोधनयुग ( रेनेसाँ ) व धार्मिक सुधारणेची चळवळ ( रिफॉर्मेशन ) आणि राजकीय नी औद्योगिक क्रांत्या या सर्वांतून बाहेर पडलेल्या पश्चिमेनें पूर्वेच्या वेणा जाणल्या पाहिजेत. "एका महान् ध्येयानें प्रेरित झालेली समग्र जनता" ही जणूं कांहीं रूप-रंग नसलेली पौर्वात्य जगांतील लक्षावधींची एक गठडी आहे, असें मानून पश्चिमेला तिच्याकडे दुर्लक्ष करतां येणार नाहीं. जॉन हर्सेच्या "ए सिंगल पेबल" या कथेंतल्याप्रमाणें वैयक्तिक पश्चिमेपुढें वैयक्तिक पूर्वच उभी ठाकली पाहिजे. यांगत्से नदींतून वर ओढल्या जाणाऱ्या एका मचव्यांतील तरुण आजारी अमेरिकन इंजिनीयराला आपली अवस्था पाहून मोठा धक्का बसतो. ज्या तऱ्हेचें कदान्न त्याला देण्यांत येतें तें पाहून "मचव्याचा मालक आणि त्याची बायको, इतकेंच काय पण त्यावरील खलाशी, स्वयंपाकी किंवा ढोलक्या यांच्यापेक्षांहि माझा दर्जा खालीं आहे; मी अमेरिकन आहे आणि इंजिनीयरिंगचें उच्च शिक्षण मी घेतलें आहे, तरीसुद्धां दीडदमडीच्या कंगाल, अज्ञ लोकांपेक्षां थोड्या वरच्या पातळीचा पगार मला मिळतो," याची जाणीव त्याला होते.

## पहिलें पाऊल

या तरुण इंजिनीयराला ही जी जाणीव झाली तशीच आशियांतील पाश्चिमात्य तांत्रिक व शैक्षणिक शिष्टमंडळांतील विचारी व ग्रहणशील लोकांना जर झाली तर नम्रतेचा तो आदर्श पाठ ठरेल. आंतरराष्ट्रीय समजुतदारपणाच्या क्षेत्रांतील हें एक कठीण असें पहिलें पाऊल आहे. पण पहिलेंच पाऊल. याचा शेवट जरी यदाकदाचित् खऱ्याखुऱ्या सर्वव्यापी संस्कृतीच्या निर्मितींत झाला नाहीं, तरी निदान पूर्व व पश्चिम वैयक्तिक पातळीवरून समोरासमोर येतांच परस्परांविषयींच्या आदरभावनेंतून त्यांच्या ठिकाणीं एक समग्र जागतिक दृष्टिकोन निर्माण होण्यांत तरी त्याची फलश्रुति दिसेल.

## कांचेचीं घरें

कांहीं क्षेत्रांत अर्थात् वैचारिक देवाणघेवाण कदाचित् संपूर्णपणें अशक्य होऊन बसेल. पाश्चिमात्य वाङ्मयांतील रोमॅंटिक प्रेमाचाच प्रकार घ्या. ठरवून होणारीं लग्नें आणि मातापितरांची भक्ति यांवर भर देणाऱ्या बौद्ध वा कन्फुशियन प्रेमाशीं जुळणारी एक तरी गोष्ट आहे का ? " मला तुमचे चित्रपट उमगत नाहींत; पण इंग्रज लोक आणि त्यांचें न्यारें प्रेम मला शिकायचें असतें," असें एकादा जपानी विद्यार्थी सांगतो. तरीसुद्धां समांतर गोष्टी आढळल्यास कितीहि दूरान्वयानें त्यांचा संबंध आला तरी—आपण एका समान भूमिकेवर येतोंच. जातिभेद नी वर्णभेद म्हणजे कांचेचींच घरें. तेव्हां भारतीय वा अमेरिकन यांपैकीं कुणीहि कुणावर दगडफेंक करण्याचें कारण नाहीं. आणि त्यांतहि, आपल्या स्वतःच्या संरजामशाही इतिहासांतील वर्णभेद किती चिवट, कांटेकोर होतो याचा पाश्चिमात्यांनीं थोडा विचार करावा—किंवा आपल्यामध्येंच सत्प्रवृत्तीची मिरासदारी गाजविणारे जे धर्मलंड वा अस्पृश्य नी पापी मानले गेले आहेत त्यांचा खिश्चनांनीं थोडा विचार करावा. हा विचार आपणाला उपकारकच ठरेल.

## संपत्तीमागील तत्त्वज्ञान

याउलट पौर्वात्यांनीहि अमेरिकन स्वावलंबनाबाबतच्या व भौतिकवादाबाबतच्या आपल्या कल्पना बदलल्या पाहिजेत. स्वावलंबन हें सहकार्थ या अर्थानें आहे. तसेंच भौतिकवाद ही एक प्रेरक शक्ति आहे. तें साधन आहे, साध्य नव्हे. परमेश्वर हा या पृथ्वीचा खरा शास्ता, नियंता व विधाता असून मानव त्याचा सारथी आहे. या भावनेंतून हा भौतिकवाद निर्माण झाला. आतांपर्यंन्त जगानें कधींहि पाहिल्या नाहींत अशा ... शूर संस्था ज्या संपत्तींतून निर्माण झाल्या आणि गेल्या ५० ... " महान् परिवर्तन " म्हणून ओळखलें जाणारें जें संपत्तीचें समाजी... अमेरिकेंत झालें त्यामागील तत्त्वज्ञान हेंच आहे.

## माणसांप्रमाणेंच वस्तूंचीहि कदर

आपल्या मालमत्तेविषयींची अमेरिकन लोकांची भावना ... जिव्हाळ्याची असते. भारतांतील अहिंसेचें अमेरिकेंतील प्रति... शोधावयाचें झाल्यास या संग्रह-भावनेंत तें दिसेल. श्रमाविषयीं ... पवित्र भावना असते त्याच भावनेंतून या श्रमांचीं फळें चांग... जातात. या आस्थेला एक आत्मिक अस्तर आहे. पूर्वेत कुठेंहि ... आस्था दिसणार नाहीं. माणसांप्रमाणेंच वस्तूंविषयीं आदर बाळग... हें शिक्षण चारित्र्य घडवितें.

## " भारताचा मार्ग "

८५ वर्षांपूर्वी आपल्या आत्म्यासाठीं निवारा शोधतांना वॉल्ट व्हि... मननें आपल्या पिढीला पूर्व–पश्चिमेच्या मीलनाचें एक प्रतीक दि... " पॅसेज टु इन्डिया " या आपल्या महान् काव्यांत अटलांटिकखा... घेतलेली सागरी संदेशवाहक तार, सुवेझचें उद्घाटन व अमेरिके... दोन्ही टोकांना जोडणारा लोहमार्ग यांचें त्यानें उत्साहानें स्वागत के... १८६९ सालच्या जगाला जोडणारे हे ३ दुवे म्हणजे मानव जातीं... सांस्कृतिक व आत्मिक ऐक्याचे डिंडिम वाजविणारा—निरनिराळीं ... हवामानें व महासागर यांचा—संगमच होय " अशा शब्दांत त्यानें ... घटनांचें वर्णन केलें. " भारताचा हा मार्ग " म्हणजे मानवी आत्म्या... विचाराच्या गाभ्याकडे जो प्रवास चाललेला असतो, त्याचेंहि ए... प्रतीक आहे.

## उत्तुंग प्रतीक

खुद्द चालू घडीलाहि एका शेर्पानें व न्यू झीलंडमधील गिर्यारोह... पूर्व–पश्चिमेच्या भेटीचें एक उत्तुंग प्रतीक आपल्या हवालीं केलें आ... २९ मे १९५३ च्या सकाळीं एडमंड हिलेरी व तेनसिंग नोर्के यां... जगांतील सर्वोच्च शिखरावर, एव्हरेस्टवर, पहिला पाय रोंवला. ते... तब्बल १५ मिनिटें त्यांनीं खालची पृथ्वी न्याहाळली. आकाशावि... चढाई करण्यास सिद्ध झालेलीं हीं माणसें या युगाचीं प्रसादचिन्हेंच हो...

याच प्रतीकाचा निर्भेळ आधार घेऊन मला या लेखाचा शेवट कर... आला असता तर किती बरें झालें असतें ! पण दुर्दैवानें उत्तुंग शिखरा... जें शुद्ध होतें तें खालीं येतांच त्यांत हीण मिसळलें. निसर्गाची ही अं... रची हद्द ओलांडल्याबद्दल सुरुवातीला अत्यानंदानें नाचूं लागले... पूर्व-पश्चिमेंत, 'शिखरावर आधीं कुणी पाय रोंवला' असा वाद नंतर ... झाला. जगण्यासाठीं एकमेकांवर विसंबून रहाणाऱ्या गिर्यारोहकांच्या ... हा वाद मूर्खपणाचा होता. " आम्ही जवळ जवळ एकदमच शिखरा... पोंचलों " असें पत्रकहि यावर हिलेरी व तेन्सिंग यांना काढावें लागलें ... भविष्यकाळीं कुठलीहि संस्कृति येवो, तिच्या शिखरावर पोंचतांना पू... पश्चिमेला एकमेकांची सोबत करूनच वर चढावें लागेल. वाद घाल... बसण्यापेक्षां ही चढण चढण्यांतच त्यांना अपूर्व आनंदाचा साक्षात्का... घडो, एवढीच आपण प्रार्थना करूं या.

# श्री ज्ञानदेवांचा मानवतावाद

लेखक :—वाचस्पति विष्णुजी क्षीरसागर, नाशीक.

आपल्या 'भावार्थ–दीपिके'च्या अखेरीस श्रीज्ञानदेवांनी भगवन्ताजवळ सुन्दर प्रसाद मागितला आहे. सुमारें नऊसहस्र ओव्यांच्या ह्या महाकाव्यांतून त्यांनीं ईश्वरी आदेश आपल्या भाषाबंधूंना सांगितला. सत्कृत्यांनीं देव प्रसन्न होतो. भावार्थ दीपिका हें तर महान सत्कृत्य आहे. अनंत काल पर्यन्त समाजाला प्रकाश दाखवून मार्गदर्शन करण्याचें सामर्थ्य ह्या 'दीपिकें'त आहे. विधात्यानें ज्ञानदेवांना कारण करून अंधारांत चांचपडणाऱ्या सहस्रावधी मुमुक्षूंसाठीं प्रचलित केलेली ही अमर ज्योति आहे. ज्ञानदेवांचा भगवंत सहाजीकच ह्या कृतीनें प्रसन्न झाला कीं तो, भक्तांना वर देतो. त्यांचीं दुःखें नाहींशी करतो. त्यांना हवें ते देतो. देवा सारखा दाता देवच ! अशा स्तुतीनें प्रसन्न झालेल्या भगवन्ताजवळ ज्ञानदेवांनीं मोठे अद्भुत मागणें मागितलें आहेत. काय मागावें त्यांनीं ?

ते ज्ञानदेव वर मागत आहेत कीं, आमचें परमपूज्य पिताजी विठ्ठलपंत गुरूच्या आज्ञेला प्रभु–आज्ञा मानून पुनः संन्यासाचे गृहस्थी झाले. हें अघटित भयानक कृत्य पाहिल्यावर आमच्या समाजानें त्यांना वाळीत घातलें. समाज त्यांच्याशी बोलेना. त्यांना अन्न देईना. त्यांना जीवन नकोसें करून अस्पृश्यांहून अस्पृश्य ठरविलें. प्राणान्तिक यातना दिल्या. शेवटीं मुलांच्या कल्याणासाठीं समाजाला शरण जाऊन त्या महापुरुषानें समाज–पुरुषाजवळ प्रायश्चित्ताची याचना केली. समाजानें त्यांना देहदंडाचें शासन दिलें. प्रयागच्या त्रिवेणींत आपल्या लाडक्या ज्ञानराजाच्या आईवडिलांनीं देहत्याग केला. ज्यांनी जगाला निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान अन् मुक्ताबाई दिली, त्यांना समाजानें आत्महत्या करावयास लावलें. ज्यानें सहस्रावधी घरांत आपल्या भावार्थ–दीपिकेनें सहस्रावधी ज्ञानदीप लावून दिवाळीचा आनंद दिला त्यांच्या जन्मदात्यांनाच **आम्ही जीवें मारलें**. काय विलक्षण न्याय आहे हा !

एवढें भयानक कृत्य समाजानें केल्यावर मग ज्ञानदेवांच्या मनांत समाजाबद्दल प्रेम राहिलें असेल कां ? समाजानें अस्पृश्य ठरविलें म्हणून त्यांनीं समाजाविरुद्ध कोणतें बंड केलें ? कां भयावह परधर्म स्वीकारला ? समाजाला दुःखातिरेकानें भयानक शाप तर दिले नाहींत ना ? महाभारतांत महासती गांधारी आपली सर्वमुलें रणांगणांत मारलीं गेल्यावर पुत्रशोकानें वेडी झाली. ह्या भयानक संहाराला श्रीकृष्णच कारण आहे, असा तिचा समज झाला. श्रीकृष्ण तिच्या भेटीस गेल्यावर तिने त्यांना भयानक शाप दिला. ती म्हणाली " श्रीकृष्णा, ह्या संहाराला तूं जबाबदार आहेस. आज जशीं माझीं मुले मेलीं तशीं छत्तीस वर्षांनी तुझीं सारीं मुलें बाळें मरून जातील. " मानवी दुःखातिरेकानें वेड्या झालेल्या मातृहृदयांतून ही अपत्यप्रेमामुळें स्रवलेली शापवाणी आहे.

आमचे ज्ञानदेव असा शाप देत नाहींत. तर ते प्रसन्न झालेल्या आपल्या विश्वात्मक–देवाला म्हणतात :—

" देवा ! तूं जर ह्या वाग्यज्ञानें प्रसन्न झाला असशील तर मला हें वरदान दे कीं, जे दुष्ट प्रवृत्तीचे लोक असतील, नेहमीं जे वांकडेच वागणारे असतील, त्यांचा तो वाकडेपणा जाऊं दे. त्यांच्या हातून दुःष्कृत्यें न होऊं देतां त्यांचे सत्कर्माचे ठायीं प्रेम वसूं दे. आणि देवा ! असें प्रेम अन्तरीं निर्माण झाल्यावर भूतमात्रांत परस्परांत जिवाची मैत्री होऊ दे. सर्वत्र जिव्हाळा निर्माण होऊ दे. जे अज्ञानी–पतित–आहेत त्यांच्या अन्तःकरणांतील अज्ञानांधकार जाऊन त्या ठिकाणीं स्वधर्माचा सूर्य उदय पावो. स्वधर्मांविषयीं त्यांची निष्ठा वाढो. मग ते स्वधर्माचरण करूं लागल्यावर त्यांना योग्य ज्ञानदृष्टि येईल. आणि भगवंता ! त्यांना योग्य वर मागण्याची दृष्टी आल्यावर ते अयोग्य मागणी करणार नाहींत; चांगले तेंच मागतील. ह्या साऱ्या प्राणिमात्रांना मग जें हवे असेल, तें तूं खुशाल दे....सदैव मांगल्याचाच वर्षाव करणारे तुझ्या भक्तांचे समुदायचे समुदाय सतत ह्या देवभूमीवर अवतरत असतात. अशा भक्तांची कल्याणकरी संगती देवा, सर्वांना लाभूं दे...भगवंता तुझे हे भक्त कसे ? तर ते जणूं कल्पवृक्षांचे अंकुरच आहेत. स्वर्गांत तर एकच कल्पवृक्ष आहे. येथें–भूमंडळीं–सहस्रावधी कल्पवृक्षांचे अंकूर उगवले आहेत. मनाची चिंता नाहींशी करणारा चिंतामणी क्वचितच बघावयास मिळतो. तो तर बोलत नाहींच. पण देवा, हे तुझे भक्त म्हणजे चैतन्यमय चालते असे अगणित चिंतामणीच होत. स्वर्गांत तर अमृताचा एकच कुंभ होता; त्यासाठीं केवढीं भांडणें झालीं ! आमच्याकडे तर अमृताचा चालता बोलता प्रचंड महासागरच आहे. जणूं कांहीं ते निष्कलंक चंद्रबिंबासारखे सुन्दर ! प्रभातकालच्या तापहीन प्रसन्न सूर्यबिंबाप्रमाणें उत्साहदायी आणि सदैव अंतरीं सज्जनतेचा आविष्कार असणारे खरोखरच आमचे सोयरे होत. जे स्वतः जळून इतरांना प्रकाश दाखवितात, जे स्वार्थ रहित प्रेम करतात, तेच खरे आप्त ! सोयरे ! ! आणि मग भगवंता ! सारा त्रैलोक्य सुखी होवो. सदैव ते तुझेंच स्मरण करोंत. "

ज्ञानराजांच्या अन्तःकरणांतून बाहेर पडलेला हा सर्वांग–सुन्दर आविष्कार मन थक्क करणारा आहे. आजच्या जगांतील दांभिक मानवतावाद्यांनीं ज्ञानदेवांच्या अन्तरंगाच्या ह्या बोलांचें चिंतन केलें, तरच त्यांना यथार्थ–मार्ग सांपडू शकेल. त्यांतच खरा मानवतेचा साक्षात्कार आहे.

• • •

# सर्वत्र भगवान !

लेखक—**श्री. भवानीशंकर नीळकंठ वागळे**

पन्नास वर्षांपूर्वीची ही एक सत्यकथा आहे. शिरडीचे संत-शिरोमणी साईबाबा यांनीं अध्यात्म जगतांत फार प्रसिद्धी मिळविली. ते एकदां विचारमग्न स्थितींत असतांना खुदकन् हंसले—

"तुझ्याकडे मंदिरांत कुणी माणसें येतात कां ?" साईबाबांनीं आपल्या प्रमुख शिष्याला–उपासनीबाबांना–प्रेमानें प्रश्न केला. ते साईबाबांच्या आज्ञेबरहुकूम शिरडीच्या सीमेवर असलेल्या खंडोबाच्या मोडक्या मंदिरांत राहत होते. ते ब्राह्मण असल्या कारणानें द्वारकामाई–अर्थात मशिदींत-राहूं इच्छित नव्हते. ते नित्यनेमानें साईबाबांच्या दर्शनास येत असत. आपल्या हातानें भोजन तयार करून ते नित्य दुपारीं साई-बाबांना मशिदींत तें आणून देत असत. साईबाबांचें जेवण उरकल्यावर ते अन्न-पाणी ग्रहण करीत असत.

"तेथें कोणीही येत नाहीं, बाबा !" उपासनी महाराजांनीं उत्तर दिलें.

"बरं, बरं, कधीं कधीं मी येत जाईन." साईबाबांनीं उपासनी महाराजांकडे कृपादृष्टीनें पाहत म्हटलें.

× × ×

ती दुपारची वेळ होती. सूर्याच्या प्रखर किरणांनीं पृथ्वी तप्त झाली होती. उपासनी महाराज भयंकर उन्हांमधून भोजनाचें ताट घेऊन गुरु-गृहीं चालले होते. अचानक ते रस्त्यांतच थबकले. त्यांना वाटेंत एक काळा कुत्रा दिसला ! तो भुकेनें व्याकुळ झाला होता. साईबाबांना भोजन समर्पण केल्यानंतरच कुत्र्याला अन्न घालायचं, असं उपासनी बाबांनीं ठरवलं. ते पुढें चालूं लागले व त्यांच्या मनांत विचार परिवर्तन झाले. पण समोर असलेला काळा कुत्रा कुठेंच दिसेनासा झाला !

"तुला इतक्या कडक उन्हांतून येण्याची काय आवश्यकता होती! मी तर रस्त्यांतच उभा होतों कीं !" साईबाबांनीं वरील उद्गार काढतांच उपासनी बाबांना काळया कुत्र्याची आठवण झाली व त्यांना वाईट वाटलें. साईबाबा पुन्हां कांहीं बोलले नाहींत.

दुसऱ्या दिवशीं पुन्हां भोजनाचं ताट घेऊन उपासनी बाबा मंदिरांतून बाहेर निघतात न निघतात तोंच त्यांना एक शूद्र भिंतीला टेकून उभा असलेला दिसला ! बाबा लगबगीनें मशिदीकडे जाण्यास निघतांना भुकेनें व्याकूळ झालेल्या शूद्राची चुळबूळ सुरूं झाली. पण बाबांना आपल्या गुरूपाशीं जाऊन पोंहचण्याची प्रथम तळमळ लागली होती.

"तूं पुन्हां व्यर्थ कष्ट केलेस. मी मंदिराच्या भिंतीपाशींच आज उभा होतो." साईबाबांनीं आपल्या प्रिय शिष्याच्या नेत्रांत अंजन घातलें !

"कुत्रा व शूद्र–सर्व प्राणीमात्रामध्यें एकाच परमात्म्याचा वास आहे. मी त्यांच्याच रूपानें **आत्मसत्य** प्रगट करून तुला वेदान्त प्रतिपाद्य परब्रह्म परमात्म्याच्या सर्वव्यापकतेचें रहस्य समजाऊन दिलें. **तोच सर्वत्र आहे.** प्रत्येकाविषयीं सद्भाव ठेऊन यथोचित कर्तव्याचं पालन करणें परम श्रेयस्कर आहे. भगवान घटाघटांमध्यें व्यापलेला आहे. त्याला ओळखून त्याच्याशीं संलग्न होण्याची आवश्यकता आहे." इतकें म्हणून साईबाबांनीं उपासनी बाबांना आशीर्वाद दिला.

• • •

# सगाथावग्गो-देवतासंयुत्त

## १. नळवग्गो

### (१) ओघं

एवं मे सुतं। एकं समयं भगवा सावत्थियं विहरति जेतवने अनाथ-पिण्डिकस्स आरामे॥

अथ खो अञ्ञतरा देवता अभिक्कन्ताय रत्तिया अभिक्कन्तवण्णा केवल-कप्पं जेतवनं ओभासेत्वा येन भगवा तेनु'पसङ्कमि। उपसङ्कमित्वा भगवन्तं अभिवादेत्वा एकमन्तं अट्ठासि॥

एकमन्तं ठिता खो सा देवता भगवन्तं एतद'वोच-कथं नु त्वं मारिस ओघं अतारी'ति॥

अप्पतिट्ठं खो अहं आवुसो अनायूहं ओघमतारिं'ति। यथाकथं पन त्वं मारिस अप्पतिट्ठं अनायूहं ओघमतारी'ति॥

यदा स्वाहं आवुसो सन्तिट्ठामि तदास्सु संसीदामि।
यदा स्वाहं आवुसो आयूहामि तदास्सु निब्बूय्हामि।
एवं खो अहं आवुसो अप्पतिट्ठं अनायूहं ओघमतारिं'ति॥
चिरस्सं वत पस्सामि ब्राह्मणं परिनिब्बुतं।
अप्पतिट्ठं अनायूहं तिण्णं लोके विसत्तिकं'ति॥
इदं अवोच सा देवता। समनुञ्ञो सत्था अहोसि॥
अथ खो सा देवता 'समनुञ्ञो मे सत्था'ति भगवन्तं।
अभिवादेत्वा पदक्खिणं कत्वा तत्थेव अन्तरधायी'ति॥

### २. निमोक्खो

॥ **सावत्थियं** ॥ अथ खो अञ्ञतरा देवता...पे०...
(§१) भगवन्तं एतद'वोच :—
जानासि नो त्वं मारिस सत्तानं निमोक्खं पमोक्खं विवेकं 'ति?।
जानामि खो अहं आवुसो सत्तानं...पे०...विवेकं 'ति।
यथाकथं पन त्वं मारिस जानासि सत्तानं...पे०...विवेकं'ति?॥
नन्दीभव-परिक्खया, सञ्ञा-विञ्ञाण-संखया।
वेदनानं निरोधा उपसमा। एवं खो अहं आवुसो जानामि।
सत्तानं निमोक्खं पमोक्खं विवेकं'ति॥

### ३ उपनेय्यं

॥ **सावत्थियं** ॥...एकमन्तं ठिता खो सा देवता भगवतो सन्तिके इमं गाथं अभासि-:—
उपनीयति जीवितं अप्पमायु। जरूपनीतस्स न सन्ति ताणा॥
एतं भयं मरणे पेक्खमानो। पुञ्ञानि कयिराथ सुखावहानी'ति॥
उपनीयति जीवितं अप्पमायु। जरूपनीतस्स न सन्ति ताणा॥
एतं भयं मरणे पेक्खमानो। लोकामिसं पजहे सन्तिपेक्खो'ति॥

### ४ अच्चेन्ति

॥ **सावत्थियं** ॥...एकमन्तं ठिता खो सा देवता भगवतो सन्तिके इमं गाथं अभासि :—
अच्चेन्ति काला तरयन्ति रत्तियो। वयोगुणा अनुपुब्बं जहन्ति॥
एतं भयं मरणे पेक्खमानो। पुञ्ञानि कायिराथ सुखावहानी'ति॥
अच्चेन्ति काला तरयन्ति रत्तियो। वयोगुणा अनुपुब्बं जहन्ति॥
एतं भयं मरणे पेक्खमानो। लोकामिसं पजहे सन्तिपेक्खो'ति॥

### ५ कति छिन्दे

॥ **सावत्थियं** ॥ एकमन्तं ठिता खो सा देवता भगवतो सन्तिके इमं गाथं अभासि :—
कति छिन्दे कति जहे। कति चुत्तरि भावये।
कति सङ्गातिगो भिक्खु। 'ओघतिण्णो' ति वुच्चति॥
पञ्च छिन्दे पञ्च जहे। पञ्च चुत्तरि भावये।
पञ्च सङ्गातिगो भिक्खु। ओघतिण्णो'ति वुच्चति॥

### ६ जागरं

॥ **सावत्थियं** ॥ एकमन्तं ठिता खो सा देवता भगवतो सन्तिके इमं गाथम'भासि :—
कति जागरतं सुत्ता। कति सुत्तेसु जागरा।
कतीहि रजं आदेति। कतीहि परिसुज्झती'ति॥
पञ्च जागरतं सुत्ता। पञ्च सुत्तेसु जागरा।
पञ्चहि रजमादेति। पञ्चहि परिसुज्झती'ति॥

### ७. अप्पटिविदिता

॥ **सावत्थियं** ॥ एकमन्तं ठिता खो सा देवता भगवतो सन्तिके इमं गाथम'भासि :—
येसं धम्मा अप्पटिविदिता। परवादेसु नीयरे।
सुत्ता ते नप्पबुज्झन्ति। कालो तेसं पबुज्झितुं'ति॥
येसं धम्मा सुप्पटिविदिता। परवादेसु न नीयरे।
ते सम्बुद्धा सम्मदञ्ञा। चरन्ति विसमे समं'ति॥

### ८ सुसम्मुट्ठा

॥ **सावत्थियं** ॥ एकमन्तं ठिता खो सा देवता भगवतो सन्तिके इमं गाथम'भासि :—
येसं धम्मा सुसम्मुट्ठा। परवादेसु नीयरे।
सुत्ता ते नप्पबुज्झन्ति। कालो तेसं पबुज्झितुं'ति॥
येसं धम्मा असम्मुट्ठा। परवादेसु न नीयरे।
ते सम्बुद्धा सम्मदञ्ञा। चरन्ति विसमे समं'ति॥

### ९ मानकामा

॥ **सावत्थियं** ॥ एकमन्तं ठिता खो सा देवता भगवतो सन्तिके इमं गाथमा'ह :—
न मानकामस्स दमो इधत्थि। न मोनमत्थि असमाहितस्स।
एको अरञ्ञे विहरं पमत्तो। न मच्चुधेय्यस्स तरेय्य पारं'ति॥
मानं पहाय सुसमाहितत्तो। सुचेतसो सब्बधि विप्पमुत्तो।
एको अरञ्ञे विहरं अप्पमत्तो। स मच्चुधेय्यस्स तरेय्य पारं॥

### १० अरञ्ञे

॥ **सावत्थियं** ॥ एकमन्तं ठिता खो सा देवता भगवन्तं गाथाय अज्झभासि :—
अरञ्ञे विहरन्तं सन्तानं ब्रह्मचारिनं।
एकभत्तं भुञ्जमानं केन वण्णो पसीदती'ति॥

अतीतं ना'नुसोचन्ति । नप्पजप्पन्ति नागतं ।
पच्चुप्पन्नेन यापेन्ति । तेन वण्णो पसीदति ॥
अनागतप्पजप्पाय । अतीतस्सानुसोचना ।
एतेन बाला सुस्सन्ति । नळो'व हरितो लुतो'ति ॥

### नळवग्गो पठमो

तत्रुद्दानं:—ओघं निमोक्खो उपनेय्यं अच्चेन्ति कतिछिन्दि च ।
जागरं अप्पटिविदिता सुसम्मुट्ठा मानकामिना ।
अरञ्ञे दसमो वुत्तो वग्गो तेन पवुच्चति ॥

× × ×

## परिच्छेदो दुतियो—नन्दनवग्गो

### १. नन्दन

एवं मे सुतं । एकं समयं भगवा सावत्थियं विहरति जेतवने अनाथपिण्डिकस्स आरामे । तत्र खो भगवा भिक्खू आमन्तेसि–भिक्खवो'ति । ' भदन्ते 'ति ते भिक्खू भगवतो पचस्सोसुं । भगवा एतद'वोच :—

भूतपुब्बं भिक्खवे अञ्ञतरा तावतिंसकायिका देवता नन्दनवने अच्छरासङ्घपरिवुता दिब्बेहि पञ्चकामगुणेहि समप्पिता समङ्गीभूता परिचारियमाना तायं वेलायं इमं गाथम'भासि :—

न ते सुखं पजानन्ति ये न पस्सन्ति नन्दनं ।
आवासं नरदेवानं तिदसानं यसस्सिनं'ति ॥

एवं वुत्ते भिक्खवे, अञ्ञतरा देवता तं देवतं गाथाय पच्चभासि :—

न तं बाले पजानासि यथा अरहतं वचो ।
अनिच्चा सब्बसङ्खारा उप्पादवयधम्मिनो ।
उप्पज्जित्वा निरुज्झन्ति तेसं वूपसमो सुखो'ति ॥

### २. नन्दति

एकम'न्तं ठिता खो सा देवता भगवतो सन्तिके इमं गाथमा'ह :—

नन्दति पुत्तेहि पुत्तिमा, गोमिको गोहि तथेव नन्दति ।
उपधी हि नरस्स **नन्दना**, न हि सो नन्दति यो निरूपधी'ति ॥
सोचति पुत्तेहि पुत्तिमा, गोमिको गोहि तथेव सोचति ।
उपधी हि नरस्स **सोचना**, न हि सोचति यो निरूपधी'ति ॥

### ३. नत्थि पुत्तसमं

एकम'न्तं ठिता खो सा देवता भगवतो सन्तिके इमं गाथमा'ह :—

न'त्थि पुत्तसमं पेमं, न'त्थि गो समितं धनं ।
न'त्थि सुरियसमा आभा, समुद्दपरमा सरा'ति ॥
न'त्थि अत्तसमं पेमं, न'त्थि धञ्ञसमं धनं ।
न'त्थि पञ्ञासमा आभा, वुट्ठि वे परमा सरा'ति ॥

### ४. खत्तियो

खत्तियो द्विपदं सेट्ठो, बलिवद्दो चतुप्पदं ।
कुमारी सेट्ठा भरियानं, यो च पुत्तानं पब्बजो'ति ॥
सम्बुद्धो द्विपदं सेट्ठो, आजानीयो चतुप्पदं ।
सुस्सूसा सेट्ठा भरियानं, यो च पुत्तानं अस्सवो'ति ॥

### ५ सकमानो (वा सन्तिकाय)

ठिते मज्झन्तिके काले, सन्निसिन्नेसु पक्खिसु ।
सणते' व ( v. l. पलातेव ) महारञ्ञं, तं भयं पटिभाति मं'ति ॥

ठिते मज्झन्तिके काले, सन्निसिन्नेसु पक्खिसु ।
सणते'व ( v. l. पलातेव ) महारञ्ञं, सा रती पटिभाति मं'ति ।

### ६ निद्दा तन्दी

निद्दा तन्दी विजम्भिका, अरती भत्तसम्मदो ।
एतेन नप्पकासति, अरियमग्गो इध पाणिनं'ति ॥
निद्दं तन्दिं विजम्भिकं, अरतिं भत्तसम्मदं ।
विरियेन नं पणामेत्वा, अरियमग्गो विसुज्झती'ति ॥

### ७ दुक्करं (वा कुम्मो)

दुक्करं दुत्तिक्खञ्च, अब्यत्तेन च सामञ्ञं ।
बहूहि तत्थ सम्बाधा, यत्थ बालो विसीदती'ति ॥
कतिहं चरेय्य सामञ्ञं, चित्तं चे न निवारेय्य ।
पदे पदे विसीदेय्य, सङ्कप्पानं वसंनुगो [ v. l. वसानुगो )
कुम्मो व अङ्गानि सके कपाले । समोदहं भिक्खु मनोवितक्के ।
अनिस्सितो अञ्ञं अहेठयानो । परिनिब्बुतो न उपवदेय्य कञ्ची'ति ।

### ८ हिरी

हिरीनिसेधो पुरिसो कोचि लोकस्मिं विज्जति ।
यो निन्दं अप्पबोधति अस्सो भद्रो कसामिवा'ति ॥
हिरीनिसेधा तनुया ये चरन्ति सदा सता ।
अन्तं दुक्खस्स पप्पुय्य चरन्ति विसमे समं'ति ॥

### ९ कुटिका

कच्चि ते कुटिका नत्थि कच्चि नत्थि कुलावका ।
कच्चि सन्तानका न'त्थि, कच्चि मुत्तो'सि बन्धना'ति ॥
तग्घ मे कुटिका न'त्थि, तग्घ न'त्थि कुलावका ।
तग्घ सन्तानका न'त्थि, तग्घ मुत्तो'म्हि बन्धना'ति ॥
किन्ताहं कुटिकं ब्रूमि, किन्ते ब्रूमि कुलावकं ।
किन्ते सन्तानकं ब्रूमि, किन्ताहं ब्रूमि बन्धन'ति ॥
मातरं कुटिकं ब्रूसि, भरियं ब्रूसि कुलावकं ।
पुत्ते सन्तानकं ब्रूसि, तण्हं मे ब्रूसि बन्धनं'ति ॥
साहु ते कुटिका न'त्थि, साहु न'त्थि कुलावका ।
साहु सन्तानका न'त्थि, साहु मुत्तो'सि बन्धना'ति ॥

### १० समिद्धि

१ एवं मे सुतं । एक समयं भगवा राजगहे विहरति तपोदारामे ।

२. अथ खो आयस्मा **समिद्धि** रत्तिया पच्चूसमयं पच्चुट्ठाय येन तपोदा तेनु'पसङ्कमि गत्तानि परिसिञ्चितुं । तपोदे गत्तानि परिसिञ्चित्वा पच्चुत्तरित्वा एकचीवरो अट्ठासि गत्तानि सुक्खापयमानो ।

३. अथ खो अञ्ञतरा देवता अभिक्कन्ताय रत्तिया अभिक्कन्तवण्णा केवलकप्पं तपोदं ओभासेत्वा येनो'यस्मा समिद्धि, तेनु'पसङ्कमि, उपसङ्कमित्वा वेहासं ठिता आयस्मन्तं समिद्धिं गाथाय अज्झभासि—

अभुत्वा भिक्खसि भिक्खु, न हि भुत्वान भिक्खसि ।
भुत्वान भिक्खु भिक्खस्सु, मा तं कालो उपच्चगा'ति ॥
कालं वो'हं न जानामि, छन्नो कालो न दिस्सति ।
तस्मा अभुत्वा भिक्खामि, मा मं कालो उपच्चगा'ति ॥

(न सम्पुर्ण)

# गुरूदेव रवीन्द्रनाथ ठाकुर

( लेखक—**श्री. जी. के. राव** बम्बई )

( * बम्बई ३ अगस्त। खेरवाडी परिश्रमालयकी साप्ताहिक प्रार्थना सभा के पश्चात, आगामी ७ अगस्त १९५८ ई. को गुरूदेव रवीन्द्रनाथ ठाकुर की सत्रहवीं पुण्यतिथि के उपलक्ष में, माननीय प्रोफेसर वी. जी. राव की अध्यक्षता में प्रस्तुत निबन्ध लेखक के प्रवचन का महत्वपूर्ण भाग, जो कि वक्ता द्वारा लिखा गया है, प्रकाशित किया जाता है )

**— सम्पादक**

आगामी तारीख ७ अगस्त को, गुरुदेव रवीन्द्रनाथ ठाकुर की पुण्यतिथि है, जिनकी चिरस्मरणीय स्मृति हमें प्रेरणाप्रदान करती है। मेरे पर गुरुदेव का जो प्रभाव पडा है और छात्रावस्था में, मुझे मद्रास में, श्रीमती एनी बीसेण्ट की उपस्थिति में, जो सम्भाषण और दर्शन का सुयोग लाभ हुआ था, उसकी स्मृति चिरस्मरणीय रहेगी। उनके साहित्य का मैंने रसास्वादन किया, उसमें मैं अपने आनन्द में सबको सहभागी बनाना चाहता हूँ। गुरुदेव के साहित्य के सम्बन्ध में, जो कि एक मूलवान कृति है, जिसने देश और संसार को महान प्रेरणाप्रदान की है, एक इंग्लिश लेखक के कथनानुसार कहा जा सकता है,—

"That song that nerves a nation's heart, is in it self a deed."

अर्थात वह काव्यगायन जो संसार के हृदय को संस्पर्श करता है, स्वयं एक महान कृति है।

कविवर रवीन्द्रनाथ ठाकुर के जीवन और उनकी कृतियों पर, जब हम विचार करते हैं, तो आपका महत्व असाधारण प्रतीत होता है। यह हमारा कर्तव्य है कि हम उनके जीवन से कुछ सबक लें।

जब हम गत १९५३ में स्वर्गीय भारतीय हायकमिश्नर श्री बाला-साहेब खेर साहेबके साथ लन्दन में थे, संयोगवश मुझे गुरुदेव रवीन्द्र-नाथकी द्वादश पुण्यतिथि समारोहके अवसर पर, गुरुदेवके जीवन और काव्य तथा अन्यान्य कृतियों और उनके आदर्शपर, एक प्रबन्ध वाचन करनेका सुप्रसंग मिला था। उसीके आधार पर हम यहाँ चर्चा करेंगे।

गुरुदेव रवीन्द्रनाथ प्राचीन भारत के ऋषितुल्य एक प्रतीक प्रतीत होते हैं। उनकी रचनाओं में प्राचीन भारत की परम्परा और आर्षवाणी की ध्वनि आती है। आप में मानवता का पूर्ण विकाश हुआ था। आप देश काल सीमा से परे थे। अतएव आपको विश्व कवि कहना यथायोग्य है। आपकी विशेष रचनायें, आपकी मातृभाषा बंगाली में पाई जाती हैं, लेकिन आपने स्वतः अपनी रचनायें अंग्रेजी में रूपान्तर की थी, जिनमें "गीताञ्जलि" का नाम उल्लेखनीय है। जिस पर आपको सन १९१३ ई. में एक लाख तीस हजार रुपयेका सुप्रसिद्ध अन्तरराष्ट्रीय नोबल पुरष्कार प्राप्त हुआ था, जिसका विनियोग विश्वभारती शांतिनिकेतन में किया गया। सुप्रसिद्ध नोबल पुरष्कार प्राप्त, महाकवि मैटरलिंकने गीताञ्जलीके सम्बन्ध में, अपने उद्गार प्रकट करते हुए कहा था, कि "यह रचना अत्युच्च भावना, अत्यन्त गम्भीर और असाधारण दैवी विभूति, वैभवशाली प्रतीत होती है।"

आपने अपने सम्पूर्ण साहित्य भण्डार में लगभग एक लाख पाँच हजार काव्य पंक्तियां लिखीं हैं और लगभग चौदह सौ काव्य गायन लिखें हैं। आपका राष्ट्रगीत "जनमनगण" सुप्रसिद्ध है। आप बचपन-से ही प्रतिभाशाली थे और कविता करते थे। अपने जीवन के संध्या-कालमें, जब कि आपकी अवस्था लगभग ८० साल की थी, तब तक आप काव्य रचना करते रहे। आपका सारा जीवन एक महाकाव्य है।

बंगाल के सुप्रसिद्ध घरानोंमें ठाकुर वंश प्रसिद्ध है। आपके पिता का नाम महर्षि देवेन्द्रनाथ ठाकुर था। आप महान त्यागी, निस्पृह, राजा राममोहन राय के पश्चात, ब्रह्म समाज के अग्रणी कर्णधार थे। यह कुटुम्ब अपनी विद्या, बुद्धि, कथा, कौशल, संस्कृति और साहित्य का भण्डार माना जाता है। इनकी बहुत बड़ी जमींदारी थी और सब तरह से सम्पन्न थे।

श्री रवीन्द्रनाथ ठाकुर का जन्म तारीख ७ मई १८६१ ई. कलकत्ता में हुआ था। आपको स्कूल या कालेज की कोई शिक्षा, दीक्षा नहीं प्राप्त हुई। आपने बचपन में घर पर थोड़ी बहुत मातृभाषा बंगाली की शिक्षा पाई थी, लेकिन आपकी प्रतिभा असाधारण थी। बचपन में ही कविताका बीजाङ्कुर हुआ था, जो उत्तरोत्तर बढ़ता गया। इसका प्रमाण नोबल पुरष्कार है। जो आपको १३ नवम्बर १९१३ को प्राप्त हुआ। लगभग इसी समय ब्रिटिश शासन द्वारा "नाइट हुड" सर की उपाधि प्रदान कर आपको सम्मान प्रदान किया गया। सन १९१९. में जलियानवाला बाग हत्याकाण्ड के विरोध में, आपने अपनी यह उपाधि परित्याग कर, देश के प्रति अपनी समवेदना और स्वाभिमान तथा देशानुराग का परिचय प्रदान किया था।

इस प्रकरण के सम्बन्ध में, आपने जो पत्र वायसराय महोदय को लिखा था, वह मानव सभ्यता के इतिहास का एक महत्वपूर्ण दस्तावेज है। उस पत्र का सार मर्म यह है,—

"पञ्जाब सरकार द्वारा स्थानीय अशान्ति और उपद्रव को शांत करने के लिये, जो निर्दय भयंकर तरीका अमल में लाया गया है, वह अत्यन्त निर्मम और दारूण करूणाजनक है, जो कि भारतीय प्रजाजनों की असहायावस्था का द्योतक और अपमानजनक है।

"हमारे पंजाबी भाईयों की यातना ओर अपमान का जो विवरण उपलब्ध हुआ है, जिसकी ध्वनि सारे देशमें और लोगों के हृदयों में, उत्तेजना के रूप में फैल गई है, जिसे निर्दयता पूर्वक दमन किया गया है। जिसकी उपेक्षा हमारे शासकोंने की है और इस तरह के जघन्य अत्याचारोंको, एंग्लो-इंडियन समाचारपत्रों द्वारा, समुचित दण्ड कहकर, अभिनन्दन किया जा रहा है। यह निर्ममता एंग्लो-इण्डियन समाचार पत्रों द्वारा स्वीकार की गई है और वे हमारी दुःखद वेदनाओं का उपहास कर रहे हैं। जिस पर अधिकारियों द्वारा कोई नियंत्रण नहीं लाया गया और अत्याचार पीडितोंकी आवाज दबाने के लिये, देशी समाचार पत्रों के मत का कोई विचार न कर, उन्हें निर्ममता पूर्वक दबाया गया है।

"इस लिये मैं अपना कर्तव्य समझता हूँ कि जो उपाधि प्रदान कर मुझे सम्मानित किया गया है, हम अपने देशबान्धवों की समवेदना के साथ दुख के सहभागी बनें, जिन्हें अमानुषी अत्याचार भोग करना पड़ा है, जिन्हें अत्यंत क्षुद्रहीन समझा गया, जो कि मानव जाति के लिये अयोग्य है, इस सम्मानीय उपाधि का परित्याग करें। यही कारण है कि मैं लाचार होकर ससम्मान दुख के साथ निवेदन करता हूं कि मुझे "नाइट हुड" की उपाधि से मुक्त किया जाये।"

गत १९४० मैं आक्सफर्ड विश्वविद्यालयने आपको डाक्टर की उपाधि प्रदान की थी।

आपकी ८० वीं जयन्ती के प्रसंग पर, महात्मा गांधीने निम्नलिखित तार आपको भेजा था,—

"चार कोड़ी (८०) काफी नहीं है, आपको पांच (१००) पूरा करना चाहिये। मेरा प्रेम।"

जिसका उत्तर रवीन्द्रनाथने दिया था,—

"सन्देश के लिये धन्यवाद। लेकिन चार कोड़ी (८०) भार स्वरूप है। पांचवीं कोड़ी (१००) असहनीय होगी।"

इस तरह सारा जीवन देश, समाज, साहित्य, संस्कृति की सेवा करते हुए, विगत ७ अगस्त १९४१ ई. को आपका स्वर्गवास हुआ, जिसकी स्मृति पुण्यतिथिके रूपमें चिरस्मरणीय रहेगी।

रवीन्द्रनाथ की सर्वतोमुखी प्रतिभा का परिचय इससे जाना जा सकता है, कि आप एक कलाकार, गायक, कवि, लेखक, शिक्षणतज्ञ और चित्रकार थे। आपके सम्बन्ध में जर्मन दार्शनिक काउण्ट कैसर लिंगने लिखा है कि "वह विशेषतः जागतिक विश्व नागरिक थे, उनकी भावना सर्व व्यापक थी। वह मानवता के प्रतीक थे। यह मेरा अनुभव है।"

आपकी रचनाओं में आपके स्वर्गीय सन्देश पाया जाते है, कि यह मानव जीवन कैसा सुन्दर सौदर्यशाली आनन्द का भण्डार है, और मानव जीवन की लहराती जीवनधारा, मधुर गुंजन के साथ प्रवाहित हो रही है। प्रत्येक प्राणी का जीवन, उस महान अनन्त से सम्बन्धित होने के कारण परिपूर्ण महत्त्वपूर्ण है। आपका धर्म कविजनोचित भावना और साधना है। आप अपनी सम्पूर्ण कविताओं और कथाओं द्वारा, साधारण से साधारण वस्तुओं में, जो सौन्दर्य और चमत्कार, प्रकृति और जीवन में जो अलौकिक आनन्द, प्रकाश और शान्ति तथा व्यापक चैतन्य पाया जाता है, उस अनुभूति और भावना में, आप हमें अपना सहभागी बनाते हैं। आपको एक अलौकिक ईश्वरीय शक्ति का विश्वास है, जो सारे विश्व में मानवता की प्रतिष्ठापना करती है और हमें सन्देश देती है कि प्रत्येक व्यक्ति अपने अहंकार और स्वार्थपर विजय सम्पादन करे और स्वयं अनाशक्तिपूर्वक विज्ञान और दर्शन, साहित्य और कला सेवा और पूजा में उसका साक्षात्कार लाभ करे। यह आपका दृढ़ विश्वास था कि मानव समाज अपने विकाश के लिये, केवल अतीतकालीन चिरसञ्चित सत्य को ग्रहण करे, जिसे कि कितनेही परिश्रम और कष्ट के साथ आयत्त किया गया है, इससे व्यष्ठि और समष्ठि की एकता का, सत्य तत्व बोध सुलभ होगा।

विगत ८ मई १९५८ को रवीन्द्र जयंती के प्रसंग पर, प्रधानमन्त्री जवाहरलाल नेहरू ने अपने ब्राडकास्ट भाषण में रवीन्द्रनाथ की अलौकिक प्रतिभा और उनकी महत्त्वपूर्ण सेवाओंके के प्रति श्रद्धाञ्जलि निवेदन करते हुए कहा था कि गुरुदेव के गायन और उनकी साहित्यिक रचनायें चिरस्मरणीय रहेंगी, लेकिन अगर हम उनके प्रति सत्यनिष्ठ हों, तो हमें उनके सन्देश को आगे बढाना पड़ेगा और हमें यह ध्यान रखना चाहिये, जिससे उनके शांति निकेतन और श्री निकेतन की उन्नति और विकाश हो...लेकिन आपका यथार्थ सम्मान और स्मृति पूर्ण होगी और आपका सन्देश तभी सफल होगा, जब भारत के नव निर्माण में हमारी यथार्थ सहायता सुलभ होगी, जिसका वैभवशाली विवेचन उनके साहित्यमें पाया जाता है।"

गुरुदेव रवीन्द्रनाथ की आन्तरिक भावना का परिचय तथा उनका देशानुराग, विशाल दृष्टिकोण, उदारवाणी निम्नलिखित कविता में सन्निहित है, जिसकी अभिव्यक्ति का रूपान्तर हम प्रदान करते हैं,—

"हे परम पिता परमात्मा!

जहां चित्त निर्भय हो, और मस्तक उन्नत हो,

जहां ज्ञान बन्धन से मुक्त हो,

जहां गृहकी प्राचीरों में संसार का संकीर्ण विभाजन न हो,

जहां सत्य के अन्तस्थल से वाणी प्रकट हो,

जहां प्रत्येक देश तथा दश दिशाओं में अनन्त गतिविधियों की कर्म धारा निरन्तर पूर्णता की ओर प्रवाहित होती रहे,

जहां तुच्छ आचारों की मरुभूमि में निर्मल विचारधारा का अवसान न हो,

हे परम पिता! आप सब कर्मो विचारों और आनन्द के पथ प्रदर्शक हो हमारा मार्गदर्शन करें,

और आपके सुदृढ हाथोंद्वारा स्वर्गीय भारत का नवनिर्माण जागृत हो, यही मेरी आन्तरिक प्रार्थना है।

× × ×

अन्तमें अध्यक्ष प्रोफेसर वी. जी. राव ने गुरुदेव के प्रति अपनी श्रद्धाञ्जलि प्रदान करते हुए कहा कि "जब मैं (सन १८०९-१३) लन्दन में था, मैं कलकत्ता हायकोर्ट के माननीय न्यायाधीश जस्टिस चौधरी की पत्नी प्रतिभादेवी के द्वारा, गुरुदेव रवीन्द्रनाथ ठाकुर के सम्पर्क में आया और गुरुदेव से बंगाली भाषा पढी थी। वह लन्दन में श्री. पी. के. राय के यहां आते जाते थे। जब वह सन १९२२ में बम्बई आये, तो मेरे यहां पधारने की कृपा की थी। मैं शान्तिनिकेतन का आजीवन सदस्य हूं और उनके पुत्र श्री रथीन्द्रनाथ ठाकुर से मेरा पत्रव्यवहार है। अतएव मैं प्रस्तुत विवेचन के लिए श्री. जी. के. राव महोदय का आभार मानता हूं, जिससे मुझे अपना संस्मरण निवेदन करने का अवसर मिला। जयहिन्द।

(प्रेषक–हिन्दी स्वाध्याय मण्डल बम्बई नं. २१)

# संत तुकाराम के मराठी अभंगोंका हिन्दी रूपान्तर

[ मराठी साहित्य में संत तुकाराम संत साहित्य मंदिर के कलश माने गये हैं और जिनके अभंग अत्यंत सरल, लोकप्रिय, उपनिषद दर्शन, बुद्ध दर्शन, संत परम्परा के प्रतिबिम्ब हैं। सेण्ट जेवियर कालेज के संत फादर हेरास का कहना था कि "वर्तमान संत परम्परामें, उपनिषद दर्शन का तत्वज्ञान पूर्व परम्परा की रक्षा करता हुआ, एक सरल विवेचन सुलभ साधन उपलब्ध है"।

सुप्रसिद्ध सारस्वत मामा वरेरकर समाज सेवक विनयमूर्ति हिन्दी स्वाध्याय मण्डल के प्रवर्तक प्रोफेसर वी. जी. राव जिनके सम्पर्कमें आकर मुझे मराठी संत स्वाध्याय का अध्ययन करनेका सौभाग्य लाभ हुआ। श्री तुकाराम विश्व विद्यालयके प्रवर्तक विद्वान प्राध्यापक श्री. एन. के. भागवतने प्रेरणा प्रदान की, सिद्धार्थ कालेज लायब्रेरीके अध्यक्ष श्री रेंघे महोदयने साहित्य प्रदान किया, तद्नुसार संत तुकाराम के हिन्दी अभंग काव्य और दोहाके रूप में, हिन्दी मराठी प्रेमी पाठकोंको यह मेरा पुण्य प्रयास नियमित उपहार सादर है। —**काशीनाथ मालवी**।]

## संत तुकाराम की जीवन भूमिका

(तुकाराम गाथा २६०)

धर्म रक्षण भावना, विवेक चित्त ज्ञान ध्यान।
वेद धर्म रीति नीति, संत वचन प्रेरणा समान॥
सनातन से संतजन जो निरन्तर करते आये है।
वही तो मैं करता हूँ, संतों की परम्परा जान॥ १॥

(गाथा २१३६)

धर्म शासन प्रतिपालन, पाखण्डखण्डन समाधान।
यही मेरा ध्येय इस्ट, जिससे अनिष्ट क्षयभय ज्ञान॥
नाम का प्रचार तिमि बीजारोपण भक्ति ज्ञान।
यही साधना उपासना है, मेरा जीवन तत्वज्ञान॥ २॥

(२३०२)

मैं अनेक जन्मजीवनसे, यही करता आया हूँ।
पाप ताप दुखी दीन, आतुर पीड़ित माया मान॥
जिन के कल्याण की भावना मन में महान।
नाम का प्रचार हो, सुखिया सब संसार हो।
जिससे धर्मश्रद्धा ज्ञात, हरि के गुण गाता हूँ॥ ३॥
हरि कथा नाम संकीर्तन, गूंजे दशदिशि एक समान।
वैष्णवों का सत्संग तिमि, दर्शन पावन ज्ञान ध्यान॥
पत्थर पसीजे जब, पानी हो पाषाण जान।
शुद्धभाव भावना, रामनाम पारस जान॥
भक्तजन स्वागत आयें, संकीर्तन करें नाचें गायें।
नाचें गायें पीटे ताली, शुभमंगल जीवन पायें॥ ४॥
दृढ विश्वास निदान मन, भले महाँ कलिकाल।
कलिका मान मर्दन करूं, भले हो काल कराल॥
तुकाराम तज जग सुखी, काम क्रोध सम मान।
इन्द्रिय गोचर मन स्ववश, मैं गोस्वामी जान॥
मन मेरा स्वाधीन है, सो स्वराज्य पद ज्ञान।
तुकाराम स्वामी स्वयं, विठलदास सज्ञान॥ ५॥

• • •

हिन्दी प्रव्रजासूत्र, सुत्तनिपात पाली गाथागायन

# प्रव्रजासूत्र

क्या कारण क्या भावना, क्या विचार क्या ध्यान।
चक्षुष्मान विवेकमणि, बुद्ध प्रव्रजा त्याग महान॥
प्रथम निवेदन करि यथा, तथा विवेचन जान।
प्रभु प्रव्रजा परित्याग सुख, साधन अन्तर्ज्ञान॥ १॥

गृह संसार समाज जग, जीवन जग व्यवहार समान।
रज मल विपुल विकारवश, जीवन विमल न साधन ज्ञान॥
प्रव्रजा निदान महान सुख, मुक्त वायु नभ निर्मल मान।
सो विचार संसार त्यागतज, परिव्राजक सर्वज्ञ सुजान॥ २॥

जग व्यवहार विवेक देख लख, परिव्राजक सुगत सुजान।
मनसा वाचा कर्मणा तिन सब, पाप परित्याग समान॥
वचन विवेक विचार ज्ञान चित, तज अवगुण कटु भाषण मान।
पावन जीवन सरल जीविका, विमल भावना पावन प्राण॥ ३॥

बुद्ध पधारे नगर राजगृह, मगध प्रदेश राजधानी महान।
गिरिव्रज वासस्थान दिव्य स्थल, विजन एकान्त पवित्र सुजान॥
उत्तम लक्षण तेज कान्ति तप, प्रभा प्रभाकर प्रकाश समान।
भिक्षा चर्या जनपद विचरण, गृह गृह भेद न कोई मान॥ ४॥

राजमहल से अवलोकन कर, लक्षण सम्पन्न सुशीतल प्राण।
विम्बिसार राजा कौतुकवश, बोला स्वगत प्रिय वचन समान॥
युग पद संयत सम चरण लख, निम्न दृष्टि पथ पथिक महान।
सो धीरे धीरे वह जा रहा, विनयशील मणि ज्ञाननिधान॥ ५॥

अहो, मनोहर रूपराशि गुण, निम्न दृष्टि स्मृति सज्ञान।
भव्य पवित्र चरित्र शीलमणि, विनय विवेक ज्ञान की खान॥
युगपद संयत समचरण पथ, निम्न दृष्टि सज्ञान सुजान।
देखो धीरे धीरे जा रहा, धर्म विवेक शीलमणि ज्ञान॥ ६॥

जिसकी निम्न दृष्टि धरतीतल, स्मृति श्रद्धा विवेक महान।
उत्तम कुल के सब लक्षण लख, सभी सुलक्षण दिव्य निदान॥
अनुसन्धान निदान कौन है, आवागमन कहाँ स्थान।
राजदूत यह पता लगायें, आना जाना जहाँ समान॥ ७॥

नृप अनुशासन राजदूत तिमि, चले सजग गतिमान।
पीछे पीछे लगे गुप्त चर, गति विधि एक समान॥
भिक्षु कहाँ से आता जाता, क्या परिचय पहचान।
इसका पता ठिकाना क्या है, नृप अनुशासन जान॥ ८॥

अवगुण्ठन शरीर सुसंवृत; भगवावस्त्र आवरण समान।
सजग चित्त सावधान मन, अन्तर्ज्ञान विवेक महान॥
गृह गृह भेद न एक भावना, भिक्षाटन परिपूर्ण निदान।
पिण्डपात परिपूरण जब तब, चले जहाँ था निवासस्थान॥ ९॥

पिण्डपात भिक्षाटन मुनिमणि, विचर नगर गिरिवास निदान।
नगरे परे वन गुफा पाण्डव, आये जहाँ एकान्त महान॥ १०॥
वासस्थान निवास देख लख, बैठे प्रहरी राजाज्ञा महान।
उनमें एक निदान चला तब, नृप सादर शुभ वर्तमान॥ ११॥

महाराज सो भिक्षु महामुनि, मानों सिंह केसरी समान।
पाण्डव पर्वत गुफागर्भ में, बैठा है राजन श्रीमान॥ १२॥
राजदूत के वचन सुन, क्षत्रिय शासक नृप सज्ञान।
पाण्डव पर्वत को चला, रथ पर यथा तथागत जान॥ १३॥
यथा राज पथ रथ पर आया, श्रद्धा भक्ति ज्ञान मतिमान।
पथ से उतर चला वह पैदल, विनय विवेक तथागत मान॥
आया वहाँ जहाँ बैठे थे, बुद्ध देव भगवान महान।
सादर अभिवादन कर बैठा, आकर समीप जहां भगवान॥ १४॥

निकट बैठ राजाने पूछा, मंगल कुशल प्रश्न समाधान।
कुशल प्रश्न समाधान आप तब, बोला यथा निवेदन प्राण॥ १५॥
युवा अवस्था तरूण तपस्वी, अल्पावस्था क्या वयमान।
तेरी कान्ति अलौकिक आभा, सुदृढ शरीर बलिष्ठ समान॥
जिससे मुझे जान पडता है, क्षत्रिय वंश राजकुल मान।
यह मेरा अनुमान दृष्टि है, मेरा यह विश्वास निदान॥ १६॥
यह मेरा शासन सिंहासन, वैभव सम्पत्ति सर्वस्व प्रदान।
महाकटक गजराज सुरक्षित, सेनापति पद गौरव मान॥
मेरा प्रश्न सभान भला क्या, क्या परिचय क्या ज्ञाति निदान।
यह मेरी जिज्ञासा भगवन, कृपा आपकी मेरा समाधान॥ १७॥
सुगत सरल सविनय तब बोले, राजन समुचित प्रश्न समान।
उत्तर एक हिमाचल जनपद, सुखी समृद्ध प्रजा बलवान॥ १८॥

सूर्यवंश क्षत्रिय कुल मेरा, शाक्य वंश मम जन्म समान।
सो कुल त्याग परिव्राजक मैं, नहीं कामना अवशेष निदान॥ १९॥
विषयभोग सन्ताप आपलख, अकिञ्चन अभय निरापद मान।
त्याग विराग विवेक ज्ञान चित, साधन पथ गति ज्ञान समान॥
तपश्चरण सङ्कल्प भावना, निर्भय पद अलौकिक निर्वाण।
यह मेरा आनन्द मनोरथ, मेरे मनका सुयोग्य समाधान॥ २०॥
बिम्बिसार सन्तुष्ट चित, बोले कृपा निधान।
पूर्ण साधना सिद्धि जब, पावन पद निर्वाण॥
आप कृपा कर देव पधारें, मेरा भाग्य महान।
मैं दुर्लभ दर्शन पाऊँगा, अभिलाषा सद ज्ञान॥ २१॥

—काशीनाथ मालवीय काशी

(प्रेषक—हिंदी स्वाध्याय मण्डल बम्बई नं. २१)

# RAM BABU SAKSENA

by

**Prof. N. S. Gorekar,** M.A.

( St. Xavier's College, Bombay. )

Ram Babu Saksena who had established a wide reputation as a critic and a historian and in the world of literature who stood out as a doughty champion of the Urdu language and literature, was born in the year 1895 in the family of Munshi Nanak Prasad, belonging to Kayesth caste, whose ancestors were connected with Maharaja Balkrishna, the Chief Minister of Oudh. He passed his M. A. Degree examination from the Agra College in 1918, securing a first class first in the whole of the Allahabad University. After getting through his Law examination with credit, he was accepted in the Indian Civil Service for the second time, but domestic occupation compelled him to stick to the Provincial Civil Service. He acted as Collector of Bareily and Bulund Shahr, Director of Information of the then United Provinces, Private Secretary to the Maharaja of Baroda, and Chief Minister and Minister for Education of Kotah State in Rajputana. He also represented the then Government at the Round Table Conference held ih London in 1931. He discharged his duties and responsibilities most efficiently and to the best of his ability in all the capacities, and he was held in high esteem by all those who met and knew him. It was in the year 1945 that the Agra University conferred on him the honorary degree of the Doctorate in Literature. Besides, he was associated with several literary and cultural societies like the Hindustani Academy of Allahabad and the P. E. N. of India as well as of England. In recognition of his meritorious services to the cause of literature in general, he was appointed a member of the Sahitya Akademi by the Government of India.

Ram Babu Saksena has done yeoman 's service to the Urdu language and literature by writing in English a history of Urdu, entitled 'The History of Urdu Literature' which has been successfully translated into Urdu by Mirza Mohammed Askari. This book is a land mark in the history of Urdu criticism, since before the compilation of this book in 1927, there was hardly any history of Urdu except a few Tazkirahs, or Memoirs with very scanty historical material. Ram Babu Saksena revealed a profound scholarship, love of research, and an intellectual balance of mind in treating the subject of Urdu, thereby making the book an authentic history of Urdu literature up to date. He has neither adhered to a particular school of thought nor to specific kind of poetry in Urdu—rathar he has made a successful attempts in adopting the western methods of criticism, displaying continuity of thought as well as moderation. Ram Babu Saksena appears to be more of a historian than a critic in this book.

His second work in English is 'The European and In[do-] European Poets of Urdu and Persian' which consis[ts of] life-sketches and poetic compositions of European a[nd] Indo-European poets of Urdu and Persian; besides, it a[lso] gives an information of about hundred poets of Urdu, w[ho] were either Indo-German, Indo-British, Indo-Portugu[ese,] Indo-French, or Indo-Italian, and also Indo-Europ[ean] Poetesses. In this book Ram Babu Saksena exhibits [his] talents both as an historian and a critic. 'The History [of] Urdu Literature,' is the first and foremost comprehens[ive] book on Urdu litreature, but 'The European and Ind[o-] European Poets of Urdu and Persian' is not only the fi[rst] but perhaps the last on the subject. By writing these t[wo] books in English, Ram Babu Saksena has introduced Ur[du] language not only to those who are unacquainted wi[th] the richness of Urdu in India, but even to those outsi[de] India.

'Masnaviyat-e-Meer ba-Khatte Meer' is his great w[ork] which shows his earnest quest for manuscripts, a[nd] 'Murraqqa-e-Shoura' is his another work, giving t[he] poetic compositions along with the photos of the poets o[f] Urdu in their true perspective and in a matter-of-fact style.

Ram Babu Saksena was also actively connected with th[e] All-India Writers' Conference in particular and read pape[rs] among others on 'The Attitude of Classical and Mode[rn] Writers to the Fundamental Value of Life' and 'T[he] Progress of Urdu Literature between 1945 and 1947' [at] the Conference held at Banaras in 1947, and 'Modern Ur[du] Drama' at the Conference held at Baroda in 1957.

It was gratifying that the Urdu and Persian Departme[nt] of the Lucknow University had decided in the lifetime o[f] Ram Babu Saksena to present him with a 'Commemorati[on] Volume' in recognition of his long and distinguished servi[ce] to the cause of Urdu language and literature. It a[lso] proposed to establish a 'Library' and to institute in his na[me] a 'Lecturership' of a suitable value in Urdu literature. [It] was a great pity that he was not spared to see the sche[me] being crowned with success as the cruel jaws of dea[th] has snatched him on the 22nd December, 1957 at th[e] Meerat Railway Station while on his way to Calcutta t[o] attend the All-India Writers' Conference. Neverthele[ss] it is hoped that the Lucknow University will bring out th[e] 'Commemoration Volume' as a fitting memorial to Ra[m] Babu Saksena who stands out as one of the most outstandi[ng] critics and historians of Urdu language. In the words o[f] Asar Lucknovi, a contemporary, Ram Babu Saksena was [a] Messiah and a maddened lover of Urdu.

# Consolidated Pneumatic Tool Co. Ltd.

( Incorporated in England )

Liberty Building,

41-42 Marine Lines, BOMBAY (1)

## Makers of Compressed Air Equipment

Telephone No. **242447**

# *Hume Pipes*



**Used Extensively for all types of Railway and road culverts.**

For culverts, "Hume pipes" are given greater preference than stone or brick because of Economy, strength, utility, and Facility of construction.

*Manufactured & Supplied by:—*

## THE INDIAN HUME PIPE CO. LTD.

H.O. CONSTRUCTION HOUSE, BALLARD ESTATE, BOMBAY 1

World
Religion
Supplement

# धर्मचक्र

वर्ष ११ वें ] [ अंक २ रा
१५ सप्टेंबर १९५८

THE WHEEL OF THE MORAL LAW
(Vol. XI—2)
15th September 1958

## JAPANESE FLOWER ARRANGEMENT

## जपानांतील पुष्परचनाशास्त्र



A SISTER from JAPAN

Is it Flower Arrangement or a Lesson in Devotion to Truth, Blessedness and Beauty !

जपानांतील भगिनी—हा पुष्परचनाशास्त्रांतील पाठ कीं सत्यं, शिवं, सुंदरं संबंधीचा आविष्कार !

# धर्मचक्र

(The Wheel of the Moral Law)

[ बौद्ध शिकवण, जीवन व कला यांच्या विश्वसनीय दर्शनानें महात्माजींची मूलभूत शिक्षा सिद्ध करून दाखविणारें मराठींतील पहिलेंच मराठी-हिंदी सांस्कृतिक मासिक ]

* दर महिन्याच्या १५ तारखेस प्रसिद्ध होतें. *

मुख्य संपादक ( मराठी व इंग्रजी विभाग ), मुद्रक व प्रकाशक :

प्रा. ना. के. भागवत, एम्. ए., ( मुंबई विश्वविद्यालय, पाली ग्रंथ प्रकाशन—सन्मान्य संपादक )

प्रा. शिवसहाय पाठक, एम्. ए., साहित्य रत्न, के. सी. कॉलेज : संपादक हिंदी विभाग

वर्ष ११ वें ] १५ सप्टेंबर १९५८ [ अंक २

## अनुक्रमणिका

### मराठी विभाग



### पाली संहिता विभाग :



### हिंदी विभाग



### World Religion Supplement :



**वर्गणीचे दर :**

१ : भारतांत पोस्टेजसह रु. ५-०-०
२ : महाभारतांत पोस्टेजसह रु. ७-०-०
३ : किरकोळ अंकास ७५ नये पैसे
बुद्धजयंती विशेषांक रु. १-७५ नये पैसे (२४ मे १९५६ चा)

**जाहिरातीचे दर :** ( एक वेळचे )
अत्यन्त सवलतीचे आहेत.
कृपा करून पत्र पाठवून तपास करा.

मुद्रक व प्रकाशक : प्रा. ना. के. भागवत, धर्मचक्र कार्यालय, सुगतनिधान, १९ वा रस्ता, प्लॉट नं. ४६३, खार, मुंबई २१
मुद्रण स्थळ : मुंबई वैभव प्रेस, सरदार वल्लभभाई पटेल रोड, गिरगांव, मुंबई, नं. ४

World Religion Supplement

धर्मचक्र

THE WHEEL OF THE MORAL LAW

वर्ष ११ वें ] १५ सप्टेंबर, १९५८ [ अंक २ रा

# जीवितकोडें सुटेल कां !

दिक्कालानें प्रतिहत नाहीं, तें मज, तें सुख मिळेल कां ?
सौख्यासाठीं दैवालंबन ? नको ! त्रासलें ! सुटेन कां ?
तुकया रमला त्या दिव्याचा लेशभर तरी मिळेल कां ?
'दुःख' 'निराशा' 'कार्यमूढता' 'दैववाद' तो सरेल कां ?
त्याच मोहिनीमधुनी माझी कार्यस्फूर्ति स्फुरेल कां ?
प्रवृत्तीच्या उज्ज्वल ज्योती निवृत्तींतुनि निघेल कां ?
कर्तव्यास्तव कर्तव्याची जाणिव चित्तीं उठेल कां ?
भाव 'तुक्याचा' कार्यक्षमता 'दासांची' ती वठेल कां ?
या उभयांचें मीलन माझें जीवन बनुनी जाइल कां ?
—पूर्णानंदी, आशावादी हृदय कधीं हें बनेल कां ?
या जीवाला जीवितकोडें जन्मान्तरिं तरि सुटेल कां ?

कमलाबाई देशपांडे ( जीवितकोडें )

# संपादकीय

**मा**गील महिन्याच्या **१५ तारखेस** भारतीय स्वातंत्र्याचा ११ वा वाढदिवस अखिल भारतांत अलमदुनियेनें मोठ्या उत्साहानें, भावनात्मकतेनें व अपूर्व अशा आत्मीयतेनें साजरा केला ! जगांत भारताचीं लेंकरें सर्वत्र पसरलीं आहेत. त्या सर्वांनींही त्या त्या देशांत आपल्या देशाच्या स्वातंत्र्यप्राप्तिनिमित्त छोटे छोटे समारंभ भरवून त्या वेळीं त्या देशांतील प्रजेलाही आपल्या आनंदांत व उत्साहांत वाटेकरी केले. ११ व्या वर्षांच्या स्वातंत्र्याचा वाढदिवस ही कांहीं साधीसुधी घटना नाहीं. देशांचें स्वातंत्र्य ही काय चीज आहे, ही गोष्ट त्याकरितां प्राणाचे बळी देणाऱ्यांनाच कळणारी आहे. आपल्या लोकांनीं आनंदांत रहावें, त्यांच्या मूलभूत गरजा भागवितां याव्या, त्यांचा सर्वांगीण विकास व्हावा, त्यांचें नैतिक जीवन सोज्ज्वल होऊन त्यांच्या नागरी जीवनाचें सुंदर व विलोभनीय चित्र दृष्टीस पडावें, असे वाटणारे सामाजिक कार्यकर्ते, लोकाग्रणी, व राजकारणीपुरुष व परदुःखानें विरघळणारे महात्मे, आजही जिवाचें रान करून राहिले आहेत ! उत्सव करणें हा मानवाचा स्वभाव आहे. आमची मुंबापुरी नेहमींच्या पद्धतीनें नटून सजून व असंख्य विद्युद्दीपांच्या झगझगाटांत सुंदर रीतीनें तळपायास पाहिजे होती. पण त्यावेळीं अहमदाबादच्या उठावानें लोकांच्या आनंदावर विरजण पडलें. त्यामुळें सर्वत्र भारतांत हा उत्सव इतका गाजला नाहीं ! तथापि लाल किल्ल्यावरील झेंडावंदन, राष्ट्राध्यक्षांचा संदेश, प्रदर्शनें, मुलांचे मेळावे, वगैरे कार्यक्रम पार पडलेच. आमच्या आनंदावर जर विरजण पडलें तर त्याला जबाबदार कोण ? आम्हींच आमचें सुख उत्पन्न करतों व आम्हींच आपलें दुःख भोगण्याला कारणीभूत होतों, हें कटु सत्य आहे. आम्हीं स्वतंत्र झालों; पण स्वातंत्र्य भोगण्यास योग्य झालों आहोंत काय ? एखादा रडका रुसका माणूस जर दुःखी राहिला तर त्याला जबाबदार कोण ? राष्ट्रीय उत्सव अखिल राष्ट्रानें साजरे करावयाचे असतात. त्यांत राजकारण घुसडावयास आरंभ केला कीं, जनतेंत बुद्धिभेद उत्पन्न होतो, जनतेचें एक मन द्विधा होतें, जनतेंत सुसंवादनाच्या ऐवजीं विसंवाद उत्पन्न होतो, तिच्या अन्यथा असणाऱ्या शान्तवृत्ति भडकावयास लागतात व उत्सवाचा मूळचा उद्देश एका बाजूस रहातो. दोन मल्ल एकमेकासमोर दंड थोपटून उभे राहिले कीं, बिचाऱ्या जनतेची कुचंबणा होते; तीस काय करावें हें कळत नाहीं. आमच्या देशांतील जनता तर अडाणी, दरिद्री, भोळीबापडी, स्वतःचा विचार करण्यास असमर्थ व भावनाप्रधान आहे. सरकारानें सांगितलें, उत्सव करा; तर ती ते पाळण्यास एका पायावर तयार; पण त्याचवेळीं विरोधी पक्षानें उद्घोषणा केली 'उत्सव कसला करितां ? सरकाराचा निषेध करा, कांहीं करूं नका.' कीं बिचारी जनता हिरमुसलें तोंड करून बेचैन होते ! अशा परिस्थितींत उत्तम रीतीनें उत्सव साजरा करणार कसा ? अनेक वर्षांच्या खडतर जीवनानंतर, आपण हा सोन्याचा दिवस पहात असतांना जर जनता आपल्या मनाप्रमाणें वागण्यास स्वतंत्र असेल, तरच ती त्या दोघांनाही लाथाडून देईल व आपलें स्वतःचें भवितव्य स्वतः ठरविण्याचा प्रामाणिक प्रयत्न करील; **पण इतरांचा हस्तक्षेप नको.** पण हे दिवस पडले लोकशाहीचे ! लोकशाहींतील प्रत्येक घटक सुशिक्षित, स्वतंत्र विचार करणारा व **आत्मतन्त्र** असला पाहिजे; पण आमच्या बाबतींत शून्य आहे ! आम्ही स्वतंत्र झालों; पण शहाणपण शिकलों नाहीं ! स्वातंत्र्य मिळालें पण स्वतःवरच्या जबाबदारीची जाणीव उत्पन्न झाली नाहीं. राष्ट्रकार्याचें मूल्यमापन करण्याची पद्धतीच चुकीची. व्यक्तीला महत्व कीं कार्याला महत्व; व्यक्ति श्रेष्ठ कीं कार्य श्रेष्ठ. "हें करणें जरी आवश्यक वाटलें तरी तें केल्याचें श्रेय एका विशिष्ट व्यक्तीला किंवा व्यक्तिप्रमुखपक्षाला जाईल, म्हणून तें करूं नका," असला राष्ट्रघातकी विचार आमच्या कांहीं शहाण्या लोकांच्या डोक्यांत जेव्हां येतो, तेव्हां विषाद वाटावयास लागतो ! ही नैतिक मूल्यांची घसरण सुरूं झालीं कीं, स्वातंत्र्याचा उपयोग काय ? राजकीय वातावरणांत दुष्ट घटनांचें ढग जमण्याचें कार्य अव्याहत सुरूं आहे. म्हणून हा दिवस जसा आनंदाचा तसाच तो भविष्यकाळाविषयी काळजी व चित्ताची अस्वस्थता वाढविणाराही आहे. अन्तःशत्रु व बाह्य-शत्रु व पंचम स्तंभीयांच्या कारवाया, लांचलुचपतीचा थैमान, निसर्गाचा कोप, नद्यांना भरमसाट पूर येऊन लोकांच्या वित्ताची, शेतकीची, घरादारांची झालेली हानी, 'सरकार चुकतें कोठें व आम्ही त्यावर उठतों केव्हां ?' हें डोळयांत तेल घालून पाहण्याची अशास्त्रीय वृत्ति—हें चित्र विचारी माणसाच्या डोळयांपुढें येऊन त्यास आजचा दिवस चिंतेचा व काळजीचा वाटतो. "गेली ती घटका खरी," असें म्हणण्याची वेळ येऊन ठेपली आहे. अशी जरी निराशाजनक परिस्थिति आज दिसत असली, तरी या वर्षांत मुंबईराज्यानें निरनिराळ्या कार्यक्षेत्रांत बरीच प्रगति दाखविली आहे. स्वातंत्र्यदिन हा आढावा घेण्याचा दिवस. मुख्य मन्त्री श्री. यशवंतराव चव्हाण यांनी या दिनानिमित्त दिलेला संदेश गतकाळ व सद्यस्थिति व त्यावरून भविष्यकाळीं दिसून येणारें चित्र यांचा उत्तम कयास करून देतो. आपण आनंदांत, समाधानांत, निर्भयतेंत कित्येक वर्षें राहूं शकत नाहीं, याची वास्तववादी जाणीव त्यांनीं करून दिली आहे. निरनिराळ्या क्षेत्रांतील कार्यांचा आढावा घेऊन पुढील वाक्य त्यांनीं उच्चारलें आहे. ते म्हणतात, "या वर्षींच्या प्रगतीवरून जनतेमधील एक नवा उत्साह, नवीन आशा, नवा विश्वास आणि स्वतःच्या प्रगतीबद्दल दुर्दम्य इच्छा अशा अदृश्य स्वरूपांतहि ती (प्रगति) होऊं शकेल आणि त्यामुळें विकास कार्यक्रमाच्या अंमलबजावणीला नवा जोम प्राप्त होईल." हा कयास खरोखरच आशादायक आहे. विविध समाजकल्याणकार्यांतील एकसूत्रताच दिसून येईल. रस्ते बांधणी, पाणी पुरवठा, उद्योगधंद्याची योजना, मुंबईच्या कापडधंद्यांतील नवें पर्व, शाळा इमारतीसाठीं दिलेलीं कर्जे, विदर्भांतील जमीनविकास या गोष्टी गुणग्राहकशक्तीला पटणाऱ्या आहेत. म्हणून आपण अशी प्रार्थना करूं या कीं, मुंबईराज्य, नवीन स्वरूपांत, आपल्यावरील जबाबदारी उत्तम रीतीनें पार पाडो. व नवीन वर्षी सर्वांगीण प्रगती होऊन जनतेचें क्षेमकल्याण संरक्षित होवो. आमचें स्वातंत्र्य आम्हीं संभाळलें पाहिजे, ही जाणीव सर्वांना सारखी होवो !

# धर्मचक्र मासिकाचा ११ वा वाढदिवस.

[ ले. **काशिनाथ महादेव ताम्हनकर** बी. ए., मुंबई ]

दिनांक १५-८-५८ स्वातंत्र्य दिनादिवशीं-सायंकाळीं ४ ते ८ पर्यंत प्रा. ना. के. भागवत मुख्य संपादक 'धर्मचक्र' यांच्या 'सुगत-निधान' या निवासस्थानीं ( १५ वा रस्ता प्लॉट नं. ४६३ खार, मुंबई २१ ) धर्मचक्र मासिकाला १० वर्षे संपून ११ वें वर्ष सुरूं झाल्याबद्दलचा समारंभ थाटानें साजरा झाला. सुरवातीला कुमारी शुभांगी विजयकर यांचे श्री तुकारामाच्या अभंगांचें सुस्वर भक्तिपर गायन झाल्यानंतर मध्यंतरांत 'धर्मचक्र' मासिकाच्या उत्कर्षाविषयीं शुभचिंतनपर व आशीर्वादपर भाषणें झालीं.

## प्रा. ना के. भागवत

यांनीं निमंत्रण पत्रिका वाचून दाखविली आणि या समारंभासाठीं उपस्थित झालेल्या सज्जनांचे आभार मानले. यावेळीं त्यांनी श्री. गजानन महाराज बोरकर, श्री. आचार्यस्वामी, श्रीरामतीर्थ योगाश्रमाचे श्री. उमेशचंद्रजी चक्रवर्ती, श्री. अवधूत स्वामी लिमये प्रभृति सर्व सज्जनांना 'धर्मचक्रा'च्या अकराव्या वर्षाचा प्रारंभांक अर्पण केला. नंतर या अंकांतील संपादकीय मनोगताचा सारांश त्यांनीं सांगितला आणि श्री. गजानन महाराजांचा शुभाशीर्वादपर संदेश, जो मागील अंकांत छापला आहे, तोही वाचून दाखविला. नंतर प्रा. भागवत म्हणाले-धर्मचक्राचा उदय श्रीगजानन महाराजांच्या मंदीरांत झाला. त्यांच्या निवासस्थानाला मी मंदीरच समजतों. श्री. गजानन महाराज व श्री. केसकर महाराज माझे व धर्मचक्राचे मातापिताच आहेत. याप्रसंगीं या संतसज्जनांच्या आशीर्वादपर संगोपनाबद्दल आणि 'धर्मचक्रा'शी सहकार्य करणाऱ्या सर्व सज्जनांबद्दल मला कृतज्ञता वाटत आहे. आनंदापेक्षां कृतज्ञतेचीच भावना प्रभावी आहे. आज माझे हें लहान कार्य पहावयास श्री. बोरकर महाराज असल्याचें समाधान वाटतें. पण श्री. केसकर महाराज प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें येऊं शकले नाहींत, याचें वाईट वाटतें. यावेळीं फार बोलवत नाहीं. खरें प्रेम मूक असतें. आज जमलेल्या सर्व सज्जनांपुढें 'धर्मचक्र' रूपीं लेकरूं ठेवीत आहे. श्री. बोरकर महाराजांविषयीं मला इतकें भक्तिप्रेम कां वाटते, याचें वर्णन करायला मजकडे पुरेसे शब्दच नाहींत. जरा मरगळ वाटली कीं, मी त्यांच्या निवासस्थानरूपीं मंदीरांत जातों आणि समाधान आणि उत्साह घेऊन परत येतों, येवढें मात्र खरें ! भगवान बुद्धांच्या शिकवणीचा अभ्यास, चिंतन व मनन करून मी बुद्धानुयायी बनलों. राष्ट्रपिता **महात्मा गांधी** यांच्या शोकांतिकेनें 'धर्मचक्र' चालविण्याची प्रेरणा झाली. महात्माजींचे आध्यात्मिक सुपुत्र **विनोबाजी** यांचा धर्मचक्राला आशीर्वाद मिळाला आणि श्री बोरकर महाराज व श्री केसकर महाराज आणि सज्जन शुभचिंतक यांच्या कृपाछत्राखालीं तो सुफल झाला. यानंतर 'धर्मचक्रा' चे सहाय्यक सहकारी जळगांवचे श्री.**मी. का. भोरटके** यांचाही शुभचिंतनपर विस्तृत संदेश प्रा.भागवत यांनीं वाचून दाखविला आणि इतरहि शुभचिंतनपर संदेशांचा त्यांनीं उल्लेख केला. ( हे अन्यत्र छापले आहेत. ) आपण भगवान बुद्धाच्या शिकवणीचे अनुयायी असतांना श्री तुकाराम महाराजांच्या वाङ्मयाकडे आणि 'श्री तुकाराम विश्वविद्यालया' सारख्या चिरंतन स्मारकाच्या कार्याकडे कसें वळलों, याचा प्रा. भागवतांनीं खुलासा केला. 'जगाच्या कल्याणा संतांच्या विभूती' 'भूतांची दया हें भांडवल संतां' 'उरलों उपकारा पुरता' 'तुका म्हणे सुख पराविया सुखें' इत्यादि श्री तुकारामांच्या अभंगांतील उद्गारांचें चिंतन व मनन केल्यानंतर भगवान बुद्ध व श्री तुकाराम यांचें कार्य एकच असें पटल्यामुळेंच, मी श्री तुकारामांच्या कार्यास चिरंतन स्वरूप देण्याच्या प्रयत्नांना लागलों. श्री तुकाराम हे केवळ सांप्रदायिकांचें नसून **अखिल विश्वाचे संत** आहेत, असा मला मनोमय प्रत्यय आल्यामुळेंच मी हें कार्य हातीं घेतलें. नंतर फिरून एकवार श्री. बोरकर महाराज व केसकर महाराज, श्री.आचार्य स्वामी आणि श्रीरामकृष्ण योगाश्रमाचे उमेशचंद्रजी चक्रवर्ती यांच्या कार्यांचें व थोरवीचें दिग्दर्शन करून प्रा. भागवत यांनीं आपलें प्रास्ताविक आणि आभारप्रदर्शनात्मक भाषण पुरें केलें. नंतर श्री गजानन महाराजांच्या सूचनेवरून

**श्री अवधूत स्वामी तथा मो. वा. लिमये** बी. अे. आपल्या तळमळीच्या भाषणांत म्हणाले-आजचा हा भाग्याचा दिवस सत्पुरुषांच्या आशीर्वादानें उगवला, असें नुकतेंच प्रा. भागवत यांनीं सांगितलेंच आहे. सत्पुरुषांचे आशीर्वाद हेच शुभाशीर्वाद ठरवतात. स्वातंत्र्यानें 'धर्मचक्रा'ला प्रेरणा दिली खरी; पण 'धर्मचक्र' हातीं आल्याशिवाय खरें स्वातंत्र्य नाहीं. खऱ्या स्वातंत्र्याची जाणीव 'धर्मचक्र'च करून देतें. 'संसार तापें तापलों मी देवा' हा श्री तुकोबांचा अभंग नुकत्याच झालेल्या सुंदर गायनांत आपण ऐकलांत. सभोंवार चाललेल्या अधर्माचारांनीं आपण गांजलों असतां खरें स्वातंत्र्य कसलें? प्रभु रामचंद्र, श्रीकृष्णादींनीं सद्गुरूंचा आदेश घेऊन आपापल्या कार्यांना सुरुवात केली. त्याप्रमाणें प्रा. भागवतांनींहि सद्गुरुंच्या आदेशानेंच 'धर्मचक्र' हातीं घेतलें. आपण विषयांध आहोंत, तोंपर्यंत स्वतंत्र कसे ? म्हणून विषयांधतेपासून मुक्त करण्यासाठींच 'धर्मचक्रा'चा उपयोग अनेक संतांनीं सांगितलेल्या सद्धर्माचें चिंतन-मनन करण्याची प्रेरणा व साधन 'धर्मचक्र' पुरवितें. संतांच्या आशीर्वादांचा फायदा प्रा. भागवतांनीं 'धर्मचक्रा'ला करून घेतला. **यामुळेंच खरें स्वातंत्र्य मिळविण्यासाठीं 'धर्मचक्र' उपयुक्त ठरणार आहे.** द्वेष व मत्सर नाहींसें करून प्रेम आणि बंधुभावादि सद्गुणांची जागृति करण्याचें थोर कार्य 'धर्मचक्र' करीत आहे. बाहेरच्या शत्रूपेक्षांहि स्वतःच्या हृदयांतील रिपूशीं लढण्याची शिकवण 'धर्मचक्रां'तून मिळत आहे. 'संसाराची माया संकल्पाची कशी' हा योग श्री तुकारामादि संत वचनांचे आधारें 'धर्मचक्र' वाचकांना शिकविण्याची कोशीस करीत

असते. परमेश्वराला एकनिष्ठ भक्त आवडतात. स्वतः सद्बुद्धीनें व स्वतंत्र झाल्याशिवाय सभोंवारच्यांना आपण कसें स्वतंत्र करूं शकूं ? आज धर्मशिक्षणाची आत्यंतिक आवश्यकता आहे. दास व्हायचें तर, परमेश्वराचे दास व्हा-तरच आपण आपल्या ध्येयाची सिद्धि गाठूं शकूं, हा धडा प्रा. भागवतांनीं आत्मसात् केला असून तोच 'धर्मचक्रा' मार्फत ते जगापुढें ठेवीत आहेत. नंतर **श्री. का. म. ताम्हनकर** यांनीं थोडक्यांत केलेल्या भाषणांत सांगितलें कीं, श्री. शंकराचार्यांनीं सनातन धर्माचें पुनरुज्जीवन समन्वयाच्या मार्गानें केलें. भगवान् बुद्ध हे श्रीराम, श्रीकृष्णाप्रमाणें सनातन धर्माचेच अवतारी पुरुष असें सांगून त्यांनीं बुद्ध धर्माची थोर शिकवण सनातन धर्मांतही असल्याचें दाखवून दिलें. प्रा. भागवतहि भगवान बुद्ध व श्री तुकाराम यांच्या शिकवणींतील एकरूपता दाखवून देऊन श्री शंकराचार्यांचें कार्यच पुढें चालवीत आहेत. त्यांनीं आपल्या 'धर्मचक्रा' साठीं थोर थोर सद्-गुरूंचा आणि विश्वसंतांच्या वचनांचा आधार मिळविला असल्यामुळेंच त्यांच्या 'धर्मचक्रा'चें कार्य यशस्वी झालें आणि यापुढेंही तें यशस्वी व ठिकाऊ व्हावें, अशी आपण प्रार्थना करूं या. नंतर—

### श्री. गजानन महाराज बोरकर

आपल्या भाषणांत म्हणाले—प्रा. भागवतांच्या या थोर कार्याला आशीर्वाद देणारे आम्ही कोण ? लहानपणापासून प्रा. भागवतांचे श्री केसकर महाराजांनीं कोडकौतुक केलें. यावरून त्यांना ईश्वराचे पूर्ण आशीर्वाद असल्याचें दिसून येतें. श्री केसकर महाराज व आम्ही एकरूपच आहोंत. आम्ही केवळ निमित्तमात्र आहों. केसकर महाराजांना याप्रसंगीं येण्याची फार इच्छा होती; पण प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें ते येऊं शकले नाहींत; म्हणूनच त्यांच्याप्रमाणें मोजे घालून मला यावें लागलें. अशा रूपानें जणुं आम्ही आज दोघेही या समारंभाला उपस्थित झालों ! प्रा. भागवतांची थोरवी त्यांच्या लीन-स्वभावांत आहे. वयाला ६६ वर्षें उलटून गेलीं तरी 'धर्मचक्र' प्रचाराचें कार्य ते इतक्या निरलसपणें करतात, हीच ईश्वरी कृपा होय. ते रत्नागिरींतील रत्न आहेत. रत्नागिरींतील रत्नांनींच लोकमान्य टिळक प्रभृति-अनेक पुढाऱ्यांप्रमाणें महाराष्ट्राला चमकदार केलें आहे. रत्नागिरीचे हापूस आंबे सुप्रसिद्ध आहेत. वारा अनुकूल लाभला, कीं चार दिवसांत मुंबईस येऊन आपल्या अमृततुल्य स्वादानें मुंबईकरांना ते संतुष्ट करतात; पण वारा प्रतिकूल होऊन विलंब लागला कीं ते फुकट जातात; पण अनुकूल वाऱ्याच्या सत्संगतीची प्रेरणा प्रा. भागवतांना बालपणापासूनच ईश्वरी कृपेनें लाभली. प्रा. भागवतांचा पिंडच पुण्यवान् आहे. बालपणापासूनच आनंदमय परमेश्वरी विचारांच्या भक्तींत ते रंगून गेले आहेत. **त्यांचें धर्मचक्र परमेश्वराला आवड-लेलें आहे.** परमेश्वर त्यांचें हें कार्य चालवीत असून पुढेंही चालवील. साधुसंत जादुगारासारखे या कार्याला उपयोगी पडतात. प्रा. भागवतांना फसविणारेहि भेटले. त्यांच्या सांगण्यावरून साडेतीन हजार रुपये खर्च करून त्यांनीं आपल्या पुस्तकाच्या १० हजार प्रती काढल्या; पण त्या त्यांच्याच अंगावर पडल्या आणि ते मोठ्या आर्थिक संकट-चक्रांत सांपडले ! पण तरीही त्यांतून त्यांचें ईश्वरानें रक्षण केलें ! त्यांचें हें धर्मकार्य कधींही फुकट जाणारें नाहीं. त्यांची थोर इच्छा ईश्वरकृपेनें सफल होईलच. देह आणि देहावरील आघात केवळ निमित्तमात्र आहेत. तुका म्हणे तोची संत । सोशी जगाचे आघात ॥ असें श्री तुकोबांचें वचन आहे. एक नवखा नावेंतून जलप्रवासाला निघाला. अशाप्रसंगीं ईश्वरी कृपाच अनुकूल वारा मिळवून देते. नामदेवांना ज्ञानेश्वरांनीं 'निगुरु' म्हटल्याचा राग आला ! पण पांडुरंगांनीं सद्गुरू-शरणतेचें महत्त्व पटवून देऊन त्याला-विसोबा खेचर- सद्गुरूकडे पाठविलें आणि भक्ताचें कच्चे मडकें पक्कें बनविलें ! जलप्रवासाला निघालेल्या नवख्यालाही सद्गुरु भेटले आणि 'तुला ईश्वर दर्शन हवें कीं समुद्रांतील रत्नें हवींत,' असा त्याला सद्गुरूंनीं सवाल केला. तेव्हां 'मला ईश्वर दर्शनच हवें; समुद्ररत्नें नकोत' असें तो म्हणाला. अर्जुनानें श्रीकृष्णाजवळ जशी केली तशी मागणी त्यानें केली. मग श्रीकृष्णांनीं योग्य इषारा देऊन विश्वरूप दर्शन दिलें.

बोलूनि ऐसें मग वासुदेवें । पार्थासि तें दाखविलें स्वरूप ।
भ्याल्यासि आश्वासन द्यावया तो । झाला पुन्हा सौख्य उदार देव ।

सुरवातीस सांगितलेंच आहे कीं, श्री केसकर महाराज व आम्ही एकरूपच आहों. १९३२ सालीं श्री केसकर महाराजांनीं दिव्य दृष्टीची प्रचीती घेतली आहे. तेव्हां त्यांच्यासारख्या विश्वसंतांच्या आणि परमेश्वराच्या कृपेनें प्रा. भागवतांच्या 'धर्मचक्रा'चें आणि 'श्री तुकाराम विश्वविद्यालया'चें थोर ध्येय सुफलित व्हावें, अशी आमची प्रभुचरणीं प्रार्थना आहे ! नंतर—

### श्री आचार्यस्वामी

आपल्या भाषणांत म्हणाले—मी नुकताच १४ महिन्याचा दक्षिण भारताचा दौरा करून आलों आणि आज या त्रिवेणी संगमांत स्नान करण्याचा सुयोग मला लाभला आहे. (१) स्वातंत्र्यदिन (२) धर्मचक्र आणि (३) विश्व-धर्माचें ध्येय हाच हा त्रिवेणी संगम होय ! सुदर्शनचक्राप्रमाणेंच 'धर्मचक्र' ही एक दिव्य वस्तु होय. 'धर्मो रक्षति रक्षितम्' अशा धर्माच्या अनेक व्याख्या आहेत. 'धर्मचक्र' विश्वधर्माचें मला दर्शन करते, धर्माचें संरक्षण करण्यासाठीं झटते आणि प्रसंग पडल्यास सुदर्शन चक्राप्रमाणें अधर्माचा नाशही करते. प्रा. भागवतांचा व माझा ३५ वर्षांचा परिचय आहे. आज नवशक्तीचे माजी संपादक श्री. ताम्हनकर येथें उपस्थित आहेत. त्यांचे प्रभावी अग्रलेख आणि भाषणें मीं ऐकलीं आहेत. पण आज ते इतके मितभाषणी कां बनलें, हें समजत नाहीं. त्यांचें विस्तृत भाषण ऐकावयास मिळेल, अशी माझी अपेक्षा होती. असो. ताम्हनकरांनीं म्हटल्याप्रमाणें प्रा. भागवत खरोखरच श्री शंकराचार्यांचे धर्म समन्वयाचें कार्य पुढें चालवीत आहेत. त्यांचा विशेष हा कीं, त्यांनीं अनेक वर्षें खिश्चनमिशनऱ्यांच्या वातावरणांत घालवूनहि त्यांनी स्वधर्माचें आपलें तत्त्व सोडलें नाहीं. बुद्ध धर्माचीं थोर तत्वें आणि आपल्या सनातन धर्माचीं थोर तत्वें यांचा त्यांनीं सुवर्णमध्य (Golden Mean) साधला. मी भाषांचा मोठा व्यासंगी नसलों, तरी प्रा. भागवत यांची धर्मचक्रांतील भाषा-विशेषतः, मराठी भाषा-**हा मराठी सभ्य भाषेचा अप्रतिम नमुना आहे, असें मला वाटतें.** तरुण पिढीनें धर्मचक्रांतील सुविचारांचा फायदा घेतला पाहिजे. मी 'युग-धर्म' पुस्तक लिहून प्रसिद्ध केलें; त्यांत युगधर्माचा मुख्य भाग राष्ट्रधर्म असल्याचें म्हटलें आहे. 'धर्मचक्र' याच शिकवणीचा प्रचार करीत आहे. या कार्याला श्री. गजानन महाराज, श्री केसकर महाराज आणि संताचा शुभाशीर्वाद आहे. तेव्हां प्रचारकार्य सुयशस्वी होईल आणि तो यावच्चंद्र दिवाकरौ टिकाऊ ठरेल, अशी माझी सर्वांच्या प्रमाणें ईश्वराकडे प्रार्थना आहे. नंतर श्रीरामकृष्ण योगाश्रमाचे प्रवर्तक

### श्री. उमेशचंद्रजी चक्रवर्ती

यांनींही आटोपशीर भाषण करून 'धर्मचक्रा' ला सुयश चिंतिलें. नंतर कॉफीपान होऊन, कुमारी शुभांगी विजयकर यांच्या भक्तिगीत गायनाचा उत्तरार्ध होऊन हा समारंभ रात्रीं ८ चे सुमारास मोठ्या आनंदोत्साहांत आटापला.

• • •

# भाग्यवान तरुण पिढी

( आशेचे किरण )

[ कै. बाळासाहेब खेर हे एकवेळीं 'लोकमान्या'चे संपादक होते. त्या-वेळीं ( सन १९२५ सालीं ) त्यांनीं वरील शीर्षकाचा एक लेख लिहिला होता. त्यानंतर २५ वर्षांनीं ( सुमारें १९५० सालीं ) त्यांच्या आकांक्षा प्रत्यक्षांत दिसूं लागल्या. त्यांचा तो लेख खेर कुटुंबियांनीं आम्हास प्रसिद्ध करण्याची परवानगी दिली त्याबद्दल आम्ही त्यांचे ऋणी आहोंत.

—संपादक ]

दार्जिलिंगपासून पांच सात मैलांवर व्याघ्रपर्वत नांवाचा एक लहानसा डोंगर आहे. प्रवासी लोक तेथें सूर्योदयाचा अवर्णनीय देखावा दिसतो तो पहावयास गेल्यावांचून राहात नाहींत. आकाश निरभ्र असल्यास पहांटे चार वाजतां हें सुंदर दृश्य दृष्टीस पडते. परंतु येवढ्या उंच स्थळीं धुकें बहुतकरून असतेंच, त्यामुळें लागोपाठ आठ आठ दिवस जाऊनहि सूर्योदयाचा देखावा दृष्टीस न पडतांच कित्येकांना निराश होऊन परतावें लागतें. भाग्यवान असतात त्यांना मात्र प्रथम प्रसंगींच हा अनुरूप सृष्टिचमत्कार पहावयास मिळतो व त्याचवेळीं नगाधिराजाचें अत्युच्च शिखर 'एव्हरेस्ट'सुद्धां नजरेस पडून कृतार्थ होतां येतें. सूर्योदयाच्या अगोदर कितीतरी कंटाळवाणा काळ जातो; परंतु ज्यांनीं ज्यांनीं हा चमत्कार पाहिला आहे त्यांना एक गोष्ट पक्की आठवत राहाते, ती ही कीं एकदां दिशा विकास पावून बालरवि क्षितिजावर डोकावू लागल्यानंतर तो चक्राकार फिरत फिरत इतक्या झपाट्यानें वरती येतो व मनोहर दिसतो कीं, अगोदरच्या सर्व अभ्रखेदाची व काळोखाची प्रतीक्षा करीत राहिलेल्या दीर्घकाळाची कटुस्मृति एकदम नष्ट होऊन प्रेक्षक त्या स्वर्गीय सुखाचा आस्वाद घेण्यांत दंग होऊन जातो.

लोकमान्यांत 'गोष्टी' व 'कविता' छापीत नाहींत, याची विस्मृति होऊन वरील मजकूर लिहिला आहे कीं काय अशी आपल्या वाचकांस शंका येईल. म्हणून एकदमच सांगतों कीं, ही गोष्टहि नव्हे व कविताही नव्हे. राष्ट्रीय-सभा स्थापन होऊन आज चाळीस वर्षें झालीं. सूर्योदयाचें दृश्य नजरेस पडण्यासाठीं हिंदी लोकांच्या तीन पिढ्या सारखे कष्ट सोसून वाट पहात राहिल्या व प्रयत्न करीत राहिल्या. पण जें साधलें नाहीं तें सध्यांच्या भाग्यवान् तरुण पिढीला जरूर दृष्टीस पडणार व एकदां क्षितिजावर आल्यानंतर स्वराज्यसूर्य झपाट्यानें वरती चढणार, अशी साक्ष तरुण पिढीच्या मनाला पटली आहे. हा दार्जिलिंगच्या दृष्टान्ताचा समर्पकपणा आहे. राजकीय, धार्मिक, सामाजिक–सर्व चळवळीकडे पहा, पूर्वीपेक्षां बरीच जलद प्रगति होत असल्याचें आपणास दिसून येईल. आधीं राजकीय कीं आधीं सामाजिक–कशाचें महत्त्व अधिक, इत्यादि वादग्रस्त प्रश्न विद्वान् घटपटादि खटपट करण्याकरितां सोडून देऊन आपण नुसत्या सध्यांच्या परिस्थितीचें निरीक्षण केलें तर, श्री. देवधर यांनीं परवां पुण्यास भरलेल्या प्रान्तिक सामाजिक परिषदेंत केलेल्या भाषणांत सांगितल्याप्रमाणें आपली प्रगति उत्साहजनक आहे, असें कोणीहि कबूल करील. समाजांत स्वातंत्र्याची मनोवृत्ति उचंबळली म्हणजे ती एकाच बाजूनें प्रगति करीत नाहीं. शरीरांतील रक्त वाढलें म्हणजे तें एकाच अवयवाची सुदृढता वाढवून थांबत नाहीं. सर्व शरीरावर इष्ट परिणाम घडवून आणतें. श्री. देवधरांनीं म्हटल्याप्रमाणें—"Change is the sign of life and vitality and to prepare the people to submit willingly and intelligently to the dictation of this law is the aim of all movements."

( परिस्थितींत इष्ट फेरफार घडणें हें जीवंतपणाचें व जोमदारपणाचें लक्षण आहे आणि या नियमाप्रमाणें जनतेला असे फेरफार स्वयंस्फूर्तीनें घडवून आणण्यास लावणें हा सर्व चळवळींचा उद्देश आहे. )

अस्पृश्यता निवारण, स्त्रीशिक्षण, इत्यादि सामाजिक लोकजागृति करून जनतेला राजकीय परिस्थितीची माहिती करून देणें, स्वराज्य-प्राप्तीचें महत्त्व पटवून देणें, इत्यादि राजकीय चळवळींत किती फेरफार झाला आहे, हें प्रत्येकानें स्वतःला विचारून पाहिलें असतां आपल्या हिंदी समाजाची किती सर्वांगीण प्रगति झाली आहे, तें दिसून येईल. उतावीळ तरुण पिढीला ती फार मंदगतीनें होत आहे, असें वाटणें स्वाभाविक आहे; पण हटकून स्वराज्याचें दृश्य आपल्या दृष्टीस पडणार अशी खात्री पटल्यावांचून मात्र राहणार नाहीं. निराश होण्याचें कारण नाहीं. देशबंधुदास दार्जिलिंगला देह ठेवून गेले, पण त्यांचा अमर आत्मा अखिल आर्यावर्तांतील तरुणांना 'हा सूर्योदय तुमच्या दृष्टीस जरूर पडणार,' असा निरोप सांगत फिरत आहे. मात्र व्याघ्रपर्वतावर जाण्याचे कष्ट सोसण्याची तयारी व चिकाटी पाहिजे."

× × ×

इ. स. १९२५ सालीं 'लोकमान्य' दैनिकाचा कांहीं काळ संपादक असतांना 'भाग्यवान् तरुण पिढी'—आशेचे किरण, हा वरील लेख मी लिहिला. आज २५ वर्षांनंतर त्या काळची कांहीं स्वप्नें व आकांक्षा प्रत्यक्षांत दिसून येत आहेत. त्या काळची तरुण पिढी आतां पन्नाशी उलटून गेल्यामुळें जुन्या पिढींत मोडत आहे. स्वातंत्र्य हें त्यापासून होणाऱ्या फायद्यामुळें मौल्यवान आहे असें नसून स्वातंत्र्य ही स्वतःच एक अत्यन्त मौल्यवान चीज आहे. आजच्या तरुण पिढीला तें स्वातंत्र्य प्राप्त झालेलें आहे. देशाचें भवितव्य त्यांच्या हातांत आहे. स्वातंत्र्य मिळविण्यासाठीं ज्यांनां आपलें तारुण्य व शक्तिसर्वस्व खर्च करावें लागलें ते लोक आतां 'गोष्टी सांगेन युक्तिच्या चार' असें म्हणून मार्गदर्शन करूं

( पान ९ वर )

# विवेक आणि साधना

(समीक्षण)

[ लेखक-**केदारनाथजी**-प्रकाशकः नवजीवन मुद्रणालय, अहमदाबाद प्रसिद्धी सन १९५१-पृष्ठ संख्या ३८७-किंमत चार रुपये. ]

हा ग्रंथ लिहिणारे श्री केदारनाथजी यांनीं आरंभींच आपल्या ग्रंथाचा उद्देश स्पष्ट केला आहे. ते म्हणतात, " श्रद्धा व भाविकतेची पराकाष्ठा, तत्वज्ञान व सन्तवचनें यांवरील अनन्यनिष्ठा, धर्म, आध्यात्म, ईश्वर वगैरेविषयीं अमर्याद आस्तिकता, वगैरे सर्व भूमिकांच्या अनुभवांतून व त्या अनुभवांकरितां अनेक प्रकारचे कष्ट सोसून मी **प्रस्तुत विचारांवर** आलों आहे. आध्यात्मिक हेतूकरितां मला जसें अज्ञानानें निरर्थक (दुःख) सोसावें लागलें तसें कोणास सोसावें लागूं नये, हा एक कारुण्यपूर्ण हेतु या लिहिण्याचें मागें **प्रधानपणें** आहे."

या उताऱ्यांत दोन तीन गोष्टी प्रामुख्यानें आढळतात. त्यांची तपस्या व त्यांनीं अनुभवलेले कष्ट किती दारुण असले पाहिजेत, याची कल्पना करतां येते. शिवाय माझ्यासारखें दुःख इतरांना भोगावें लागूं नये, हा विचार करुणाभावनेनें उत्पन्न झाला आहे. अशा स्वानुभवावर आधारलेला व परहितविषयक अनुकंपेनें हेलावून लिहिलेला हा ग्रंथ आहे. यांत अहंभाव, अभिनिवेश, त्रागा, अट्टाहास, अधिक्षेप करण्याची वृत्ति, हीं नाहींत. पण परिस्थितीचें कठोर निरीक्षण व विश्लेषण केलेलें यांत आढळून येईल आध्यात्मांतील गहन गहन विषय हाताळलेले असूनहि त्यांचें प्रतिपादन अतिशय सुलभ रीतीनें केलेलें आहे. भाषा सोपी, सरळ, ओघवती आहे. आध्यात्माचा किंवा संस्कृतवाङ्मयाचा ज्याला गंध नाहीं, तो सुद्धा हें पुस्तक वाचून त्याचा अर्थ समजूं शकेल. उदाहरणार्थ, आमच्या सौभाग्यवतीनें हें पुस्तक वाचावयास घेतल्यावर तिनें तें पुरें केलें व यांतील दृष्टि नवीन आहे; परंपरागत आलेल्या निष्ठांना धक्का देणारी आहे, अशी कबुली दिली! धर्मविषयक प्रमेयांचें शास्त्रीय व मानसशास्त्रांच्या प्रमेयानुसार परीक्षण करून उपस्थित होणाऱ्या सिद्धांताची मांडणी करून **मानवधर्माचें** सांगोपांग व सोपपत्तिक विवेचन, व दिग्दर्शन यांत केलें आहे. 'समुदायानें समुदायाच्या सुरक्षेकरितां, उन्नतीकरतां व कल्याणाकरितां आचरावयाचें जे नियम तोच **मानवधर्म** (पृ. १३). हा धर्म मागें पडण्याचीं कारणें देतांना ग्रंथकारानें आतापर्यंत आम्हास या बाबतींत मिळालेलें शिक्षण व विचारप्रणालिका व ध्येय यांचा संपूर्ण परामर्ष घेतला आहे व त्यावरून असा सिद्धांत काढला आहे कीं, हीं सर्व आमच्या पतनावस्थेला कारणीभूत झालीं आहेत. जर आपलें प्रास्तव्य आपणास प्राप्त करून घ्यावयाचें असेल तर आतांपर्यंतचा मार्ग सोडून देऊन मानवता वा मानवधर्म, यांचें सूक्ष्म, दूरदर्शी व पृथःकरणशील ज्ञान मिळविलें पाहिजे. 'व्यावहारिक' 'पारमार्थिक' या शब्दप्रयोगांची जी रस्सीखेंच चालूं आहे, त्या योगानें "इतो भ्रष्टस्ततो भ्रष्टः" असली अनुकंपनीय अवस्था आमची झाली आहे. म्हणून या अधिकारी पुरुषानें "आधीं केलें मग सांगितलें" या न्यायानें अधिकारयुक्त वाणीनें हा ग्रंथ लिहिला आहे. आरंभीं "आत्मपरिचय" दिला आहे.

या ग्रंथाचे दोन खंड केले असून पहिल्याचें नांव "विवेक दर्शन" व दुसऱ्याचें नांव "साधनाविचार" असें आहे. पहिल्या खंडांत अठरा पोटभाग असून त्यांत विविध प्रश्न हाताळलेले आहेत. मुख्यत, ईश्वरभावना, भक्तिशोधन, तत्त्वज्ञानाचें साध्य, साध्यसाधन विवेक, व्यक्ताव्यक्त विचार, सामुदायिक कर्म व कर्मफळ व संतसज्जनांचें उपकार यांच्यावर विचारप्रदर्शन केलें आहे. 'जीवन हें महाव्रत' असें समजून मानव, मानवता व मानवधर्म यांचें स्वरूपाविष्करण केलें आहे. ह्या बाबतींतील आजपर्यंत झालेली उपेक्षा व असार गोष्टींना सारभूत व सारभूत गोष्टींना असारभूत समजल्यामुळें केवढा हा वस्तुविपर्यास होऊन आमचें अधःपातन होत गेलें आहे, हें स्पष्ट, निःसंदिग्ध पण कळकळीच्या भाषेंत सांगितलें आहे. दुसऱ्या खंडांत तीन विभाग आले असून त्यांची नांवें अनुक्रमें गुणदर्शन, धर्म्यव्यवहार, व चित्ताचा अभ्यास अशीं आहेत. विवेक व संयम, सद्गुणोपासना, गुणविकास व गुणातीतता, दृढशरीर व पवित्रमन, मनुष्योचित सुख व त्याच्या प्राप्तीचा मार्ग, विद्यार्थी दशेचें महत्त्व, गृहस्थाश्रमाची दीक्षा, ब्रह्मचर्यविचार, चित्ताच्या अवस्थांचें परीक्षण, ज्ञानमय जागृत अवस्था हीं प्रकरणें फारच उद्बोधक व मार्गदर्शक आहेत. मानव धर्माचें खरें स्वरूप सांगून त्याचें श्रेष्ठत्व दाखविण्याचें असल्यामुळें विवेकाशिवाय तें शक्य नाहीं.

ब्रह्म, माया, कर्मकाण्डाचा मार्ग, संसाराची वैय्यर्थता, दुःखमय संसार, ईश्वराची उपासना, सर्वसंगपरित्याग करून समाजाला पाठीमागें टाकून स्वर्ग व अपवर्ग याच्या मागें लागलेल्या लोकांचें निष्क्रिय, निवृत्तपर, दुःखमय व वैफल्ययुक्त जीवन—यांचें यथातथ्य व चित्रोपम वर्णन ग्रंथकारानें केलें आहे. परमात्मा व 'परमशक्ति' व ती-बद्दल सदैव कृतज्ञ व भावपूर्ण राहणें, हें आपलें मुख्य कर्तव्य आहे.

श्री केदारनाथांनीं आत्म्याच्या अस्तित्वाबद्दल जी विचारसरणी स्वीकृत केली आहे, ती शास्त्रोक्त व बुद्धाच्या विचारसरणीशी सुसंगत आहे. त्यांचीं खालील वाक्यें याची साक्ष देतील. ते म्हणतात :—दिवा जसा प्रतिक्षणीं नवनवीन द्रव्य जाळींत असतांना **अनुस्यूतपणें** जळत असलेला दिसतो, पाण्याचे परमाणू सतत बदलत असतांना नदीचा प्रवाह जसा एकसारखा **अखंडितपणें** चाललेला असतो, त्याचप्रमाणें ज्याच्या आधारावर 'अहं'चें स्फुरण चालू आहे, त्या शरीरांतील परमाणु नित्य बदलत असतांहि **तें एकसारखें एकच आहेसें** वाटत असतें." बुद्धाच्या अनात्मवादाचें इतकें सरळ व यथातथ्य वर्णन क्वचितच सांपडूं शकेल. भगवान बुद्धानें मानवधर्माचाच पुरस्कार केला. कारण त्याचा आधार समतेच्या वर्तनावर आहे. "ज्या मानानें

ही समता आपल्या आचरणांत येईल त्यामानानेंच आपल्यांतील 'आत्मभाव' **व्यापक होईल.** आपल्यांतील धर्मबुद्धीमुळें आपलें "आत्मत्व" मानवजात व आपल्या सहवासांतील प्राणीवर्ग येथपर्यंत तरी विशाल झालें पाहिजे, " व त्यासाठीं कर्मकाण्डाचा उपयोग होणार नसून मानसिक विकास उपयोगी पडणार आहे. मानवाच्या मनांतील कुशल व अकुशल मनोवृत्तींचा झगडा सुरूं असून अकुशल मनोवृत्तींचा बीमोड करून त्यांची जागा कुशल मनोवृत्तींनीं भरून काढणें व अशारीतीनें सर्वच जीवन कुशल वृत्तींनीं भरून काढणें व तन्मय होणें हीच बुद्धाची साधना होय. "बहुजन हिताय बहुजन सुखाय" या शब्दसमूहांत मानवजात व निसर्ग यांचा समावेश होतो. भगवन्ताचा धर्म आरंभीं कल्याणप्रद, मध्ये कल्याणप्रद, व पर्यवसानीं कल्याणप्रद असा आहे. त्यांत सर्वकल्याण आहे. जीवन हें महाव्रत या करितां आहे. "अप्रमादता" (सदैव जागरूकता) हा अमरणत्वाचा मार्ग आहे. 'प्रमादता' हा शब्द आमच्या मतें 'विवेक' याच्या अर्थाला जुळता आहे. मानवतावाद मानवी प्रजेची दखल घेतो व त्यासाठीं सद्‌गुणाच्या द्वारें जगताशीं समरस होतो. व त्यांतच मानवधर्माचें ध्येय प्राप्त होतें. जीवनांतील रडवेपणा घालवून "Life is real, Life is earnest" अशा रीतीने त्यांत पुरुषार्थ, कर्तृत्व व उद्योगप्रियता हीं आणलीं पाहिजेत, ह्यावर केदारनाथांचा मुख्य कटाक्ष आहे. मैत्री, करुणा, मुदिता व उपेक्षा (साम्यावस्था) या ब्रह्मविहारांच्या परमोच्च बिंदूंत मानव धर्म सामावलेला आहे. अशा रीतीनें सर्वांग परिपूर्णतेंतच जीवनाचा विकास भरलेला आहे. आपल्या चैतन्याचें सदैव व सर्वत्र प्रकटीकरण करणें, हाच मानवी धर्माचा गाभा.

सध्यांच्या काळांत, मुख्यतः, कर्तृत्वहीन व ध्येयशून्य जनतेला अशा ग्रंथाची अत्यन्त आवश्यकता आहे. श्री. केदारथाथ यांनीं जनतेवर हा ग्रंथ लिहून जे उपकार केले आहेत, त्यांतच त्यांची महनीता स्पष्ट होते. त्यांना बोधिसत्वाची किंवा भारतीय संताचीच उपमा योग्य आहे. या ग्रंथाची योग्यता प्रथम श्रेणींत बसण्याइतकी आहे. आम्ही त्यांचें कृतज्ञतापूर्वक व नम्रतापूर्वक अभिनन्दन करतों. "काय मानूं मी या संतांचे उपकार। मज निरंतर जागवीती।" हें सत्य. ह्या ग्रंथानें ती जागृति द्रुततर होवो व भारताचें जीवन नैतिकदृष्ट्या संपन्न, समृद्ध व कर्तव्यशील होवों !

• • •

( पान ७ वरून )

शकतील, व कांहीं कालपर्यंत देशाच्या कारभाराचीं सूत्रें हलवूं शकतील. पुढें काय ? तें भारतांतील तरुणांनींच ठरविलें पाहिजे. याकरितांच हिंदी युवक परिषद (Indian Youth Congress) ही संस्था जन्मास आलेली आहे, ही समाधानाची गोष्ट होय. तिचे उद्देशहि व्यापक असून त्यांत शारीरिक, सामाजिक, मानसिक, बौद्धिक, ऐतिहासिक व सांस्कृतिक कार्यक्रम सामावलेला आहे व मुख्य म्हणजे देशांतील निरनिराळ्या शहरीं किंवा खेडवळ विभागांत फिरून तरुणांना कामकरी व शेतकरी लोकांशीं सहकार्य करण्यास उत्तेजन द्यावें, व यासाठीं कार्यकर्त्यांच्या तुकड्या व प्रवासमंडळें निर्माण करणें," हा आहे. तरुण विद्यार्थ्यांची परिषद मुंबईस पंडित जवाहरलाल नेहरू ह्यांच्या अध्यक्षतेखालीं नुकतीच भरली आहे. (म्हणजे त्यावेळीं) अशावेळीं प्रत्येक तरुणानें आत्मनिरीक्षण करून व आपल्या आयुष्याची दिशा नीट ठरवून दृढ निश्चयानें भारताच्या उन्नतीच्या कार्यास लागावें, हें त्यांचें कर्तव्य आहे.

• • •

आधुनिक

# उपासिका धम्मदिन्ना

(कुमारी क्लारिस्सा वान स्टूम)

भगवान बुद्धाच्या काळीं कित्येक तरुण कुमारिकांनीं व स्नुषांनीं भगवान् बुद्धाच्या कार्याला वाहून घेतलें होतें. घरची श्रीमंती, वैभव, संपत्ति, सामाजिक दर्जा, व उच्चाधिकार यांचा त्याग करून बुद्धाची भिक्खुणी किंवा उपासिका म्हणून घेण्यांत त्या कन्यकांना व महिलांना भूषण वाटलें व भगवन्तांच्या उच्च ध्येयांनीं प्रेरित होऊन मानव-जातीची त्यांनीं सेवा केली, व तेंच जीवनसर्वस्व व जीवनाचें परमोच्च ध्येय मानिलें. त्या काळाचा इतिहास पाली वाङ्मयांतून विखुरलेला आहे. २५०० वर्षांपूर्वी घडलेला चमत्कार आजहि दृष्टीस पडला म्हणजे भगवन्तांच्या अन्तःसत्वाची, महोदार शिकवणीची, विश्वात्मक दृष्टि-कोणाची साक्ष पटून भगवन्ताचे समोर मानवाची मान अवनत झाल्या-विना राहत नाहीं. ज्या भगवान् बुद्धानें १/३ मानव जातीला जीवनाचे धडे दिले व ज्याचे पाठ आजच्या भारतांत लाखों दलित बांधव, बुद्धाला शरण जाऊन, गिरवूं लागले आहेत, त्याची महनीयता पाश्चात्यांना पटावयास लागून वैभवसंपन्न व सर्व भौतिक संपत्तीच्या उच्च स्थानीं विराजमान झालेल्या अमेरिकेंतील नरनारींनाहि त्याचें वेड लागावें, हा महान चमत्कार म्हटला पाहिजे. २२ वर्षांच्या एका अमेरिकन तरुणीनें भगवान् बुद्धाचा स्वीकार करून त्यानें शिकविलेल्या मार्गानें जीवन व्यतीत करणाचा दृढ निश्चय करून आपल्या आईबापांना आश्चर्यपूर्ण केलें. ही कथा जितकी अश्रद्धेय तितकीच रोमांचपूर्ण आहे. म्हणूनच तिचा विस्तार "धर्मचक्राच्या" वाचकांना करून देत आहों. खालील माहिती आम्हीं हिंदुस्थान टाइम्सच्या २३ जुलै च्या अंकावरून मिळविली आहे.

कुमारी स्टूम यांनीं आपलें शालेय शिक्षण पुरें केल्यावर कॅलि-फोर्नियाच्या विश्वविद्यालयांत एक वर्ष अभ्यास केला. त्यांचा आपुल-कीचा व आवडीचा विषय म्हणजे रसायनशास्त्र. त्या खेळांतहि भाग घेत, मुख्यतः, बेसबॉल. पण लौकरच त्यांनीं अभ्यासाला रामराम ठोकला. सर्वस्वी धर्माला वाहून घेण्याचें त्यांनीं ठरविलें. अमेरिकेंत त्यांनीं वेदान्ताचा अभ्यास केला होता व झेन बुद्धधर्मासह निरनिराळ्या धर्मावरील व्याख्यानेंहि ऐकलीं. हीं व्याख्यानें ऐकतांनाच सान फ्रॅन्सिस्को येथील वेदान्त सोसायटीचे प्रमुख स्वामी अशोकानंद यांनीं "मला मार्ग दाखविला" अशी स्पष्ट कबुली त्यांनीं दिली आहे. कुमारी वान स्टूम या भारतात परत येत असतांना सिंगापूर येथें ११ जुलै रोजीं त्यांनीं बौद्ध-धर्माची दीक्षा घेतली. त्यासाठीं तेथें एक खास धार्मिक समारंभ करण्यांत आला होता. श्री लंकारामय बौद्धमंदिराचे (सिंगापूर) भिक्षु चंद्रसिरि यांनीं त्यांना दहा शिक्षापदें देऊन त्यांचा त्यांनीं स्वीकार केला! मी हिंसा करणार नाहीं; दिल्याविना गोष्ट स्वीकारणार नाहीं; अब्रह्मचर्य वर्ज करीन; खोटें बोलणार नाहीं; मद्य, निशा येणारे पदार्थ सेवन करणार नाहीं; अयोग्य वेळीं (दुपारी १२ च्या नंतर) भोजन करणार नाहीं; नर्तन, गायन-वादन, बाहुल्यांचा खेळ वगैरे वर्ज करीन; पुष्पमाला, उटणीं, चंदन, वगैरे पदार्थ वापरणार नाहीं; उंच शय्या, कोचे, किंवा बैठकीवर बसणार नाहीं; सोनें-रूपें यांचा स्वीकार करणार नाहीं. अशा नियमांचें परिपालन करण्याची निष्ठा व्यक्त करून त्यांनीं धर्माचा स्वीकार केला. त्यांचें नवें नांव **उपासिका धर्मदिन्ना** असें ठेवण्यात आलें आहे. त्यांचा हा निर्णय अनपेक्षितच होता. बँकोक येथें तीन दिवस प्रवासांत खंड करून त्यांनीं दूर दूर भ्रमण करून त्यांत त्यांना विपस्सनेचा अभ्यास करणारे विद्यार्थी भेटले व त्यांचें जीवन व त्यांनीं बौद्ध तत्त्वज्ञानाचें केलेलें विशदीकरण व अर्थबोध यांचा त्यांच्या मनावर जबर-दस्त परिणाम झाला. मी कित्येक वर्षें सत्याचें शोधन चालविलें होतें व सन्यस्त मार्गाचीच गोडी मला सदैव लागली होती. हा मार्ग म्हणजेच प्रव्रजा, अशी कबुली देतांना त्यांनीं हास्य केलें! त्यांचा स्वभाव आनंदी असून या तरुण धर्मान्तरित उपासिकेचे उच्चार सन फ्रॅन्सिकोंतील लोकां-सारखेच आहेत. त्यांनीं सर्व मुंडण केलें आहे; कारण बौद्धधर्माच्या आज्ञेचें पालन करणें, हा त्यांचा बाणा आहे.

धर्मदिन्नेचा पुढचा बेत म्हणजे हृषिकेश येथें असलेल्या वेदान्त-वन-विश्वविद्यालयांत वेदांताचा अभ्यास करावयाचा. त्याप्रमाणेंच सिलोन, कांबोडिया, व सयाम यांत प्रवास करावयाचाहि त्यांचा बेत आहे. पण सामान्यतः, भारतांत राहून बुद्ध धर्माचें कार्य करावयाचें हा मुख्य उद्देश. त्यांच्या आईबापांना आपली मुलगी बुद्ध धर्माचा स्वीकार करून भारतांत राहील हें खरें वाटेना. भारतांत प्रवास केल्यावर अमेरिकेंत परत येण्याचें भाडेंहि त्यांनीं तिच्याजवळ दिलें होतें. सध्यां त्या दिल्ली येथील बुद्ध विहारांत राहून पुस्तकाच्या ढिगांत मांडी घालून बसतांना वार्ताहरानें पाहिलें तेव्हां "भगवान् बुद्धानें शिकविलेलें कठोर तपस्येचें जीवन तुम्ही कसें व्यतीत करूं शकाल" असा प्रश्न त्यानें त्यांना टाकला. त्याचें उत्तर त्यांनीं दिलें--मी स्थविरा (old) आहे. माझें वय बरोबर २२ वर्षांचें आहे!

उपासिका धर्मदिन्नेला भारतांत फारच मोठें काम करावयाचें आहे. लाखों लोक आज डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या आदेशानें भगवान् बुद्धाला शरण गेले आहेत. त्यांच्यांत काम करून **स्वतःच्या उदा-हरणानें** त्यांचें वर्तन, आचरण, विचारसरणी, यांत आमूलाग्र फरक घडवून आणण्याचें पवित्र कार्य जर त्यांनीं केलें, तर त्यांची निष्ठा सफळ होईल व भगवान बुद्धाच्या काळीं प्रख्यात झालेल्या भद्राकुण्डलकेशेप्रमाणें त्यांची कीर्ति सर्वत्र पसरेल! भगवान् बुद्धाची कृपा त्यांच्यावर सदैव राहो, ही प्रार्थना!

• • •

# संयुत्त-निकाय-सगाथावग्गो देवता-संयुत्त

( मागील महिन्यावरून पुढें चालूं )

४. अथ खो सा देवता पठवियं पतिट्ठहित्वा आयस्मन्तं समिद्धिं एतदवोच—

दहरो त्वं भिक्खु पब्बजितो सुसु काळकेसो भद्रेन योब्बनेन समन्नागतो पठमेन वयसा अनिकिळितावी कामेसु। भुञ्ज भिक्खु मानुसके कामे, मा सन्दिट्ठिकं हित्वा कालिकं अनुधावी ’ति।

५. न खो अहं आवुसो सन्दिट्ठिकं हित्वा कालिकं अनुधावामि। कालिकञ्च खो अहं आवुसो हित्वा सन्दिट्ठिकं अनुधावामि। कालिका हि आवुसो कामा वुत्ता भगवता बहुदुक्खा बहुपायासा आदीनवो एत्थ भिय्यो। सन्दिट्ठिको अयं धम्मो अकालिको एहिपस्सिको ओपनेय्यिको पच्चत्तं वेदितब्बो विञ्ञूही’ति।

६. कथञ्च भिक्खु कालिका कामा वुत्ता भगवता बहुदुक्खा बहुपायासा आदीनवो एत्थ भिय्यो। कथं सन्दिट्ठिको अयं धम्मो अकालिको एहिपस्सिको ओपनेय्यिको पच्चत्तं वेदितब्बो विञ्ञूही’ति।

७. अहं खो आवुसो नवो अचिरपब्बजितो अधुनागतो। इमं धम्मविनयं न खो अहं सक्कोमि वित्थारेन आचिक्खितुं। अयं सो भगवा अरहं सम्मासम्बुद्धो राजगहे विहरति तपोदारामे। तं भगवन्तं उपसङ्कमित्वा एतं अत्थं पुच्छ। यथा ते भगवा ब्याकरोति तथा नं धारेय्यासी’ति।

८. न खो भिक्खु सुकरो सो भगवा अम्हेहि उपसंकमितुं अञ्ञाहि महेसक्खाहि देवताहि परिवुतो। सो चे खो त्वं भिक्खु तं भगवन्तं उपसङ्कमित्वा एतं अत्थं पुच्छेय्यासि मयं पि आगच्छेय्याम धम्मसवनाया’ति।

९. ‘एवमावुसो’ति खो आयस्मा समिद्धि तस्सा देवताय पटिस्सुत्वा येन भगवा तेनुपसङ्कमि। उपसङ्कमित्वा भगवन्तं अभिवादेत्वा एकम’न्तं निसीदि। एकमन्तं निसिन्नो खो आयस्मा समिद्धि भगवन्तं एतदवोचः—

१०. इधा’हं भन्ते रत्तिया पच्चुससमयं पच्चुट्ठाय येन तपोदा तेनुपसङ्कमिं गत्तानि परिसिञ्चितुं। [ Repeat the § 2–3 by changing the 3rd person into the 1st porson and adding भन्ते

१२-१५ अथ खो भन्ते सा देवता पठवियं पतिट्ठहित्वा मं एतद’वोचः दहरो त्वं [ Repeat § 4–7 by making the necessary changes तथा नं धारेय्यासी’ति and adding भन्ते ]

१६. एवं वुत्ते भन्ते सा देवता मं एतद’वोच :—

न खो भिक्खु सुकरो सो भगवा [ Repeat § ८] धम्मसवनाया’ति। सचे भन्ते तस्सा देवताय सच्चं वचनं इधेव सा देवता अविदूरे’ति।

१७. एवं वुत्ते सा देवता आयस्मन्तं समिद्धिं एतदवोच :–पुच्छ भिक्खु, पुच्छ भिक्खु, यं अहं अनुप्पत्तो’ति।

१८. अथ खो भगवा तं देवतं गाथाय अज्झभासि :—

अक्खेय्यसञ्ञिनो सत्ता अक्खेय्यस्मिं पतिट्ठिता।  
अक्खेय्यं अपरिञ्ञाय योगमा’यन्ति मच्चुनो॥  
अक्खेय्यञ्च परिञ्ञाय अक्खातारं न मञ्ञति।  
तं हि तस्स न होती’ति येन नं वज्जा न तस्स अत्थि॥  
सचे विजानासि वदेहि यक्खी ’ति।

१९. न खो अहं भन्ते इमस्स भगवता संखित्तेन भासितस्स वित्थारेन अत्थं आजानामि। साधु मे भन्ते भगवा तथा भासतु यथा अहं इमस्स भगवता संखित्तेन भासितस्स वित्थारेन अत्थं जानेय्यं’ति।

२०. समो विसेसी अथवा निहीनो, यो मञ्ञति सो विवदेथ तेन।  
तीसु विधासु अविकम्पमानो, समो विसेसी न तस्स होती ’ ति॥  
सचे विजानासि वदेहि यक्खी’ति।

२१. इमस्स पि खो अहं भन्ते भगवता संखित्तेन भासितस्स न वित्थारेन अत्थं आजानामि। साधु मे भन्ते...पे०...अत्थं जानेय्यं’ति॥

२२. पहासि सङ्खं ( v. l. कङ्खं, सङ्गं ) न विमानं अज्झगा  
अच्छेच्छि तण्हं इध नामरूपे।  
तं छिन्नगन्थं अनिघं निरासं  
परियेसमाना नाज्झगमुं।  
देवा मनुस्सा इध वा हुरं वा  
सग्गेसु वा सब्बनिवेसनेसु॥  
सचे विजानासि वदेहि यक्खी’ति।

२३. इमस्स खो अहं भन्ते भगवता संखित्तेन भासितस्स एवं वित्थारेन अत्थं आजानामि—

पापं न कयिरा वचसा मनसा  
कायेन वा किञ्चन सब्बलोके।  
कामे पहाय सतिमा सम्पजानो  
दुक्खं न सेवेथ अनत्थसंहितं’ति॥

## नन्दनवग्गो दुतियो

तत्रुद्दानं—

नन्दना नन्दति चे’व न’त्थि पुत्तसमेन च।  
खत्तियो सकमानो च निद्दातन्दि च दुक्करं।  
हिरि कुटिका नवमो दसमो वुत्तो समिद्धिना’ति॥

× × ×

## परिच्छेदो ततियो-सत्ति-वग्गो

**सावत्थि निदानं** ( i. e. एकं समयं भगवा...पे० ( Repeat **नळवग्ग-ओघं** Para § 1 ) अट्ठासि। ) एकमन्तं ठिता खो सा देवता भगवतो सन्तिके इमं गाथं अभासि :—

### १. सत्तिया

सत्तिया विय ओमट्ठो डय्हमाने’व मत्थके।  
कामरागप्पहानाय सतो भिक्खु परिब्बजे’ति॥  
सत्तिया विय ओमट्ठो डय्हमाने’व मत्थके।  
सक्कायदिट्ठिप्पहानाय सतो भिक्खु परिब्बजे’ति॥

### २. फुसति

नाफुसन्तं फुसति च फुसन्तं च ततो फुसे।
तस्मा फुसन्तं फुसति अप्पदुट्ठपदोसिनं'ति॥

यो अप्पदुट्ठस्स नरस्स दुस्सति
सुद्धस्स पोसस्स अनङ्गणस्स।
तमेव बालं पच्चेति पापं
सुखुमो रजो पटिवातं'व खित्तो'ति॥

### ३ जटा

अन्तोजटा बहिजटा जटाय जटिता पजा।
तं तं गोतम पुच्छामि को इमं विजटये जटं'ति॥
सीले पतिट्ठाय नरो सपञ्ञो, चित्तं पञ्ञं च भावयं।
आतापी निपको भिक्खु सो इमं विजटये जटं'ति॥
येसं रागो च दोसो च अविज्जा च विराजिता।
खीणासवा अरहन्तो तेसं विजटिता जटा॥
यत्थ नामञ्च रूपञ्च असेसं उपरुज्झति।
पटिघं रूपसञ्ञा च एत्थ सा छिज्जते जटा'ति॥

### ४ : मनो-निवरणा

यतो यतो मनो निवारये, न दुक्खमेति नं ततो ततो।
सो सब्बतो मनो निवारये, स सब्बतो दुक्खा पमुच्चति॥
न सब्बतो मनो निवारये, न मनो सयतत्तं आगतं।
यतो यतो च पापकं, ततो ततो मनो निवारये'ति॥

### ५ : अरहं

यो होति भिक्खु अरहं कतावी, खीणासवो, अन्तिमदेहधारी।
अहं वदामी'ति पि सो वदेय्य, ममं वदन्ती'ति पि सो वदेय्य॥
[ यो होति भिक्खु अरहं कतावी, खीणासवो अन्तिमदेहधारी।
अहं वदामी'ति पि सो वदेय्य, ममं वदन्ती'ति पि सो वदेय्य।
लोके सामञ्ञं कुसलो विदित्वा, वोहारमत्तेन सो वोहरेय्या'ति॥ ]
यो होति भिक्खु अरहं कतावी, खीणासवो अन्तिमदेहधारी।
मानं नु खो सो उपागम्म भिक्खु, अहं वदामी'ति पि सो वदेय्य।
ममं वदन्ती'ति पि सो वदेय्या'ति॥
पहीनमानस्स न सन्ति गन्था, विधूपिता मानगन्थस्स सब्बे।
स वीतिवत्तो यमतं सुमेधो, 'अहं वदामी'ति सो वदेय्य।
[ ममं वदन्ती'ति पि सो वदेय्य ]
लोके समञ्ञं कुसलो विदित्वा, वोहारमत्तेन सो वोहरेय्या'ति॥

### ६ पज्जोतो

कति लोकस्मिं पज्जोता, ये हि लोके पकासति।
भवन्तं पुट्ठुमागम्म, कथं जानेमु तं मयंति॥
**चत्तारो लोके पज्जोता,** पञ्चमेत्थ न विज्जति।
दिवा तपति आदिच्चो, रत्तिं आभाति चन्दिमा।
अथ अग्गि दिवारत्तं, तत्थ तत्थ पभासति।
सम्बुद्धो तपतं सेट्ठो, एसा आभा अनुत्तरा' ति॥

### ७ सरा

कुतो सरा निवत्तन्ति, कत्थं वट्टं न वट्टति ( v. l. कत्थ वद्धं न वद्धति।
कत्थ नामञ्च रूपञ्च, असेसं उपरुज्झती' ति॥
यत्थ आपो च पठवी, तेजो वायो न गाधति।
अतो सरा निवत्तन्ति, एत्थं वट्टं न वट्टति।
एत्थ नामञ्च रूपञ्च, असेसं उपरुज्झती' ति॥

### ८. महद्धन

महद्धना महाभोगा, रट्ठवन्तो पि खत्तिया।
अञ्ञमञ्ञाभिगिज्झन्ति, कामेसु अनलङ्कता॥
तेसु उस्सुक्कजातेसु, भवसोतानुसारिसु।
गेधतण्हं पजहिंसु, के लोकस्मिं अनुस्सुकांति॥
हित्वा अगारं पब्बजित्वा, हित्वा पुत्तं पसुं पियं।
हित्वा रागञ्च दोसञ्च, अविज्जञ्च विराजिय।
खीणासवा अरहन्तो ते लोकस्मिं अनुस्सुका'ति॥

### ९ चतुचक्क

चतुचक्कं नवद्वारं, पुञ्ञं लोभेन संयुतं।
पङ्कजातं महावीर, कथं यात्रा भविस्सती'ति?॥
छेत्वा नन्दिं वरत्तञ्च, इच्छा लोभञ्च पापकं।
समूलं तण्हं अब्बुय्ह एवं यात्रा भविस्सतीं'ति॥

# 'धर्मचक्रा'च्या वाढदिवशीं आलेल्या सदिच्छा, शुभसंदेश, शुभचिंतन

१

(१) सिक्कीम संस्थानचे रेसिडेंट **श्रीमान अप्पासाहेब पन्त** म्हणतात :—

I have always read with interest your magazine 'DHARMA CHAKRA'. I have found valuable and interesting information and guidance in it. I wish you all the best.''

( Apa B. Pant )

(२) श्री **एम्. एस्. रांगणेकर** वकील व श्रीमती रांगणेकर, ठाणें :–

They regret their inability to attend owing to age and distance. They, however, wish complete success to the function, and futher wish that the Magazine prospers.

(३) माईमार्कंड घोलेकिया–माई निवास–सान्ताक्रूझ.

I am so very happy to receive your invitation on completion of the tenth year of DHARMA CHAKRA on behalf of your learned self and members of the Dharma Chakra and Tukaram University. As you know I never go out; but please be sure and give my assurance to others that both these activities are the brightest aspects of modernised and Universalised religion, the former of Buddhism and the latter of Hinduism They have my greatest sympathy, appreciation and the blessings of Universal Mother, who is propitiated.

(४) श्री नटवरलाल देसाई–रमेश आणि कंपनी–चहाचे व्यापारी मुंबई :—

We decided to attend the function; unluckily I could not do so, because I was not well. Now I feel better and attend business.

I pray God to give you good health and long life to render more service to the Nation.

२

(५) **श्री. वि. श्यं. ताटके**, मुख्याध्यापक, मॉडर्न हायस्कूल, शिवाजीनगर, पुणें (५)

" धर्मचक्र मासिक आम्हांस पुढें चालू ठेवावयाचें आहे. संतांनीं पुरस्कारिलेला नैतिक मार्ग महाराष्ट्रांत प्रसृत करण्याचें आपलें महत्कार्य उपयुक्त ठरो, हीच माझी इच्छा. "

( ६ ) ( सही लागत नाहीं )—

" धर्मचक्रा " नें अकराव्या वर्षांत प्रवेश केल्याचें समजलें. आपल्या नियतकालिकाचा उत्कर्ष इच्छितों. आपला शुभेच्छू—( ? )

( ७ ) श्री. **मि. का. भोरटके—जळगांव** : शुभसंदेश

" जीवननिष्ठा अढळ असली, जीवनास निश्चित व उच्च ध्येय असलें आणि जीवनांत येणारा प्रत्येक बरा वाईट अनुभव हा जीवनाच्या विकासाकरितांच असतो ही वास्तविक जीवनदृष्टि सदैव टिकून असली म्हणजे अशा जागृत जीवनांतील अनेक अनुभवांनीं जीवन समृद्ध होऊन तें विशाल, व्यापक व उदात्त होतें. सत्यानुभूति हा सर्वोच्च अनुभव होय. तो जीवनाच्या ह्या अवस्थेंतच शक्य असून त्यायोगें जीवनाला पूर्णत्व प्राप्त होतें.

"जीवनाला सत्यानुभूतिकडे जी नेते ती नीति–तिची गति अखंड असून मानवाला मानवतेची प्रेरणा तिच्यामुळेंच होत असते. जीवनांत सत्यानुभूतिसाठीं मानवता हा मानवाचा धर्म ठरतो. ह्या मानवताधर्माचें चक्र मानवीजीवनांत नीतीच्या गतीनें अखंड फिरत राहून त्याचा विकास पूर्ण होतो व त्याला पूर्णत्व प्राप्त होतें.

" भगवान बुद्ध व महात्मा गांधी ह्यांनीं मानवाला मानवता धर्माची जाणीव करून देऊन त्याचें पालन करण्याकरितां मानवाला जीवनविषयक नैतिक शिकवणूक करून दिली आहे. सुप्रसिद्ध प्रो. ना. के. भागवत, एम्. ए. ह्यांच्या संपादकत्वाखालीं सतत दहा वर्षें यशस्वीपणें चालत आलेलें 'धर्मचक्र' मासिक ह्याच उच्च व उज्वल जीवनविषयक नैतिक शिकवणुकीचा पुरस्कार व प्रसार चालू युगांत करीत आहे. मानवीजीवनाची पातळी उंचावण्याच्या दृष्टीनें संपादकांना आलेलें हें सुयश आशादायी असून त्यांच्या थोर व्यक्तिमत्वाची ती एक साक्ष आहे. धर्मसमन्वयासहि हें मासिक योग्य तो हातभार लावीत असून 'संत तुकाराम विश्वविद्यालया'ची स्थापनाहि संपादकांचे हातून झालेली आहे. हें सर्व स्तुत्य कार्य व त्यांतील सुयश संपादकांना भूषणावह आहे. त्यांची विद्वत्ता व पात्रता तर निर्विवाद आहे.

" ह्या मासिकांतील संपादकीय लिखाण हें त्या मासिकाचें एक अभिनव वैशिष्टय आहे. कोणताहि वाचक तिकडे सहज आकृष्ट झाल्यावांचून राहात नाहीं. त्यांतील चालू प्रश्नांचें व घटनांचें समालोचन समतोल; हृद्य व बुद्धिगम्य असतें. तें वाचतांना संपादकांचेबद्दल आदर वाटून एक प्रकारें आनंद होतो व त्यांचे अभ्यासूपणाबद्दल खात्री पटते.

" उच्च विचारसरणीचें मासिक आजच्या कालांत टिकणें महा कठीण गोष्ट आहे; तथापि हें कार्य इतक्या दीर्घकाल व्हावें याचें श्रेय संपादकांनाच आहे. ह्या कामीं त्यांनीं जी चिकाटी दाखविली व जे अविश्रांत परिश्रम घेतले ते खरोखरच उत्तेजन व आश्रय देण्यास पात्र आहेत.

" आजच्या युगाची खरी गरज असलेलें असें हें ' धर्मचक्र ' मासिक लोकाश्रयावर असेंच यापुढेंहि दीर्घकाल चालो व त्यासाठीं संपादकांना दीर्घायुरारोग्य व सुयश लाभो, अशी मी १५ ऑगस्टच्या सुदिनीं परमेश्वराजवळ मनःपूर्वक प्रार्थना करतों. "

## (८) श्री कृष्णचंद्र मिसर–रावेर–पूर्व खानदेश

" धर्म-चक्रा " चा अंक मिळाला. " धर्म-चक्रा " नें भौतिक वादळांच्या भयानक टक्करींना ध्येयसामर्थ्याच्या सात्विक तेजानें तोंड देऊन अकराव्या वर्षांत पदार्पण केलें, ही खरोखर दैवीघटना म्हटली पाहिजे...!

"आजच्या भूमिकाहीन विध्वंसक जग–प्रवृत्तीच्या तडाख्यांत अध्यात्म-प्रवण आत्मोन्नतीच्या ध्येयानें जगणें म्हणजे एक दिव्य आहे...!! " धर्म–चक्रा " नें आपल्या दहा वर्षांच्या तपश्चर्येत संकटांशीं झगडून जगापुढें मानवतेची जागती ज्योत पेटवून ठेवली आहे. त्या ज्योतीच्या चिर प्रकाशांत येणारा निश्चितपणें " माणूस " म्हणून जगण्यास लायक होत आहे ..!!!

"आजचा लोकशाही–पुरस्कृत हिन्दुस्थान प्रगतीच्या दिशेनें जात आहे. परन्तु नुसत्या बाह्य प्रगतीनें मानवी जीवनाचें मूल्य मापन होऊं शकत नाहीं. कारण अशा प्रकारची प्रगति अथवा स्वातंत्र्य मिळून सुद्धां ' भारत कितपत सुखी आहे ?' असा जर प्रश्न उपस्थित केला तर वरील प्रगतीचा इमला कोलमडून पडल्याखेरीज राहणार नाहीं...

"मूठभर प्रगत म्हणविणाऱ्यांच्या दिखाऊ प्रगतीवर बहुजनसमाजाची प्रगति अवलम्बून नाहीं. त्या साठीं समूळ समाज–धारणा—आध्यात्मिक बैठकीवर पुनःश्च उभारली गेली पाहिजे; म्हणजे बुद्धिच्या विकासा सोबत मनाचाही विकास व्हावयास पाहिजे..." धर्म–चक्रा "नें आपल्या दहा-वर्षांच्या कारकीर्दीत समाजास " अन्तःर्बाह्य " अशा दोन्हीं बाजूंनीं घडविण्याचा प्रयत्न केला आहे.

"भारतीय संस्कृतीचे पोकळ अभिमानी आणि तात्विक (!) दंभी पुष्कळ पाहण्यांत येतात; परंतु त्यांचें " मनांत कांहीं नि जनांत कांहीं" असें धोरण उमगलें कीं, समाजाच्या अधोगतीचें मूलस्थान सहज दृष्टोत्पत्तीस येते आणि सामाजिक भ्रष्टता कशामुळें निर्माण होत आहे ह्याची कारण मीमांसा लक्षांत येऊं शकते. " धर्म–चक्रा" नें आपल्या ध्येयाशीं एकरूप पाऊन आपल्या समाज–संस्कृती निष्ठेचा आदर्श जगासमोर सक्रिय ठेवला आहे...

"धर्म–समाज–जाती आणि पक्ष–द्वेषियांनीं मानवतेचें आसन पोखरण्याचा कुटिल प्रयत्न सांप्रतच्या काळांत झपाट्यानें सुरूं केला आहे. धर्म–धर्मान्तराचें फॅड ! हें त्या पैकींच एक आहे...ज्यांना धर्म आणि त्याचें तत्वज्ञान कळत नाहीं...ज्यांचें जीवन अस्थिर–कंपित विचार-शून्य आहे, केवळ जाति अभिनिवेशानें ते धर्म–धर्मान्तराचें खूळ उपस्थित करतात आणि आपल्या गाढ अज्ञानाचें जगासमोर प्रदर्शन करतात, त्यांच्यासाठीं " धर्म–चक्रा " नें ज्ञानाचें ज्ञानसत्र सुरू केलें आहे. असंख्यांनीं सदरच्या ज्ञान सत्रांत आपआपला भाग उचलावा...

" आतां पर्यन्त " धर्म–चक्रा"च्या निरनिराळ्या अंगोपांगाचा संक्षिप्त विचार केला. त्याच्या विविध स्वरूपाकडे पाहतां भारतीय-संस्कृतीचें हे प्रतिनिधिक मासिक आहे, असें म्हटल्या वाचून राहवत नाहीं. जनतेनें आणि सरकारनें अशा पुकाराच्या देशोद्धारक कार्याला सहकार्य देऊन त्याला चिरकाल टिकविण्याचा अट्टाहास करावा, हीच प्रभूचरणीं प्रार्थना.

" शेवटीं ज्यांच्या अविरत श्रमानें " धर्म–चक्रा "चें प्रवर्तन होत आहे त्या पू० श्री. ती. भागवतजी ह्यांना परमेश्वर दीर्घायुषी करो व "धर्म चक्रा"ची उत्तरोत्तर उन्नती होवो...... "

ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः

## (९) श्री. पु. ह. ऊर्फ काकासाहेब गद्रे. वकील—नाशिक.

"चालू महिन्याचा धर्मचक्राचा अंक पोहोंचला. अनेक खडतर प्रसंगांतून निभाऊन धर्मचक्रानें ११ व्या वर्षांत पदार्पण केलें, याबद्दल आपलें मनःपूर्वक अभिनंदन करतों. आपलें वय लक्षांत घेतां आपण ज्या उत्साहानें धर्मचक्र व श्री तुकाराम विश्वविद्यालय संघाचें कार्य करीत आहां तें पाहून तरुणांनाही मान नमवावी लागेल, यांत शंका नाहीं.

" धर्मचक्रांत बुद्ध धर्माच्या तत्त्वांचा व गांधीजींच्या विचारप्रणालीचा पुरस्कार केला जातो. बुद्धधर्माचा पाया 'सर्वं दुःखं सर्वं दुःखं' या तत्वावर अवलंबून आहे. वेदान्त तत्वज्ञान ' आनन्द ब्रह्मेति व्यजानात ' असें शिकवतें. बुद्ध धर्माला आत्मा मान्य नाहीं तर ' आत्मा वा रे श्रोतव्यः द्रष्टव्यः निदिध्यासितव्यः' अशी वेदान्त तत्वज्ञानाची शिकवणूक आहे.

कांहीं झालें तरी जैन, बुद्ध, लिंगायत हे पंथ हिंदूधर्मांतून उत्पन्न झाले आहेत. हिंदू धर्मानें तर " बौद्धावतारे " याप्रमाणें बुद्धाला अवतार म्हणून मानलें आहे. व बुद्ध धर्माच्या अभ्यासाची जरूरी आहे; कारण सामान्य जनतेची दुःखाची निवृत्ति करावयाचा मानवतावादाचा प्रसार व्हावयास पाहिजे. त्या दृष्टीनें धर्मचक्राची उपयुक्तता फार आहे.

" श्री. तुकाराम महाराजांच्या विश्वविद्यालयाचें कार्य जास्त बिकट आहे. पण यशापयशाची पर्वा न करतां ' कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन' या गीतामाऊलीच्या तत्वाचा स्वीकार करून आपण आपलें मन, बुद्धि, शरीर या कार्यास वाहिलें, हें आपणास भूषणावह आहे.

" तुकाराम महाराजांचें जीवन तसेंच आकर्षक आहे. ज्याप्रमाणें कृष्ण परमात्मा गोपींना सखा भासला, गवळी सवंगड्यांना जिवलग स्नेही वाटला, तसेंच तुकाराम महाराजांच्या जीवनाचें आहे. सर नारायण चंदावरकरांना तुकाराम महाराज एकेश्वरी मताचे दिसले, गाडगे बुवांना सामाजिक कार्याचा पुरस्कार करणारे दिसले, वारकरी तर गाथा वेदवत् मानतात. जशी आमची दृष्टी ठेवूं, तसे ते दिसतात. यांत कोणाचीच चूक नाहीं. पण एकानें एक दृष्टि ठेवली म्हणजे दुसऱ्याची दृष्टि चुकीची अतएव त्याज्य ठरविणें गैर होईल.

" या दृष्टीनें पहातां आपण ज्या दृष्टीनें ही विश्वविद्यालयाची स्थापना केली आहे व अहोरात्र यशार्थ झटतां, हें लक्षांत घेतलें म्हणजे एवढेंच म्हणतां येईल कीं, ' सत्य संकल्पाचा दाता भगवान ' तो आपले मनोरथ पूर्ण करील यांत शंकाच नाहीं.

" पत्र फार लांबलें, पण पत्रद्वारें का होईना आपली भेट झाली, हा आनंद कांहीं मला थोडा लाभला नाहीं !"

× × ×

हिन्दी अत्तदण्डसूत्र सुत्तनिपात पाली गाथा गायन :—

# प्रव्रजा–निदान

भगवान बुद्ध की प्रव्रजा का मूल रहस्य

आत्मविकार प्रचण्ड कोपभय, शासन दण्ड कठोर महान ।
कलह परस्पर लख जगजीवन, मिथ्या दम्भ विरोध समान ॥
सो सम्वेग प्राण विन्हल चित, भय कम्पन तन मन चित प्राण ।
मैं कहता हूँ अनुभव मेरा, मेरा अनुभव, बोध महान ॥ १ ॥
जग जन जीवन विकल भयातुर, आकुल व्याकुल जीवन प्राण ।
जिमि सर क्षीण मलीन नीर जल, मत्स्यन्याय संघर्ष समान ॥
एक दूसरे के दुश्मन जिमि, वैर विरोध परस्पर महान ।
सो अवलोकन कर भय मन में, अन्तःकरण भयभीत निदान ॥ २ ॥
यह व्यवहार प्रत्यक्ष देख लख, जग असार कुछ सार न ज्ञान ।
काँप रही थी दशों दिशायें, ऐसा बोध प्रतीति निदान ॥
और सुरक्षित खोज रहा था, न पता ठिकाना आश्रय स्थान ।
कोई जगह न जग में पाई, खोज निरर्थक अनुसन्धान ॥ ३ ॥
अन्तिम घड़ी निदान मृत्युपथ, मरणासन्न तथापि समान ।
कलह विरोध परस्पर लख चित, जग के प्रति वैराग्य निदान
जब मैंने देखा उर अन्तर, सो त्रिशूल कंटक सम प्राण ।
मनोविकार समान यातना, अपना अनुभव, जग पहचान ॥ ४ ॥
जिसके हृदय शल्य मद मत्सर, राग द्वेष छल कपट समान ।
विद्धविकार विकल भय संशय, विचलित दशदिशि हलचल जान ॥
विकल निदान त्रिशूल काढ़ि तब, समाधान पीड़ा चित प्राण ।
विकल प्राण मन शांत वेदना, स्थिर चित शांत समाधान ॥ ५ ॥
सो शिक्षा पद धर्म विवेचन, श्रुति स्मृति शास्त्रीय विधान ।
तिमि निदान बन्धन अवलोकन, साँट न गाँठ निदान समान ॥
मनोविकार कामना सारी, विषय विराग भोग भय भान ।
केवल एक भावना साधन, कैसे सुलभ मुक्ति निर्वाण ॥ ६ ॥
सत्यप्रिय विवेक मति मानस, अप्रगल्भ मद मान अज्ञान ।
तिमि प्रपंच से परे सजग चित, निन्दा स्तुति मुक्त निदान ॥
राग द्वेष न क्रोध कोप मन, मनोविकार काम तज ज्ञान ।
सब पापों से बचे निरन्तर, मदमात्सर्य हलाहल जान ॥ ७ ॥
जिन निर्वाण विवेक ज्ञान पथ, उत्तम पद निर्वाण महान ।
निद्रातन्द्रा आलस सब तज, विजय विराग विवेक सज्ञान ॥
सदा सजग चैतन्य आत्मा, कभी न जगचित असावधान ।
अहंकार अभिमान त्याग तप, हठ अतिमान भयंकर जान ॥ ८ ॥
अवडम्बर तज सरल जीविका, आडम्बर मिथ्या मदमान ।
प्रियअप्रिय रति रूप स्नेह तज, कभी न इच्छा लोभ निदान ॥
मनोविकार जान तज मिथ्या, स्वमत स्वमान निरर्थक जान ।
दुःसाहस से परे शांत चित, अभिलाषा तज सजग समान ॥ ९ ॥
गत अतीत स्मृति सुखदाई, सुखका साधन मान न जान ।
तिमि नवीन की नहीं कामना, रूचि इच्छा अनुराग समान ॥
तिमि विनाश लख खेद न चिन्ता, सत्य सनातन नियम विधान ।
निराधार आधार गगन सा, क्या साधन अवलम्बन निदान ॥ १० ॥

यह संसार प्रवाह लोभनद, जगजीवन सरिता अनुमान ।
तृष्णा इच्छा गृद्ध दृष्टि चित, प्रबल प्रवाह प्रवाहित जान ॥
अस्थिर चित्त विकल्प सहारा, निराधार अवलम्ब न मान ।
विषम भोग सुख काम वासना, दुस्तर दलदल पंक समान ॥ ११ ॥
इस प्रवाह से कोई मुनिजन तथा ब्राह्मण तपोधन ज्ञान ।
स्थिर चित्त ठहर सकता है, भले प्रवाह प्रचण्ड महान ॥
परित्याग सब शेष अकिञ्चन, पार तीर तट विकट समान ॥
सोई संज्ञा जान शान्त चित, सोई शान्ति स्वरूप निदान ॥ १२ ॥
सो विवेक विज्ञान बोध जिन, धर्म स्वरूप विविध गति ज्ञान ।
निस्पृह आप निदान धर्म लख, सोई चतुर खरा विद्वान ॥
सो वेदज्ञ वेद पारगमुनि, वेद वेदना ज्ञान महान ।
तिन जगजीवन सदाचार प्रिय, जग कुछ स्पृहा न इच्छा जान ॥ १३ ॥
जगजीवन सहवास आस तज, दुस्तर कठिन महान समान ।
विषयभोग अनुराग रागरति, कामोपभोग उत्तीर्ण निदान ॥
सो प्रवाह से बचा पार जग, सब बन्धन क्षय लय अवसान ।
सो अशोकमय शोकं न चिन्ता, मोह न माया लोभ न जान ॥ १४ ॥
जो अतीत अवशेष अन्तकर, शोषण कर अवशेष समान ।
तिमि अवशेष न बाकी रखना, शेष न बाकी भविष्य निदान ॥
वर्तमान से विलग न सञ्चय, मनोकामना बन्धन मान ।
सो उपशान्त प्राण संयत चित, विचरण शील न जग भय जान ॥१५॥
नाम रूप आधार सर्वथा, जो कुछ जग अस्तीत्व समान ।
ममता माया नहीं वेदना, अपना समझ न अपना जान ॥
तिमि अभाव वश शोक न चिन्ता, न क्षय भय शेष अज्ञान ।
सो जगजीवन अमृत पद तिमि, जीर्ण न जीवन अमृत ज्ञान ॥ १६ ॥
जिसे न किञ्चित किसी वस्तु की, चाह नहीं कामना निदान ।
अपना और पराया जीसको, न मेरा तेरा भाव समान ॥
जिसे न कोई मोह कामना, नहीं वेदना अपना मान ।
यह मेरी प्रिय वस्तु नष्ट तिमि शोक कदापि न चिन्ता मान ॥ १७ ॥
यदि कोई यह प्रश्न करे क्या लक्षण निर्भय मनुष्य निदान ।
मेरा कहना कोमल चित हो, लोभ मोह मद मान न जान ॥
अभय निरापद कम्प न भय तिन, जग जीवन समान सज्ञान ।
यथा चतुर्विध गुण भूषणमणि, सो भय कम्प न पार समान ॥ १८ ॥
जिन विवेक विज्ञान अभय पद, निर्भय अभय निरापद जान ।
मनोविकार वासना तिनकी, शेष न कोई कर्म निदान ॥
सब कर्मों से विरत विमल मन, कर्म विवेक निदान समान ।
सो सर्वत्र निरापद भयक्षय, क्षेम कुशल मंगल कल्याण ॥ १९ ॥
सो मुनि स्वयं कदापि न अपनी, गणना श्रेष्ठ कनिष्ठ समान ।
वाद विवाद वीत मत्सर सो, शांत सुशील विमल मन प्राण ॥
ग्रहण त्याग से परे स्वयं तिन, पावन जीवन पुष्प महान ।
भगवत वचन मनोहर वाणी, स्वस्तिसत्य मंगल कल्याण ॥ २० ॥

—काशीनाथ मालवी

# संस्कृति और साहित्य में श्री राधा

लेखक—प्रो. माधवाचार्य

दशरथ,-कौशिल्या, राम-सीता, तारा-बालि, मन्दोदरी-रावण और सत्य हरिश्चंद्र तथा शैव्या के समान श्रीकृष्ण और राधा भी आर्य संस्कृति के वास्तविक अंग हैं।

यह एक नियम की बात है-चाहे किसी भी देश और जाति का साहित्य क्यों न हो, वह वहां की संस्कृति और सामयिक दशा के साथ अवश्य सम्बन्ध रखेगा। यही एक कारण है कि-"जिसे जिस संस्कृति का जैसा ज्ञान होता है वह उस साहित्य को उतना ही समझता है।" कोई भी साहित्य क्यों न हो वह वर्ण्य और वर्णन पर ही अवलम्ब रखता है। वर्णन करती वार कवि "उपमा" संस्कृति के ही प्रसिद्ध एवम् मनोहर पदार्थों की दिया करता है। क्योंकि उसके सामने वही आदर्श होता है। कोई भी कवि अपने आदर्श को छोडकर बाहर नहीं जा सकता।

इतना ही नहीं करत कोई भी साहित्य, संस्कृति के श्रद्धेय अनेक ज्ञान और चरित्रों को अपने सांचें में ढालकर उन्हें सौन्दर्य और सरसता प्रदान करता है। इसी कारण साहित्य का साहित्यपन सार्थक होता है। आर्य संस्कृति के मूल श्रोत वेद हैं। वेद के पदार्थों का विवरण और विस्तार, ब्राह्मण ग्रन्थोंने किया है। कल्प और श्रौत सूत्रों ने इन्हें विधि का रुप दे दिया है। स्मृतिकारों ने इनमें समाज संचालन के नियम देखे हैं दर्शनों ने इनसे अध्यात्मिक विषयों का संग्रह कर अपने कलेवर बनाये हैं पुराण और इतिहासों ने इनकी बिखरी कथाओं को एकत्र कर लड़ी जोड़ी है।

सत्यवादी महाराजा हरिश्चन्द्र, युवराज रोहिताश्व, शुनःशेप, महारानी शैव्या, महर्षि वसिष्ठ और विश्वामित्र, ऋग्वेद और एतरेय ब्राह्मण में आये। इनके इतस्तत: बिखरे हुए वैदिक वृत्तोंको भागवतादि पुराणों ने एकत्रित कर कथा का रुप दे दिया। साहित्य ने इससे चण्डकौशिक नाटक बनाया इसे भारतेन्दु बाबू हरिश्चंद्रजी ने नाटक के रुप में अनुवादित किया सत्यवादी महाराजा हरिश्चन्द्र युवराज रोहिताश्व ऋषि कुमार शुनश्शेप महारानी शैव्या, महर्षि वसिष्ठ, विश्वामित्र आदिक, ऋग्वेद, एतरेय ब्राह्मण, और यजुर्वेद आदिक वैदिक ग्रन्थों में भी आये हें।

ऐसे इतस्तत: बिखरे हुए वैदिक वृत्तों को भागवतादिक पुराणों ने एकत्रित कर ही, कथाओं का रूप दे दिया है। साहित्यकोंने इन्हें अपने रंग में रंग कर उन पर नाटकों और काव्यों का निर्माण किया है।

यह बात नहीं है कि—वेदों की उर्वशी भागवत की उर्वशी से भिन्न हो। न पुरूरवा ही भिन्न वस्तु है। दोनों एक हैं। वेदों का प्रसंग, सरल होकर पुराणों में आया। यहीं से संस्कृत काव्यों और नाटकों में आया यहीं से फिर हिन्दी आदिक भाषाओं के काव्यों और नाटकों में रखा गया।

यदि हम व्यापक दृष्टि से देखें तो यह अच्छी तरह निरख सकते हैं कि, एक ही पदार्थ वेदोंसे लेकर हिन्दी के काव्यों और नाटकों तक में उत्तरोत्तर सरलता के साथ आता चला गया है। यही है आर्य संस्कृति की अखण्डता जो कि-वेद की भाषा से लेकर पुराणों और दैनिक व्यवहारोंकी भाषाओं तक एक ही चली गई है।

अन्य सांस्कृतिक पदार्थों के समान ही व्रजेश्वरी श्री राधिका भी हैं।

राधा-व्रज साहित्य की देन नहीं है अपितु राधा ने व्रज साहित्य में आकर उसे परम चित्ताकर्षक और सरस बना दिया है। इस साहित्य को श्री राधा नाम की एक सर्वशक्ति समन्विता सर्वगुण संपन्न ऐसी नायिका मिल गयी है, जिसमें उल्लेखालंकार के समान सारा नायिका भेद गतार्थ हो गया है। व्रज साहित्य की राधा, सारी नायिकाओं का साहित्यिक रुप है।

राधातापिनी उपंनिषद में लिखा है—-

" येयं राधा यश्च कृष्णो रसाब्धिर्देहश्चैकः क्रीडनार्थं द्विधाऽभूत्" रस के अनन्त सागर भगवान् श्री कृष्ण और रासेश्वरी श्रीराधा वास्तव में दोनों एक हैं। क्रीडा के लिए दो हो गये हैं।

ब्रह्मवैवर्तपुराण ने कहा है कि- " वैकुण्ठ से ५० करोड़ योजन ऊपर कृष्ण--भगवानने अपनी इच्छा से जो लोकनिर्मित किया इस गो.लोक में, कृष्ण भगवान की इच्छा हुई कि मैं 'रमण करुं।' उसी समय आधे शरीर से राधा प्रकट हो गई।

सामवेद की छान्दोग्य उपनिषद् और यजुर्वेद की बृहदारण्य उपनिषद में लिखा है कि-" एकाकी न रमते तस्माद् आत्मानं द्विधाऽकरोत्" एकाकी रमण नहीं कर सकता इस कारण स्वेच्छामय शरीरी भगवान ने अपने को स्त्री और पुरुष दो रुपों में विभक्त कर लिया।

भागवत भी "स्वेच्छामयस्य न तु भूतमयस्य" कहकर कृष्ण का स्वेच्छामय विग्रह मानता है, भूतमय नहीं मानता।

निर्गुणवादी शंकर भी इस सिद्धान्त से पीछे नहीं हटे हैं। उन्होंने भी स्थानादिव्यपदेशाच्च वे ब्र. सू.-१-२-१४ पर कहा है कि निर्गुण, नाम रुप में रहने वाले गुणों से सगुण हो जाता है इस कारण उपनिषदों का सगुण उपासना का विधान भी सार्थक होता है।

३-२-१२ के भाष्य में आप कहते हैं कि सविशेषत्वमपि ब्रह्मणोऽभ्युपगन्तव्यम्-ब्रह्मको निर्विशेष के समान, सविशेष भी समझना चाहिए।

इसके साथ ही आपने यह भी कहा है कि सर्वगतस्यापि ब्रह्मणः उपलक्ष्यर्थं स्थानविशेषो न विरुध्यते शालग्राम इव विष्णोः—

जिस प्रकार सर्वव्यापक विष्णु की संनिधि, शालग्राम शिला में होती

है, उसी प्रकार सर्वव्यापकब्रह्म भी उपलब्धि के लिए वैकुण्ठ गोलोक आदि स्थानों में हो सकता है।

भगवान् कृष्ण का गोलोक है वहां वे राधाजी के साथ सदा रास करते हैं। यह बात शंकराचार्यजी के मत से भी विरुद्ध नहीं होती। शाल-ग्राम के दृष्टान्त से इनकी सगुण मूर्तिपूजा की प्रीति भी ध्वनित होती है। भेदाभेदवादी आचार्य निम्बार्काचार्य के यहां, भगवान कृष्ण और राधा की रासलीला के आनन्द का उपभोग गोलोक में जाकर पा लेने का नाम ही, मोक्ष है। यही बात इन्होंने ४-४-१३ के वेदान्त पारिजात सौरभ में कह दी है कि "भगवान की लीला के अनुसार दिये गये दिव्य शरीर से मुक्त, भगवान की रासलीला का अनुभव लेता है।"

ब्रह्मवैवर्तपुराण ने कृष्ण के देह से सकल गोप तथा राधा के शरीर से सारी गोपियों की उत्पत्ति मानी है। वहां भी नित्य रास होता रहता है। यहां के रास का तो हमारे मस्तसन्त कबीर ने अनुभव किया और लिखा है कि"

"सगुण ब्रह्म माते वृन्दावन अजहुन छूटि खुमारी।" ठीक है राधाकृष्ण की रासलीला का अनुभव आज भी कबीर सरीखे मस्त ही ले सकते हैं। दूसरे रास के रसको क्या जाने। निम्बार्क सम्प्रदाय निम्बार्क के समय को ५ हजार वर्ष से भी अधिक प्राचीन मानता है। ऐसा ही उनके भाष्य की भूमिका में लिखा मिलता है। यह पुस्तक विद्याविलास प्रेस, बनारस से प्रकाशित है। इन्होंने अपनी छोटी सी पुस्तक वेदान्त काम धेनु में कृष्ण को परम तत्व मानकर राधा के विषय में कहा है कि।

अंगे तु वामे वृषभानुजां मुदा विराजमानामनुरूपसौभगाम्
सखीसहस्रैः परिसेवितां सदा, स्मरेम देवीं सकलेष्टकामदाम्।"

कृष्ण के वामांग में कृष्ण के समान सुन्दर श्री राधा विराजमान है। सहस्रों सखियां उनकी सेवा में सदा बनी रहती हैं। यही भक्त जनों की सारी कामनाएं पूरी करती है। अतः मैं सदा इसी का स्मरण करता हूं। ब्रह्मवैवर्तपुराण ने भी यही कहा है कि–

आदौ राधां समुच्चार्य पश्चात् कृष्णं विदुर्बुधाः–उपासना का मर्म समझने वाले जन राधे राधे प्रथम रटते हैं। पीछे राधाकी कृपा से कृष्ण के वास्तविक स्वरूप को जानते हैं।

जिस प्रकार श्री संप्रदाय में श्री की कृपा से मोक्ष मिलता है उसी प्रकार निम्बार्क के यहां राधा की कृपा कटाक्ष से ही जीव भव पार कर सकता है, अन्यथा नहीं कर सकता, यही कारण है कि प्रत्येक निम्बार्क "मुनीन्द्रवृन्दवन्दिते ! त्रिलोकशोकहारिणि।"

कदा करिष्यसीह मां, कृपा–कटाक्ष–भाजनम्।

मुनिमण्डलपूजितपादपद्में ! त्रिलोकशोकनाशनक्षमें ! भगवतिराधे ! मुझे अपने कृपा कटाक्ष का भाजन कब कर लोगी।

यह कहता हुआ राधा से राधा के कृपा कटाक्ष की याचना करता रहता है। तब कहीं राधा की कभी एवं किसी पर कृपा होती है।

पुराण ने भी उपदेश दिया है कि—कृष्णप्रेममयीं शक्तिं प्राणाधिष्ठा-तृदेवताम् निर्गुणां भज राधां त्वं प्रदात्रीं सर्वसंपदाम्।"

राधा का भजन कर, इसी की उपासना से मुझे भोग और मोक्ष दोनों मिल जायेंगे। क्योंकि राधा कृष्ण की प्रेममयी शक्ति है एवम् प्राणों की अधिष्ठात्री देवी है।

जब नित्य वृन्दावन के प्रतीक वृन्दावन धाम में श्री राम भक्त सन्त तुलसीदास जी पधारे थे तो उन्हें "आक, ढाक और कैर" सभी राधे ! राधे ! ! कहते मिले थे।

स्कन्ध पुराण तो राधा के रमण होने के कारण ही कृष्ण को आत्माराम कहता है। आत्माराम श्री कृष्ण की सच्ची आराधना श्री राधा जी ही करती है। तभी कृष्ण को अखण्ड आनन्दरूपता मिलती है। यही बात सामरहस्योपनिषद् में लिखी है कि—" अनादिरयं पुरुष एक एवं अस्ति, तदेकं रुपं द्विधा विधाय समाराधनतत्परोऽभूत्, तस्मात् तां राधां रसिकानन्दां वेदविदो विदन्ति।"

अनादि पुरुष एक ही कृष्ण भगवान हैं। उन्होंने अपने दो रूप किये। एक रूप से वे राधा तथा दूसरे से कृष्ण हुए। इन दोनों में राधा रूप से वे अपनी आराधना आप करने लगे।

अपने आत्मा के प्रथम स्वरूप श्री कृष्ण की अनन्या आराधिका श्री राधा हुई यही कारण है कि वेदों के रहस्य के ज्ञाता लोग, राधा को रसिकों के आनन्द की अटूट निधि मानते हैं।

रासपंचाध्यायी में जिस गोपी के साथ लेकर अन्तर्धान होने का प्रकरण आता है वह श्री राधा के सिवा कोई दूसरी नहीं हो सकती। क्योंकि राधा के लिए "वधू" शब्द का प्रयोग करके भागवतकार ने उसे अन्य गोपियों से भिन्न दिखा दिया है।

श्रीका नाम न लेकर "अनयाराधितो नूनम" इस पद्य से राधा का अर्थ आराधिका करते हुए; कृष्ण की राधा द्वारा आराधित या सिद्ध बताया है। राधा कृष्ण की साधिका तथा कृष्ण राधा को सिद्ध थे। इसमें किसी को भी सन्देह नहीं हो सकता। इस प्रकार भागवत भी साम रहस्योपनिषद् का पूरा विवरण कर देती है। मेरा तो यह विचार है कि उपनिषद् ने राधा के नाम की निरुक्ति की है। भागवत ने उसका विवरण किया है। सूरदास जी तथा अष्टछाप के सन्तों ने भागवत की रासपंचा-ध्यायी को अपनी अपनी भाषा में कहकर गाया है।

"कृष्ण राधा जी को लेकर गये" इस बात का ब्रह्मवैवर्त ने तो स्पष्ट उल्लेख किया है। दूसरे शब्दों में कहूँ तो यह कह सकता हूँ कि "ब्रह्म-वैवर्त पुराण" राधा कृष्ण का ही पुराण है। इसमें आदि से अन्त तक सब विषय राधा कृष्ण का ही है। अन्य बातें तो गौण हैं। महर्षि गर्गजी ने नन्दजी को राधा कृष्ण के विषय में सब कुछ बता दिया था। यह बात पुराणों में ही नहीं, अपितु व्याकरण में भी ध्वनित होती है।

१-४-३९ सूत्र पर "कृष्णाय राध्यति-ईक्षते वा" इसका विवरण भी किया जाता है कि "पृष्टोगर्गः शुभाशुभं पर्यालोचयति" इत्यर्थः। राधा का विवाह भी ब्रह्माजी ने कराया है यह विषय मैंने व. वै. में देखा है। इसके अतिरिक्त, वह सारा राधा का विषय मैंने ब्रह्मवैवर्त में देखा है जो कि ब्रज भाषा में आया है। देव का राधाकृष्ण मय रहस्यवाद का मूल भी इसी पुराण में है। द्रविण दिव्य प्रबन्धों में भी मैं राधा एवम् राधा की आराधना का अनुकरण देखता हूँ। ये प्रबन्ध आज के नहीं किन्तु इनका समय आज से ५००० वर्ष पहिला है।

विष्णु सूरि के घर में भू देवी का गोदाम्बा के रूप में अवतार होता है। ये युवती होने पर अपने पिता से पूछती हैं कि-कुलकन्या भगवान को पति कैसे बना सकती है ? इसका विष्णु चित्त यही उत्तर देते हैं कि "राधा ने मार्गशीर्ष में कात्यायनीका व्रतकर, भगवान को प्राप्त करलिया

था। तू भी यदि भगवान को पति चाहती है तो मार्गशीर्ष का व्रत कर। गोदा ने स्वयम् राधा का भाव धारण कर तीस द्रविड़ गाथाओं का प्रथम प्रबन्ध भी बनाया फिर १४० गाथाएँ भी इन्होंने इसी प्रकार की बनायीं। ये गाथायें आज भी विद्यमान हैं। इनमें इनका राधा भाव ध्वनित है। सारे भारत के सभी श्री वैष्णव मंदिरों में हजारों वर्ष पहिले से गोदाम्बा जी की सन्निधियां बनी हुई हैं। इनमें बड़े ठाट-बाट के साथ उनकी नित्य पूजा-अर्चा होती है।

राधाकृष्ण पर अनेकों संस्कृत काव्य बने हुए हैं। गीत गोविन्दकार जयदेव की पत्नी को तो रसिक लोग राधा का अवतार मानते हैं। मीरा और जयावती को भी भगवती राधा के अवतारों में गिना करते हैं। आज मद्रास प्रांत में मीरा को राधा मानकर उपासना करने वाला भी एक संप्रदाय विद्यमान है।

उद्धव के संदेश, माधुर्य के आकर्षण को ज्ञान में नहीं बदल सके। उसे व्रज में भ्रमर गीत की गायिका के रूप में स्वयम् राधा ही उसे भ्रमर से बातें करती मिली थीं। इनके चमत्कार को देखकर उद्धव स्वयम् ही चरण-रज होने की इच्छा कर बैठा था।

कृष्ण, भारत के तत्वज्ञ, राजनैतिक, सर्वेश और योगीराज के रुप में आने पर भी अन्त में कुरुक्षेत्र में सूर्य ग्रहण के अवसर पर एकान्त में स्वयम् गोपियों से मिले थे। यहाँ कृष्ण ने प्रथम गोपियों को अपना माधुर्य और सौजन्य का अनन्यानन्द चखाया फिर ज्ञान, तब वे कहीं ज्ञानोन्मुख हुईं तब कहीं उनके जीवमय कोष का अन्त हुआ। यह बात भा. १० स्क. ८३ अध्याय के ४८ वें श्लोक में कहीं है कि—

"अध्यात्मशिक्षया गोप्य एवं कृष्णेन शिक्षिताः, तदनुस्मरणध्वस्त जीवकोशास्तमध्यगन्।"

इस प्रकार कृष्ण ने गोपियों को अध्यात्मशिक्षा दी। यह उनके हृदय पटल पर अंकित हो गई। समय समय स्वर्णाक्षरों में चमकी। इसी से गोपियों के जीव कोष का अन्त हो गया। फिर क्या था ये स्वयम् कृष्ण को प्राप्त हो गयीं।

रही राधा की बात-पानी में कूदने का एक बहाना करके फिर वे कभी भक्त जनों को रास के सिवा अन्यत्र न दीखीं।

या इनका पूजा में अस्तित्व मिला। गोपाल सहस्र नाम ने कह दिया कि गौर तेज राधा के विना यदि कोई श्याम तेज श्री कृष्ण को पूजेगा वह पातकी होगा। शंकर आदिक सभी धर्माचार्यों ने इसपर अपने भाष्य रचकर अपनी स्वीकृति की मुद्रा लगादी।

इन सारी बातों से प्रतीत होता है कि राधा हिन्दू संस्कृति की अमर चीज हैं। यहीं से संस्कृत हिन्दी द्रविद और प्रान्तीय भाषाओं के साहित्य में आयीं। किसी साहित्य ने इन्हें कल्पित नहीं किया है। जबतक आर्य संस्कृति जीवित है राधा अमर रहेंगी। न ये सहस्र वर्ष की वस्तु हैं न कलकी, ये आर्य्य साहित्य परंपरा से हिन्दी में आयीं हैं। जबतक माधुर्य भक्ति है राधाजी का आचार्यत्व अखण्डित रहेगा।

यह वस्तु हिन्दी के संशोधकों की समझ में उस समय पूर्ण रूप से आयेगी जब के वे अपने इस कार्य्य में अंग्रेजी के माध्यम को छोड़ संस्कृत का सहारा लेंगे।

ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः

# "भक्त कवियों की लोकहित की भावना"

(प्रो० अमरनाथ दुबे एम. ए., सा. र.)

प्रश्न उठता है कि हिन्दी साहित्य के प्रमुख भक्त कवियों ने समाज एवं साहित्य के निर्माण में कहाँ तक सहयोग दिया है। वैसे तो भक्तों की एक धारा ही अनवरत गति से जनजीवन के प्रारम्भ से लेकर अबतक बहती चली आ रही है, पर स्वान्तःसुखाय–लोक हिताय–अपनी लेखनी उठानेवाले, साहित्य–समाजसेवी कुछ भक्त साहित्यकार ऐसे भी हुए हैं, जिन्होंने साहित्य और समाज की नीव को सुदृढ़ बनाकर, तीर्थराज प्रयाग एवं काशी की ही भाँति उसे पूत भावनाओं से समन्वित कर मुक्ति देने का निरन्तर प्रयत्न किया है। हिन्दी साहित्य का भक्तिकाल तो ऐसे प्रातः स्मरणीय साहित्य-कारों का युग ही रहा है। इस परम्परा की कड़ी के रुपमें जहाँ एक ओर हिन्दू भक्त आते हैं वहीं पर दूसरी ओर मुसलमान भक्त भी उन्हें सहयोग देते दिखाई देते हैं। ऐसे प्रमुख साहित्यकारों के रूपमें तुलसी, सूर, कबीर एवं जायसी का नाम गौरव के साथ लिया जाता है। हिन्दी साहित्य रूपी भवन के ये चारों स्तम्भ हैं, यह न होते तो इनके बिना यह निर्माण अधूरा ही रह जाता।

यों तो वेदों में भी भक्ति है पर हिन्दीमें भक्ति की दो प्रमुखधारायें 'सगुण' एवं 'निर्गुण' के नाम से विक्रम की १५ वीं शताब्दी के अन्तिम भाग में प्रकट प्रवाहित हो चली। सगुण काव्यमें भी दो शाखाएं फूटीं जिनमें प्रथम थी 'रामभक्तिशाखा' और द्वितीय थी कृष्णभक्ति शाखा। कालक्रम के अनुसार निर्गुण धारा का आविर्भाव सर्वप्रथम हुआ। भक्तिकाल के प्रारम्भिक उत्थान में भी कबीर की ही रचनाएँ पहले पहले विस्तृत रूप में प्राप्त होती हैं। इतना ही नहीं कबीरदास निर्गुणधारा की ज्ञानाश्रयी शाखाके सर्वश्रेष्ठ कवि माने जाते हैं। निर्गुण धारा की दूसरी शाखा है, 'प्रेममार्गी सूफी शाखा' जिसमें कुतुबन, मंझन, जायसी, उसमान, शेखनबी, नूरमहम्मद आदि कवियों ने हिन्दी साहित्य के भंडार को भरा। किन्तु इन सम्पूर्ण सूफी संत कवियों में जायसी की ही देन, साहित्य एवं समाज दोनों की दृष्टि से विशेष महत्वपूर्ण है। ज्ञानाश्रयी शाखा के अन्य कवियों में सुन्दर दास साहित्यिक दृष्टि से बहुत ऊपर उठे हुए हैं। किन्तु अपने मत-सिद्धान्त, पंथ के प्रचार एवं प्रसार की दृष्टिसे, जिन विचारोंका विशेष सामाजिक महत्व हैं वे हैं नानक पंथ के प्रणेता गुरुनानक, एवं दादू पंथ के आराध्य दादू दयाल। 'सबके दाता राम' में अखंड विश्वास रखने वाले 'मलूक दास' की भी तो अपनी कुछ व्यक्तिगत विशेषताएं थीं ही।

भगवान राम के अवतार का आधार लेकर चलनेवाले भक्तिमार्ग के प्रकृत पक्ष के पूर्ण विकास का दर्शन हमें तुलसी की रामभक्ति में प्राप्त होता है। तुलसी की इसी प्रतिभाके कारण इस धाराके अन्य कवि जैसे नाभादास, स्वामी अग्रदास, हृदय राम आदि अस्तित्व हीन हो उठे हैं। कृष्ण भक्ति शाखा की परम्परा इतनी पूर्ण एवं गहरी नहीं तो इससे विस्तृत अवश्य है, जिसमें सूरके इकतारे का स्वर सबसे ऊँचा रहा है। आचार्य रामचन्द्र शुक्ल ने भक्ति की इसी सुरीली तान की चर्चा करते हुए कहा है:—"जयदेव की देववाणी की स्निग्ध पियूषधारा, जो काल की कठोरता में दब गई थी, अवकाश पातेही मिथिला की अमराइयों में विद्यापति केको किल–कंठसे प्रगट हुई और ब्रजके करील–कुंजों में फैल, मुरझाये मनों को सीचने लगी। आचार्यों की छाप लगी हुई आठ वीणाएँ एक ही साथ कृष्ण का कीर्तन करने को उठीं जिनमें सबसे ऊंची, सुरीली और मधुर झंकार अंधे कवि सूरकी वीणा की थी"। यह कहना अब आवश्यक नहीं कि सूरदास कृष्णभक्ति शाखा के सर्वश्रेष्ठ कवि हैं, जिन्होंने अपने सवा लाख पदों में कृष्ण भक्तिका सागर उड़ेल दिया है। सूरदास के समकालीन एवं पूर्व भी कृष्णभक्ति की एक सशक्त परम्परा पाई जाती है। इन कवियों में श्री बल्लामाचार्य, नन्ददास, कृष्णदास, परमानन्ददास, कुम्भनदास, छीतस्वामी, गोविन्दस्वामी, (अष्टछापके कवि) हितहरिवंश एवं अन्य दूसरे कवि तथा कवयित्री जैसे मीराबाई और रसखानि आदि का नाम विशेष उल्लेखनीय है। कुछ अन्य फुटकर कवियों का भी इस भक्ति धारा में सहयोग रहा है, जिसमें नरोत्तमदास, केशवदास, रहीम, सेनापति, आदि प्रमुख हैं।

कबीर का युग वह पुरा था जहाँ विभिन्न विश्रृंखल प्रवृत्तियों का क्षेत्रीय प्रसार जड़ पकड़ता चला जा रहा था। विभिन्न धर्मों की तो बात ही और है एक ही धर्म में न जाने कितने मत मतान्तर प्रचलित हो चले थे। कबीरदास अपने युग की विभिन्न परिस्थितियों के एक ऐसे ही मिलन-बिन्दु पर खड़े थे। "परिस्थितियों के इस हिरण्यकश्यप को कोई नृसिंह जैसा कबीर ही मार सकता था।" आचार्य हजारी प्रसाद द्विवेदी के शब्दों में यह मिलन बिन्दु वहाँ था "जहाँ से एक ओर हिन्दुत्व निकल जाता है और दूसरी ओर मुसलमानपन, जहाँ एक ओर ज्ञान निकल जाता है दूसरी ओर अशिक्षा, जहाँ एक ओर योग मार्ग निकल जाता है दूसरी ओर भक्तिमार्ग, जहाँ से एक ओर निर्गुण भावना निकल जाती है दूसरी ओर सगुण साधना–उसी प्रशस्त चौराहे पर वे खड़े थे।" इस प्रकार कबीर समाज में पाए जाने वालीं, परस्पर विरुद्ध दिशाओं को गए, दोनों के मार्गों के गुण दोषों को देख सकते थे, और उन्होंने देखा भी। कबीर के साहित्य में प्राप्त कटूक्तियां एवं व्यंग इसी के परिणाम माने जा सकते हैं। कबीर सम्भवतः 'स्पष्टवक्ता कबीर' इसी कारण बने भी। समाज को अन्दर ही अन्दर खोखला बना देने वाले वाह्याडंबरने ही सम्भवतः उन्हें वाणी दी। इसी शक्ति के आधार पर उन्होंने धर्म के ठेकेदार उन पंडितों और मुल्लाओं को ललकारा भी जिन्होंने धर्म को अपनी पैतृक-सम्पत्ति बना ली थी। कबीर का साहित्यिक महत्व चाहे भले ही उतना न हो पर सामाजिक चेतना को जगाने और ढ़ोंग को अनावृत्त कर उसके मूल रुपको जनता के सन्मुख प्रस्तुत करने में कबीर का बहुत बड़ा हाथ

था। मौलवियों को जहाँ वे यह कहकर ललकारते हैं कि:—

" ऊँचे चढ़ि कैं बाँग दें, क्या बहरा भया खुदाय ?

और " दिन भर रोजा रहत हैं, रात हनत हैं जाय।
यह तो खून वह बन्दगी, कैसे खुशी खुदाय॥ "

वहीं पर ढोंगी पंडित भी उनकी तीक्ष्ण दृष्टिसे नहीं बच पाते।

" माला फेरत युगभगा, गया न मन का फेर।
करका मनका डारि के, मनका मनका फेर॥ " और भी

" माला तो कर में फिरै, जीभ फिरै मुख माहिं।
मनुवाँ तो चहुँदिसि फिरै, यह तो सुमिरन नाहिं॥ "

"मन ना रँगाए, रँगाए जोगी कपरा।" मूर्तिपूजकों को भी नहीं छोड़ा। " दुनियाँ ऐसी बावरी, पत्थर पूजन जाय। "

कबीर ईश्वर के प्रेमको शास्त्रों एवं धार्मिक ग्रन्थोंके अध्ययन से बढ़कर मानते थे। " पोथी पढ़ि पढ़ि जग मुवा, पंडित भवा न कोय।
ढ़ाई अक्षर प्रेम का पढ़ै तो पंडित होव॥ "

गंगा-स्नान के बहाने इधर उधर के अनेक स्थानों की भ्रमणार्थिनी 'कुलबोरनी' का दृष्य भी उनकी आंखों में छिप न सका जिसने पुण्य कमाना तो अलग रहा, घर की भी (पुण्यकी) पूँजी गँवा दी।

" चली है कुल बोरनी गंगा नहाए।
सतुवा पिसाइन, गठरी बनाइन, खसम के माथें दीन्ह धराय।
पाँच पचीस के धक्का खाइन, घरहुँक पूजी दीन्ह गवाय॥ "

अपनी सधुक्कडी भाषा में साखी, सबद दोहे और पदों की अमूल्य निधि, साहित्य को प्रदान कर कबीर ने समाज को भी जिस आडम्बर और ढोंग से दूर रखा इसके लिए जनजीवन उनका सतत ऋणी रहेगा। खेद इस बात का है कि बाह्याडम्बर के सिद्धान्तों के विरोध पर चलनेवाला कबीर पंथ, स्वयं इससे अलिप्त न रह सका। केवल इतना ही नहीं बीजक में पाये जाने वाले पदों में दातुन करने, स्नान आदि नित्य कर्म करने, चूल्हा जलाने, सोने, बाहर जाने आदि सभी वस्तुओं के लिए मन्त्र का विधान बताया गया है। इस प्रकार कबीर-पंथी साधुओं ने स्वयं ही कबीर के मूल सिद्धान्तों की दाह-क्रिया कर डाली। वस्तुतः कबीर के अक्खड़पन तथा फक्कडपन ने न जाने कितनी कुरीतियों का अनावरण कर उसकी सत्यता को सामने ला खड़ा किया था। साहित्य के साथ साथ समाज के लिए भी कबीर के व्यक्तित्व की महान् देन चिरस्मरणीय बनी रहेगी।

(क्रमशः)

× × ×

*World Religion Supplement*
*(From Kherwadi Parishramalaya)*

# 70TH BIRTH DAY OF THE LATE B. G. KHER

The 70th birth-day of the late Shri B. G. Kher was celebrated at the Parishramalaya, Kherwadi on Sunday the 24th August 1958. After prayers from all important religions, Shri Kashinath Malaviya gave a pravachan in Hindi on the life and work of the late Shri Balasaheb Kher. Shri Malaviya narrated how early in his life Shri Balasaheb came under the influence of Lokamanya Tilak and G. K. Gokhale and how their influence channelled his life in the direction of self-less service. Later he worked as personal Secretary to Justice Beaman and learnt from him the great lessons of life—a sympathetic outlook, tolerance, generosity and self-effacement in his dealings with his fellowmen. In 1918 he started practice as a Solicitor. When Mahatma Gandhi started the Civil Disobedience Movement he threw himself heart and soul into it and underwent imprisonment.

In 1928 he first visited the slum locality of Kherwadi east of Khar. It was then a small Tanners' colony, the inhabitants being poor tanners. From his own funds supplemented later by donations from the public, he built a primary school and a free dispensary. Along with these were started a Library and a Reading Room, adult education classes and village cleaning. Throughout the rest of his life Kherwadi and its problems were always in his thoughts, wherever he was.

In the elections of 1937 he topped the poll in his constituency and was elected as the Chief Minister (then known as Prime Minister) of Bombay. About the end of 1939 the Congress withdrew all the Ministries as a protest against the war policy of the British rulers of India and thereafter came the 'Quit India' movement of 1942. When after the war there were elections in 1946 which put the Congress Ministries back in office, Balasaheb was again asked to become the Chief Minister of Bombay. In 1947 India gained freedom and the Republic of India was born. His Ministry rightly earned an all-India reputation as the cleanest and most progressive in India and Bombay became a fast developing Welfare State. As a Chief Minister he was an ex-officio member of the Constituent Assembly and took keen interest in the drafting of the Constitution. In 1952 he declined to stand for election in Bombay. In the same year he was appointed as India's High Commissioner in U. K. He returned to India in 1954 on leave, due to Shrimati Kher's illness.

In recognition of his ability, character and distinguished service to the Country, the President conferred on him in 1954 the honour of "Padma Vibhushan." In 1955 he was appointed Chairman of the Official Language Commission whose report was submitted to the President on 1st August 1956.

After his return to India in 1954, he devoted his time entirely to social welfare work. In addition to the work at Kherwadi to which he devoted all his well-earned leisure and savings, he took interest in Adivasi welfare, Balkan-ji-Bari, Children's films etc. In 1956 he was unanimously elected by the Gandhi Smarak Nidhi Trustees as Chairman of the Nidhi. He dedicated himself to the work with single-minded devotion in utter disregard of his fast-failing health. He died in harness as Chairman of the Nidhi on 8th March 1957-deeply mourned by the leaders and people all over the country.

Shri Malaviya said that the work at Kherwadi was a great heritage left behind us by Shri Balasaheb and it was our duty to continue the work and fulfil his dream of converting the whole slum area east of Khar railway station into a garden suburb like the model Khar suburb west of Khar.

After the pravachan, sweets were distributed to the large number of children and others present. With the singing of bhajans the celebration came to a close.

× × ×

## INDIVIDUAL FREEDOM AND IDEALS OF HAPPINESS

By

Lachman Singh,
Bombay-24.

The private life of the citizens is none of the state's business. All that the state requires is that the citizens should not injure one another in the pursuit of their individual happiness.

—PLATO

The state exists for men, and not man for the state. Man is born for only one purpose-to be happy. But what is happiness? It is that pleasant state of mind which is brought about by the habitual doing of good deeds.

—ARISTOTLE.

The only way to be happy is to invite others to partake of your happiness-not because it is noble to do so, but because it is expedient. "It is not possible to live pleasantly without living wisely and justly and generously." Treat others as you want them to treat you. Inflict no injury in order that you may suffer no injury. Live and let live.

—EPICURUS.

The ideals which have lighted me on my way and time after time given me new courage to face life cheerfully, have been Truth, Goodness, and Beauty.

—ALBERT EINSTEIN

The good life is one inspired by love and guided by knowledge.

## SHORT NOTICES

(1) (a) **"Soviet Kazakhstan"** (b) "Egypt's vic[tory]" (c) Pension system in the Soviet Union.

—These are published by the Information Departm[ent] the U. S. S. R. The first gives the reader an idea int[o] Life under Kazakhstan Republic. The very first c[hapter] is on "my right to speak." The life-story of the w[...] is given as a simple narrative. It is very simple and interesting. How many people of this type are found this land today! But none cares to write his life story!

**The Second: "Egypt's Victory"** is intended to s[...] Egypt's victory for the forces of peace. The forces aggression tried to bring the poor Egyptians down to t[heir] knees and yet as circumstances developed, the Green [...] again began to fly in pride and patriotism. In this w[...] the days of exploitation, oppression and terrorism [...] numbered. It is an anachronism!

**The third** is **"Pension system in Soviet Union."** [...] an interesting booklet and successfully tackles, a g[...] problem viz. the care and way of peaceful life in this Wor[ld] the aged. Having worked during the first part of life, i[n] latter part, man devolops oldage and inability to w[...] How can he get rest and at the same time food? Is it a duty of the Government to look after its aged and invali[ds] People who are engaged in solving this problem, will [...] ample material for thought.

(2) **"Exhibtions in Basic Education"**-published the Director National Institute of Basic Education, N[ew] Delhi.

—This Brochure is intended to offer some helpful hi[nts] and suggestions for planning and organising educati[onal] Exhibitions at various levels. The value of Exhibition [in] Education is now never challenged, but is an acknowled[ged] fact. For Schools and other educational Institutions, [...] Brochure will prove a good guide.

(3) **Paradox and Poetry in the "Voice of [the] Silence"** by Bhikshu Sangharakshita, published by [...] Indian Institute of World Culture, Bangalore.

—It tries to clearly explain a position in the Mahay[ana] Tradition. The voice of the Silence uses paradox a[s] method of awakening soul-wisdom. The author clears [the] ground, when he concludes thus :-"The Voice of Silen[ce] not to be understood, unless we realise that it appeals to [the] heart, that it strives to develop intuition to reawaken S[...] wisdom and that *in so doing* its principal methods [...] paradox and poetry." It is an enchanting booklet.

4. **"Sri Chaitanya"** (II)-Sadhu T. L. Vaswani (E[ast] and West Series No. 41), May 1958.

—Here in the II part of the life of Chaitanya is narra[ted]. He was hardly twenty-three years of age, when he wen[t to] Gaya and he returned a Changed Man! The story of [the] Changed Man is entrancing and fascinating. The chan[ged] man turns "for his inspiration-not to any ego-man, but to [the] man of selfsurrender, the Man who offers his all to S[ri] Krishna, whose life is a yajna to Mukund the Beloved." [...] we not going to be benefitted by this ideal of "humili[ty]" [of] the humblest of the humble!"

N. K. B[...]

World Religion Supplement

# धर्मचक्र

वर्ष ११ वें ] [ अंक ५ था
१५ डिसेंबर १९५८

THE WHEEL OF THE MORAL LAW
(Vol. XI—5)
15th December 1958

To the Sacred Memory of the Second Anniversary ( Parinibbana ) of Dr. B. R. alias Babasaheb Ambedkar ! "Awake ! Arise ! or be ever fallen ! " This was the dynamic Power, a Philosopher and Guide to the Crores of the down-trodden, who rallied round the Standard of Social Revolt unfurled by the late Dr. Ambedkar at Nagpur. It has become the place of Pilgrimage of thousands of devoted and brave Soldiers of the Supreme Commander— Dr. Ambedkar ! 2 years have passed ! **Long live the Light !**



यथा सङ्कारठानस्मिं उज्झितस्मिं महापथे। पदुमं तत्थ जायेथ सुचिगन्धं मनोरमं।
एवं सङ्कारभूतेसु अन्धीभूते पुथुज्जने । अतिरोचति पञ्ञाय सम्मासम्बुद्धसावको ॥—धम्मपद

प्रज्ञा व करुणा यांचा हृदयंगम संयोग—डॉ. बाबासाहेब !

# धर्मचक्र

(The Wheel of the Moral Law)

[ बौद्ध शिकवण, जीवन व कला यांच्या विश्वसनीय दर्शनानें महात्माजींची मूलभूत शिक्षा सिद्ध करून दाखविणारें मराठींतील पहिलेंच मराठी–हिंदी सांस्कृतिक मासिक ]

* दर महिन्याच्या १५ तारखेस प्रसिद्ध होतें. *

मुख्य संपादक ( मराठी व इंग्रजी विभाग ), मुद्रक व प्रकाशक :

प्रा. ना. के. भागवत, एम्. ए., ( मुंबई विश्वविद्यालय, पाली ग्रंथ प्रकाशन—सन्मान्य संपादक )

प्रा. शिवसहाय पाठक, एम्. ए., साहित्य रत्न, के. सी. कॉलेज : संपादक हिंदी विभाग

वर्ष ११ वें ] १५ डिसेंबर १९५८ [ अंक ५ वा

## अनुक्रमणिका

### मराठी विभाग



### पाली संहिता विभाग :



### हिंदी विभाग



### World Religion Supplement :



**वर्गणीचे दर :**

१ : भारतांत पोस्टेजसह रु. ५–०–०
२ : महाभारतांत पोस्टेजसह रु. ७–०–०
३ : किरकोळ अंकास ७५ नये पैसे
बुद्धजयंती विशेषांक रु. १–७५ नये पैसे (२४ मे १९५६ चा)

**जाहिरातीचे दर : ( एक वेळचे )**

अत्यन्त सवलतीचे आहेत.
कृपा करून पत्र पाठवून तपास करा.

### या अंकांत विशेष काय पहाल ?



मुद्रक व प्रकाशक : प्रा. ना. के. भागवत, धर्मचक्र कार्यालय, सुगतनिधान, १५ वा रस्ता, प्लॉट नं. ४६३, खार, मुंबई २१
मुद्रण स्थळ : मुंबई वैभव प्रेस, सरदार वल्लभभाई पटेल रोड, गिरगांव, मुंबई, नं. ४

World
Religion
Supplement

धर्मचक्र

THE WHEEL OF
THE MORAL LAW

वर्ष ११ वें ] १५ डिसेंबर, १९५८ [ अंक ५ वा

# तो झरा, ती झोपडी !

[ मुक्त—शैली ]

या व्यथांनो, संकटांनो
संहारक शक्तींनो या !
न्या धनदौलत ही
सारे कांहीं,
जगांतील वैभवहि :
...उपभोगिण्याला मज
देऊं नका
तो बादशाही भपका,
तें सौंदर्य माखलेलें
चिखलानें,
नि तो मान...!
ती बुद्धि :
...सडक्या मेंदूची बुद्धि,
आणि ती शक्ति प्रचंड
अण्वस्त्राची,
मानवास नाशणारी;
...नको नकोच मजला !
...मला हवी आहे
हृदयाची शक्ति,
मला हवी आहे
हृदयाची बुद्धि,
हृदयाचें तें सौंदर्य
हृदयाचा तो प्रकाश !
हे रुद्र सूर्या !
ऊन पाडून कडक तुझें
आटव महासागर
आटव त्या महानद्या
पेटव ते राजमहाल...
...परी एक माझा
प्रेमाचा झरा तो नको रे आटवूं
आणि...
ती करुणेची झोंपडी नको रे पेटवूं
तें धन
आहे मजला महान !
सूर्यदेवा ! हे संहारक शक्तींनो !
राहूं द्या तो झरा अखंड
नि राहूं द्या ती झोपडी...
...तो झरा झुळझुळणारा
जीव करीलच शांत तडफडणारा !
आणि ती झोपडी
देईल खरा निवारा,
नि उबारा !

—अनन्त कदम्ब

# संपादकीय

काँग्रेस सरकारनें दारूबंदीचा कार्यक्रम हातीं घेऊन त्यांत बरेचसें यश मिळविलें आहे. त्या कार्यक्रमास पूर्ण यश येण्यास निव्वळ कायद्याचा आधार उपयोगी पडत नाहीं, ही गोष्ट आतां स्पष्ट झाली आहे. खुद्द यूरोप व अमेरिका या देशांत देखील कायद्यानें त्या व्यसनाला आळा बसूं शकला नाहीं. दारुबंदीच्या योगानें दारु गाळणाऱ्या मोठ्या वर्गाचें नुकसान झाल्यानें त्यांना अन्यमार्गानें आर्थिक मदत मिळावी म्हणून ताडीचा गूळ करण्याचे प्रयोग सरकारनें जारी करून यांतहि साधारण प्रगति केली आहे. पण दारूचें व्यसन लागलें तें सुटणें किती दुरापास्त आहे याची जाणीव व्यसनी लोकांनाच होईल. त्यामुळें खाजगी रीतीनें दारू गाळणें व तिच्या भट्ट्या उभारणें असल्या अप्रशस्त



**श्री. ना. तु. ठाकूर**

व बेकायदेशीर गोष्टीला प्रोत्साहन मिळत आहे, ही गोष्ट दररोज पोलीस खातें जीं कारणें उघडकीस आणतें ह्यावरून सिद्ध होणारी आहे. दारुबंदीच्या योगानें सरकारला आलेला तोटा अन्य मार्गानें कर बसवून तो भरून काढण्याचें सरकारला सव्यापसव्य करावें लागत आहे. अशा रीतीनें दारूबंदीचा प्रयोग अयशस्वी झाल्यामुळें व नियन्त्रणांचा लोकांना नैसर्गिकच तिरस्कार असल्यामुळें अन्य मार्गानें तो प्रयोग यशस्वी करण्याचा एक उपक्रम सुरू होणार आहे, असें समजतें. दारुबाजांना कायद्याचा धाकदपटशा दाखवण्यापेक्षां त्यांचे जर हृदयपरिवर्तन करितां आले व समाजसेवकांनीं—सरकारनें नव्हे—जर हें कार्य करण्याचे ठरविलें तर दारुड्याना परावृत्त करतां येईल अशी विचारसरणी स्वीकृत करून एक बिनसरकारी संस्था स्थापन करण्याचें ठरलें असून या संकल्पित नशाबंदीमंडळाचें अध्यक्ष स्थान केदारनाथजी यांना देण्यांत येणार आहे. त्यांची कार्यपद्धति म्हणजे अशा व्यसनी लोकांना भेटून त्यांना व्यसनाचे दुष्परिणाम समजावून देणें, त्यांच्या आप्तस्वकीय व समाजांतील प्रतिष्ठित वजनदार अग्रणीच्या द्वारें त्यांचे मनावर दडपण आणून त्यांना त्या व्यसनाची कायमची शिसारी जेणें करून येईल असे प्रयत्न करणें. यासाठीं निरनिराळ्या भागनिहाय समित्या स्थापन केल्या आहेत. मानवाची प्रकृति दुष्ट किंवा समाजविरोधी नाहीं. परिस्थिति, संगति, आर्थिक विवंचना, वगैरे गोष्टींमुळें तो इतका गांजून जातो कीं, गांजलेल्या मनाला विरंगुळा किंवा थारेपालट म्हणून तो व्यसनाधीन होतो. म्हणून अशा बिनसरकारी संघटनेच्या द्वारें कार्य करण्याचा हा उपक्रम वि[illegible] आहे. शिवाय श्री केदारनाथजी सारख्या सुप्रसिद्ध व प्रसि[illegible] विन्मुख समाजसेवकाची जोड मिळाल्यामुळें त्यापासून [illegible] तरी इष्ट फलप्राप्ति होण्याची शक्यता आहे. [illegible] शुद्धीची चळवळ त्यांनीं हातांत घेऊन त्यांत बरीच प्रगति [illegible] असल्याचे दिसून येत आहे. त्यांची निरपेक्षता, कार्यकरण्याची [illegible] वादविवादपटुता, सर्व संग्रह करण्याची अप्रतिम हातोटी व समाजां[illegible] खालील थराविषयींच्या कल्याणाविषयी वाटणारी तळमळ या गुणसमु[illegible] मुळें त्याच्या या कार्यांत यश येवो, असेंच कोणी इच्छील. पशूंना मा[illegible] करण्याची ही किमया अगदींच अशक्य कोटींतील नाहीं. आम्ही [illegible] कार्यांत त्यांना पूर्ण यश चिंतितों.

× × × ×

सोमवार, दिनांक २७ ऑक्टोबर रोजीं सायंकाळीं ५ वाजतां [illegible] येथील पर्सनल प्रेस सर्व्हिसचा एकविसावा **वर्धापन दिन** (शनि[illegible] पेठ पुणें) सभागृहांत व संस्थेचे संस्थापक सदस्य व समारंभाचे प्रमुख [illegible] पंजाबचे राज्यपाल श्री माननीय काकासाहेब गाडगीळ यांचा सत्[illegible] असा दुहेरी समारंभ संस्थेच्या विद्यमानें पार पडला. सर्व्हिसचे संच[illegible] श्री ना. तु. ठाकूर यांनीं आपल्या कर्तबगारीचा पुरावा निरनिरा[illegible] चळवळी चालवून दाखविला आहे. ते पॅरेमाउंट पब्लिसिटी सिंडिके[illegible] प्रधान-प्राण आहेत. विविध विषयांवर तसेंच व्यक्तिगत वृत्तपत्रीय [illegible] पाठविणारी ही संस्था साहित्यिकांच्या, संपादकांच्या, लेखकांच्या [illegible] सामान्य वाचकांच्याहि आदरास पात्र झाली आहे. पॅरेमाऊंट पब्लि[illegible] सिंडिकेट या संस्थेनें एक तप पुरें केलें आहे व या त्यांच्या तपश्च[illegible] उपयुक्तता व्यापार उद्योग धंद्यांतील मंडळीना पटली आहे. याशि[illegible] श्री. ठाकूर यांनीं प्रकाशनाचें दालन खोललें असून त्यामार्फत द[illegible] "उद्योग-व्यापार-वार्षिक" व "दीपमाला" वगैरेची प्रसिद्धी ते [illegible] असतात. उद्योग धंदे व व्यापार या आजपर्यंतच्या महाराष्ट्रांतील उ[illegible] विषयासंबंधीं सुमारें १५०० पृष्ठें मजकूर त्यांनीं छापला असून त्यांत त[illegible] माहितीपूर्ण व विवेचक लेख येत असतात. या सामग्रीला आतां ज्ञानको[illegible] स्वरूप आलें आहे. यावर्षीच्या "वार्षिका" त श्री. ना. धों. [illegible] यांनीं "उत्कृष्ट पण स्वस्त घर बांधणीसाठीं स्थानिक साहित्याचा उप[illegible] यावर विवेचक प्रबंध लिहिला आहे. त्यांच्या उत्कृष्ट प्रबंधाबद्दल श्री. नानासाहेब गाडगीळ यांच्या हस्तें त्यांचें अभिनन्दन झालें आहे. [illegible] विविध कार्यासाठीं झालेला हा एकविसावा वर्धापन दिन उत्तम री[illegible] पार पडला. श्री. गाडगीळ यांनीं श्री. ठाकूर यांचें हार्दिक अभिन[illegible] केलें व अगदीं अल्पारंभापासून त्यांनीं जो हा व्याप वाढविला [illegible]

त्याबद्दल अध्यक्षांनीं त्यांना धन्यवाद दिले. त्यांच्या "पर्सनल प्रेस सर्व्हिस" मार्फत जीं कात्रणें आमच्याकडे येतात, त्यात विविध विषयांवरील माहिती खच्चून भरली असल्यामुळें त्यांच्या वाचनानें माणूस आपोआपच बहुश्रुत होतो. श्री. ठाकूर यांचें आम्ही मनःपूर्वक अभिनन्दन करतों व त्यांनीं आरंभिलेल्या निरनिराळ्या कार्यक्षेत्रांत त्यांना पूर्ण यश येऊन, आजच्या महाराष्ट्राला त्याचें मार्गदर्शन उपकारक होवो हीच सदिच्छा आम्ही व्यक्त करीत आहोंत !

× × ×

किर्लोस्कर कारखान्याचे कर्तबगार जनरल मॅनेजर श्री. शंकरराव किर्लोस्कर हे ३० नोवेंबरपासून सेवानिवृत्त झाले आहेत. त्याचे वयास ६८ वर्षें पुरी होऊन गेलीं असूनहि त्यांचें विविध क्षेत्रांतील नेतृत्व अपूर्व आहे. किर्लोस्करवाडी हा कारखाना प्रथम कोणत्या स्वरूपांत होता, हें ज्यानीं पाहिलें आहे, त्यांना त्याचा आजचा विशाळ व्याप पाहून व त्यास जी आज प्रतिष्ठा व वैभव प्राप्त झालें आहे, त्याचें श्रेय लक्ष्मणरावजीं बरोबरच श्री. शंकररावांनाहि द्यावें लागेल. किर्लोस्करवाडी हें नांव उच्चारल्याबरोबर निव्वळ औद्योगिक उपकरणें तयार करण्याचा कारखाना एवढेंच चित्र डोळ्यापुढे उभे रहात नसून त्याबरोबरच तें नव विचारांचे एक केन्द्र म्हणून आजचा महाराष्ट्रीय त्याजकडे पाहतो. किर्लोस्कर, स्त्री व मनोहर या तिन्ही मासिकांच्या द्वारा महाराष्ट्रांतील जीवनांत आधुनिकता आली आहे. त्यांतील नवीन विचारांच्या पखरणीनें महाराष्ट्रीयांच्या जीवनाला एक कलात्मकता, उदात्तता, भव्यता, पण त्याबरोबरच व्यावहारिकताहि आणली आहे. कारखानदार व कामकरीवर्ग यांचें संबंधांत किर्लोस्करांनीं आदर्श दाखवून दिला आहे. कारखाना, मासिकाचें केन्द्र, व समाजसुधारणा अशा तिहींचा संगम त्यांत दृष्टीस पडतो. श्री. शंकरराव किर्लोस्कर हे अत्यन्त हौशी आहेत. ते उत्सवप्रिय आहेत; आदरातिथ्य दाखविण्यांत तत्पर आहेत. आज ते सेवानिवृत्त झालें असतां त्यांनीं उर्वरित आयुष्याची आखणी करूनच ते बाहेर पडले आहेत. सत्ता व अधिकार यांचा मोह टाकून देऊन नवीन लोकांनाहि कर्तबगारी दाखविण्यास संधी दिली पाहिजे, असा उमदा विचार करून त्यांनीं राम राम ठोकला आहे ! त्यांच्या आजच्या विविध गुणांमुळें ते महाराष्ट्रांत आज प्रथम-श्रेणींतील उद्योगाधिपति म्हणून ख्यातनाम आहेत. परदेशी जाऊन नवीन कल्पना तेथून घेऊन त्यांनीं त्यांचीं उभारणी आपल्या कारखान्यांतून केली आहे. ते गरीबाचे कनवाळू आहेत. निव्वळ मूक जनावराप्रमाणें गतानुगतिक न राहतांना जीवनांत कांहीं वैशिष्ट्यपूर्ण नाविन्य उत्पन्न करण्याची त्यांची महत्त्वाकांक्षा असल्यामुळें ते कधींहि आपल्या क्षेत्रांत मागें पडले नाहींत. कल्पकता हा त्यांचा डोळ्यांत भरणारा विशेष आहे. समाजांत विविध विचारसरणीशी त्यांचे संबंध प्रेमाचे व सहानुभूतीचे आहेत. अशा रीतीनें महाराष्ट्रीय कारखानदारांत नांव करून पुढील आयुष्य अधिक क्रियाशीलतेंत घालवावें व राष्ट्राला आपला उपयोग करून द्यावा व त्या बरोबरच जीवनाची माधुरी व उदात्तता अनुभवता आल्यास ती अनुभवावी, अशा उद्देशाने ते सेवानिवृत्त झाले आहेत. तत्वज्ञानाचे भाषेंत बोलावयाचे तर नलिनी पत्रावरील जलबिंदूप्रमाणें निरपेक्षता दाखवून सेवानिवृत्त होणारा हा कर्मयोगी राष्ट्राच्या भरभराटीस आतां अधिक निरपेक्षतेने व जिव्हाळयानें वाहून घेईल, अशी खात्री जर आम्ही बाळगली तर ती आनाठायी होणार नाहीं. आम्ही श्री शंकरराव यांचे अभिनंदन करतो व त्यांच्याहातून उत्तरोतर राष्ट्रसेवा घडो अशी सदिच्छा व्यक्त करतों.

× × ×

पुणें शहरांत ख्यातनाम अशा ज्या कांहीं आदर्श शिक्षणसंस्था आहेत त्यांत "शिक्षण प्रसारक मंडळीचें" स्थान पुष्कळच वरचे लागेल. या संस्थेमार्फत "नूतनमराठीविद्यालय' "सर परशुराम भाऊ कॉलेज" ह्यांत दुय्यम व उच्च शिक्षणाची सोय अनुक्रमे होत आहे. या "मंडळी"चा अमृतमहोत्सव सुरूं होऊन त्यांची सांगता पुणे येथें दिनांक ३० नोवेंबर रोजी सायकाळी सर परशुराम भाऊ कॉलेजच्या क्रीडांगणावर संस्थेचे माजी विद्यार्थी व भारताच्या पूर्व भागाचे सेनापति ले. जनरल एस्. पी. थोरात यांच्या अध्यक्षतखालीं फारच भव्य प्रमाणांत पार पडली. पुणें येथें 'डेक्कन एज्युकेशन सोसायटी' नंतर "शिक्षणप्रसारक मंडळी" ही संस्था शिक्षण देण्यासाठीं अस्तित्वांत आली. त्या मंडळीचें सत्तर वर्षांतील शैक्षणिक कार्य कोणत्याही महाराष्ट्रीयास आनंदानें व अभिमानानें भरून टाकल्याशिवाय राहणार नाहीं. या अमृतमहोत्सवाचे निमित्तानें संस्थेला आपल्या संसाराचें संपूर्ण चित्र महाराष्ट्राला देतां आलें. या अमृतमहोत्सवाचे उत्सव निरनिराळया कार्यक्रमाच्या स्वरूपांत मुंबई, पुणें व सोलापूर येथें झाले. पुण्यांतच नूतन मराठी विद्यालय, मराठी शाळा व प्रशाळा, शिशुशाळा स. प. महाविद्यालय, टिळक शिक्षण महाविद्यालय, शारीरिक शिक्षण विद्यालय, मूक बधीर विद्यालय इत्यादि संस्था अस्तित्वांत आल्या. मुंबई येथें १९३७ साली 'रामनारायण रुइया कॉलेज' व तेथेंच १९४१ साली "पोदार कॉलेज ऑफ कॉमर्स" सुरूं झाले. सोलापूर येथें ल. ह. दे. प्रशाळा ही शाळा उत्तम प्रतीची शाळा म्हणून गणली आहे. बदललेल्या काळांत वाढत्या गरजा भागवण्यासाठी मंडळीनें नवीन नवीन संस्था चालविण्यास मागें पाहिलें नाहीं; महाराष्ट्रांत नवसमाजनिर्मितीचे कार्यांत या मंडळीने फार मोठी महत्त्वाची भर टाकली आहे. या मंडळीचा इतिहास म्हणजे असाः–इ. स. १८८३ साली विष्णूशास्त्री यांच्या स्मरणार्थ 'नूतन मराठी विद्यालय' स्थापन झालें. कै. कृ.ब. डोंगरे, कै. गो देव; कै. करंबेळकर वगैरे प्राथमिक शिक्षकांनीं ही शाळा प्रथम काढली. मग कै. विनायकराव आपटे आले. त्या संस्थांतून काम करणाऱ्या त्यागी कार्यकर्त्यांच्या अविरत परिश्रमानें व धनिकांची जोड मिळाल्यानें या संस्था उत्तम प्रकारानें आपला संसार करूं लागल्या. राष्ट्राभिमान, संस्कृतीचा अभिमान, इतिहासाचा अभिमान, महाराष्ट्र धर्म व संस्कृति यांच्या उत्तम अध्ययनानें त्यांत येणाऱ्या विद्यार्थ्यांचीं मनें सुसंस्कृत करण्याचें कार्य या शिक्षण संस्थांनीं केलें. शुक्लेंदुवत् ही मंडळी उन्नतपथावर जाऊं लागली व त्याचें दृश्यफळ म्हणजे अमृतोत्सवाचा सुवर्णयोग तिला लाभला. मंडळीचे अध्यक्ष न्या. मू. प्र. बा. गजेन्द्रगडकर व नियामक मंडळाचे अध्यक्ष म. म. पोतदार हे आहेत. अशा भव्य, उदात्त व भावनापूर्ण अशा पार्श्वभूमीवर ह्या महोत्सवाची पुण्यांतील सांगता उत्तमच गाजली. आजच्या भारताच्या संरक्षणाची जबाबदारी या संस्थेतील एका महनीय व कर्तबगार विद्यार्थ्यांपैकीं एकावर पडावी हें केवढे विलोभनीय दृश्य होतें. अध्यक्षांनीं आपल्या भाषणांत सांगितलें कीं "सर्व माजी विद्यार्थ्यांचा केवळ एक प्रतिनिधी या नात्यानेंच मी या मानाचा मोठ्या नम्रतेनें स्वीकार

(पान २२ वर पहा.)

# संपादकीय

आचार्य विनोबाजी यांच्या सर्वोदय आंदोलनानें जगांतील विचारवंतावरहि परिणाम केल्याविना राहिला नाहीं ! आमच्या लोकांना जरी त्याचें महत्त्व जाणण्याची किंवा जाणूनहि तें न दाखविण्याची कला साध्य असली तरी पाश्चात्यांची वृत्ति "मनस्यन्यत् वचस्यन्यत्" अशा नाहीं ! हे विचार सुचण्याचें कारण म्हणजे एक फ्रेंच समाज सुधारक ऍबे पेरी यांना आचार्यांच्या चळवळीचें रहस्य व मर्म पटत चाललें आहे. ऍबे पेरी हे सध्या मुंबईत असून आचार्यांची व त्यांची गांठ होणार असल्याचें जाहीर झालें आहे. हे पूर्वी पार्लमेंटचें "डेप्युटी" होते व त्यावेळीं युद्धोत्तरजगांत पॅरिसच्या गरीब लोकांच्या हालअपेष्टा पाहून त्यांचें अंतःकरण द्रवलें. प्रथम त्यांनीं आपल्या आंदोलनास मदत म्हणून आपलें घर गरीब व गरजू लोकांना देण्याचें ठरवून त्यांनीं त्यांना निमन्त्रण केलें. लौकरच जास्त जास्त लोक त्यांचें भोंवती जमा झाले व त्या सर्वांनीं संघटित जीवन व्यतीत करण्याचें ठरविलें. पैसा मिळविण्यासाठी निरनिराळ्या युक्त्या सुचविल्या. त्यांनीं पॅरिस मध्यें "चिंध्या गोळा करणारे" असें नांव मिळविलें आहे. लौकरच त्यांनीं झोंपड्या बांधण्यास व नवीन सामुदायिक केन्द्रें निर्माण करण्यास आरंभ केला. त्यांच्या विनंतीस मान्यता देऊन श्रीमंतांनीं त्यांना मोठमोठ्या उदार देणग्या दिल्या व लौकरच त्यांनीं "संघटित जीवनाचे मित्र" ( Friends of the Community ) असें नांव धारण केलें. ऍबी पेरी यांनीं आतांपर्यंत पुष्कळशीं घरें बांधून शिवाय आणखी २००० घरें बांधण्यास सुरवात केली आहे. ऍबे पेरी यांनीं आपल्या चळवळीची उपपत्ति खालीलप्रमाणें दिली आहे. ते म्हणतात—"चिंध्या गोळा करणाऱ्यां" च्या कामानें **श्रीमंतांना** "मानसिक–धक्का" मिळाला. **खाऊनपिऊन सुखीजनांत**, गरीबांना आपण मदत करण्याची खटपट केली पाहिजे, अशी जाणीव उत्पन्न झाली. त्यांचें कार्य व ध्येय या योगानें त्यांची व जयप्रकाश नारायण यांची भेट झाली व ऍबे यांनीं पन्तप्रधान नेहरू यांचीहि भेट घेतली. ऍबे पेरी यांचे आंदोलन आतां जपान, अर्जेंटिना, युराग्वे, कॅनडा, स्वित्झर्लंड व बेल्ज्यम् यांत देशांतहि बद्धमूल होत आहे ! त्यांनीं आचार्य विनोबांच्या कार्याबद्दल गौरव व प्रशंसाहीं व्यक्त केली. आपलें काम व आचार्यांचें कार्य एकाच स्वरूपाचें आहे असें मत त्यांनीं व्यक्त केलें. त्या दोघांची गांठ पडल्यावर एकमेकांच्या मतांच्या देवाणघेवाणानें कांहीं तरी दूरगामी व परिणामकारक अशी योजना बाहेर पडेल, अशी आशा बाळगणें अप्रस्तुत होणार नाहीं. "जगाच्या कल्याणा सन्तांच्या विभूती, देह कष्टवीति उपकारें" हें श्री तुकाराम महाराजांचें वाक्य सत्य होय.

× + ×

मागील महिन्यांत मुंबई शहरांत कितीतरी समारंभ पार पडले ! समारंभ, उत्सव, सप्ताह, पुण्यतिथी, पाहुण्यांच्या भेटी, वगैरे सर्व प्रकार मुंबईत नेहमींच चालू असतात व त्या योगानें मुंबईच्या बहुविध व वैचित्र्यपूर्ण जीवनाची साक्ष पटल्यावाचून राहत नाहीं. सामाजिक, धार्मिक, शैक्षणीक, राजकीय, सांस्कृतिक अशा जीवनाच्या अंगोपांगांचा जेणेंकरून विकास होईल, अशा घटना मुंबईत घडतच असतात. मुंबई शहर हें सर्व जातीयांचें, सर्व भाषिकांचें, सर्व धर्मीयांचें शहर असल्यामुळें प्रत्येक विभाग आपलें वैशिष्ट्य दाखविण्याचे कामीं दक्ष असतो. त्यामुळें जीवनाची माधुरी साधून जीवनाचा एकांगीपणा जाऊन त्या ठिकाणीं आचारांत, विचारांत व उच्चारांत उदारमतवादित्व येण्यास मदत होते. अशा मुंबईतील एक महिना आपण उदाहरणादाखल घेऊं. मागील महिन्यांत हिन्दचे राष्ट्रपति डॉ. राजेन्द्र प्रसाद मुंबईस आले होते. त्यांच्या मुंबईच्या मुक्कामांत त्यांनीं कितीतरी गोष्टी केल्या, कितीतरी समारंभ पाहिले, किती तरी लोकांनीं त्यांच्या भेटी घेतल्या व मुंबईच्या बहुरंगी जीवनाचें त्यांना कसें दर्शन झालें, हें निर्विकार मनानें पाहणें खरोखरच बोधप्रद आहे. त्यांनीं "मुंबई शहर समाज शिक्षण समिती" च्या १० व्या आठवड्याचें उद्घाटन केलें; मणीभवनाचें उद्घाटन केलें; "हाफकिन इन्स्टिटयूट"चा हीरक-महोत्सव साजरा केला; अपंग समाजाच्यासाठीं चालू असलेल्या संस्थेस भेट दिली; मुंबई येथील आनन्द केंद्राला भेट दिली; एलिफन्टा येथील त्रिमूर्ति पाहण्यास त्यांना वेळ मिळाला. याप्रत्येक प्रसंगीं मानवाच्या जीवनाचा विकास कसा होत आहे, त्याचें प्रात्यक्षिक त्यांना अनुभवावयास सांपडलें. त्याचें पूर्वींच त्यांनीं जावा, बोर्नियो, इंडोनेशिया वगैरे, दक्षिण-पूर्व देशांत यशस्वी दौरा केल्यामुळें, त्यांच्या जीवनास एक प्रकारचा ताजेतवानेपणा आला होता व त्याची मरगळ नाहींशी होण्यास मदत झाली होती, त्या त्या देशांतील लोकांचें जीवन व त्यांतील कलात्मकसौंदर्य यांचा भरपूर आस्वाद घेतल्यामुळें त्यांच्या जीवनाचें पुष्प विकसित झालें होतें व अशाच मनाच्या अवस्थेंत ते मुंबईत आले होते. त्यांच्या त्यावेळच्या भाषणांत एक व्यापक दृष्टिकोण दिसून येत होता. हाफकिन इन्स्टिटयूटच्या समारोहाचे वेळी भाषण करतांना ते म्हणाले-'साठ वर्षांपूर्वी या संस्थेची स्थापनाकरणाऱ्या डॉ. वॉल्डेमार हाफकिन याचें नांव दिलेली ही संस्था, जगांत नाहीं तरी पौर्वात्य देशांत, एक प्रमुख वैद्यकीय संशोधन संस्था म्हणून मान्यता पावलेली आहे. डॉ. हाफकिन् यानें मनोभावें, मानवी कल्याणाच्या अमर्याद उत्साहानें आणि कळकळीनें या संस्थेस एक आदर्श उदाहरण घालून दिलें असून, या गुणांची छाया या संस्थेच्या प्रयोग शाळेवर पडली आहे. रोगांचें निर्मूलन करून मानवी सुखांत भर घालावयाची असल्यास कोणत्याहि प्रकारच्या शास्त्रीय क्षेत्रांत आंतरराष्ट्रीय सहकार्याची आवश्यकता आहे. आधुनिक शास्त्रज्ञ शास्त्रीय संशोधनाच्या निष्कर्षांचा, विनाशाकरितां नव्हे, तर मानवजातीच्या कल्याणासाठीं, उपयोग करतील अशी आपण आशा करूं या'. पण याहीपेक्षां सरस व भावनापूर्ण भाषण गांधीजीचें स्मारक खुलें करतांना झालें. हा प्रसंग म्हणजे "मणिभुवन" हें गांधीजीचें स्मरण स्थान म्हणून उद्-

घोषित करण्याचा होता. ते म्हणाले–' महात्मा गांधीची स्मृति चिरंतन ठेवणें, हें भारताचें कर्तव्य होय. आम्ही महात्माजींना जीवंत ठेऊं शकलों नाहीं, पण त्यांची स्मृति कायम राखणें ही आमची जिम्मेदारी होय. आज जगामध्यें आडवाटा फुटल्यामुळें गांधीजींनीं शिकवलेलीं तत्वें-सत्य व अहिंसा–ह्या मूल तत्वांकडे दुर्लक्ष करणें, जगाला अशक्य झालें आहे. सामाजिक आणि आधिभौतिक प्रगतीइतकीच वैयक्तिक उन्नति महत्त्वाची आहे. लोकांनीं आपलें जीवनमानच सुधारावें, एवढेच गांधीजींना नको होतें; तर त्यांचा सर्व जोर मानसिक व आध्यात्मिक शक्तींच्या विकासावरच होता, कारण त्या विकासानेंच अधिभौतिक गुलामगिरी जिंकण्यास मदत होणार होती. तसेंच त्यानीं "टाटास्मारक इस्पितळास" ही भेट दिली व कॅन्सरसारख्या दुराध्य रोगाविषयीं बरीच माहिती गोळा केली. मागील १७ वर्षांत ट्रस्टमधून ७० लाख रुपये खर्च झाले असून सुमारें ७०,००० रोग्यांवर उपचार करण्यांत आला, ही माहिती त्यांनां देण्यांत आली. त्यांनीं आपला मुंबईतील चार दिवसांचा मुक्काम पुरा करून ते ठाणें जिल्ह्यांतील घोलवडला गेले. आदिवासी लोकांची स्थिति पाहण्याचा त्यांचा मानस होता. अशा रीतीनें डॉ. राजेंद्रप्रसाद यांनीं मुंबईतील जीवनाचे निरनिराळे पैलू पाहिले. मुंबईकरानांहि, आपलें जीवन राष्ट्राध्यक्षांनीं पाहिलें, हें समाधान प्राप्त झालें. राष्ट्राध्यक्ष व प्रजा यांच्या मधील हा सहकार राष्ट्राच्या एकंदर जीवनाच्या विकासास उपकारक नाहीं, असें कोण म्हणेल ?

× × ×

दरवर्षीप्रमाणें मुंबई येथील "दहावा समाजशिक्षण सप्ताह" मोठ्या भव्य प्रमाणांत रंगभवन ( धोबीतलाव ) येथें तारीख ९ जानेवारी १९५९ रोजीं सायंकाळीं ५-३० वाजतां उद्घाटित झाला. भारतीय गणराज्याचे राष्ट्राध्यक्ष डॉ. राजेन्द्रप्रसाद यांनीं उद्घाटन केलें व मुंबईचे राज्यपाल श्रीप्रकाश यांनीं अध्यक्षीय भाषण केलें. पहिल्या दिवशीं प्रार्थनागीतानंतर श्रीरामलाल मोहनलाल यांनीं सप्ताहाचे अध्यक्ष या नात्यानें सर्वांचें स्वागत केलें व श्री सीलम यांनी प्रास्ताविक भाषण केलें. नंतर संदेश वाचनानंतर डॉ. राजेन्द्रप्रसाद यांचा गौरव केल्यावर त्यांनीं भाषणास सुरवात केली व फारच उद्बोधक भाषण केलें व त्यानंतर राज्यपाल श्रीप्रकाश यांनीं अत्यंत मनोरंजक भाषण करून सामान्य जनता व प्रौढ शिक्षण यांचा संबंध उत्तम रीतीनें दाखवून दिला. अशा उपक्रमाचें महत्व श्रोत्यांस पटवून देऊन त्यांनीं समितीच्या कार्यांचा गौरव केला. या सप्ताहाच्या प्रसंगानें समितीनें विविधप्रकारचा भरगच्च कार्यक्रम आंखला होता. तो शुक्रवार, दिनांक २-१-१९५९ पासून गुरुवार, तारीख २२-१-१९५९ पर्यंत चालू होता. हे कार्यक्रम मुंबईतील निरनिराळ्या ठिकाणीं मुक्रर केल्यामुळें सर्वांना त्यांचा फायदा घेण्याची व्यवस्था करण्यांत आली होती, स्त्रियांची सभा, सांस्कृतिक कार्यक्रम, मशाल निवडणूक, झेंडावंदन, नागरिकदिन, कामगारदिन, समाजसेवकदिन, आरोग्यदिन, वगैरे आकर्षणें त्यांत समाविष्ट केलीं होतीं. निरनिराळ्या समाजांतील प्रमुख व्यक्ती यासाठीं एकत्रित झाल्या होत्या. समाजशिक्षण ही अशी एक बाब आहे कीं, ही सर्वांना एका भूमीवर आणूं शकते. त्यांत राजकीय, धार्मिक, जातीय, अन्यविचारसरणींची मतांतरें, असल्या मर्यादा घालतांच येत नाहींत. त्याठिकाणीं सर्व भेद नाहींसे होतात. कारण तें कार्य व त्याचा हेतु **सर्वांना सारखाच इष्ट असतो.** सामान्य माणसापासून राष्ट्राध्यक्षापर्यंत सर्वजण या पातळीवर येऊं शकतात. त्यांत विद्यार्थी एकत्र येऊन शिक्षणाकरितां फंड गोळा करतानां पाहून कौतुक वाटतें. सर्व शिक्षण-संस्थांना आपली कर्तबगारी व कार्यश्रद्धा दाखविण्याची संधी या योगानें प्राप्त होते. उत्साहाला नवी भिलई चढते. म्हणून असा शिक्षणात्मक सप्ताह गाजावा, यांत नवल नाहीं. आम्ही मुंबई समाज शिक्षण समितीचे अध्यक्ष, उपाध्यक्ष, व इतर पदाधिकारी यांचें अभिनन्दन करतों व त्यांच्या सामुदायिक प्रयत्नानें मुंबईच्या मुखावरील निरक्षरता हा कलंक धुवून जावो, असें इच्छितों.

× × ×

मागील महिन्याच्या १३ तारखेस ब्रह्मदेशाच्या सुप्रीम कोर्टाचे न्यायाधीश यू चान टून व श्रीमती चान टून यांचें मुंबईस आगमन झालें. ते "जागतिक बौद्ध धर्म परिषदेचे" अध्यक्ष आहेत. त्यांनीं भारतांतील हा दौरा मुद्दामच काढला होता. महानिर्वाणप्रत गेलेले डॉ. बाबासाहेब अंबेडकर यांच्या बरोबर त्यांच्या लाखों अनुयायांनीं जो बौद्ध धर्माचा स्वीकार केला, त्या नवबौद्धधर्मीयांना भेटावें, त्यांची स्थिति पहावी, त्यांच्या समस्यांची माहिती करून घ्यावी, व त्यांना प्रोत्साहन देऊन त्यांना योग्य मार्गदर्शन करावें, या उद्देशानें न्यायमूर्तींनीं हा दौरा सुरू केला होता. दिल्ली व आग्रा येथें तारीख २ पासून १२ पर्यंत ते राहून दिल्ली व आग्रा येथील बौद्ध जनांना त्यांनीं भेटी दिल्या व १३ रोजीं सकाळीं विमानानें ते मुंबईत दाखल झाले. विमानतळावर बौद्ध महासभेतर्फे श्री. भय्यासाहेब अंबेडकर यांनीं त्यांचें स्वागत केलें. नंतर पुष्पहारार्पण व मानवंदना झाल्यावर ५००० बौद्ध जनांनीं त्यांचा गौरव केला. रिट्झ हॉटेलमध्यें त्यांची राहाण्याची सोय करण्यांत आली होती. दि. १४ रोजी सकाळीं ९ वाजतां त्यांनीं सिद्धार्थ कॉलेजला भेट दिली व डॉ. बाबासाहेब अंबेडकर यांनीं लिहिलेल्या Buddha and His Dhamma" या ग्रंथाचें प्रकाशन केलें. सायंकाळीं ४ वाजतां मुंबईच्या नगरपालिकेंत मुंबईच्या मेयरतर्फे त्यांचा सत्कार झाला. व सायंकाळी ६॥ वाजतां दादर चौपाटीवर त्यांचें जंगी स्वागत करण्यांत आलें. त्यावेळी पांच लाख बौद्ध धर्मीय हजर होते. त्यांत त्यांनीं जें भाषण केलें, त्यांत ते म्हणाले—तुम्ही सर्वांनीं डॉ. बाबासाहेबांच्या आदेशानुसार बौद्धधर्माची दीक्षा घेतल्याचें वर्तमान आशियांतील बौद्ध देशांतील बांधवांना कळतांच आम्हां सर्वांना अत्यानंद झाला. आम्ही आशियाखंडांतील बौद्धधर्मीय देशांतील बांधव तुमच्याशी सहजीवनाचा मार्ग आक्रमण करावयास सदैव तयार आहोंत. भगवान बुद्धांच्या विश्वशांतीच्या संदेशानें आणि त्यांच्या तत्वप्रणालीच्या प्रसारानें पुन्हां जगांतील राष्ट्रांत सुवर्णयुगाचा काळ प्राप्त होईल, अशी आशा वाटूं लागली. अशारीतीनें त्यांनीं सर्वांना नवीन चैतन्य उत्पन्न करून दिलें. श्री. बाबासाहेबांच्या परिनिर्वाणानें त्यांच्या अनुयायांत जी एकप्रकारची औदासिन्याची अवकळा पसरली होती, ती नाहींशी करून त्यांच्या कार्यक्षमतेंत उजाळा उत्पन्न करण्याचें महान् कार्य न्यायमूर्ति चान टून यांनीं केलें. नागपुरांत चान टूनचे कस्तुरचंद पार्कवर २ लाखांच्या मेळाव्यासमोर जें भाषण झालें तेंहि अत्यन्त समिचीन व यथायोग्य झालें. तें भाषण हिंदू व नवबौद्ध या दोघांनाहि विचार करावयास लावणारें आहे. ते म्हणाले. —

" आपण आपसांत तर सहिष्णुतेनें वागलें पाहिजेच, परंतु त्याबरोबरच इतरांशीं व विशेषतः हिंदूंर्च्या बरोबर तर अधिक सहिष्णुतेनें राहिलें पाहिजे.

आपलें धर्मांतर झाल्याबरोबर धर्मांतरित बौद्ध व हिंदु यांच्यांत गैरसमज निर्माण झाल्याचें ऐकून **भारताबाहेरील आम्हां बौद्धांना चिंता उत्पन्न झाली.** तुम्हीं धर्मांतर केलें म्हणजे बंड केलें, असें हिंदूना वाटलें असेल. तुम्ही केली ती सामाजिक व मानसिक क्रान्ति होती हें खरेंच आहे. तथापि हिंदु व बौद्ध हे धर्म भिन्न असले **तरी दोघांचीहि संस्कृति व आध्यात्मिक पार्श्वभूमि एकच आहे.** या समान संस्कृतीची व समान आध्यात्मिक पार्श्वभूमीची आठवण ठेवून दोघांनीहि एकमेकांशी प्रेमानें वागणें आवश्यक आहे." न्यायमूर्तींची विचारसरणी हिंदुधर्मीयांनीहि आत्मसात् करणें आवश्यक आहे. आज वर्गीकृत समाजांत जी जागृतीची ज्योत उत्पन्न झाली आहे, ती दाबून टाकण्याचा प्रयत्न करणें, म्हणजे जुन्या व वृद्ध आजीबाईंनीं आपल्या केरसुणीनें समुद्राच्या पाण्याची भरती मागें लोटण्यासारखें हास्यास्पद आहे. ही ज्योत तेवत राहून सर्व भारतीयांच्या सामूहिक जीवनाला कशी उपकारक होईल व नवीन बौद्धधर्मीयांना ती जशी अंधकारांतून वाट दाखविण्यास उपयोगी पडेल, तशीच व तितकीच ती अंधश्रद्धेनें व धर्मवेड्याच्या वृत्तीनें काळोखांत चांचपडणाऱ्या हिंदूधर्मीयानांहि त्यांचें डोळे उघडण्यास कारणीभूत झाली पाहिजे. **धर्माच्या नांवासाठीं बौद्ध धर्मानें एकहि युद्ध केलें नाहीं;** ही भगवान् बुद्धाच्या धर्माची अखंड व उज्वल परंपरा आहे. **ह्या परंपरेचे आम्ही आज राखणदार आहोंत** ही जाणीव हिंदु व बौद्ध या दोघांनीहि राखली पाहिजे. आम्ही दोघे कसे वागतो, ह्या कडे सर्व जगाचे डोळे लागून राहिले आहेत. आपण या बाबतीत जगाची निराशा करणार नाहीं, ही निष्ठा दोघांनीहि उराशी बाळगली पाहिजे. तरच न्यायमूर्ती चॅन टून यांच्या संदेशांचा परिणाम आमच्यावर झाला, असें होईल; नाहींतर पालथ्या घागरीवर पाणी, असें होणार व दोघांच्याबद्दल असलेला परराष्ट्रांतील पूज्यभाव नाहींसा होणार! पण अशी आपत्ति आमच्यावर येणार नाहीं, अशी सामुदायिक सदिच्छा आपण बाळगूं या! "चेतना अहं भिक्खवे कम्मं वदामि"–इच्छा किंवा कार्य हेतु हेंच दुष्कर्म किंवा सुकर्म याच्या बुडाशी असणारें निर्णायक तत्त्व होय!

● ●

# महिन्यांतील महत्त्वाचें पण संक्षिप्त वर्तमान.

हंगेरीयन विद्वान् मिस्टर आर्थर कोएसलर यांनीं श्रीमत् शंकराचार्य, कांची कामकोटी पीठम्, मद्रास यांची जानेवारी दहा तारखेस भेट घेतली. त्यावेळीं मद्रास विश्वविद्यालयांतील संस्कृतचे प्रमुख डॉ. व्ही. राघवम् हे बरोबर होते. पाहुण्यांनीं श्रीना "धर्म आणि विज्ञान" "कर्माची कल्पना" "विज्ञान व तत्त्वज्ञान" "ज्ञानवृक्ष", "योग व मानसिक अवस्था", "चमत्कार" "नरक", वगैरे प्रश्न विचारून आपलें समाधान करून घेतलें. श्रीशंकराचार्यांनीं पुढें येऊन सर्वांची ज्ञानतृष्णा भागविली पाहिजे. श्रींनीं हें जें उदाहरण इतरांना घालून दिलें त्याबद्दल त्यांना नम्रतापूर्वक अभिवादन.

× × ×

३१ जानेवारीच्या 'मातृभूमींत' "ईश्वर प्राप्तीचे मार्ग" यावर एक विचारपूर्ण संपादकीय आलें आहे. "तुम्हाला ईश्वर भेटला का?" याची मीमांसा व शंकासमाधान त्यांत उत्तम रीतीनें केलेलें आढळेल.

× × ×

पुण्याच्या "तरुण भारतानें" हिंदू व बौद्ध राष्ट्रांची संघटना ही आजची निकड म्हणून न्यायमूर्ति चॅनटून यांच्या व्याख्यानावर केलेलें भाष्य वाचनीय आहे. भारतव्यापी संघटनेची गरज आज इतरांना मार्गदर्शन करून देईल, हेंच खरें."

× × ×

३० जानेवारी रोजीं सकाळीं बरोबर अकरा वाजतां भारतांतील हुतात्म्यांची स्मृति दोन मिनिटें पाळण्यांत आली. महात्मा गांधी हे सर्वांत मोठे हुतात्मे होत. कारण ते आमच्यापैकीं एकाच्या गोळीला बळी पडले. इतर हुतात्मे परकीयांच्या गोळ्यांना बळी पडले!

× × ×

१० डिसेंबर ते ११ जानेवारीपर्यंत मुंबई येथें क्रॉस मैदानांत कला उद्योगधंदे यांचें भव्य प्रदर्शन भरलें होतें. हें प्रदर्शन "सोसायटी ऑफ गुडवुइल अँड कल्चर" या संस्थेच्या विद्यमानें भरलें होतें. याचें उद्घाटन माहिती व प्रसिद्धीकरण खात्याचे मंत्री डॉ. बी. व्ही. केसकर यांनीं केलें. सर्वस्वी प्रेक्षणीय असेंच तें प्रदर्शन ठरलें.

× × ×

गांधीजींचें स्मारक मागील महिन्यांत मुंबई येथें डॉ. राजेन्द्र प्रसाद यांनीं केलें त्यावेळीं "गांधी स्मारक निधीनें" "गांधीजी आणि मणिभुवन" या नांवाची एक उद्बोधक पुस्तिका प्रसिद्ध केली आहे. तींत इ. स. १९१७ पासून ते इ. स. १९३४ पर्यंतचा मणिभवनाचा इतिहास वर्णन केला आहे. कारण तें वर्षे गांधीजींच्या मणीभवन येथील वास्तव्याचें शेवटचें वर्ष होय. राष्ट्रपित्याचें जें एकाकाळीं वसतिस्थान होतें, तेंच आज यात्रेचें ठिकाण होऊन बसलें आहे. मणिभुवनाची यात्रा सर्व देशभक्तांना, व स्वातंत्र्य व शांतता यांच्यासाठीं अविरत परिश्रान्त होणाऱ्या सर्व जागतिक बंधुभगिनींना आज स्फूर्तिस्थान झालें आहे!

× × ×

या वर्षीचा प्रजासत्ताक दिन फारच गाजला. सर्व जगभर त्याचा बोलबाला झाला. मुंबईत तर उत्साहानें उच्चांक गांठला. दिल्लीस तर मोंगल साम्राज्यांच्या वैभवाची साक्ष पटवून दिली!. जनतेनें बेफाम उत्साह दाखवला. सरकारनें या अफाट जन महासागराचा बंदोबस्त उत्तम प्रकारानें ठेवला होता. असंख्य विद्युद्दीपानीं मुंबई नगरी नटली होती. सडक्या कुचक्या विचारांना बुडवून टाकण्याचें मुंबई नगरीनें ठरविलें होतें! त्यामुळें **सर्वांनींच मुंबईच्या विद्युद्दीपांचा व रोषणाईचा सारखाच मनमुराद** आस्वाद घेतला! प्रजासत्ताक दिन खरोखरच उत्तम रीतीनें सर्वांनीं पाळला व त्याचें रहस्य उत्तम रीतीनें जाणलें. इतक्या वर्षांनीं हा दिन इतक्या योग्य रीतीनें सर्वांनीं साजरा केला!

× × ×

नागपूर–उमरेड निवडणूक चुरशीची झाली व त्यांत महाराष्ट्राचे पुराणपुरुष लोकनायक अणे निवडून आले! लोकमान्य टिळकांचे एकेकाळचे सहकारी, बिहारचे भूतपूर्व गव्हर्नर, विदर्भाचा अट्टाहासानें पुरस्कार करणारे लोकनायक अणे यांनीं यांत घसघशीत यश मिळविलें म्हणून त्यांचें अभिनंदन. महाराष्ट्राचा खरा धर्म राखून, कोणत्याहि परिस्थितींत निधड्या छातीनें उभे राहून यश जिंकणारा हा महापुरुष महाराष्ट्राच्या जुन्या पिढींतला आदर्श पुरुष होय. त्यांना आमचे नम्रतापूर्वक अभिवादन!

● ●

# मानवतेचीं प्रतीकें

## १ आदर्श बलिदान

१९२२ साल. पी. अँड ओ. कंपनीचं एक जहाज अचानक समुद्रांत बुडालं. त्यावेळीं एका वीर तरुणानं आत्मसमर्पण केल्याची ही कथा आहे.

ह्या तरुणाचं नांव जॉर्ज जेनर. तो जहाजावरचा एक अधिकारी 'लाइफ बेल्ट' (संरक्षककडें) गळयांत घालण्याच्या तयारींत होता आणि जहाजहि समुद्राच्या तळाशीं जाण्याच्या तयारींत होतें. समुद्रांत उडी मारणार तों त्याची दृष्टि जहाजावर असलेल्या एका हताश कुमारिकेकडे गेली. ह्या कुमारीकेचें नांव मार्गरेट. जॉर्जनें मार्गरेटच्या तोंडाकडं पाहिलं आणि तिची मनोव्यथा त्याच्या अंतःकरणाला चटकन् स्पर्श करून गेली. एकाच क्षणांत जॉर्जनें आपलें लाईफ बेल्ट गळयांतून काढून मार्गरेटच्या पुढं धरलं.

जार्ज०—भगिनी ! घे, हें बेल्ट गळयांत घाल !

मार्गरेट क्षणभर स्तब्ध राहिली. एका अपरिचित बाईसाठीं आत्मसमर्पणास सिद्ध झालेल्या त्या तरुणाकडे मार्गरेट आश्चर्यचकित दृष्टीनं पाहूं लागली.

मार्गरेट (आढेवेढे घेत)–नको, नको. हें बेल्ट तुमचं आहे. माझं काय व्हायचं असेल तें होईल.

जॉर्ज०—(तिच्या हरकतीला न जुमानतां) भगिनी, आतां मुळींच विलंब करूं नकोस. समुद्रांत उडी मार, परमेश्वर तुझं रक्षण करील. God save you! God help you!! असें म्हणत 'लाईफ बेल्ट' तिच्या गळयांत जॉर्जनं अडकविलेंहि !

मार्गरेट०—पण...आपण काय करणार ?

जॉर्ज०—माझी चिंता करूं नकोस ! मला पोहायला येत नाहीं. फिकट हास्य करीत जॉर्ज उद्गारला.

जॉर्जच्या ह्या उद्गारांनी मार्गरेट तर अधिकच आश्चर्यचकित झाली. आतां विचार करायला सवडच नव्हती. प्रत्येक क्षणाला जहाज समुद्रतळाच्या रोखानें खालीं खालीं जात होतें.

जॉर्जच्या सांगण्याप्रमाणें मार्गरेटनं समुद्रांत उडी मारली. दुसऱ्या दिवशीं बाहेरून आलेल्या मदतीच्या तुकडीनें मार्गरेटला वर काढलें. आणि जॉर्ज समुद्राच्या तळांत सामावला !

दुसऱ्यासाठीं आपल्या प्राणांचं बलिदान करणाऱ्या जॉर्ज सारख्या वीर पुरुषाबद्दल कुणाला धन्यता वाटणार नाहीं ?

मधुकांत भट्ट

## २ रमण महर्षि आणि मिशनरी

मिशनरी—(रागानें) आपल्याला म्हणे ईश्वरसाक्षात्कार झाला असून आपण रोज तीन तास एकांतांत त्यांच्याशीं बातचीत करीत असतां असं ऐकतों. हें पाखंड आतां आम्ही अधिक काल चालूं देणार नाहीं...भोळया भाबड्या जनतेची अशी दिशाभूल करणं, हें सर्वांत मोठं पाप आहे. हें पाप निर्मूलन करण्याचा संकल्प करून आम्हीं आपल्याकडे आलों आहोत. आपण आपला ईश्वर आम्हांला दाखवा, नाहींतर ही भोंदूगिरी आम्ही चव्हाट्यावर आणल्यावांचून रहाणार नाहीं.

महर्षि—(शांतपणें हंसत) भगवान आपल्याला शांति देवो ! आपण सकाळीं माझ्याबरोबर चला नि माझ्या ईश्वराचं दर्शन घ्या.

'महर्षींची भोंदूगिरी' चव्हाट्यावर येणार, या उत्साहभरांत मिशनऱ्यांना रात्रभर झोंप आली नाहीं नि भल्या पहांटेच ते आश्रमांत येऊन दाखल झाले. नित्यकर्म आटपून मिशनऱ्यांसमवेत महर्षि जंगलाकडे वळले. दोन मैल चालल्यानंतर नदीकांठीं असलेल्या एका झोपडीसमोर महर्षि थांबले. महर्षि झोपडींत गेले आणि चटईवर कुष्ठरोगानें पीडित झालेल्या दांपत्याला तैलमर्दनं करूं लागले. मालिश झाल्यानंतर त्या नवरा–बायकोला महर्षींनीं स्नान घातलं आणि खिचडी तयार करून खाऊं घातली.

हें अभिनव दृश्य बघून ते मिशनरी दगडासारखे स्तब्ध झाले. त्यांच्या डोळयांतून आनंदाश्रूंची नदी वाहूं लागली. रुद्ध कंठानं क्षमायाचना करीत ते म्हणाले,

"पूज्य महर्षि ! आमच्या अपराधांची क्षमा करा ! पुण्यशील लोकांनांहि दुर्मिळ असें आज आपण आम्हां अपराध्यांना दिलं आहे."

मिशनरी महर्षींना वंदन करून जेव्हां परत शहरांत गेले, तेव्हां ते आपल्या हयातीभर सद्गदित होऊन लोकांना सांगत कीं "त्या दिवशीं आम्ही या पृथ्वीवर ख्रिस्ताला सगुणस्वरूपांत पाहिलं !"

सुब्रह्मण्यशास्त्री



# गान्धी-सूक्ति-मुक्तावलि

(10) Truth to me is infinitely dearer than the Mahatmanship, which is purely a burden. It is my knowledge of my limitations and my nothingness which has so far saved me from the oppressiveness of the Mahatmanship. [4]

*

महात्मत्वात्प्रेयो भवति मम सत्यं न्वतितमां
न तद्भाराद्भिन्नं मम निजविशून्यत्वपरिधेः ।
स्वकीयानां सीम्नामथ परिचयो मे विहितवान्
महात्मत्वोत्पीडाभरपरिहृतिं यावदधुना ॥ ४ ॥

*

महात्मत्वापेक्षां प्रियतर मला सत्य अमित
मला माझ्या सीमा, परिसरहि तो शून्यविदित
मम ज्ञानानें या, गुरुतर महात्मत्व–जनित
हरूनी भारातें, मम अवन केलें अविरत ॥ (४)

*

(11) I am not aching for martyrdom, but if it comes my way in the prosecution of what I consider to be the supreme duty in defence of the faith I hold.........I shall have earned it. [9]

*

न यज्ञबलितां प्रति प्रयतते मनो मे हठात्
परन्तु पथवर्तिनी यदि भवेत् समाराधने ।
स्वधर्मपरिरक्षणे परतमस्य कार्यस्य सा
जनो गणयतां मया यदियमस्ति साध्वर्जिता ॥ ९ ॥

*

न यज्ञबलि व्हावया मन मदीय हें व्याकुल
स्वधर्मपरिरक्षणीं परमउच्चकार्यीं पळ ।
विरोध परि होऊनी, स्वबलिदान आवश्यक
दिसेल तरि तेंहि मी करिन, भाक घ्या मामक ॥ (९)

*

(12) I hope there is no pride in me. I feel I recognize fully my weakness. But my faith in God and His strength and love is un-shakable. I am like clay in the Potter's hands. [11]

*

न कोप्याशासेऽहं मयि वसति दर्पः परमहं
निजं दौर्बल्यं यत्सकलमवगच्छामि ननु तत् ।
ध्रुवा मे श्रद्धेशे दयनसहिते तस्य च बले
कुलालस्यामुष्याहमपि करयोरस्मि मृदिव ॥ ११ ॥

*

गमे माझ्या ठायीं वसति लवही गर्व न करी
असे दौर्बल्याची मजसि तशि जाणीवहि पुरी ।
स्थिरश्रद्धा माझी प्रभुंत परि, तत्प्रीतिबलि ही
करी कुंभाराचे जणु मृदुल मातीच तनु हि ॥ (११)

*

(13) I wear the same Corruptible flesh that the weakest of my fellow-beings wears, and am, therefore, as liable to err as any. [12]

*

तथा शरीरं मम दोषपात्रं
यथाऽ बलिष्ठस्य नरान्तरस्य ।
तस्मादियं मे प्रतिपत्तिरस्ति
यथापरो भ्रान्तिपरस्तथाहम् ॥ १२ ॥

*

दोषपात्र तनु लाभलि मातें
जेविं दुर्बल-तमा मनुजातें ।
थास्तव स्खलनशील तसा मी
जेविं मानव कुणी निजकामीं ॥ (१२)

*

(14) My life is an indivisible whole, and all my activities run into one another; and they all have their rise in my insatiable love of mankind. [14]

*

मदीयमायुर्ह्यविभाज्यमेकं
मिथः प्रसारप्रवणाः क्रियाश्च ।
प्रीतिर्नृ–वंशे मम या न शाम्या ।
सा मत्क्रियाणां च निसर्गमूलम् ॥ १४ ॥

*

हें मदीय अविभाज्य जीवित
मत्क्रिया तव परस्परीं रत ।
प्रीति मानविं अशाम्य मन्मनीं
त्या क्रिया उपजती तिच्यांतुनी (१४)

*

# ॥ कविसम्राट् श्री कालिदास ॥

लेखक-सर्व तंत्र स्वतंत्र विद्यामार्तंड प्रो. माधवाचार्य्य

केवल रस भाव आभास विभाव काल और प्रकृतिमात्र के ही चिन्तक नहीं थे प्रत्युत देश धर्म और समाज के कल्याण में भी सततरत रहा करते थे। भारत के वीर योद्धा आप की प्रेरणा से संगठित होकर आक्रान्ता विदेशियोंको परास्त कर प्रत्यावर्तित किया करते थे।

भगवती काली माता की कृपा से तीनों का ज्ञान था। वेद वेदाङ्ग दर्शन पुराण इतिहास भूगोल और अन्यविद्याएं आपके हस्तामलक के समान सदा सामने रहा करती थीं। कोई विषय ऐसा नहीं था जो आपकी दृष्टि से बाहिर हो; सर्वशक्तियुता भगवती की अपूर्वकृपा से आपको सबकुछ उपस्थित था।

सरस्वती भी आप पर पूर्ण कृपा करती थी। काव्यप्रतिभा आपके संकेत पर नृत्य किया करती थी। आप जो कुछ भावना में लाते सिद्ध पदार्थ ही होता था। यही नहीं आप सिद्ध कवि थे जिसका जैसा वर्णन करते वह पदार्थ वैसाही होता और हो जाता था। आप के विचार कभी अन्यथा नहीं होते थे। सत्य शब्द ब्रह्मके उपासक थे। यही भाषाके शब्दोंमें ओत-प्रोत होकर निकलता था। जो कहते थे वही होता था।

उज्जयिनी के अनन्याधिपति महाराजा विक्रमादित्य परमार की राज्य परिषद मात्र के ही रत्न नहीं प्रत्युत हृदयरत्न के रूप में भी आदृत थे। इनके असाधारण सभासद रह कर हमारे महाकविने–रघुवंश मेघदूत कुमारसंभव शकुन्तला विक्रमोर्वशीं ऋतुसंहार मालविकाग्निमित्र आदि काव्यरत्नों का संपादन किया था। इनमें अधिकांशतः देश धर्म और समाजका चिन्तन किया है। रस और प्रकृति चिन्तन के साथ भारत के नव्य और प्राचीन इतिहास को भी अमर बनाया है। आज उनकी रचना काल को दोहजार वर्ष से अधिक होते हैं फिर भी वह उस समय की तरह आज भी नूतन है। इसी तरह सदा नूतन रहेगी। कालिदास भी अमर हैं। क्यों कि कवि कभी नहीं मरता। किसी ज्ञाताने कहा है कि—

‘कविर्नित्यः कविर्नित्यः कविर्नित्यो न संशयः’

कवि नित्य है नित्य है, नित्य है इस बात में किसी प्रकार का भी संदेह नहीं है। केवल नित्य ही नहीं किन्तु–कविसम्राट् कालिदास–साहित्यिक जगतके देदीप्यमान सूर्य हैं। जहा कहीं साहित्य विद्यमान है। कालिदास की सरस किरणें वहां निरन्तर व्याप्त हैं। संसार का ऐसा कोई भी देश या प्रान्त नहीं हो सकता जहां साहित्य हो और हमारे महाकविका प्रकाश न हो। काव्य साहित्य जगत सर्वत्र कालिदास की किरणों से कृतकृत्य है।

आज हम देख रहे हैं कि–विदेशों के साहित्यप्रेमी अपने राष्ट्रिय कवियोंको कालिदास से तोल रहे हैं। जिस किसी भी विषय में थोडासा भी साम्य पा जाते हैं तो वे फूले नहीं समाते समझने लग जाते हैं कि–हमारा कवि कालिदास की कोटि में पहुँच गया।

कविता के तीन हेतु हैं–प्रथम कवित्व के बीजरूप संस्कार चाहिये इसे लोग प्रतिभा कह कर स्मरण करते हैं। इसके साथ लोक और शास्त्रों के अवेक्षण के कारण उभयत्र निपुणता भी होनी चाहिये। महाकवियों की सेवा कर उनके पास अभ्यास भी करना ही चाहिये।

कालिदास कवि होने के साथ लोक निपुण प्रतिभाशाली महाविद्वान भी थे। इस कारण केवल प्रतिभा या अन्य किसी एक वस्तु पर कविता करने वाले उन्हें कभी नहीं पा सकते।

यही कारण है कि–दूसरे कवि कालिदास की तुलना में समता नहीं पा सके हैं। न इष्ट शून्य एकोपकरण वाले कवि पा ही सकते हैं।

यह सच है कि—आज ये अमर कवि होते हुए भी स्थूल शरीर से इस भूमिपर नहीं हैं। हम उनके स्थूल देह को हजार प्रयत्न करने पर भी इन चरम चक्षुओं से देख नहीं सकते। वे महाकाल के भी आराधक थे। उनके आराध्य महाकाल के सूक्ष्म रूप समयने उसे हमारी आँखों से ओझल कर दिया है। अतः वह अब केवल ध्यानगम्यही हैं।

फिर भी उनका यश और काव्यमय देह आकल्प जीवित रहेगा। ये दोनों देह वर्तमान में विराजमान हैं। भविष्य में भी विराजमान रहेगें। इनमें कालकी गति नहीं है।

कवि कृष्णरायने इसका अनुभव लिया था इसी कारण वे कह उठे थे कि—

> ‘वाल्मीकीमिव सभासम्,
> यशः शरीरेण सर्वदा सन्तम्।
> रसवद् वचनविकासम्,
> नमत कविं कालिदासं तम्॥’

महाकवि कालिदास भलेही स्थूल शरीर से हमारे बीच न रह रहे हों किन्तु–वे यशरूपी शरीर से सर्वदा सर्वत्र विद्यमान हैं। यश भी सामान्य नहीं, वाल्मीकि रामायण के यश के समान स्वयं स्वतः ही देदीप्यमान है। इनके काव्यों में अपने अपने स्थान पर सभी रस प्रतिष्ठित एवम् व्यंजना से प्रतीत होते हैं। कही रसाभास का प्राधान्य नहीं मिलता है।

ऐसे कवि सम्राट कालिदास को हमें सदा श्रद्धापूर्वक प्रणाम करनी चाहिये।

श्लोक के ‘सभास’ का दूसरा अर्थ यह भी हो सकता है कि—आप तो वाल्मीकि के समान अजरामर हैं। अपने प्रताप से भास को भी जीवित रख रहे हैं।

आपने अपने नाटक में अपने से पूर्वका प्रतिष्ठित कवि भास माना है, इस कारण लोग भास को भी कालिदास के कथन के अनुसार यशस्वी

बनाये हुए हैं। अन्यथा भास की इतनी प्रतिष्ठा न होती जितनी कि — कालिदास के उल्लेख के कारण हुई।

भर्तृहरि ने कहा है कि—

'जयन्ति ते सुकृतिनो रससिद्धाः कवीश्वराः।
नास्ति येषां यशःकाये जरामरणजं भयम् ॥

उन रससिद्ध कवीश्वरों की विजय हो जिनके कि–यश रूपी शरीरमें जरा और मरण का भय नहीं है। भर्तृहरि केवल विद्वान् ही नहीं अपितु योगी और त्यागी विद्वान थे। उनका कथन कालिदास के विषय में भी अक्षरशः सत्य है। इस सत्य को कृष्णरायनें देखा इनके सिवा अन्य–लब्धप्रतिष्ठ प्राचीन कवियोंने भी कालिदासजीके गुण गायें हैं। उदाहरण के रूप में कुछ महा कवियों को दिखाता हूं।

महाकवि–बाणभट्ट–संस्कृत जगत के परम प्रसिद्ध कवि हैं। आपने कादम्बरी नामक एक विचित्र और महा उपन्यास लिखा है। इसकी समता का आज तक कोई उपन्यास नहीं लिखा गया। यह इस जगत में यहां तक प्रतिष्ठित हुआ है कि–महाराष्ट्र में तो उपन्यासों को सामूहिक रूप से कादम्बरी कहते हैं।

इनका दूसरा प्रसिद्ध ग्रन्थ हर्षचरित भी है यह भी अत्यन्त प्रतिष्ठित है।

आप कान्य कुब्जाधिप हर्षवर्धन के राज्य कवि थे। इसी कारण पाश्चात्य विवेचक ६०६ से लेकर ६४८ तक इन का समय मानते हैं।

इन्होंने कालिदास के विषय में कहा है कि—

'निर्गतासु न वा कस्य कालिदासस्य सूक्तिषु।
प्रीतिर्मधुरसान्द्रासु मञ्जरीष्विव जायते॥'

जो काव्यों के रसास्वादको आप ही बताएं कि कालिदास की सूक्ति में किसका प्रेम न होगा। कौन नहीं चाहता रसभरी परिपूर्ण मंजरी को। सभी इसके चाहनेवाले होते हैं। इसी प्रकार कालिदास की कविता को सभी चाहते हैं।

किसीने बाण कवि की पूर्वोक्त कविता को निम्न लिखित अक्षरों में कहा है कि —

'निर्गतामलवाक्यस्य, कालिदासस्य सूक्तिषु।
प्रीतिर्मधुरसार्द्रासु, मञ्जरीष्विव जायते॥'

कालिदास के वाक्य सदा ही निर्मल निकले हैं। इस कारण रसभरी परिपूर्ण मंजरी के समान सबका प्रेम कालिदास की सूक्तिपर हो जाता है।

बाण और इस में इतना ही आदर है कि–बाणने प्रशंसा में भी कवित्व भर दिया है। यहां उसमें सरलता की गई है। दोनों के पदार्थ प्रतिपादन में कोई अन्तर नहीं है।

कालिदास और अन्य कवियों में कितना अन्तर है जिसके कारण बाण सरीखे महाकवि भी कालिदास की प्रशंसा करते थे। इस पर कृष्ण कवि कहते हैं कि—

'कवयः कालिदासाद्याः कवयो वयमप्यमी।
पर्वते परमाणौ च पदार्थत्वं प्रतिष्ठितम्॥'

कालिदास आदिक भी कवि हैं और हम भी कवि हैं। ठीक है! परमाणु और पर्वत दोनोंमें ही पदार्थत्व रहता है। पर कहां अणु और कहां पर्वत, इसी प्रकार कहां कालिदास जैसे सरस्वती के पुत्र, और कहां किसी प्रकार अक्षरजोड लैनेवाले हम जैसे कवि, दोनों में अणु और पर्वत का अन्तर है।

अपने समय के परम प्रसिद्ध कवि—

गोवर्धनाचार्य ने भी कालिदास के विषय में कहा है कि—

साकूत मधुर कोमल विलासिनी कण्ठ कूजित प्राये।
शिक्षा समयेऽपि मुदे रतलीला कालिदासोक्ती॥

एकान्त के समय विदग्ध विलासिनी अपने कोमल कण्ठ के प्रेरक कूजित से विशेष प्रकार समझाती हुई आनन्द देती है इसी प्रकार कालिदास की कविता कामिनी भी आनन्द देती है।

इस प्रकार कालिदास की कविता कामिनी प्रशंसा करने वाले उक्त आचार्य साधारण नहीं प्रत्युत इतने बड़े कवि थे; जिनकी कि–प्रशंसा गीत गोविन्दकार जयदेव ने भी की है।

ये वंगदेश के अधिपति लक्ष्मणसेन की सभा के महारत्न थे।

किसी कवि को कालिदास की काव्य कला देख कर जब अपना ध्यान आया है तो वह स्वयं कह उठा है कि —

'वयमपि कवयः कवयः कवयोऽपि च कालिदासाद्याः।
दृषदोऽपि भवन्ति दृषदः, चिन्तामणयोऽपि हा दृषदः॥'

हम भी कवि हैं और कालिदास आदिक भी कवि हैं। पत्थर भी पत्थर होता है और दुख है कि–चिन्तामणि भी पत्थर हुआ करती है।

जितना अन्तर चिन्तामणि और दूसरे पत्थरों का है। ठीक उसी प्रकार हमारी कविता और कालिदासादिकों की कविता में अन्तर है। हमारी कविता पत्थर और कालिदास की कविता चिन्तामणि है।

राजा पुलकेशी के समय मे राजकुमार रविकीर्तिनें वीजापुर जिले के अय्यावोले गाम में जिन मंदिर बधाया था। उसके शिला लेख में लिखा है कि—

'येनाऽयोजि नवेऽश्मस्थिरमर्थविधौ विवेकिना जिनवेश्म—
स विजयतां रविकीर्तिः कविताश्रित कालिदास–भारविकीर्तिः।'

जिस प्रकार कविता के सहारे कालिदास और भारवि की कीर्ति विजय पा रही है इसी प्रकार रविकीर्ति की विजय हो जिस विवेकी ने अपने धनसे जिनेन्द्र का नया मंदिर बनवा दिया। पुलकेशी का समय ६३४ या ३५ है। इस समय कालिदास इतने प्रसिद्ध थे कि–उनकी कीर्ति उपमा में काम में लायी जाती थी।

यह कालिदास तथा उनकी कविता का वैशिष्ट्य है। इसे आशीर्वाद के रूप में भी चाहा गया है।

गीत गोविन्दकार जयदेव ने कालिदास को कविकुल गुरु कह कर स्मरण किया है एवम् इन्हें कविता कामिनी का विलास माना है। ये प्रसिद्ध कवियों से कविता कामिनी प्रस्तुत करते हुए कहते हैं कि—

यस्या चोरश्चिकुरनिकरः कर्णपूरोमयूरः ।
भासोहासः कविकुलगुरुः कालिदासो विलासः ॥
हर्षो हर्षो हृदयवसतिः पञ्चावणस्तु वाणः ।
केषां नैषा कथय कविता कामिनी कौतुकाय ॥

बताओ लोगो ? यह कविता कामिनी किसे आनन्द के कौतुक में निमग्न नहीं, करती । सभी को अपूर्व चमत्कार देती है। चोर इस के सुन्दर सुहावनेवाल, मयूर कर्णपूर, भासहास, हर्ष हर्ष, पंचवाण वाण और कविकुल गुरु कालिदास विलास है।

यहां जयदेवने कालीदास को विलास बताते हुए सबसे मुख्यता दी है। क्यों कि-' कामिनी के शरीर में विलास ही प्रधान है।' इसी प्रकार उल्लिखित कवियों में कालिदास ही प्रधान है। मम्मट—का साहित्य का प्रसिद्ध ग्रन्थ काव्य प्रकाश है। इसे पाश्चात्य विद्वान ईसाकी ग्यारहवीं सदी का मानते है।

इस में काव्य के प्रयोजन बताते समय सर्व प्रथम कहा है कि—
'काव्यं यशसे— काव्य यश के लिये किया जाता है। इसपर टीका करते हुए स्वयं लिखते हैं कि—

'कालिदासादीनामिव यशः ।

जिस प्रकार काव्य से कालिदास आदि महा कवियों को अविनाशी महा यश मिला। इसी प्रकार जो जैसा काव्य बनाते हैं उन्हें वैसा ही यश भी मिलता है।

यहां मम्मटने सर्व प्रथम कालिदास को गिनाया है इससे विदित होता है कि—कालिदास का कवियों में इस समय तक अग्रस्थान बराबर बना रहा।

आज भी उनका वही स्थान है। उनके इस स्थान को अब तो किसी के द्वारा छिनाना भी असंभव है। यह है कवि के यशोमय देह का नित्यत्व जिसे न कोई मिटा सकता है। न मिटा ही सका है कवि यशोमय देह से आज भी विद्यमान हैं एवम् सदा रहेंगे।

कविका दूसरा देह —

काव्य है। कवि अपनी सारी मानसिक भावनाओं को काव्य के रूप में विश्व के सामने रख देता है। वह जैसे स्वभाव का रहता है। उसका काव्य भी वैसा ही रहता है।

वाल्मिकिने तपस्वी सर्वगुण सम्पन्न सर्वोत्तम मर्यादा पुरुषोत्तम भगवान राम को अपने काव्य का नायक चुना क्योंकि—ऋषिगण शास्त्रीय जीवन चाहते हैं।

कालिदास ने भी रघुवंश को ही चुना। उनके रसिक हृदय नें रस में भी अव्यवस्था नहीं चाही । शृंगार भी मर्यादा प्रधानही रहा। उनके प्रत्येक पद्य से देश धर्म और समाज का मार्गदर्शन होता है।

कालिदास कब हुए।

यह प्रश्न हमारे सामने उपस्थित हो सकता है। हमें ही उसका उत्तर भी खोजना चाहिये। निःस्वार्थ सेवक कालिदास को इसकी आवश्यकता नहीं थी कि—वे हमारे लिये परिचय भी स्फुट रूपसे लिख जाते। पहिले लोग बडे परमार्थी थे। वे बड़ेबडे कार्य्य करना चाहते थे किन्तु उनके प्रतिफल के रूप में अपनी पूजा नहीं चाहा करते थे।

कभी किसीने कहीं लिख दिया हो तो लिख दिया हो नहीं तो उनका परिचय भी ध्वनिगम्य ही रहा है। कालिदास के काव्य में भी जो समय बोधक संकेत हैं उनसे हमें जान लेना चाहिये। हम कालिदास के समय आदि के जानने की चेष्टा करें तो उनके ग्रन्थों से जान सकते हैं।

काशी हिन्दु विश्व विद्यालय के अपने समय के हिन्दी विभाग के अध्यक्ष पं. केशव प्रसादजी के समीप 'अभिज्ञान शाकुन्तलम्' की एक-हस्त लिखित प्रति मिली है। यह अगदन सुरी ५ सं १६१४ की लिखी हुई है।

'आर्य्ये रसभाव विशेष दीक्षागुरोः विक्रमादित्यस्य साहसांकस्य इयं परिषत्। अस्याञ्च कालिदासप्रयुक्तेन अभिज्ञानशाकुन्तलेन नाटकेन उपस्थातव्यमस्माभिः।

अयि आर्ये यह सभा साहसांक विक्रमादित्य की है। आप जानती हैं कि महाराज वीर विक्रमादित्य रस भाव आदिकों की विशेषताओं को समझानेवाले हैं। बड़े बड़े विद्वान आप के पास आकर इनका मर्म समझते हैं। यह सभा किसी साधारण विद्वान की नहीं है इस कारण कालिदास के बनाये हुए अभिज्ञान शाकुन्तल नाटक से हमें इसका उप-स्थान करना चाहिये। यह बात सूत्रधार प्रधान नटी से कहता है।

इससे प्रतीत होता है कि-अभिज्ञान शाकुन्तल प्रथम विक्रमादित्य की सभा में खेला गया था। कालिदास विक्रमादित्य के इतने मान्य विद्वान थे कि-' उनका नाटक बहुमान के साथ उनके दरबार में खेला जाता था।

उदाहृतपाठ जीवानन्द विद्यासागर की १९१४ की प्रति में भी उपलब्ध है।

मेरे सामने S. C. De (I. E. S. retd) का Kalidasa and Vikramaditya ग्रन्थ है। इसमें भी मैं इस अवतरिणा को देख रहा हूं। यह संस्करण भी मार्च १९२८ का है।

ग्रन्थकारने अवतरणिका का अंग्रेजी में अर्थ कर के कहा है कि—

From the above we find that Kalidasa, the dramatist, flourished in the reign of Vikramaditya.

ऊपरके प्रमाण से प्रतीत होता है कि—अभिज्ञान शाकुन्तल आदि प्रसिद्ध नाटकों के लेखक कालिदास विक्रमादित्य के समय में हुए थे एवं वे उन्ही के दरबार में रहते थे।

योगी अरविन्दजी ने 'कालिदास' यह ग्रंथ अंग्रेजी में लिखा है। इसके ११ वे पृष्ठ में आप कहते हैं कि हमारी सभ्यता और सदाचार के प्रतीक भगवान वेद व्यास और महर्षि वाल्मीकि के समान ही कवि सम्राट् कालिदास हैं।

पर दुख है कि-हम जितना व्यास और वाल्मीकि के विषय में जानते हैं उतना भी कवि सम्राट् कालिदास के विषय में नहीं जानते।

कालिदास कवि हुए और अपने काव्य किसके आश्रय में लिखे ? इस प्रश्न का उत्तर देते हुए आप कहते हैं कि—

And wrote under the patronage of the Great Vikramaditya, who founded the era of the Malava and in the middle of the first century before Christ.

जिस महा विक्रमादित्यने ईसा के ५८ वर्ष पहिले अपना मालव संवत् चलाया था। इन्हीं पर दुख भंजक महाराजा वीर विक्रमादित्य की छत्रछाया में रह कर कवि सम्राट् कालिदास ने मेघदूत रघुवंश आदि काव्यों की रचना की थी।

यहां योगी अरविन्द ईसा से ५८ वर्ष पहिले विक्रमादित्य और कालिदास दोनों को मान रहे हैं। कालिदास को केवल कवि के रूप में नहीं, किन्तु वाल्मीकि और व्यास की कोटि में भी रख रहे हैं। इनके इस कथन से अन्य विक्रमादित्यों के समय का निराकरण होता है।

कालिदास शकारि विक्रमादित्य के आश्रित थे।

यह वस्तु राजशेखरजीने स्पष्ट कर दी है। ये कहते हैं कि–

हालेनोत्तमपूजया कविवृषा श्रीपालितो लालितः।
ख्यातिं कामपि कालिदासकवयो नीताः शकारातिना॥
श्रीहर्षो विततार गद्यकवये वाणाय वाणीफलम्।
सद्यः सत्क्रिययाभिनन्दमपि च श्रीहारवर्षोऽग्रहीत्॥

महाराजा शातवाहन हालने उत्तम मान सम्मान के साथ श्रेष्ठ कवि श्रीपाद की सेवा की। शकाराति विक्रमादित्यने कालिदास का भी अमर यश कर दिया। एक कवि को काव्य के लिये जो आदर मिलना चाहिये वह श्रीहर्ष राजाने वाण भट्ट को भी दिया। श्रीहार वर्ष को भी अपनी कविता का फल शीघ्र ही मिल गया।

राज शेखर के इस कथन से प्रतीत होता है कि–शकादि विक्रमादित्य की राजसभा में कालिदास रहते थे। येही कालिदास के विश्व व्यापी यश के कारण थे।

शकादि विक्रमादित्य विक्रम संवत् संस्थापक के रूप में प्रसिद्ध हैं। इन्हों ने ईसा के सन ५८ वर्ष पहिले अपना संवत् चलाया था।

मालविकाग्निमित्र भी कालिदास के काल पर प्रकाश डालता है। गुप्तवंश के अन्तिम सम्राट बृहद्रथ को समाप्त कर शुंग गोत्रिय सेनापति पुष्यमित्र ने ईसवी से १८४ वर्ष पूर्व अपने वंश के साम्राज्य की नीव डाली थी। इनके पुत्र का नाम अग्निमित्र था। इनकी निजी स्वतंत्र राजधानी विदिशा (भेलसा) थी।

पुष्यमित्र ने वैदिक धर्म की स्थापना की थी। अश्वमेध यज्ञ भी किया था।

कालिदासने मालवा के राजा माधव सेन की बहन मालविका नायिका और विजयी सेनापति पुष्य मित्र के पुत्र अग्निमित्र को नायक चुनकर पूर्वोक्त नाटक बनाया है।

नायक का समय कवि के समय के पास ही होता है। क्यों कि–विक्रम का संवत् ईसा के सन से ५८ वर्ष पहिले प्रारंभ होता है।

कालिदास इसकी अवतरणिका में अपने समय से पहिले के कवियों का भी उल्लेख करते हैं कि—

"प्रथितयशसां भास सौमिल्लक—
कविपुत्रादीनाम् प्रबन्धानतिक्रम्य
वर्तमानकवेः कालिदासस्य
क्रियायां कथं बहुमानः।"

जिनकी कीर्ति दिगदिगन्तों में व्याप्त है ऐसे प्राचीन कवि भास सौमिल्लक और कवि पुत्रादिकों के नाटकों के छोडकर वर्तमान के कवि कालिदास की कृति का बहुमान क्यों?

इस से विदित होता है कि–उदाहृत कवि गण कालिदास से पूर्व के एवम् लब्ध प्रतिष्ठ हैं।

इसके साथ इसकी यह भी ध्वनि निकलती है कि–इनके नाटकों से खेला जानेवाला कालिदास का नाटक अच्छा है। आज भास के नाटक प्रसिद्ध हो चुके हैं। दोनों के नाटकों पर विचार किया जा सकता है यहां कालिदास का दावा अपने नाटकों को उनसे अच्छा सिद्ध करना है। अनेक दृष्टियों से यह नाटक अच्छा है।

मालविका के परिणय के समय के समय ही वसुमित्र नामक वीर पुत्र की विजय की सूचना देनेवाला पिता पुष्पमित्र का पत्र भी अग्निमित्र को प्राप्त होता है कि—सिन्धु के दक्षिणी किनारे पर यवनों ने अश्वमेध के अश्व को रोका किन्तु एक महायुद्ध के पश्चात् वसुमित्र ने उनसे घोड़ा जीत लिया।

इससे यह सूचित होता है कि—यह एक ऐतिहासिक घटना समीप ही घटी।

यों तो कालयवन का आक्रमण कृष्ण के समय में ही हो गया था। यह यूनान का राजा था। इसकी पुत्री कंस को विवाही थी। इससे विदित होता है कि—यूनान भी आर्य देश था। इनके आक्रमण कालयवन तकही सीमित नहीं रहे बराबर चलते रहे। जब इन्हें अवकाश मिला भारतपर चढ़ दोड़े।

शुंगवंश ब्राह्मण था। इसके समय में वैदिक धर्म की अच्छी उन्नति हुई। इन्होंने वैदिक संस्कृति और राष्ट्रभाषा व संस्कृत की अच्छी सेवा की स्वतंत्रता की रक्षा की।

इनके इतिहास में लिखा मिलता है कि–इन्होंने ग्रीक कावल आदि के आक्रमणकारी लोगों को भारत से निकाल दिया। इनके राज्य में अन्य धर्मावलम्बियों का भी अच्छा आदर था। बौद्ध भिक्षुक भी सम्मान से देखे जाते थे।

पश्चिम के विद्वान और आर्य इतिहास–ये दोनों वस्तु परस्पर प्रतिद्वन्दी रही हैं। पश्चिमी विद्वान उस जाति के थे जिसने भारत को पददलित किया। तो इन्हों ने भारतीय साहित्य पर आक्रमण किया। यदि मैं सीधे शब्दों में कहूं तो यह कह सकता हूं कि–सैनिक विदेशियों ने भूमि पद दलित की तो बुद्धिजीवी विदेशीयों ने भारत के उच्च साहित्य और संस्कृति पर आक्रमण किया।

पाश्चात्य अन्वेषकों का एक ही सिद्धान्त रहा कि–जितना भी खींचा जा सके भारतीय महा पुरुषों को उनके धर्म को और साहित्य को नीचा खींचा जाय। वश? जिस किसी पाश्चात्त्य विद्वान ने प्रयत्न किया है तो यही किया है।

भारतीय विद्वान धन और बलकी न्यूनता के कारण प्रभुओं के मुखापेक्षी बन गये। कुरसी पर विराजे हुए साहिब वहादरों के वाक्यों को

वेद से भी अधिक प्रामाण्य मानने लगे। 'जो साहिब फरमाते हैं सब ठीक ही ठीक फरमाते हैं।' इसी धारणा पर चलने लगे। क्योंकि इसी में उनका स्वार्थ था।

जिस सभ्यता को करोडों वर्ष बीतते हैं। उसका इतिहास, लाखों का भी नहीं छोडा। हमने भी अपने बापदादों को कोस कर उपाधियां प्राप्त कीं। आज हम स्वतंत्र हो गये पर ढांचा हमारा वहीं है।

दूसरे शब्दों में कहूं तो यह कह सकता हूं कि-बादशाहों के नामाओं को लिखनेवाले लोगोंने-सिंहलद्वीप में आजसे सात आठ हजार वर्ष पहिले बाबा आदम की उत्पत्ति मानी एवम् यहीं से मानवसृष्टि का प्रारंभ भी माना। हमारे पश्चिम के शाहों की जाति के विद्वानों का भी यही ढंग रहा। ये भारतीय साहित्य की प्राचीनता न सह सके। जहांतक इनसे हो सका पीछे खींचने की चेष्टा की है। दुख है कि-भारतीय स्कालर अंग्रेजी के माध्यम और अंग्रेजों की दृष्टि से भारतीय साहित्य को देखते हैं स्वतंत्र दृष्टि से नहीं रखते।

मल्लिनाथजी के सामने कालिदास की पूरी जीवनी थी। ये महाकवि के काव्यों के ही मर्मज्ञ नहीं प्रत्युत कवि की आन्तरिक जीवनी के भी मर्मज्ञ थे।

इन्होंने मेघदूत के १४ वे श्लोक की टीका में लिखा है कि—

'निचुलो नाम महाकविः कालिदासस्य सहाध्यायी
परापादितानां कालिदास प्रबन्ध दूषणानां परिहर्ता।'

निचुल नामक महाकवि कालिदास के सहपाठी थे। ये कालिदास से इतना स्नेह रखते थे कि-जो कोई कालिदास की कृति में किसी प्रकार का दूषणाभास दिखाते थे ये उनके मुखों को बन्द कर दिया करते थे। अतः कालिदास ने इनका श्लेष से निर्देश किया है।

दिग्नागाचार्य- कालिदास के सामयिक प्रतिपक्षी थे। ये भी हमारे विज्ञ टीकाकार मल्लिनाथ के दृष्टि से बाहिर नहीं थे। यही कारण है कि-मेघदूत के १४ वे श्लोक की टीका में मल्लिनाथजी ने इनका प्रसंग उठाया है कि—

'दिग्नागानाम्'-'पूजायां बहुवचनम्' दिग्नागाचार्य्यस्य कालिदास-प्रतिपक्षस्य, हस्तावलेपान्-हस्तविन्यासपूर्वकाणि दूषणानि परिहरन्।

'दिग्नागानाम्' यहां षष्ठीबहुवचन दिग्नाग की प्रतिष्ठा के कारण दिया है। क्यों कि-'दिग्नाग आचार्य्य हैं उन्हें बहुमान से ही स्मरण करना चाहिये। इनका काम रहता था कि-ये कालिदास की कृतियों का खण्डन हाथ नचका, नचका कर किया करते थे।'

ये बौद्धाचार्य्य-वसुबन्धु के शिष्य थे। इनके ग्रन्थों का चीनी भाषा में अनुवाद हुआ है। यह अनुवाद सन ४०४ का है।

पहिले आज के समान साधन नहीं थे। चीन तक जानेके लिये यथेष्ट समय चाहिये। इसमें कुछ वर्षों का लग माना कोई कठिन बात नहीं है। अश्वघोष के बुद्ध चरित्र की शैली कालिदासकी शैली से मिलती हुई एवम् कविता उतरती हुई है। क्यों कि—अनुकरण में असलके तत्त्व नहीं आ सकते। इससे विहित होता कि—कालिदास अश्वघोष से पूर्व के थे। लोग इनका समय कनिष्क का समय मानते हैं। प्रतीपी का कनिष्क ७८ सन में हुआ था।

कालिदास परीक्षक भी थे। इनके समय में उज्जैन और पटना दो स्थलों पर विद्वानों की परीक्षाएं हुआ करती थीं। इन में उज्जैन के केन्द्र में कालिदासजी की परिषद परीक्षा लेती थी। यह राजशेखर ने बताया है। ये कहते हैं कि—

'श्रूयते च उज्जयिन्यां काव्यकारपरीक्षा'

हम परंपरागत सुनते हैं कि-उज्जयिनी में कवियों की परीक्षा हुआ करती थी। यहां परीक्षा लेनेवाले—

'इह मेण्ठावत्रामर रूपसूर भारवयः'
हरिश्चन्द्र चन्द्रगुप्तौ परीक्षितौ इह विशालायाम्।'

मेण्ठ अवत्र अमर रूपसूर और भारवि थे। इन्हों ने विशाला में हरिश्चन्द्र और चन्द्रगुप्त की परीक्षा ली थी। इससे विदित होता है कि-हमारे महाकवि का सम्बन्ध उज्जैन से था। पटना से नहीं था।

कालिदास के मत का उल्लेख—भी हम काव्य मीमांसा में देखते हैं। इन का कहना है कि—

'न' इति कालिदासः। पृथगेव हि कवित्वाद् भावकत्वम्, भावकत्वाच्च कवित्वम्, स्वरूपभेदाद् विषयभेदाच्च"

कवित्व और भावकत्व ये दोनों भिन्न भिन्न वस्तु हैं। कविता करने की प्रतिभा तथा अन्य कारणों से कवित्व होता है। काव्य किये जाते हैं। किसी भावना की विशेषता से काव्यों का मर्म जाना जाता है। करना और जानना ये दोनों एक नहीं हो सकते। क्यों कि—इनके विषय में भी भेद है तथा दोनों के स्वरूप भी भिन्न हैं।

यह-मतप्रतिपादन भी कालिदास के अस्तित्व का साक्षी होता है। यह उल्लेख काव्यमीमांसा के 'शिष्य प्रतिभे' प्रकरण में आता है।

कवि के काल का काव्य पर असर पडता है! जब कविको आवश्यकता पडती है अपने काल के पदार्थों का उपयोग कर लेता है। कवि के अनुभव तो सदाही उसके काम में आते रहते हैं।

रघु की दिग्विजय के समय जिन पदार्थों का वर्णन कालिदास ने किया है वे कालिदास की ज्ञप्ति के भीतर होने चाहियें।

दिशि मन्दायते तेजो दक्षिणस्यां रवेरपि।
तस्यामेव रघोः पाण्ड्याः प्रतापं न विषेहिरे॥

जिस दक्षिण दिशा में सूर्य्य का भी तेज मन्दा पड जाता है। ऐसी प्रतापी दक्षिण दिशा है। इसी दिशा में पाण्ड्य वंश भी राज्य करता है। ये रघु के प्रताप को न सह सके।

कालिदास पाण्ड्य को स्वयंवर में भी नहीं भूले हैं। आपने वेत्रहारी के मुख से इसके विषय में कहलाया है कि—

'पाण्ड्योऽयमंसार्पितलम्बहारः
क्लृप्तांगरागो हरिचन्दनेन।
आभाति बालातपरक्तसानुः,
सनिर्झरोद्गार इवाद्रिराजः।'

देख यह वैष्णव पाण्ड्य राजा है। इसके कन्धे पर तो लम्बा हार पडा हुआ है और शरीर में हरिचन्दन लगा हुआ है। यह इस समय ऐसा

प्रतीत होता है मानो पूर्वांचल की शिखर पर प्रातःकालीन सूर्य्य की बाल-किरणें पड रहीं हों।

पारसीकान्–ततो जेतुं प्रतस्थे स्थलवर्त्मना।
इन्द्रियाख्यानिव रिपून्–तत्वज्ञानेन संयमी ॥ ४–६०

इसके पश्चात् परम प्रतापी रघु ने अपनी विजय वाहिनी के साथ स्थलमार्ग से पारस को जीतने के लिये इस प्रकार प्रस्थान किया जिस प्रकार कि—एक संयमी तत्वज्ञान से इन्द्रियों को जीतने चलता है।

यवनी मुखपद्मानां सेहे मधुमदं न सः।
बालातपमिवाब्जानामकालजलदोदयः ॥ ४—६१

जिस प्रकार असमय में उठी मेघमाला से, प्रभात की मन्द मन्द धूप में कुछ कुछ खिले हुए कमलों के पुष्पों की चमक या शोभा चली जाती है इसी प्रकार बालादित्य रघु के आकस्मिक आक्रमण से मदिरा के मद मे मत्त हुई एवम् मुख से दुर्गन्धि उडानेवाली यवनियों के मुखकमल मुरझा गये उनके पद्माननों की सारी चमक चली गयी।

संग्रामस्तुमुलस्तस्य पाश्चात्यैश्चाश्वसाधनैः।
शार्ङ्ग कूजितविज्ञेय प्रतियोधे रजस्यभूत् ॥ ४–६२ ॥

इन पाश्चात्यों के पास वेगवान् शक्तिशाली घोडे थे। इनकी टापों से इतनी धूल उडी कि–आकाश में अन्धकार छा गया। उस समय एक दूसरे को धनुष की टंकार से ही जान सकता था।

भल्लापवर्जितैस्तेषां शिरोभिः श्मश्रुलैर्महीम्।
तस्तार सरघाव्याप्तैः स क्षौद्रपटलैरिव ॥ ४–६३ ॥

घुडसवार यवनों के शिर मुख आदि पर गहरी दाढी मूछें थीं। रघुने इनके शिर काटकाट कर भूमि पाट दीये शिर जमीन पर पड़े हुए ऐसे लगेंते थे–मानों मधुमक्खियों से भरे हुए छत्तों से पृथ्वी पटी पडी हो।

जो जीवित बचे उन्होंने अपने लोहे के टोप उतारकर रघु के चरणों में रखकर उसकी कृपा से जीवनदान पाया। महापुरुषों की कृपा उनकी शरण में जानेपर अवश्य प्राप्त हो जाती है। ४–६४ यहां से रघु उत्तर की उत्तर की ओर उड़ा।

तत्र हूणावरोधानां भर्तृषु, व्यक्तविक्रमम्।
कपोलपाटलादेशि बभूव रघुचेष्टितम् ॥ ४–६८

यहां पहुंचकर रघुने वह पुरुषार्थ दिखाया कि—हूणों के अन्तः-पुरोंने अपने इतने शिर पीटे कि—उनके चमकने कपोल भी लाललाल होकर रघु के पराक्रमों की साक्षी देने लगे।

उद्धृत श्लोकों में यवनियों का मदिरापान करके मस्त होना, यवनों के पास युद्ध के समय घोड़े होना तथा बड़ी बड़ी डाढी मूछ रखना, शिर पर टोप पहिनना, इन से हूणों का उत्तर में होना पाया जाता है।

बादशाहों के नामोंपर बने हुए नामों में बाबा आदम से मानव सृष्टि का प्रारंभ, जिसे कि–हाल में ६००० वर्ष होते हैं बताया है। इससे विदित होता है कि–पाश्चात्य मतमतान्तर कुछ कुछ फैल चुके थे। जिनमें स्त्रियों में मदिरा पान, डाढी मूछ तथा टोप आदि आ गये थे। उत्तर में हूण भी विद्यमान थे।

काव्यमीमांसा ने बताया है कि– कवि को भूगोल और देशविदेशों की सभ्यता का ज्ञान रहना चाहिये। महाकवि कालिदास उनबातों के ज्ञान से कब अज्ञात रह सकते हैं जिन्हें कि नाट्यशास्त्र के नियम के अनुसार प्रत्येक कवि को जानना चाहिये।

कालिदास जी इन विषयों को भूतकालिक के रूप में इनकी इतिहासिकता को लेकर लिख सकते हैं। यदि ये रघु के समय में हों तो भी कविका लिखना बन सकता है। यदि कवि के समयमें भी वास्तविक रूप से प्रसिद्ध हों तो भी कवि इनका उल्लेख कर सकते हैं।

हमें एतरेय ब्राह्मण और वाल्मिकि में मिलता है कि–विश्वामित्र के अभिमान को चूर्ण करने के लिये–कामधेनुने अपने विभिन्न अंगोंसे–पह्लव, शक–यवन, कम्बोज, बर्बर, म्लेच्छ, हारीत और किरातों को उत्पन्न किया। हूण भी इसी प्रकार की एक जाति है। यह भारतके उत्तर में उस समय रही होगी। रघु के समय भी इनकी सत्ता हो सकती है। क्यों कि–ये जातियां भी एतिहासिक हैं।

इसका यह तात्पर्य्य नहीं हो सकता कि–हूणोंने ५०० ई. में भारत पर आक्रमण किया था इस कारण कालिदास के इस आक्रमण के पीछे का ठहराया जाय।

यदि आर्य इतिहासपर विचार करनवाले लोग एतरेय ब्राह्मण और वाल्मिकि रामायण तथा मानव धर्मशास्त्र को देख लेते तो वे ऐसी कल्पना न करते। यह बात नहीं कि–इन जातियों का परिचय भारत पर चढ आने से ही हो। अन्य साधनों से भी हो सकता है। आज भी अनेक देशों की सभ्यता को भारतीय जानते हैं। डा. भाऊदाजी का लिटररी रिमेन्स के ८९ वे पेज में इसी आधारपर कालिदास को पीछे का मानना मानसिक दुर्बलता है। हूण ईसा से दो शताब्दि पहिले पामीर के पूर्वोत्तर को आक्रान्त कर चुके थे। अतः उत्तर में उनका वर्णन कालिदास के लिये ५८ वर्ष पहिले असंभाव्य नहीं। पुराण रामायण और एतरेय में भी मिलता ही है अतः इतने ही आधारपर यह मान बैठना कि–कालिदास हूणाक्रमण के बाद हुए नितरां भ्रांति है। कालिदास आदि विक्रमादित्य के समय में ही हुए हैं। कालिदास का जन्म स्थल–

मैथिल ब्राह्मण मिथिला में मानते हैं। इनका कहना है कि अमुकग्राम में कालिदास की उपास्या काली देवी है। जिसकी कृपा से कालिदास को कवित्व प्राप्त हुआ था।

यहीं एक विदुषी की ओर उनकी दो उंगलियां लिकली थीं। यहीं उन्होंने डाली को भी उलटा काटा था।

ठीक है महापुरुष कभी अपना परिचय देना नहीं चाहते जब उनका यशःशरीर रह जाता है तो सभी उनके स्थूल देह को अपने समुदाय का बताते हैं। मैथिल समाज की तरह अन्य भी उन्हें अपना बताते हैं। अच्छी वस्तु सभी की होती है। बुरी वस्तु किसी की भी नहीं हुआ करती। कालिदास सब के थे। सब उन्हें चाहते हैं यहीं उनका महाशय पन है।

सभी का जन्मस्थलपर प्रेम होता है। इन्होंने मेघदूत में सब से अधिक उज्जयिनी की प्रशंसा की है। पूर्व मेघ के २९ वे श्लोकसे लेकर ४३ तक उज्जैन का ही वर्णन किया है। इतना किसी नगर का वर्णन नहीं किया।

फिर भी हमारे योगी अरविन्दजीने कहा है कि—

It is probable but not certain that he was a native of Malava born not in the capital Ujjaini, but in one of those villages of which he speaks in the Cloud Messenger and that he afterwards resorted to the capital.

कालिदास का मूल निवास स्थल मालवा हो और इसमें भी वे उन गामों में पैदा हुए हों जिनका कि वर्णन उन्होंने मेघदूत में किया है। पश्चात् समर्थ विद्वान होकर उज्जैन चले आये हों।

यह बात अधिक संभवित हो सकती है। पर यही ठीक है ऐसा दावे के साथ नहीं कह सकते। यह एक अनुमान मात्र है। कि ऐसा संभव हो सकता है।

इससे यह सिद्ध होता है कि—हमारे योगी अरविन्द कालिदास का मालवा देश मानते हैं। मालवा में भी ये उन गामों का मानते हैं। जिनका कि वर्णन इन्होंने मेघदूत में किया है। कई विद्वानों ने इन्हें उज्जैन का माना है। ये महाकाल के भक्त शैव थे यह भी इनके मेघदूत से प्रकट होता है। किसी का विचार इनके लिये वंगीय होने का तथा कोई इन्हें काश्मीर वासी मानते हैं। किन्तु इनका मालव देशवासी होना अधिक संभव है।

इनके काव्यों को देखने से प्रतीत होता है कि—इनका व्यापक पाण्डित्य था। भारत के परम भक्त थे। इतिहास के परम प्रेमी थे। इनका सारा काव्य जगत प्रायः इतिहास को लेकर चला है। ये भारत के वीर पुरुषों के साथ भी सदा संबन्धित रहे हैं।

आज कालिदास नहीं रहे पर उनकी सूक्ति भारत में विद्यमान है यह देश धर्म और समाज को सदा प्रेरणा देती रहेगी। इनके द्वारा कालिदास आज भी हममें जीवित विद्यमान है।



## — श्री तुकाराम विश्वविद्यालय संघ–बृहन्मुबई–पुरवणी —

मागील वर्षी डिसेंबर महिन्यांतील शेवटचे आठवड्यांत संचालक प्रो. ना. के. भागवत हे हैदराबादेस गेले होते. त्यांनीं संघकार्यांचा उद्देश व प्रचार यांबद्दल निरनिराळ्या स्थानिक व्यक्तींशी ऊहापोह केला. या कामीं स्थानिक मित्र एल्. एम्. पानसेर, सेल्सटॅक्स एक्सपर्ट यांचा बराच उपयोग झाला. डॉ. नंदापूरकर, सेवानिवृत्त एंजिनिअर श्री. म. द. गाडगीळ, सेवानिवृत्त मन्त्री श्री. बिन्दू, उस्मानिया विश्वविद्यालयाच्या मराठी खात्याचे प्रमुख प्रा. आर. बी. माढेकर यांच्यांशी बराच विचार-विनिमय केला. मुख्यतः, आंध्र व मराठवाडा यांच्यांतून जे हजारों यात्रेकरू देहूला श्रीतुकाराम बीजेला दर्शनास येतात, त्यांचे हाल कमी करून त्यांची यात्रा सुखाची व्हावी, यासाठीं तळेगांव येथें संघाचे जागेत **"हैदराबाद व मराठवाडा हाऊस"** बांधून तेथें त्यांची राहण्याची सोय करावी व यात्रा घडविण्याच्या कामीं त्यांना हरप्रकारची मदत करून त्यांना दर्शन बिन त्रासानें व्हावें, म्हणून तेथून त्याची तशी सोय करावी, ही कल्पना सर्वांना पसंत पडली. पुन्हां एकवार संचालकांनीं हैद्राबाद व मराठवाडा येथें येऊन दौरा काढल्यास शक्यतों द्रव्यनिधी मिळण्यास जड जाणार नाहीं, असें सर्वांचें मत पडलें. श्री. अफझुलपूरकर यांनीं सक्रिय सहानुभूति दाखविण्याचें कबूल केलें आहे.

येत्या श्रीतुकाराम बीजेला तळेगांव येथें मागील वर्षीसारखा उत्सव त्या दिवशीं सायंकाळीं साजरा करण्याचे प्रयत्न सुरू आहेत. श्री. महाजनी म्युनिसिपल सेक्रेटरी, यांना स्थानिक कार्यकर्त्यांच्या मदतीनें एक कार्यक्रम, आंखण्याची विनंति करण्यांत आली आहे. त्यासंबंधीं विशेष माहिती पुढील अंकांत देऊं. या महिन्यांत संघाच्या विद्यमानें कांहीं कार्यक्रम आखतां आला नाहीं.

× × ×

श्री. विठ्ठल उल्लाळ यांनीं मागील देणगीपैकीं ५ रुपये भरून २५ रुपये पुरे केले. व स्थिर देणगीदार म्हणून त्यांचें नांव समाविष्ट झालें. तसेंच तळेगांव येथें स्थानिक मनुष्य नेमून, भाड्याच्या जागेंत संघामार्फत कांहीं कार्य सुरूं करण्यास यावें, यासाठीं जो पैसा जमवावयाचा आहे, त्यांत त्यांनीं आपले दहा रुपये दिले आहेत. श्री. निंबकर (अध्यक्ष) यांनीं २०० रु. देण्याचें कबूल केलें आहे.

× × ×

संघाच्या कार्यकारी मंडळांतील सभासदांनीं संघाबद्दल कांहीं विशेष आस्था दाखवून बिल्डिंग फंडाचे कामीं झटल्याविना कार्यांची प्रगति कशी होणार? तरी सर्वांनीं हातभार लाऊन फंडाला मदत मिळवून देण्याची कायावाचामनें खटपट करावी, ही नम्र प्रार्थना. तसेंच दरसाल एक रुपया देणारे सामान्य देणगीदार निदान पंचवीस तरी प्रत्येकाने मिळवून द्यावेत, ही सर्व सभासदांना विनंति. म्हणजे तळेगांव येथील यावर्षींची बीज उत्तम रीतीनें साजरी करण्यास मदत होईल. तरी संघ कार्यकारी मंडळानें पत्र लिहून देणगीदाराचे फॉर्म मागवून घ्यावेत ही संचकांची इच्छा.

× × ×

# संयुत्त-निकाय-सगाथावग्गो-देवता-संयुत्त

( मागील महिन्यावरून पुढें चालू )

### ४ संयोजन

किंसु संयोजनो लोको, किंसु तस्स विचारणं ।
किस्सस्स विप्पहानेन, निब्बानं इति वुच्चती'ति ॥
नन्दी संयोजनो लोको, वितक्क'स्स विचारणं ।
तण्हाय विप्पहानेन निब्बानं इति वुच्चती'ति ॥

### ५ बन्धन

किंसु सम्बन्धनो लोको, किंसु तस्स विचारणं ।
किस्सस्स विप्पहानेन सब्बं छिन्दति बन्धनं'ति ॥
नन्दी सम्बंधनो लोको, वितक्कस्स विचारणं ।
तण्हाय विप्पहानेन सब्बं छिन्दति बन्धनं'ति ॥

### ६ अब्भाहत

केनस्सु'ब्भाहतो लोको, केनस्सु परिवारितो ।
केन सल्लेन ओतिण्णो, किस्स धूपायितो सदा 'ति ।
मच्चुना अब्भाहतो लोको जराय परिवारितो ॥
तण्हासल्लेन ओतिण्णो, इच्छाधूपायितो सदा'ति ।

### ७ उड्डितो

केनस्सु उड्डितो लोको केनस्सु परिवारितो ।
केनस्सु पिहितो लोको, किस्सिं लोको पतिट्ठितो ।
तण्हाय उड्डितो लोको, जराय परिवारितो ।
मच्चुना पिहितो लोको, दुक्खे लोको पतिट्ठितो'ति ॥

### ८ पिहितो

केनस्सु पिहितो लोको, किस्सिं लोको पतिट्ठितो ।
केनस्सु उड्डितो लोको, केनस्सु परिवारितो ।
मच्चुना पिहितो लोको, दुक्खे लोको पतिट्ठितो ।
तण्हाय उड्डितो लोको, जराय परिवारितो ॥

### ९ इच्छा

केनस्सु बज्झति लोको, किस्स विनयाय मुच्चति ।
किस्सस्सु विप्पहानेन, सब्बं छिन्दति बन्धनं'ति ॥
इच्छाय बज्झति लोको, इच्छा विनयाय मुचति ।
इच्छाय विप्पहानेन, सब्बं छिन्दति बन्धनं'ति ॥

### १० लोक

किस्सिं लोको समुप्पन्नो, किस्सिं कुब्बति सन्थवं ।
किस्सा लोको उपादाय, किस्सिं लोको विहञ्ञती'ति ॥
छसु ( V. L. छस्सु ) लोको समुप्पन्नो, छसु कुब्बति सन्थवं ।
छन्नं एव उपादाय, छसु लोको विहञ्ञती'ति ॥

## अद्धवग्गो सत्तमो

**तस्स उद्दानं :** नामं चित्तं च तण्हा च
सयोजनं च बन्धनं ।
अब्भाहतु'ड्डितो पिहितो
इच्छा लोकेन ते दसा'ति ॥

## अट्ठमो परिच्छेदो--छेत्वा वग्गो

एकमन्तं ठिता खो सा देवता भगवन्तं गाथाय अज्झभासि:-

### १ छेत्वा

किंसु छेत्वा सुखं सेति, किंसु छेत्वा न सोचति ।
किस्सस्स एकधम्मस्स, वधं रोचेसि गोतमा'ति ॥
कोधं छेत्वा सुखं सेति, कोधं छेत्वा न सोचति ।
कोधस्स विसमूलस्स, मधुरग्गस्स देवते ।
वधं अरिया पसंसन्ति, तं हि छेत्वान सोचती'ति ॥

### २ रथ

किंसु रथस्स पञ्ञाणं, किंसु पञ्ञाणं अग्गिनो ।
किंसु रट्ठस्स पञ्ञाणं, किंसु पञ्ञाणं इत्थिया'ति ॥
धजो रथस्स पञ्ञाणं, धूमो पञ्ञाणं अग्गिनो ,
राजा रट्ठस्स पञ्ञाणं, भत्ता पञ्ञाणं इत्थिया'ति ॥

### ३ वित्त

किंसूध वित्तं पुरिसस्स सेट्ठं । किंसु सुचिण्णो सुखमावहाति ।
किंसु हवे सादुतरं ( v. l. साधुतरं ) रसानं । कथं जीवं जीवितमाहु सेट्ठं'ति ॥
सद्धी'ध वित्तं पुरिसस्स सेट्ठं । धम्मो सुचिण्णो सुखमावहाति ।
सच्चं हवे सादुतरं रसानं । पञ्ञाजीवं जीवितमाहु सेट्ठं'ति ॥

### ४ वुट्ठि

किंसु उप्पततं सेट्ठं । किंसु निपततं वरं ।
किंसु पवजमानानं । किंसु पवदतं वरं 'ति ॥
बीजं उप्पततं सेट्ठं । वुट्ठि निपततं वरा ।
गावो पवजमानानं । पुत्तो पवदतं वरो'ति ॥
विज्जा उप्पततं सेट्ठा । अविज्जा निपततं वरा ।
सङ्घो पवजमानानं । बुद्धो पवदतं वरो'ति ॥

### ५ भीता

किंसूध भीता जनता अनेका । मग्गो व'नेकायतनं पवुत्तो ।
पुच्छामि तं गोतम भूरिपञ्ञ । किस्सिं ठितो परलोकं न भाये'ति ।
वाचं मनञ्च पणिधाय सम्मा । कायेन पापानि अकुब्बमानो ।
बव्हन्नपानं घरं आवसन्तो । सद्धो मुदू संविभागी वदञ्ञू ।
एतेसु धम्मेसु ठितो चतुसु । परलोकं न भाये'ति ॥

# श्रीदत्त मंदिराचा रौप्य महोत्सव

(श्रीक्षेत्र चिंचखरी, रत्नागिरी)

श्रीक्षेत्र चिंचखरी येथील श्रीदत्त मंदिराच्या पायाभरणीचा समारंभ सद्गुरु श्रीगजानन स्वामी बोरकर यांच्या हस्तें झाल्यानंतर १९३३ साली श्रीदत्त मंदिराची बांधणी पूर्ण झाली व त्याचें उद्घाटन कै. औंधचे राजेसाहेब श्रीमंत बाळासाहेब पंत प्रतिनिधी यांच्या हस्तें झालें. या घटनेला १९५८ सालच्या श्रीदत्तजयंतीला २५ वर्षें पूर्ण झालीं असल्यानें १९५८ सालचा श्रीदत्तजयंती महोत्सव, रौप्य महोत्सव, डिसेंबर दिनांक १८ ते २९ पर्यंत मोठ्या थाटानें पार पडला. मुंबईहून शंभर-सवाशें आणि रत्नागिरी व आसपासच्या गांवांहून हजारों भक्त मंडळींनीं त्यांत भाग घेतला.

## रोहिदास बोटीवर

मुंबईहून दि. २१-१२-५८ रोजीं रोहिदास बोटीनें चिंचखरी येथील श्रीदत्त मंदिराचे संस्थापक श्री गजानन महाराज बोरकर, अॅ. आनंदराव सुर्वे, श्री अवधूत स्वामी उर्फ मो. वा. लिमये, बी. ए.; अॅडव्होकेट, मयेकर, का. म. ताम्हनकर, पु. बा. कुलकर्णी, श्रीविश्वनाथ सारंग प्रभृति मंडळी याच बोटीनें चिंचखरीस रवाना झाली. सूर्यास्ताचे वेळीं श्री गजानन महाराज व अवधूतस्वामी यांचीं सुश्राव्य प्रवचनें झालीं. जयगड बंदर नजीक आलें. त्यावेळीं प्रवचनें संपून भजन आणि चौघडा सनई वगैरे मंगल वाद्यें वाजविण्यांत आलीं. बोटीच्या आघाडीवर मंदिराचा भगवा ध्वज लावण्यांत आला होता. बोटीवरील सर्व प्रवाशांना या समारंभाचें कौतुक वाटलें. जयगड बंदरावरील लोकहि हा प्रकार कुतुहलपूर्वक पहात होते.

रोहिदास बोट रात्रौ नऊ–दहाचे दरम्यान रत्नागिरी बंदरा नजीक पोहोंचली. तेव्हां चिंचखरीला जाणारें सामान आणि यात्रिक मंडळी यांनीं एक मोठा पडाव भरगच्च भरला. आणि साडेदहा वाजण्याचे सुमारास या पडावाला ओढून नेणारी लॉंच सुसज्ज होऊन मंगल वाद्यांच्या व भजनांचे गजरांत चिंचखरी मार्गावर चालूं झाली. रात्रीं बारा वाजण्यापूर्वीं सर्व मंडळी चिंचखरीस पोहोंचली. बोटीवर पाहुण्यांचें स्वागत करण्यापासून अखेरपर्यंत श्रीदत्त मंदिराचे व्यवस्थापक श्री. शंकर गणपत बोरकर यांनीं सर्व व्यवस्था उत्तम ठेविली होती.

## यज्ञमंदिराचें उद्घाटन

दि. १८-१२-५८ रोजीं नाम सप्ताहानें उत्सवास सुरुवात झाली. ता. २२ ते २५ श्रीगुरुचरित्र पारायणाचें कार्य श्री अवधूत स्वामीचे नेतृत्वाखालीं पार पडलें. ता. २२ डिसेंबर १९५८ रोजीं सकाळीं श्रीदत्त यज्ञ मंदिराचें उद्घाटन श्रीगजानन महाराज बोरकर याचे हस्तें झालें. या प्रसंगीं श्री अवधूत स्वामी लिमये व श्रीगजानन महाराज यांची भाषणें यज्ञ व विशेषतः 'ज्ञानयज्ञ' या विषयांवर मोठीं उदबोधक झालीं. तीन दिवस या विश्वशांती स्वरूपी यज्ञाचें कार्य मुंबईहून आलेले वे. शा. सं. व. म. पुरंदरे, मो ग. नाईक व चिं. प. पाराशरे आणि स्थानिक सोमेश्वरचे बापु सोहनी यांनीं उत्साहानें पार पाडलें. दररोज भजन, पारायण, आरती वगैरे कार्यक्रम चालूच होते.

## कै. जनार्दन बोरकर शाळेचा बक्षिस समारंभ

श्रीगजनान महाराजांनीं आपले वडील कै. जनार्दनपंत बोरकर यांच्या स्मारकासाठीं पांच हजार रु. खर्चून बांधून दिलेल्या शाळेचा वार्षिक बक्षिस समारंभ यंदा रत्नागिरीचे कलेक्टर श्री यशवंत स. कसबेकर यांच्या अध्यक्षतेखालीं दि. २४-१२-५८ रोजीं सकाळीं १० ते ११-३० पर्यंत थाटानें पार पडला. त्याप्रसंगीं शाळेंतील मुलींनीं स्वागत गीतें म्हटल्यावर अॅ. सुर्वे, श्री अवधूतस्वामी लिमये, अॅ. मयेकर श्री. सारंग पु. बा. कुलकर्णी, का. म. ताम्हनकर, वसंतराव पुरंदरे, प्रभृतींचीं भाषणें झालीं. पूर्वीचे याच शाळेंतील विद्यार्थी व आतां शाळेचे अध्यापक श्री. बोरकर यांनीं अहवाल वाचून दाखविल्यावर श्री. य. स. कसबेकर कलेक्टर यांच्या पत्नी सौ. विमलबाई यांचे हस्तें मुलांना बक्षिसें वाटण्यांत आलीं. मुलांचे संवादात्मक कार्यक्रम झाले. नेहमींप्रमाणें अॅ. श्री. आनंदराव सुर्वे यांनीं मुलांना खाऊ म्हणून ५ रु. आणि श्री. शांताबाई कृष्णा कांबळे यांनीं आपल्या वडील मातुश्रीचें स्मरणार्थ ५ रु. शाळेला मदत म्हणून दिली. दरम्यान मुलांचे संवाद झाले. या शाळेची स्थापना १९०४ मध्यें झाली आणि श्रीगजानन महाराज बोरकर यांनीं वडिलांचे स्मरणार्थ शाळेची इमारत नवी बांधून दिल्यावर तिचें उद्घाटन व पहिला वार्षिक समारंभ कलेक्टर जिल्हाधिकारी जोशी यांचे हस्तें १९३५ मध्यें वार्षिक बक्षिस समारंभासह झाला.

दरसाल वार्षिक समारंभासाठीं बक्षिसें व शाळेचीं उपकरणें श्रीगजानन महाराजच पुरवीत आले आहेत.

## अध्यक्षांचें भाषण

अध्यक्ष या नात्यानें भाषण करतांना जिल्हाधिकारी श्री. य. स. कसबेकर यांनीं स्वागतपर पद्य रचणारे आपले सहाध्यायी कवि ज.द. सिध्ये यांचे आभार मानून त्यांना धन्यवाद दिले. विकास योजनेंत आपल्याला सहकार्य व प्रोत्साहन देण्याची त्यांनी जनतेकडे मागणी केली. आणि शील व शिस्त हे सद्गुण आंगीं बाणविण्याचा विद्यार्थ्यांना उपदेश करून रत्नागिरीस परत जाण्याची घाई असल्यामुळें आपलें भाषण आटोपतें घेतलें. नंतर श्रीगजानन महाराज बोरकर यांचें आभार प्रदर्शन व समारोपात्मक भाषण झाले. जिल्हाधिकारी अध्यक्ष पुण्यवान म्हणून आणि आपण भाग्यवान म्हणून अडचणी असूनहि त्यांच्या अध्यक्षपदाचा लाभ आपल्यास मिळाला. आपण केवळ निमित्त मात्र असून श्रीदत्तप्रभूच अशी ज्ञानयज्ञाचीं कार्यें तो आपल्याकडून करवून घेतो, असें आपल्या भाषणांत श्रीगजानन महाराजांनीं सांगून अध्यक्षासह सर्वांचे आभार मानले.

ता. २४-१२-५८ रोजीं सायंकाळीं श्रीगुरुचरित्र पारायणाची समाप्ति झाली आणि त्याप्रसंगीं या पारायणाचें नेतृत्व करणारे श्री अवधूत स्वामी

लिमये आणि गजानन महाराज बोरकर यांचीं श्रीसद्‌गुरु महात्म्याचें विवरण करणारीं उद्‌बोधक भाषणें झालीं.

**—: चरित्र ग्रंथ प्रकाशन :—**

दि. २५-१२-५८ रोजीं १२ चे सुमारास रत्नागिरीचे डिस्ट्रिक्ट **व सेशन्स जज्ज श्री राम केशव रानडे** यांच्या अध्यक्षतेखालीं लेखक ल. के. तांबे उर्फ ब्रह्मानंद स्वामी यांनीं या रौप्यमहोत्सवानिमित्त लिहिलेल्या श्रीगजानन महाराज बोरकर यांच्या चरित्रग्रंथाचा प्रकाशन समारंभ झाला. याप्रसंगीं अध्यक्षपदाची सूचना श्री. पु. बा. कुलकर्णी व अनुमोदन ॲ. मयेकर यांनीं दिल्यानंतर स्वागतपर पद्यें सौ. सरस्वती माई बोरकर यांनीं म्हटलीं. नंतर अवधूत स्वामी लिमये, ॲ. भाऊ साहेब सुर्वे, श्रीविश्वनाथ सारंग प्रभृतींचीं भाषणें झाल्यावर न्यायमूर्ति रा. के. रानडे यांचें सुश्राव्य भाषण झालें. जास्तींत जास्त ध्येयवादी **प्रयत्न** आणि जास्तींत जास्त ध्येयवादी **भक्ति** अशा प्रयत्न व भक्ति या दोन शब्दांचें स्पष्टीकरण त्यांनीं चरित्रग्रंथाविषयीं बोलतांना आपल्या सुंदर भाषणांत अनेक दृष्टांत देऊन केलें. नंतर आभार प्रदर्शनाच्या समारोपात्मक भाषणांत श्रीगजानन महाराजांनीं ध्येयवादी भक्ती बरोबर प्रयत्नवादी युक्ती आवश्यक असून तिच्यामुळें ईश्वरप्रसन्नतेची शक्ति जगांत मोठी कार्यें कशी घडवून आणते, याचें विवेचन करून अध्यक्षांसह सर्वांचे आभार मानले. याच प्रसंगीं चिंचखरीच्या सर्व बांधकामाची देखरेख, रचना, मार्गदर्शन इत्यादि सर्व बाबतींत आपुलकीनें लक्ष घालणारे, श्रीगजानन महाराजांना पुत्रवत असलेले, ठाण्याचे एक्झिक्युटिव्ह इंजिनियर, श्री. ग. रा. पडवळ B. SC., B.E. यांना गौरवार्थ एक चांदीचा चषक अध्यक्षांच्या हस्तें अर्पण करण्यांत आला. श्रीगजानन महाराजांच्या चरित्रग्रंथाबरोबरच 'किरात' पत्राचे संपादक श्री. अनंतराव मराठे यांनीं संपादिलेलें छोटेसें 'श्रीगुरुदेव चरित्र' आणि आर्टिस्ट श्री. पांडुरंग गणपत बोरकर यांनीं तयार केलेलें श्री चिंचखरी दत्त मंदिराचें बहुरंगी सुंदर कॅलेंडर याचेंहि प्रकाशन अध्यक्षांच्या हस्तें झालें.

**योगासनें व श्रीहरिकीर्तन**

दि. २६-१२-५८ रोजीं सायंकाळीं योगदासानुदास श्री. कृ. आठवले शास्त्री यांचे योगासनांचे कार्यक्रम झाले. त्यांचें अनेकांनीं कौतुक केलें. रात्रीं दत्तमंदिराचें सुंदर रंगकाम करणारे पेंटर श्री. काशिनाथ मंगळया पाटील यांचें सुबोध सुश्राव्य कीर्तन झालें.

**ॲ. आनंदराव सुर्वे यांचा अमृतमहोत्सवी सत्कार**

ॲ. आनंदराव सुर्वे यांना वयाचीं ७५ वर्षें पुरीं झाल्याबद्दलचा सत्कार-समारंभ दि. २७-१२-५८ रोजीं श्रीगजानन महाराज बोरकर यांच्याच अध्यक्षतेखालीं झाला. या प्रसंगींही श्री अवधूतस्वामी—लिमये, श्री. विश्वनाथ सारंग, श्री. अण्णा बोले, श्री. पु. बा. कुलकर्णी, श्री. ताम्हनकर, श्री मुकुंदराव उर्फ मुरलीधर स्वामी, ॲ. मयेकर, सेवानिवृत्त मुंबईचे पोलीस सुपरिन्टेन्डन्ट रावसाहेब डेरे, श्री. आचार्य स्वामी, श्री. अनंतराव मराठे, श्री ल. ग. थत्ते उर्फ रघुवीर स्वामी, श्री. बापूजी हडकर यांची भाषणें झाल्यावर श्रीगजानन महाराजांनीं ॲ. सुर्वे यांना चांदीचा प्याला आणि श्री. ताम्हनकर यांनीं कांहीं उपयुक्त ग्रंथ अर्पण केले. नंतर ॲ. सुर्वे यांनीं समयोचित भाषण करून आपलें उर्वरित आयुष्य परसेवेंत, जनसेवेंत व ईश्वर सेवेंत जावो अशी कृतज्ञतापूर्वक प्रार्थना केली. श्री गजानन महाराजांनीं अध्यक्ष या नात्यानें समारोपाचें भाषण करून ॲ. भाऊसाहेब सुर्वे यांच्या थोर त्यागी व ईश्वरनिष्ठ जीवनावर प्रकाश टाकला व त्यांनीं सदैव केलेल्या सहकार्याविषयीं कृतज्ञता व्यक्त केली.

**कुमारी प्रभा पडवळ हिचें अभिनंदन**

नंतर एक्झीक्युटिव्ह इंजिनीयर श्री. ग. शि. पडवळ B. SC., B.E. यांची कन्या कुमारी प्रभा पडवळ बी. एस. सी. ही एल. एल. बी. ची परीक्षा चांगल्या रितीनें उत्तीर्ण झाल्याबद्दल तिचा गौरवपर अभिनंदनाचा समारंभ श्री गजानन महाराजांच्या अध्यक्षतेखालीं झाला. यावेळीं ॲ. सुर्वे यांचें आशीर्वादपर आणि काकासाहेब राजाध्यक्ष, श्री. शिरघनकर, श्री. थत्ते प्रभृतींचीं भाषणें झालीं. नंतर कु. प्रभा पडवळ यांनी आभारात्मक भाषण केलें. अखेर अध्यक्ष श्री गजानन महाराज यांनींहि आशीर्वादपर आणि गौरवपर भाषण केल्यावर हा समारंभ समाप्त झाला. या प्रसंगीं श्री. अनंतराव मराठे यांना 'श्रीगुरुदेव दत्त' पुस्तकाबद्दल अध्यक्षांनी २१ रु. ची देणगी दिली.

**अग्रपूजा श्रीसत्येन्द्रनाथ स्वामी कडून**

त्यानंतर सायंकाळीं श्रीपाद श्रीवल्लभ सेवामंडळाचे संस्थापक श्री. पांडुरंग रामचन्द्र नागवेकर उर्फ श्रीसत्येन्द्रनाथस्वामी यांनी श्रीगजानन महाराज बोरकर व सौ. सरस्वतीबाई बोरकर यांची अग्रपूजा करण्याचा पहिला मान संपादन केला आणि अहेर केला. इतर कांही भक्तमंडळींनींहि याप्रसंगीं यथाशक्ति अहेर केले.

**कृष्णार्जुन युद्ध नाटकाचा प्रयोग**

दि. २७-१२-५८ रोजीं रात्रौ १० चे सुमारास श्री रुपवंत गणपत बोरकर यांच्या दिग्दर्शनाखालील संगीत 'कृष्णार्जुन युद्ध' या नाटकाचा प्रयोग मुंबईच्या डी. जी. रुपारेल कॉलजचे प्रिन्सिपॉल श्री. सी. बी. जोशी एम्. ए. (मुंबई व केंब्रीज) जे. पी. यांच्या अध्यक्षतेखालीं झाला. त्याप्रसंगींही श्री. लिमये, ललितकला नाटक मंडळींचे नट श्री. ग. श. भागवत यांचीं भाषणें झाल्यावर अध्यक्षांनी समयोचित समारोपाचें भाषण केलें आणि श्रीगजानन महाराजांनीं समयोचित आभार मानले. श्री. रुपवंत बोरकर यांनींही आभाराचें भाषण केलें. नाटक चांगलेंच रंगलें होतें. अध्यक्षांचे हस्तें नटांना बक्षिसें वाटण्यांत आलीं.

**सरस्वती नदीवरील सहल व सहभोजन.**

सालाबादप्रमाणें सरस्वती नदीवरील सहल आणि वनश्रींतील सहभोजन व भाषणें झालीं. याच दिवशीं दि. २८-१२-५८ रोजीं श्रीदत्त मंदीरांत श्रीगजानन महाराजांचे सुश्राव्य प्रवचन झाले.

**तीन पूजाविधी**

दि. २९-१२-५८ रोजीं श्री सत्यविनायक, श्री सत्यनारायण व पालखींतील, श्री शीरगांवकर आर्टीस्ट यांनी तयार केलेली श्री दत्तमूर्ती, या तीन पुजांचा विधी झाला. गांवभोजन झालें. आणि पहांटेपर्यंत दशरथ मयेकर आणि मंडळी व सौ. स. गो. बोरकर आणि मंडळी यांची भजनें होऊन उत्सवाची समाप्ती झाली या उत्सवाला नित्यापेक्षांही हजारों भक्तांनी भाग घेतला.

यंदाच्या या उत्सवांत श्रीदत्तजन्म प्रसंगीं पुढें दिलेल्या चार गृहस्थांनीं 'मार्गस्थ' होऊन श्रीगजानन महाराजांचें शिष्यत्व पत्करलें. त्यांचीं **मूळ नांवें** आणि पारमार्थिक नांवें पुढील प्रमाणें:—

(१) रिटायर्ड पोलीस सुपरिंटेंडंट रावसाहेब शंकर काशीनाथ डेरे, श्री वीरभद्र स्वामी.

(२) श्री. मोरेश्वर काशिनाथ पिटकर, श्री सत्यानंद स्वामी.

(३) श्री. वी. ॲस. मेहता ऊर्फ, श्री विष्णुदास स्वामी.

(४) आर्टिस्ट पी. टी. शिरगांवकर, श्री शांतीदास स्वामी.

# Letters From a Blind High-Court Judge to His Private Secretary

**21**

Hotel Cecil, Delhi.
24th Febry, 1919.

My dear Kher,

Its high time that something had occurred in my Sheeny's case. But I suppose Garhe is still playing the waiting game, hoping to tire Cohen out. How have they managed to cause such delay? Is it on the pretext of appealing against Macleod's order about costs or in order to get a certified copy of his judgment? I should have thought that the hearing before the Turf Club committee might very well have been brought on within a week of the Court's decision.

I hear of further work which is "coming" to me, but which has not yet come. I have today finished the M. big job, a great load off my mind. I am supposed to be much better. I can eat (although I do not want to) almost any ordinary food. I have walked for an hour and several times for about three quarters of an hour; but I know very well that I am not well, nothing like it, and I begin to doubt whether I ever shall be, whether this infernal colitis (from which alone according to my local doctor, I have been suffering) is not chronic and won't some of its symptoms be with me for the rest of my natural life. I hope that you are enjoying the best of health, as you certainly deserve to if you are keeping up your swimming, and that M. & K. is flourishing and abounding. As for me, I begin to be indifferent about work in view of my pending internment in Kashmir. What a complete isolation from all real movement! But it ought to have a very curative effect. Come up there for your summer holiday and we will look after the house of Rai once more. Apropos is not Sinha Lord Rai, or Mustard? I had suggested Lord Sinha of Chutneypor. I wasn't far off.

Yours as ever,
F. C. O. B.

**22**

Hotel Cecil, Delhi, Febry. 28th, 1919.

My dear Kher,

I have been quite distressed about my Sheeny; not only because if the rumour proves true I shall lose my 1500 rupees, no light matter to a greedy man but much more because such a settlement would in the circumstances be so unjust. I suppose he could have settled long ago on those terms and gone back to his business and happy home. I did not believe it possible that if the matter were left to the uncontrolled decision of the Turf Club, there could be any doubt about the result until, perhaps, that conversation I had with Cadell at breakfast the morning of the day on which I left, of which I told you in the train. But I thought I had put better counsels in his head. It is simply shameful, if it is true, that the T. C. Committee can't or won't do justice in so simple and plain a matter, when they are required to do so because the Courts can't.

I have been markedly better the last three days; though upto to that time I had not noticed much progress. If the cold suits me I still have some hopes of getting quite well after all and nightly visiting the house of Rai. Swimming too in the Dal when the weather and the water are warm. You remember the fat Chunilal who began the Mangrol work with us, whom I afterwards booted, as I did not trust him. He died suddenly at Patan in Baroda of heart failure. I am sorry to hear you have not been so well, you must not work too hard. You must get more out of Manilal than merely making up the monthly accounts. I am sure, if you should still feel below par, that a month of Kashmir would be the very thing to set you up. I rather dread the extreme cold of the journey in. It may have abated though by the time we start. At present I hear of nothing but ice floes, snow drifts and avalanches. I may freeze stiff in the car before I can reach the warmth and shelter, of Needoo's Hotel. I have definitely finished for the present the M appeal and wangled all the wires I could get hold of to help it along. I am now looking forward to a period of comparative rest and repose though it is possible that a certain amount of light work may follow me even to the remote wilds of Srinagar. But in this country as elsewhere it is the common experience "out of sight out of mind."

I canot say that I retain the very slightest interest in the court or feel any real curiosity about the doings of those odd little fellows the judges.

I wonder whether I shall make any stay in Bombay next October. I think it most likely that I shall, if I have really regained my health but not otherwise. I propose in the former case, a tour in Kathiawad which should be not only very pleasant, interesting and healthy at that time of the year but remunerative too. At the close of that cold season, I think it certain if things have cleared up in the Western world that I shall say my last adieu to India You must hurry up, get rich and come to see me in the Casa by the lake after I am finally settled there. Your boating education **inter alia** requires completing.

Yours as ever,
F. C. O. Beaman

P. S. I wrote two letters to Lance on behalf of my Sheeny and sent him one wire, but I fancy it was all labour

wasted, as the decision had probably been made long before he could read my indignant protests against its manifest injustice.

## 23

Needoo's Hotel, Srinagar
March 13

My dear Kher,

As usual I was more than a bit previous about my great recovery. The journey here nearly finished me off and I arrived not a whit better, if as well, as I was on my return from Karachi. Called in the local doctor at once, and to bed. After three days better, and perhaps I may improve here, but it does not seem to me that I am ever likely to be the man I was before this infernal illness.

Your letters are almost most welcome, telling me as they do of doings in the old auspicious sea port town. As for my miserable Sheeny, I can't understand what all the delay is about, or how there can be any real doubt as to his right to all the money. But, as you say, if the Turf Club-consult counsel God only knows what such learned gentlemen may advise. I suppose I was right in thinking that delivery of the goods passed the property in them. My recollection was that part delivery, and of course complete delivery, or part or complete payment, passed the property in goods, but I have no Contract Act with me and can't verify by referring to the section. That is the only point out of which Sheeny could make anything and I have pooh-poohed it from the first. But those sections are so tricky, that as long as I was a responsible judge I never allowed myself to pronounce on any of them without a careful verification first. I sometimes wish I had kept one or two of my law books for reference. In Delhi for instance I was asked whether a man could sue a Raja in Madras for an old debt long time barred, unless the plaintiff could surmount the bar by deducting four years' munition work in England. For the life of me I could not be certain whether that exemption applies to plaintiffs. I thought that it did not. Of course a plaintiff can deduct any time that the defendant has been residing out of the jurisdiction. But there does not appear to be any reason why he should be allowed to deduct time during which he has been residing out of the jurisdiction. Again there were special provisions made in favour of soldiers both as to suing and being sued, when the war began. But I think they were restricted to combatants, and I don't suppose that a man employed on remunerative munition work could take the benefit of them. Enlighten me learned in the law.

I am sorry to hear that you are feeling that pain again. I recommend the same remedy. At present it strikes me as rather painfully cold, though the residents call it bright spring weather. In a month though all should be sunshine and fruit, and presently swimming in the Dal. The fat boy has just arrived with the back Kit, after a six days' journey through snow and ice, grinning all over and as proud as though he were just back from an Arctic expedition. I am at least grateful to think that, humanly speaking, I need not travel any more for at least six months. Being up here cuts me off from a lot of work that was offering, but money is not everything. I dare say Some will follow me just enough to keep me amused, and in funds for cigars & chockies; do you remember our frantic efforts to get a smokable cigar here ? The time approaches when a new C. J. will have to be appointed and I hear that rumour still names M. as favourite. Should rumour be truthful for once I am sorry for the Court and glad that I left it in time. Its spoilt any how. The junior judge is sure to turn out a most undesirable acquisition. Now I must stop, tiffin time, I to drink chicken soup.

Yours as ever,
F. C. O. B.

## 24

Srinagar,
17th March 1919.

My dear Kher,

I have been thinking a good deal what I could do for Mulgaonkar. I doubt whether my intervention in any quarter would be of any assistance to him. I believe the appointment is made to all intents and purposes by Scott; certainly he never consulted me, or as far as I know any other civilian Judge before making his last amazing selection and we all know our Scott. The mere fact that I or anyone lse were to suggest a name would probably be quite enough to put Scott on search for another, to show how superior his judgement was to anyone else's in such matters. That has always been his attitude to ME at any rate. I know perfectly well, and knew all the time that I was in the Court with him that his feeling was, that it was little short of an impertinence on the part of any one else to hint to him how he should bestow his patronage. Hence I have no doubt the amazingly bad choices he often made. But that's how the case stands. I am pretty sure that Curtis won't have any say in the appointment. He might, of course, but as I have been writing to him, and as he would say, perhaps, bothering him about other matters recently I don't feel inclined to approach him on behalf of Mulgaonkar. I dare say Mulgaonkar is the best man available; but I know little, or nothing, of him. Nearly all my time was spent on the Original Side and during the short periods I sat on the Appellate Side, I don't remember Mulgaonkar ever doing any criminal business at all. He was in fairly good civil business but that is no qualification for the post of Government Pleader. Still were there nothing more to hinder me pressing his claims than that, I might put them on the general ground

( Continued on Page 22 )

# PRAYERS—THEIR EFFICIENCY AND EFFECTS

[We take great pleasure in reproducing below the following talk by Shri. V. R. Bapat, M.A., I. R. S., Hyderabad who gave this talk in the Rotary Club at Aurangabad on 22-5-57. Shri Bapat has approached the subject scientifically and to the modern mind his talk is bound to be stimulating and is sure to open a new avenue for research. We are grateful to Shri Bapat for allowing us the use of it for the readers of the Dharmachakra— **The Editor**]

Brother Rotarians,

I feel great delight this evening to be in the midst of a group of elite intelligentia of Aurangabad who are bound together by the common ties of four points of fellowships which form the quintessence of the rotarian principles. As the maxim goes–once a rotarian is always a rotarian–I take this privilege of introducing myself as a rotarian Vishnu, being a past rotarian of the Belgaum Club. The other day I happened to meet Rtn. Bapat in the Aurangabad Club who perhaps caught me in my weaker moments to make me agree to meet the rotarians of Aurangabad Club and to have tete-a-tete with brother Rotarians. Without imagining the onerous responsibility of accepting this invitation, as a few minutes ago I said that he caught me in the weaker moments, I readily consented to it and although, Rtn. Bapat came for my relief by suggesting that I may give a talk on the Income-tax matter; but being engaged all the time in watching the purse of others to see that thay are made to shell out their dues to the Government to a correct pie, I thought it worthwhile not to protrude my avocation in the Club and spoil the fellowship atmosphere of the Rotary Club. That is how I decided to choose the subject which has nothing to do with my routine activities. With this preamble I now make a humble approach to my subject of this evening, which is "PRAYERS and THEIR EFFICIENCY."

At the outset I must own that my knowledge of the subject being limited in the field, the thesis that I may propound may be faulty or may not de appealable to all. Even then it is only by communion that one gets experience and becomes rich in expanding ones own ideas and that is the reason why I have chosen the subject in which I have, made a very mediocre beginning to acquaint myself in. In common parlance one knows about prayers as worship of GOD and that too done with some specific motive. The motive may be either of personal gain or it may be alleviation of some sufferings. I, in my own humble way, feel that what I just described as the idea of a common man about prayer, is a very limited description of prayer and does not come nearer even to the infinitesimal idea of real prayer. Prayer has its own science and technique. According to my humble way of thinking I can describe prayer as a motivated approach based on faith by X through certain medium for getting some kind of benefit either to himself or to Z from Y who is capable of rendering the benefit. This definition of prayer does bring within its compass not only the modes of worship described in all religions but also practically every activity of human being without any limit of time.

I now proceed to analyse my above-quoted definition to propound my various theories regarding prayer. Essentially there are four ingredients. The two commonly known are the worshipper and the object of worship. The third is the mode of communication and the fourth is that which is conveyed to and fro from one end to another. The similie of two telegraph operators working at two ends of the stations aptly describes the process of prayer.

The conception of prayer is fundamentally based upon faith. Faith in fact is the foundation of any kind of prayer which may be in the form of request or supplication or demand made by worshipper to the object of worship. Regarding the importance of faith it is well described in the "BHAGAWADGITA"

यादृशी भावना यस्य सिद्धिर्भवति तादृशी।

As you know no building can stand without foundation similarly prayers cannot stand without the broad base of faith. How the faith works in curing many physical or mental ailments is known to every body by his every day experience. The doctors often admit that their medicines are not some times so potent as to alleviate the suffering of their patients as the faith of the patients themselves. So to start with, one is required to be armed with faith and then alone the process of prayer begins.

I have my own theory to propound to describe the process of prayer. This process begins from as well as ends at the worshipper. Just as there are positive and negative atoms which by some means when arranged in ordered fashion create electricity, in the same manner, by means of communion, certain vibrations which I may term as "UPASANA" start flowing from the worshipper. Following the principle of sound waves those vibrations which emanate from the worshipper proceed towards the object of worship and on reaching the destination they collide with the object of worship and thus generate other types of vibrations which I may call them as 'KRIPA' which

start flowing in opposite direction by the same path by which the vibrations of Upasana have travelled and returned to the place of origin of 'UPASANA' i. e., the worshipper. This is the complete cycle of describing the process of prayer.

Having described the process of prayer let me now take you through the description of four elements of prayer.

The first component part of prayer is a worshipper who can be any living element. I have deliberately excluded non-living elements because they are incapable of producing the types of vibrations mentioned above. Even in living elements the field is restricted to human beings only because they alone possess 'मनोहंकारबुद्धि' which alone have the capacity and ability to create vibrations of Upasanas.

The second component is the object of worship. According to the Hindu Philosophy not only 33 crores of gods can form the subject matter of worship but even the inanimate things with the sheet anchor of faith can well come within the compass of the object of worship. According to other religions it may be only one single object whereas according to other school of philosophy the object may be void or nothing; in other words, the object of worship can range anything from the atom to boundless infinite which pervades the whole universe. The choice of object of worship demands a great discerning attitude from the worshipper. His choice is circumscribed by his own belief and experience.

Serially the 3rd thing to be described is the contents of prayers and the mode of communication, i. e. prayer is a live force which creates vibrations of Upasanas. Every prayer contains two elements viz., the praise of object of worship and description of benefit to be obtained from that object. All the Dharma Granthas are rich treasures of prayers and one has to choose a right type of prayer according to his own ability, capacity and necessity. Sometimes in order to bring the state of mind of the worshipper to the point of ignition, the Beejas are added to the prayers. These prayers having been thought of by human beings alone are essentially based upon their own experience in dealing with other human beings. Every body knows too well that nothing succeeds like praise in getting the desired benefit from the other party. Based at it is on this psychology each prayer essentially contains the above two elements.

[ To be contiuaed ]

( Continued from Page 20 )

of seniority, and the unwisdom of trying to pick out juniors by supposed superior merit. But the considerations I first set out stand in the way. I have heard nothing more from my Sheeny. The silence is ominous. I wish I had asked you to wire when the case was decided one way or the other, no matter which. It surely must have been decided long ere this ?

The weather is beautiful here now, rathar fresh for a Bombayite, but all the better on that account. I am progressing. I walked morning and evening yesterday, nearly three quarters of an hour each time. The air was keen and tonicy, while its rigour was tempered by the rays of a gentle spring sun. My new lady reader takes over from Mrs. Davies today. But I wish I had stipulated for longer hours. I don't see how I can get through much reading in four hours a day. Why there were occasions on which you read to me for 11 hours a day, and often and often for six hours.

I have n't got as far as the house of Rai yet, and I think I shall have to take that great walk arm in arm with Peter, as Kitty appears to shy off it somehow.

Yours as ever,
F. C. O. Beaman.

## 25

Srinagar
19th March 1919.

My dear Kher,

It seems a long time since I heard from you of the doings of the auspicious Sea port Town, particularly focussed in Medows Street on a certain well known Attorneys' office. I should, I believe, have been in a position to announce that I was well and daily making reconnaissances in the direction of the house of Rai, were it not that at the crucial moment I was attacked by one of those spasmodic coughs, of which I gave you more than one example during our pleasant years together. You will remember how obstinately they clung to me, how violently they racked me. But compared with this one, they were as spring zephyrs to a winter gale. I have tried to allay its fury by every means known to science, imprimise the cunning inhalation strongly recommended by the good Wagle; the insinuating gargle, of many kinds and degrees of potency; throat painting, though there is nothing wrong with the throat; suction lozenges and trokeys; and at last recourse to the old world cough remedies, Owbridge, and Kay. The last-named appears to have gained a short lived victory at the cost of making me feel rather the worse in other ways. So the world goes, so desperately do we fight to repair nature's ravages & penalties, and fit our creaky leaky vessels to make a little longer voyage on the stormy seas of life, trusting that they will not too suddenly and finally founder. Yet in a few years at most, founder and disappear they all must. How miserly we view the last few precious coins of Time left sparsely enough in our depleted coffers. The weather has been rather inclement the last few days, and to nures my cough, I have scarcely left my fireside. That is very snug and comfortable but not strengthening.

As soon as the strong cold wind moderates, I hope to take my walks abroad with Kitty, or my new Secretary Miss Walpole, or failing these fair guides and companions with the solid and splendidly attired Peter.

But what of the Sheeny? Surely his fate must have been decided long ere this and I draw the worst conclusions from a silence so prolonged, so ominous. I think in a letter I wrote you some time ago I begged you to let me know the worst by wire, for I could hardly expect Cohen to waste his Shekels on conveying me any but the best. But I have heard neard nothing. I am now, rather reluctantly committed to quite a lot of work. I had hoped to evade it by pointing out the improbabilities of success. But some of my friends credit me with miracle working powers which I have never claimed and come to me as pilgrims with incurable diseases frequent the great Shrine of Lourdes, with incurable or almost incurable cases. I grow very lazy here and don't want to work at all, but just souse myself in the kind fo books I enjoy as often as they come my way. The **hajam** stands impatiently by, adieu.

F. C. O. Beaman

Regd. No. B. 54..

World Religion Supplement

वर्ष ११ वें ] [ अंक ८ वा
१५ मार्च १९५९

# धर्मचक्र

THE WHEEL OF THE MORAL LAW
(Vol. XI—8)
15th March 1959

This month witnesses the most astounding Day of the Ascent to Heaven of the celebrated Saint Tukaram [26th March 1959] who gave to the Common Man the most simple and yet ethically loftiest Teachings of-Love, Humanity, Non-Violence, Purity of mind and Universal welbeing.



श्रीतुकाराम महाराज

## श्री संत तुकाराम महाराजांचा निर्याण दिन, गुरुवार, तारीख २६ मार्च १९५९

### सन्त केव्हां होतात ?

नव्हती ते संत करितां कवित्व । संताचे ते आप्त नव्हती संत ॥ १ ॥
येथें नाहीं वेश सरते आडनांवें । निवडे घावडाव[1] व्हावा अंगीं ॥
नव्हती ते संत धरितां भोंपळा । करितां वाकळा प्रावरण ॥
नव्हती ते संत करितां कीर्तन । सांगतां पुराणें नव्हती संत ॥
नव्हती ते संत वेदाच्या पठणें । कर्म आचरणें नव्हती संत ॥
नव्हती संत करितां तपतीर्थाटणें । सेविलिया वन नव्हती संत ॥
नव्हती संत माळामुद्रांच्या भूषणें । भस्म उद्धूळणें नव्हती संत ॥
तुका म्हणे नाहीं निरसला[2] देहें । तों अवघे हे सांसारिक ॥

१. घाव, किंवा वार. २. देहभोगाचें निरसन केलें नाहीं.

— अभंग २३०५ — सरकारीप्रत

# धर्मचक्र

(The Wheel of the Moral Law)

[ बौद्ध शिकवण, जीवन व कला यांच्या विश्वसनीय दर्शनानें महात्माजींची मूलभूत शिक्षा सिद्ध करून दाखविणारें मराठींतील पहिलेंच मराठी–हिंदी सांस्कृतिक मासिक ]

* दर महिन्याच्या १५ तारखेस प्रसिद्ध होतें. *

मुख्य संपादक ( मराठी व इंग्रजी विभाग ), मुद्रक व प्रकाशक :

प्रा. ना. के. भागवत, एम्. ए., ( मुंबई विश्वविद्यालय, पाली ग्रंथ प्रकाशन—सन्मान्य संपादक )

प्रा. शिवसहाय पाठक, एम्. ए., साहित्य रत्न, के. सी. कॉलेज : संपादक हिंदी विभाग

वर्ष ११ वें ] १५ मार्च १९५९ [ अंक ८ वा

## अनुक्रमणिका

### मराठी विभाग



### हिंदी विभाग



### World Religion Supplement :



### वर्गणीचे दर :

१ : भारतांत पोस्टेजसह रु. ५–०–०
२ : महाभारतांत पोस्टेजसह रु. ७–०–०
३ : किरकोळ अंकास ७५ नये पैसे
बुद्धजयंती विशेषांक रु. १–७५ नये पैसे (२४ मे १९५६ चा)

### जाहिरातीचे दर : ( एक वेळचे )

अत्यन्त सवलतीचे आहेत.
कृपा करून पत्र पाठवून तपास करा.

### या अंकांत विशेष काय पहाल ?

१. विनोबांना दिसलेली आझाद बंडखोर–मीरा
२. मानवतेचें प्रतीक.
३. जपानचें आत्मशोधन व भारताचा अहंभाव
४. कालिदास और मन्दहास
५. गान्धी-सूक्ति–मुक्तावलि
६. Letters from a Blind Judge to his Private Secretary 19-2
७. Prayers-their Efficiency and Effects 21-2

मुद्रक व प्रकाशक : प्रा. ना. के. भागवत, धर्मचक्र कार्यालय, सुगतनिधान, १९ वा रस्ता, प्लाट नं. ४६३, खार, मुंबई २१
मुद्रण स्थळ : मुंबई वैभव प्रेस, ४१७/४२१ सरदार वल्लभभाई पटेल रोड, गिरगांव, मुंबई, नं. ४

World
Religion
Supplement

धर्मचक्र

THE WHEEL OF
THE MORAL LAW

वर्ष ११ वें ] १५ मार्च, १९५९ [ अंक ८ वा

# A Circular By The Director of Education

The 'Dharma Chakra' is appreciated by The Director of Education, Bombay State, in his Circular No. S–102/563–H dated 15th-10-1956, while bringing the Magazine to the notice of Secondary Schools, Colleges, Libraries, and other Educational Institutions in the State of Bombay. His Appreciation reads thus :—

"The Magazine appeals to the normal conscience of men and attempts to point out a more humanitarian approach to the problems confronting India today. The fundamentals of life, truth, non-violence, brotherhood, the unity of the human race, and idealogy and culture, fellow-feeling and the service of the poor and the less privileged, toleration, and mutual understanding–all these have been presented and taught in the Dharma Chakra for the last 7 years. (Now 10 years.) The Magazine is brought to the notice of schools and colleges.

Sd.

Director of Education.

# संपादकीय

फेब्रुवारीच्या १२ व्या तारखेस मुंबई येथील अमेरिकन उपवकिलातीच्या विद्यमानें "लिंकन हाऊस" मध्यें अब्राहाम लिंकनच्या १५० व्या लिंकन जयंतीच्या प्रसंगीं एक मोठा समारंभ सायंकाळीं भरविण्यांत आला होता. आधुनिक लोकशाहीच्या इतिहासांत ते मोठे नेते म्हणून गणले जातात. त्यांना सत्य हें प्रिय होतें व "लोकांचें, लोकांनीं, लोकांसाठीं चालविलेलें राज्य" अशी लोकशाही राज्यकारभाराविषयीं त्यांची निष्ठा होती. अखिल मानव जात ही स्वतंत्र आहे व कोणी कोणास गुलाम करूं शकणार नाहीं, किंवा कोणी कोणावर मालकी हक्क गाजवूं शकणार नाहीं, ही त्यांची श्रद्धा होती. अशा विश्वकल्याणाचा कल्याणमित्र लिंकन किंवा भारतांतील गांधीजी यांची अशा प्रसंगीं तुलना व्हावी, यांत नवल कसलें! म्हणून अमेरिकन वकिलातींत "लिंकन–गांधी" प्रदर्शन भरविण्यांत आलें होतें व त्या प्रसंगीं अमेरिकन प्रसिद्धी खात्यामार्फत एक पुस्तिकाही वाटण्यांत आली होती. त्यांत लिंकन व गांधीजी यांच्या कार्याचे तुलनात्मक व सत्स्वरूपात्मक विचार संकलित करण्यांत आले होते. त्यांतील कांहीं वाक्यें आम्ही मराठींत उद्धृत करीत आहोंतः—विशिष्ट काळाला सर्वस्वी सारखी अशीं माणसें राष्ट्रें निर्माण करतात, हें एक ऐतिहासिक सत्य होय. अमेरिकेच्या परीक्षेच्या वेळीं अब्राहाम लिंकन निर्माण झाला. भारतांत स्वातंत्र युद्धांत मार्गदर्शन करण्यासाठीं महात्मा गांधी पुढें आले. दिक् आणि काल यांनीं विभागलेले हे **दोन महान् अग्रणी दोन मूलभूत** व मूलग्राही **निष्ठांनीं** प्रसिद्ध झाले होतेः—"मानव जातीच्या समानतेची निष्ठा, आणि सत्य हेंच शेवटीं विजयी होणार ही निष्ठा!"

वर निर्दिष्ट केलेल्या पुस्तिकेंत दोघांच्या समान अर्थांची अवतरणें दिलेलीं आहेत; व तीं अत्यन्त उद्बोधक आहेत. अशा या भावनापूर्ण व रोमांचकारी समारंभाचें अध्यक्षस्थान उत्तर प्रदेशाचे भूतपूर्व राज्यपाल श्री. कन्हैयालाल मुनशी यांना देण्यांत आलें. नरनारीचा समुदाय प्रदर्शन पहात असतांनाच समारंभास सुरुवात झाली. प्रथम मुंबईतील अमेरिकन कौन्सल जनरल श्री. विल्यम टी. टर्नर यांनीं सर्वांचें स्वागत केलें. सभास्थानाच्या भव्य पटांगणाचे मागें अरबी समुद्र पसरला होता. त्यावेळीं परांजोती गायक मंडळानें लिंकनच्या काळांतील अमेरिकन गीतें गाऊन दाखविलीं. व्याख्यानानंतर "ॲबे लिंकन इन इलिनॉय" हा अमेरिकन चित्रपटहि दाखविण्यांत आला. श्री. मुनशी म्हणाले "श्री. लिंकन यांनीं मानवी प्रतिष्ठा वाढविली व लोकशाही राज्यकारभार याविषयीं लिंकन यांचे **अमर उद्गार** उद्धृत करून पुढें ते म्हणाले, "जर अमेरिकेंतील लोकशाही थोर असेल तर तो थोरपणा भौतिक संपत्तीमुळें आलेला नसून वॉशिंग्टन व अब्राहाम लिंकन यांच्यामुळें आणि स्वातंत्र्यांचा जाहीरनामा व हक्काची सनद यांतील तत्त्वाप्रमाणें प्रतिपादिलेल्या लोकशाहीचा कारभार चालत असल्यामुळें तो आलेला आहे. कधीं कधीं किंवा जगाच्या कांहीं भागांत लोकशाही नष्ट झाल्यासारखी, किंवा डळमळीत झालेली दिसत असली तर त्याचें कारण आपण मानवी प्रतिष्ठेवरील श्रद्धेंतून मिळणाऱ्या आध्यात्मिक शक्तीपासून त्या लोकशाहीला वंचित करीत आहोंत. **लिंकन व गांधीजी** यांनीं ज्या लोकशाही स्वातंत्र्याचा पुरस्कार केला व ज्या लोकशाही स्वातंत्र्यानेंच मानवी प्रतिष्ठा टिकूं शकते, **त्याची जागा दुसऱ्या कशानेंही भरून येणार नाहीं**, याची जाणीव आपणाला राहत नाहीं. लिंकन व गांधीजी म्हणजे आपआपल्या राष्ट्राच्या '**पडछाया**' होत. आजच्या या घालमेलीच्या काळांत व मानवी मनाच्या विकृतावस्थेंत असलें तुलनात्मक निदर्शन एकमेकांना परिपोषक व शुद्धीवर आणण्यास परिणामकारक झाल्याविना राहणार नाहीं. असल्या विभूती दिक्कालावर मात करून राहिल्या असतात व त्यांचा सर्वकाळीं जयजयकार झाल्या विना राहात नाहीं. "जयन्ति ते सुकृतिनः रससिद्धाः कवीश्वराः!"

× × ×

**श्री सत्य साईबाबा :** मागील नाताळांत हैदराबादेस गेलों होतों. तेथून नागार्जुन कोंडाचे 'महासागर धरण' पहावयास गेलों असतां तेथील कॅंपमध्यें एका अधिकाऱ्याच्या घरीं गेलों होतों. तेथें श्री साईबाबाचें छायाचित्र पाहून त्यांच्याविषयीं मालकाजवळ आम्ही पृच्छा केली. तेव्हां त्यांनीं सांगितलें कीं, श्री साईबाबांनीं नवीन अवतार धारण केला असून ते "**श्री सत्य साईबाबा**" या स्वरूपांत वावरत आहेत. आंध्र प्रदेशांत पुट्टापार्थी येथें ते रहात असून त्यांचें चित्रहि आम्हांस दाखविण्यांत आलें. त्यांची शिकवण प्रसृत करण्यासाठीं "सनातन सारथी" या नांवाचें नियतकालिक निघत असून त्यांत त्यांचें चरित्र, त्यांनीं केलेले चमत्कार, त्यांचा प्रवास, त्यांचें प्रचार कार्य वगैरेची माहिती दिली आहे. त्यांतील एका अंकांत '**बालसाई**' या शीर्षकाखालीं त्यांच्या जीवनाची माहिती पुरविली आहे. त्या बालकाचे नांव **सत्यनारायण राजू** असें आहे. १९४० सालीं सत्य साईबाबा १४ वर्षांचे असतांना ते उरवकोंडा हायस्कूलमध्यें शिकत होते. त्यावेळीं त्यांनीं आपला पुकार अगोदरच केला होता. आपण "शिर्डीचे साईबाबा" आहोंत असें ते म्हणाले. दर गुरुवारीं त्यांचे दर्शनास दूरदूरचे लोक येत असत. त्यांचे बंधु श्री. शेशम राजू यांना आपल्या भावाच्या या जीवनानें फार काळजी वाटली म्हणून ते हंपी येथें विरूपाक्षाच्या दर्शनास गेले. हंपी येथें विजयानगरच्या राजांच्या कुलदेवाचें–विरूपाक्षाचें–भव्य मंदीर आहे. सर्व मंडळी तेथें गेली असतांना हा सत्य "आंत न जातां बाहेरच्या देवळाचें वैभव व पौराणिक सौंदर्य व कळाकुसर पाहाण्यांत रमला होता!" रामायण काळची "किष्किंधा" म्हणून ख्यात झालेल्या प्रदेशांत "**बालबाबा**" भटकत होते. अस्तु. विरूपाक्षाची पूजा करून पुजाऱ्यांनीं कर्पुरारती फिरविल्याबरोबर त्या लिंगाचे ठिकाणीं "बालबाबा" दिसूं लागले! हा चमत्कार झाल्यापासून तर बाबांची महती

वाट लागली ! नुकताच 'सनातन सारथी'चा फेब्रुवारीचा अंक आमचे हातीं आला आहे. त्यावरील बाबांचें छायाचित्र अत्यंत भावनीय व आनंददायक आहे. "प्रेमवाहिनी" या सदरांत त्यांचा उपदेश दिलेला असतो. त्यांची पद्धतीं अतिशय साधी, सरळ, व दृष्टान्तात्मक आहे. संवादात्मकही पद्धति कोठें कोठें आढळते. येथें आम्हीं त्यांचा संस्कृतांतील उपदेश खालीं देत आहोंत :—

अहिंसा प्रथमं पुष्पं, पुष्पमिन्द्रियनिग्रहः ।
सर्वभूतदयापुष्पं, क्षमापुष्पं, विशेषतः ।
शान्तिपुष्पं, तपःपुष्पम्, ध्यानपुष्पं तथैव च ।
सत्यमष्टविधं पुष्पं, **सायी** प्रीतिकरं भवेत् ॥

**—श्री सत्य साईबाबा**

त्यांच्या प्रवचन पद्धतींतील एक विशेष म्हणजे दृष्टान्त. त्यांपैकीं एकच खालीं उद्धृत करीत आहोंत. ते म्हणतात.

"जेव्हां एखादें कमळ (तळयांत) उमलतें, तेव्हां बेडूक आणि मासे त्याकडे धांवत नाहींत. पण पहा, एखाद्या दुसऱ्या कोंपऱ्यांतून मधुकर (भुंगा) आनंदानें नाचत हजारोंच्या थव्यानें त्याचा सुगंध घेण्यास व मधूचा आस्वाद घेण्यास धांवत जातात. हीच गोष्ट अवताराचे बाबतींत लागूं पडते."

आमच्या महाराष्ट्रांत शिरडी हें साईबाबांचें परमपावन असें क्षेत्र आहे. तेथें आज मोठें नगर वसलें आहे. हजारों भक्त त्यांचे दर्शनास जात आहेत. बाबांचीं पावलें कोठें कोठें उमटतांना आपण ऐकतों. शिरडीचें संस्थानही मोठें आहे. या व्यवस्थापकांना वरील घटना ठाऊक नसेल असें म्हणवत नाहीं. बाबा जसे दृष्टि-आड झाले, तसेच अन्यस्वरूपांत ते दिसणें अशक्य नाहीं. आम्हांला एक गोष्ट येथें नमूद करणें आवश्यक वाटतें. बाबांनीं चमत्कार केले. हजारों लोकांची संकटें निवारण केलीं, शेकडों लोकांना सन्मार्गावर आणून सोडलें. व श्रद्धेच्या जीवावर त्यांच्या असंख्य भक्तांना त्यांच्या कृपेचा अनुभव मिळाला. त्यांची मध्यें मध्यें संमेलनेंहि भरलीं. मोठमोठे विद्वान त्यांचे शिष्यहि आहेत. त्यांनीं हिंदू व मुसलमान व अन्य जाती यांतील सलोखा वाढविला व विश्वधर्माचा प्रसार केला. पण त्यांचें तत्वज्ञान काय ? त्यांनीं जीवन व्यतीत करण्यास कोणता मार्ग, कोणती साधना, कोणती तपश्चर्या, कोणती जीवन मीमांसा शिकविली व त्यांचें तत्वज्ञान कोणतें, ह्याची स्पष्टभाषेंत शिकवण त्यांनीं दिलेली नाहीं. निव्वळ भोळया व भावड्या भक्तीनें त्यांना भजणें ही गोष्ट निराळी; व कोणत्याही विद्वान् व साक्षर माणसाला त्यांचें तत्वज्ञान समजून त्यानें त्यांना शरण जाणें, ही गोष्ट निराळी. त्यांची इच्छा असूनहि साईबाबांनीं आपल्या पहिल्या अवतारांत ती मूर्तस्वरूपांत आणली नाहीं. त्यामुळें साईबाबांच्या नांवावर धूर्त व कार्यसाधू लोकांचेंच चांगलें फावलें. फार काय सांगावें ? संस्थानांत दुफळी होऊन वार्षिक निवडणुका व्यावहारिक भूमिकेवरून गाजल्या. तेव्हां आपण शिकविलेल्या धर्माची विस्कटलेली घडी बसविण्यासाठीं साईबाबांनीं अवतार घेणें हें अगदींच असंभवनीय वाटत नाहीं ! कारण श्री सत्यसाईबाबांनीं 'आपण शिरडीच्या साईबाबाचा अवतार आहों,' असें उद्घोषित केलें आहे. आमची शिरडीच्या व्यवस्थापक अधिकाऱ्यांना अशी विनंति आहे कीं, **शिरडीचें स्थान जागृत आहे. श्री बाबांचा निर्णय** अद्यापीहि जनांना घेतां येतो. म्हणून त्यांनीं त्या समाधीला कौल लावून त्यांना काय उत्तर येतें, तें निर्विकार मनानें व पूर्वग्रहदूषित मन न ठेवतां समजून घ्यावें व जनतेला योग्य तें मार्गदर्शन करावें ! याबाबतींत न्यूनगंड अहंगंडाची भावना एका बाजूस सारली पाहिजे. मध्यंतरी शिरडीस जो अपघात झाला, त्याचें कारण, शिरडीच्या व्यवस्थापकांनीं श्रीसाईबाबाच्या या नवीन अवताराचा तपास केला नाहीं, हें कशावरून नसेल, श्रीदत्तात्रयाचे निरनिराळे अवतार घेतलेले आपण ऐकलें आहे. यावरून श्रीसाईबाबांनीं सत्य, तत्त्वज्ञान व शिकवण शिकविण्यासाठींच-कशावरून अवतार घेतला नसेल ! सत्याचें अन्वेषण करणें, हें सर्वांचें पवित्र कर्तव्य आहे. श्री साईबाबांचें छाया चित्र आम्ही मागविलेलें आहे. तें आल्यावर त्याचा ब्लॉक करून पुढील अंकांत आम्हीं छापविणार आहोंत. श्री तुकाराम महाराजांचें भाषेंत सांगावयाचें म्हणजे या महत्त्वाच्या प्रश्नासंबंधीं "आपुलालें चित्त शुद्ध करून" याचा निर्णय करून घेतला पाहिजे. ही सद्बुद्धि सर्वांना होवो ही प्रार्थना !

*

# श्री तुकाराम विश्वविद्यालय संघ
## बृहन्मुंबई-पुरवणी

या महिन्यांत श्री संत तुकाराम महाराजाचें निर्याण झालें ! श्री तुकारामबीज यावर्षीं गुरुवार, तारीख २६ मार्च या दिवशीं येते. त्या दिवशीं श्री क्षेत्र देहू येथें त्या सोहळयास हजारों यात्रेकरू जमा होतात. महाराष्ट्रांतून निरनिराळया प्रांतांतून, वऱ्हाडांतून, आंध्र व मराठवाडा येथून भाविक व निष्ठावान् श्री तुकारामप्रेमी स्त्रीजन हाल सोसून, उन्हातान्हाची पर्वा न करितां निव्वळ स्वर्गारोहणसोहळा पहावयाचा या सद्हेतूनें तेथें जमा होतात. बरोबर बारा वाजतां स्वर्गारोहण होतें. पिंपळाचें पान हलतें ! व नंतर यात्रा परत फिरते ! आज हें अव्याहत कित्येक वर्षें चाललें आहे ! महाराजांच्या विभूतिमत्वाचें अपूर्व तेज उज्ज्वल होऊन तें सर्वत्र भरून जाऊन ओसंडून जात आहे ! धन्य ते महात्मे ! धन्य तो भारत ! धन्य त्याची सन्तपरंपरा ! श्री तुकाराम महाराजांच्या नांवानें काढलेल्या संघाचे त्यांना कोटीकोटी प्रणाम ! त्यांच्या अपूर्व महनीयतेनें व पुण्याईनें भारतीयांचें जीवन सुबुद्ध संपन्न व नैतिकधन्य होवो, हीच प्रार्थना.

× × ×

तळेगांव येथें त्यादिवशीं योग्य स्वरूपांत बीज साजरी केली जाईल. त्या उत्सवासाठीं संघाचे उपाध्यक्ष श्री. एन. जी. वीरकर यांनीं उदारहृदयानें रु. १५० ची देणगी देण्याचें संचालकांना पत्र लिहिलें आहे. त्यांना धन्यवाद. इतर सभासदहि जास्त जास्त सभासद मिळविण्याच्या खटपटींत आहेत.

× × ×

श्री. तुकाराम बीजेच्या दिवशीं श्री. वाचस्पती **क्षीरसागर** यांचें तळेगांव येथें 'प्रवचन' होणार आहे. त्यांना धन्यवाद !

× × ×

अद्यापि इमारत बांधण्यांसाठीं पैसा मिळाला नाहीं. तोपर्यंत निदान दरवर्षी बीज साजरी करावी अशी मनीषा आहे.

× × ×

खार येथें बीजेच्या पूर्वी कीर्तनाचा कार्यक्रम होईल अशी आशा आहे ! सर्वांनीं तळेगांवला बीजेस यावे अशी **प्रार्थना** !

# श्रीगजानन महाराज बोरकर यांचा ५७ वा जयंत्युत्सव

ता. १० मार्च १९५९

# 57th BIRTHDAY OF Shri Gajanan Maharaj Borkar

(10th March 1959)



**खुर्चीवर बसलेले:**—(१) प्रा. ना. के. भागवत एम्. ए. (२) बॅरिस्टर पी. एन्. दारुवाला बी. ए , एल. एल. बी., (मुंबई) बार. ॲट लॉ. एल्. एल्. डी. (लंडन), (३) प्रिन्सिपाल सी. बी. जोशी एम्. ए , (मुंबई व केंब्रिज), (४) एक्झिक्युटिव्ह इंजिनीअर ग. शि. पडवळ बी. एस्. सी., बी. ई., (५) सौ. सरस्वतीबाई बोरकर, (६) श्री. गजानन महाराज बोरकर, (७) सुपरिंटेंडेन्ट इंजिनीअर ग. कृ. पाटील बी. ए., बी. ई., एम्. आय्. ई., (इंडिया) बी. एस्. सी., ऑ. (लंडन) ए. सी. जी. आय्., (लंडन), (८) सौ. विमलाबाई पाटील, (९) ॲडव्होकेट आ. ना. सुर्वे बी. ए., एल् एल्. बी., (ओ. एस्.) (१०) श्री. मो. बा. लिमये बी. ए., उर्फ श्री. अवधूत स्वामी.

**१ पहिले पाठीमागे उभे:**—(१) सर्वश्री वि. दे. सारंग, (२) पां. र. अंबिके, (३) पु. बा. कुलकर्णी, (४) म. अ. कोकाटे, (५) का. म. ताम्हनकर बी. ए., (६) पां. ह. जोशी, बी. ए., एस. टी. सी. डी., (७) श्री. प. मयेकर वकील बी. एस. सी., एल्. एल्. बी., (८) प्रो. य. के. पाध्ये, (९) ना. अ. कोकाटे, (१०) विक्रमप्रसाद ल. मेहता.

**२ त्याच्या वरची रांग:**—सर्वश्री (१) पु. श्री. मयेकर, (२) वि. पां. परब, (३) ज. द. सिधये, (४) जगन्नाथ अ. पडवळ, (५) मो. का. पिटकर, (६) श्री. सत्येन्द्रनाथस्वामी नागवेकर, (७) मो. स. जोशी, (८) न. वि. खांडके, (९) रावसाहेब शं. का. डेरे, माजी पोलीस सुपरिंटेंडेन्ट, (१०) रामकृष्ण गो. बोरकर, (११) शंकर दा. पाटील.

**खालीं बसलेले:**—(१) चि. अ. मो. लिमये, (२) कु. रोहिणी बा. पडवळ, (३) चि. वि. मो. लिमये, (४) श्री. म. अ. आंबेडकर बी. ए., (५) मुकुंदराव किलपाडी, (६) शिल्पकार पां. तु. शिरगांवकर, (७) चि. ह. शं. पाटील.

World Religion Supplement

# धर्मचक्र

वर्ष ११ वें ] [ अंक १२ वा
१५ जुले १९५९

THE WHEEL OF THE MORAL LAW
(Vol. XI—12)
15th July 1959

FATHER FUJI of the LAND of the RISING SUN, Who blesses the Children of the Soil, doing away with all evil influences and Nature's Wrath and brutality of Man! He is the Creator, Preserver and Perpetuator of Japan! It is the Land of the BUDDHA — AMITABHA — The Immeasurable Light. So the Love and Friendship of BHARAT and JAPAN.



**पिताजी फूजी पर्वत-जपानचा संरक्षणकर्ता**

आपल्या भूमीच्या मुलांचे अनिष्ट, अमंगळ नाहीसें करणारा, सृष्टीच्या कोपाला व मानवाच्या पाशवी मनोविकारांना रसातळास [illegible]णारा, तो जपानचा विधाता, संरक्षणकर्ता, व जपानचें जीवनसातत्य राखणारा आहे. जपान ही अमिताभ बुद्धाची भूमि आहे. [illegible] जपान व भारत यांची मैत्री व प्रेमभाव।

# धर्मचक्र

(The Wheel of the Moral Law)

[ बौद्ध शिकवण, जीवन व कला यांच्या विश्वसनीय दर्शनानें महात्माजींची मूलभूत शिक्षा सिद्ध करून दाखविणारें मराठींतील पहिलेंच मराठी-हिंदी सांस्कृतिक मासिक ]

* दर महिन्याच्या १५ तारखेस प्रसिद्ध होतें. *


मुख्य संपादक ( मराठी व इंग्रजी विभाग ), मुद्रक व प्रकाशक :

प्रा. ना. के. भागवत, एम्. ए., ( मुंबई विश्वविद्यालय, पाली ग्रंथ प्रकाशन—सन्मान्य संपादक )

प्रा. शिवसहाय पाठक, एम्. ए., साहित्य रत्न, के. सी. कॉलेज : संपादक हिंदी विभाग

वर्ष ११ वें ] १५ जुलै १९५९ [ अंक १२ वा


## अनुक्रमणिका

### मराठी विभाग



### हिंदी विभाग



### World Religion Supplement :



### वर्गणीचे दर :

१ : भारतांत पोस्टेजसह रु. ५-०-०
२ : महाभारतांत पोस्टेजसह रु. ७-०-०
३ : किरकोळ अंकास ७५ नये पैसे
बुद्धजयंती विशेषांक रु. १-७५ नये पैसे (२४ मे १९५६ चा)

### जाहिरातीचे दर : ( एक वेळचे )

अत्यन्त सवलतीचे आहेत.
कृपा करून पत्र पाठवून तपास करा.

### या अंकांत विशेष काय पहाल ?




मुद्रक व प्रकाशक : प्रा. ना. के. भागवत, धर्मचक्र कार्यालय, सुगतनिधान, १५ वा रस्ता, प्लाट नं. ४६३, खार, मुंबई २१
मुद्रण स्थळ : मुंबई वैभव प्रेस, ४१७/४२१ सरदार वल्लभभाई पटेल रोड, गिरगांव, मुंबई, नं. ४

World Religion Supplement

# धर्मचक्र

THE WHEEL OF THE MORAL LAW

र्ष ११ वें ] १५ जुलै, १९५९ [ अंक १२ वा

## नमो बुद्धाय !*

न जातो न मृतं चैव नं रूपो नापि रूपवान् ।
न संसारे न निर्वाणे नकारन्तेन सूच्यते ॥ १ ॥

मोहध्वंसकरो नित्यं मोक्षसौख्यैकदायकं ।
मोहनं सर्वमाराणां मोकारन्तेन सूच्यते ॥ २ ॥

बुद्धानां मुदितं ध्यानं बुद्धानां जनप्रेरकं ।
बुद्ध निक्लेश संबुद्ध बुकारन्तेन सूच्यते ॥ ३ ॥

धार्य्यते बोधिसत्त्वैः सद्धर्मधातुगतिः सदा ।
धर्माणां परमो धर्मो धकारन्तेन सूच्यते ॥ ४ ॥

यथाअस्ति तथानास्ति यथानास्ति तथास्तिय ।
यथावादि तथाकारी यकारन्तेन सूच्यते ॥ ५ ॥

पंचाक्षरंमिदं पुण्यं पवित्रं पापनाशनं ।
ये पठन्ति दिवारात्रौ ते प्रयांति परांगतिम् ॥

॥ इति पंचाक्षर स्तोत्र समाप्तम् ॥

---

*[महाकारुणिक सेवक संघ, दरभंगा यांच्या स्तोत्रांतून एक स्तोत्र संस्कृत व्याकरण शुद्ध नाहीं. —संपादक ]

# संपादकीय

या महिन्यांतील मुंबईतील महत्त्वाची घटना म्हणजे श्री राजगोपाळचारीची मुंबईस भेट ! या उतारवयांत ज्या करितां ते मुंबईस आले, त्यावरूनच त्यांची राष्ट्रविषयक कळकळ प्रतीत होते. महात्माजीपासून आज पावेतों कॉंग्रेसच्या जीवनांतील विविध स्थित्यन्तरें व चढउतार त्यांनीं पाहिलीं आहेत, स्वातंत्र्यप्राप्तीनंतर ते एकदा राष्ट्राची धुरा वाहत होते. निव्वळ भावना प्रधान नाहीं किंवा निव्वळ स्वार्थी व्यवहारी हि नाहीं अशी त्याची वृत्ति आहे. आपलीं मतें त्यांनीं वारंवार निर्भीडपणें बोलून दाखविलीं आहेत. 'निस्पृहस्य तृणं जगत्' अशी त्यांची स्वतंत्र किंवा एकांडी वृत्ति आहे. कॉंग्रेस ही राष्ट्रांतील एकमेव संस्था राहावी; पण तिनें मागच्या उज्ज्वल परंपरेला धरून राष्ट्रहितैषी कारभार चालवावा, अशी सर्वांची इच्छा आहे पण कॉंग्रेसच्या हातीं सत्ता आल्यापासून तिची सर्व बाजूनीं विचार करण्याची पात्रता, कार्यक्षमता कमी कमी होत चालली, हें नाकबूल करण्यांत हंशील नाहीं. आपण सत्तारूढ झालों म्हणून त्यांनीं सर्व क्षेत्रांत एखाद्या यक्षिणीच्या कांडीं प्रमाणें संपूर्ण चमत्कार करण्याची खोटी हाव धरली.'राज्य पद्धती एकदम बदलून टाका व सर्वत्र कॉंग्रेस शिक्क्याची सुधारणा करा,' असा अट्टाहास राजकारणांतील कांहीं श्रेष्ठींनी धरला ! इंग्रजी सरकारची राज्यपद्धति एकदम पालटून टाकणें ही घिसाडघाई किती अदूरदर्शी आहे, याची जाणीव त्यांना प्रथम झाली नाहीं. पहिलीं १० वर्षें पर्यंत जुनी राज्यव्यवस्था, कारभार करण्याची [illegible]शिस्त व पद्धति कायम ठेवून हळूंहळूं त्यांत सुधारणा करावयाच्या ऐवजीं [illegible]नीं एकदम जनतेस थक्क करून नेत्रदीपक कामगिरी करून दाख[illegible]ाचा जो चंग बांधला तो निव्वळ हास्यास्पद होता.राजकीय,सामाजिक, [illegible]मक, बौद्धिक, व्यापारविषयक, नैतिक क्षेत्रांत हळूंहळूंच व धीरा[illegible]रानेंच सुधारणा करावयास पाहिजेत. या विरुद्ध वागण्याचा जो परिणाम होवयाचा तो झाला ! एक राज्यकारभार करणारा कॉंग्रेसचा पक्ष व त्याला [illegible]ध करणारे पक्षोपपक्ष निर्माण झाले. समाजसत्तावादी, हिंदू महासभावादी, [illegible]म्यवादी, नरमवादी वा गरमवादी असे फड निर्माण झाले व त्यांच्यांत [illegible]वाद व भांडणें सुरूं होऊन कॉंग्रेसच्या राज्यकारभारास खीळ [illegible]लण्याचा यत्न सुरूं झाला. 'सरकारची जो अडचण तीच आमची [illegible]वर्णसंधी' अशा धोरणानें जनतेची दिशाभूल व आपल्या पक्षाचा मात्र [illegible]यदा, असा राजकारणांत विचका झाला व त्यांतच भाषिक राज्यांचें खूळ [illegible]लें, व त्यांत तर काय लोकशाही कारभार ! मोर्चे, निदर्शनें, गोळीबार, चौकशा, संप, असहकार, काझमाची चळवळ इत्यादींचा सुकाळ झाला ! या सर्व परिस्थितीचें चित्र पाहून जुन्या पिढींतील व सनदशीर पद्धतीनें राज्यकारभार चालावा असे वाटणारे प्रागतिक राजकारणी पुरुष (Liberal Spirit) कष्टी झाले. या सर्व गोंधळाचा विचार करून व जागतिक परिस्थितीचा समतोल बुद्धीनें आढावा घेऊन आपण एक नवीन पक्ष काढावा, अशी त्यांच्या मनांत स्फूर्ति व्हावी, हें साह[illegible]जिकच आहे. या पार्श्वभूमीवर स्वतंत्र पक्षाची स्थापना झालेली दिसे[illegible] त्याची चेष्टा करणें किंवा तो पक्ष कमी लेखण्याची वृत्ति दाखविणें [illegible] असमंजसपणाचें आहे. त्यांत काम करणारे अग्रणी म्हणजे श्री चक्रवर्ती राजगोपाळचारी, प्रा. एन्. जी रंगा, श्री. एम्. आर. मसानी, श्री. व्ही. पी. मेनन वगैरे मुरब्बी लोक आहेत. आपण अशी आशा करूं [illegible] कीं, या नवीन पक्षाची उपयुक्तता सर्वांना पटावयास लागून सध्याच्या राज्यकारणांतील गोंधळ, विपर्यस्तता, स्वार्थी बुद्धि. आपली [illegible] लावण्याची वृत्ति या सर्वांना पाय बंद बसेल व हा पक्ष कांहीं तरी निर्णायक व सर्व राष्ट्र उपकारक अशा सुधारणा करील व सरकाराला मार्ग दाखवील. टेनिसननें म्हटल्याप्रमाणें हा नवीन जमाना (This New Order) येऊन जुन्या जमान्यांतील घाण काढण्याची मोठी कामगिरी त्यानें करावी हीच परमेश्वराची इच्छा ? असें कांहीं लोकांना वाटल्यास त्यांत नवल नाहीं. आम्ही या 'स्वतंत्र' पक्षाला सुयश चिंतितों.

× × ×

तिबेटचे दलाई लामा यांना भारतानें आदरातिथ्यपूर्वक आश्रय दिला, ते व त्याचे बरोबर आलेले निर्वासित यांची सुव्यवस्था ठेवली, ही गोष्ट भारताच्या परंपरात्मक अतिथ्य सेवेला अनुरूपच झाली व त्या योगानें सर्व भारतीयांना आनंद झाला. मध्यंतरीं त्यांनीं आपल्या भाषणांत जे उद्गार काढले ते भारताच्या तटस्थ विषयक धोरणासंबंधीं गैरसमज उत्पन्न करणारे आहेत, असा खुलासा अधिकाऱ्यांनी केला आहे. दलाई लामा यांचें व्यक्तिमत्व स्वयंभू आहे. 'त्याचें अस्तित्व जेथें आहे तेथें सर्व तिबेट-राष्ट्र आहे' असें म्हणणें अगदीं योग्य आहे. राजकारणाच्या चष्म्यांतून जो काय अर्थ दिसतो, तों सर्वांना पटेलच, असें म्हणतां यावयाचें नाहीं. आम्ही दलाई लामा यांना भारत व तिबेट यामधील "सांस्कृतिक प्रतीक" म्हणून मानतों. त्या संबंधींच या परिच्छेदांत कांहीं लिहित आहोत. तिबेटची संस्कृति मूलतः व तत्वतः भारतीय आहे. तिबेटचें सर्व वाङ्मय म्हणजे मूळच्या संस्कृतांचीं भाषान्तरें होत. जे स्वतंत्र ग्रंथ तिबेटमध्यें लिहिले गेले आहेत, त्यांचा मुखवटाहि संस्कृताचाच आहे. इ. स. ७ व्या आठव्या शतकांत भारतांत 'जो तन्त्र-धर्म' अस्तित्वांत होता व भरभरटीस आला, त्यांतून लामा धर्माचा उगम झाला. आठव्या शतकांत नालंदा विश्वविद्यालयांतून पद्मसंभव नांवाचा भिक्षू तिबेटमध्यें गेला व त्यानें बौद्धधर्माचा प्रचार केला. तिबेटमधील गायन व नाट्य यांचा उगमहि भारतांतूनच झाला आहे. वंशशास्त्राप्रमाणें जरी तिबेट लोक भारतापेक्षा चिनशी संलग्न आहेत व त्याची भाषाहि चिनीभाषेला जवळ आहे तरी पण त्यांची

मानसिक व अध्यात्मिक मनोरचना सर्वस्वी भारतीय आहे."

यामुळें आम्हांस दलाई लामा म्हणजे आमच्या शंकराचार्यांप्रमाणेंच वाटतात. 'धर्मगुरु' दलाई लामा आपणास तिबेट पासून दूर करूं शकत नाहींत. लोकहि त्यांना असेंच मानतात, "जेथें दलाई लामा तेथें आमचा राजा, तेथें आमचे सरकार!" यांतून निराळा अर्थ काढणें म्हणजे मूर्खपणा आहे. त्यांची योग्यता चीन सरकारला ठाऊक आहे; म्हणून तर त्यांना फसवून आपल्या ताब्यांत घेण्याचा भगीरथ प्रयत्न चीन सरकार करीत होते; पण त्यांत त्यांना यश आलें नाही. दलाई लामा संबंधीं नैतिक भूमिका उच्च प्रकारची आहे, व हीच गोष्ट आम्ही या प्रसंगी स्पष्ट करूं इच्छितों. त्यांच्या विरुद्ध काहूर करणारे त्याचे हितशत्रू जी धूळ उडवत करतील, त्यानें बिचकून जाण्याचें भारत सरकारला कांहींच कारण नाहीं. यांत त्यांच्या तटस्थ धोरणाचा कांहींच भंग होत नाहीं.

× × ×

कॉंग्रेसनें हातीं सत्ता घेतल्याबरोबर प्रथम जनतेस आश्चर्याचा धक्का देणारी गोष्ट त्यांनीं केली असेल ती म्हणजे इंग्रजी शाळांतून इंग्रजीची हकालपट्टी करणें. इंग्रजी भाषा सुरूं ठेवणें म्हणजे भूतपूर्व गुलामगिरी मान्य करण्यासारखें आहे, असा हास्यास्पद कोटिक्रम कांहीं कट्टर कॉंग्रेस पुढाऱ्यांनीं केला. "इंग्रजी बद्दलचा आग्रह हा नोकरी वाल्यांचा आहे.' अशी हेटाळणी एकानें केली. इंग्रजी शिक्षण इंग्रजी शाळांतील पहिल्या इयत्तेपासून सातव्या इयत्तेपर्यंत देण्याच्या प्रथेला एकदम खो देऊन इंग्रजी शिक्षण चार वर्षांपुरते मर्यादित करण्याचे अविवेकी धोरण मुंबई सरकारनें स्वीकारलें व त्याचे दुष्परिणाम गेलीं आठवर्षें मुंबई राज्यांतील विद्यार्थ्यांना भोगावे लागले. सरकारने इंग्रजी शिक्षण चारवर्षांचे केलें; पण विद्यापीठांतील शिक्षणाचे माध्यम मात्र इंग्रजीच राहिलें. त्यामुळें कॉलेजांत गेल्यावर प्राध्यापक काय बोलतात हेंच त्यांना कळणें दुरापास्त झाले. याशिवाय पुस्तकें वाचणें, [illegible] करणें, इंग्रजीत दोन वाक्यें बिनचूक लिहिणें, किंवा प्रबंध लिहिणें, या सर्वांत विद्यार्थ्यांची कुचंबणा व प्राध्यापकांच्या जीवाचा [illegible] झाला. पण इंग्रजीचें महत्त्व सरकारी कारभारांत व अन्य सार्वजनिक व्यवहारांत मात्र मुळींच कमी झाले नव्हतें. म्हणून इंग्रजीच्या [illegible] विद्यार्थी, प्राध्यापक व सामान्य जनता यांची केवढी कुचंबणा झाली होती, हा सर्वांच्या प्रत्यहीचा अनुभव होऊन बसला. इंग्रजींतून शिक्षण देणाऱ्या मिशनरी शाळांतून विद्यार्थ्यांचा भरणा होऊं लागला! शिक्षणाचे बाबतींतील हें अराजक, जें आठवर्षें सुरू होतें, तें बंद करून मुंबई सरकारच्या विद्याखात्यानें असें ठरविले आहे कीं, पांचव्या इयत्तेपासून इंग्रजी हा ऐच्छिक विषय म्हणून शिकविण्यास परवानगी देण्याचा व तशी सोय करण्याचा निर्णय घेतला जाईल. इंग्रजी भाषा भारतांत आली आहे तिचीं मूळें [illegible] रुजत आहेत. प्रान्तीयता, जातीयता, नाहींशी होण्यास इंग्रजी-सारखें दुसरें प्रभावी साधन नाहीं. म्हणून मुंबई सरकारच्या या निर्णयाचे [illegible] व इष्ट परिणाम झाल्याविना राहणार नाहींत. म्हणूनच आम्ही [illegible] अभिनन्दन करतों!

× × ×

[illegible] 'सोविएत महिलावर्ग व सप्तवार्षिक योजना' या शीर्षका-खालीं एक स्फुट आमचें वाचण्यांत आलें. त्यांत पुष्कळ विचारार्ह गोष्टी [illegible]. अगदी पहिल्या ऑक्टोबर क्रान्तीनंतर स्त्री व पुरुष असा गंड (complex) राहिलाच नाहीं. सुखी जीवन व शिक्षण व राज्यकारभारांत घ्यावयाचा भाग, सांस्कृतिक चळवळी, या सर्व क्षेत्रांत स्त्रीला नवीन क्षितिजें निर्माण झालीं. मन्त्री, शास्त्रज्ञ व उद्योग व शेतकीतील काम करणाऱ्या भगिनी आज दिसून येऊं लागल्या. पुष्कळ महिला शिक्षक व डॉक्टर या धंद्यांत शिरतात. त्यांना डॉक्टरची मदत फुकट मिळते. विचार विनिमय-केन्द्रें, प्रसूती घरें, लहान मुलांसाठीं शिशु विहार व शाळा, मुलांसाठीं सुट्टींमधील शिबिरें यांचे मोठें जाळें सर्व देशभर पसरलें आहे. नवीन सप्तवार्षिक योजनेप्रमाणें स्त्रीला कमीत कमी कामाचे तास आठवड्यांतून मिळतील. त्यांना आपलें घर व मुलेंबाळें यांच्याकडे जास्त लक्ष पुरविण्यास वेळ मिळेल. स्त्रीचे क्षेत्र म्हणजे चूल" ही विचार सरणी सोविएतला मान्य नाहीं. घरामध्यें सर्वांचा समान दर्जा असला पाहिजे. म्हणजे घरांतील सर्व कामें करण्याचे बाबतीत सर्वांनी सारखा वाटा उचलला पाहिजे. ही विचारसरणी दिवसें दिवस अभिमत होत चालली आहे. घरांतील कामें सर्वांनीं करण्यांत कांही कमीपणा नाहीं. काम उरकून घरीं आल्यावर बाजारांत जाऊन जिन्नस खरेदी करणें किंवा लहान मुलांना शिशुविहारांतून घरीं आणण्याचे कामीं पुरुषांनीं मदत करण्यांत कांहींच अपमान वाटत नाही. नवीन सप्तवार्षिक योजनेंत पुरुष व स्त्री यांच्या उत्पन्नांत शेंकडा ४० नी वाढ होईल. दोघांचाही वाढता पगार दोघानाही भूषणावह होऊन त्यांचा संसार सुखानें चालण्यास मदत होईल.

सोविएत स्त्रिया म्हणजे इतर स्त्रियांहून कांहीं निराळ्या नाहींत. त्या प्रेम करूं शकतात, लग्न करतात, त्यानां मुलेंबाळें होतात. कदाचित् तिचें लग्न जर सुखी झाले नाहीं. तर त्यांतून मार्ग काढण्यास तिला कांहींच अडचण पडत नाहीं. कारण स्वतंत्र जीवन व्यतीत करण्याचें साधन तिचेजवळ असतेच. यास्फुटांतील शेवटचीं वाक्यें तर फारच उद्बोधक आहेत. सोविएत स्त्री सृजनशील असते. तिला उभारणी कशी करावी हें ठाऊक असते. म्हणून युद्धांचा तिला तिटकारा आहे! मातांना तर युद्धाचा हजार पट अत्यन्त तिटकारा आहे. **म्हणून सोविएत स्त्री शांततेकरितां सदैव तयार असते.** यादृष्टीनें सोविएत राष्ट्र काय म्हणते तें वाचा—'धरित्री ही मोठी व उदार आहे. प्रत्येकाल पोट भरण्यापुरते पुरेसें आहे. जर जीवनाची विषमता घालवून तें [illegible] राहणीवर आणलें तर सर्व मुलांना अन्न व वस्त्र यांचा तुटवडा [illegible] नाहीं! "Above all, let a serene blue sky shine [illegible] all the cradles the world over."

माणसाला या जगात आणखी दुसरें कांहीं हवे असते काय? जीव[illegible] ध्येय व परिपूर्ति या दृष्टीनें भारताने यांत पुष्कळ शिकण्यासारखें आ[illegible] पण केव्हां? इच्छा असेल तर!

× × ×

धर्मचक्राचा हा अंक वाचकांच्या हातीं दिला म्हणजे धर्मचक्राचें हें [illegible] संपून त्याचीं ११ वर्षें पुरी होतील! अंगीकृत कार्य येथपर्यंत आले [illegible] समाधान संपादकाला मिळेल. त्याशिवाय वाचकांचीहि अविरत से[illegible] एकवर्ष आपण करूं शकलों, ही कर्तव्यपूर्तीची माधुरी त्यांना लाभे[illegible] नवीन वर्षाच्या पहिल्या अंकांत 'संपादकीय निवेदन' सविस्तरपणें देण[illegible] आहों. त्यावेळीं विशेष माहिती त्यांत सांपडेलच. वाचकांनीं व [illegible] बंधीयांनीं व प्रेमळ सज्जनांनीं जो उदार आश्रय धर्मचक्राला दिल[illegible] त्या बद्दल त्यांचे कृतज्ञतापूर्वक आभार मानणें, हेंच आज आम्ही करीत आहोंत. त्यांनीं अशीच प्रेमाची पाखर धर्मचक्रावर धरावी. अशी त्यांना नम्रतापूर्वक विनंति! भारताचे त्रिविध कल्याण होऊन त्याचें स्वातंत्र्य त्याच्या पचनीं पडावें हीच प्रार्थना! "सर्वे भद्राणि पश्यन्तु!"

# बुद्ध–यश

(पुण्यस्मरण)

[ भारतीय बौद्धसंस्कृति व भारतीय संस्कृतीचे इतर डोळयांत भरणारे विशेष यांचा ज्यांनीं अभ्यास करून भारताबाहेर त्यांचा दीप पाजळण्यासाठीं ज्यांनीं आपलें जीवन त्याकामीं वाहून घेतलें, अशा उज्वल महाभागांना भारत विसरला व ऐतिहासिक कारणामुळें त्याची दृष्टि संकुचित, एकदेशीय व परमत–असहिष्णु बनली. पारतंत्र्याचा काळांत माझेजवळ आहे तेवढेंच खरें, शाश्वत व सनातन अशी भलतीच समजूत करून घेऊन हिंदु धर्म, आर्य धर्म, सनातन धर्म, असली मर्यादित नामाभिधानें धारण करून बाहेरच्या आपल्या आचार्यांना, धर्मासाठीं प्राणत्याग करण्यास मागें न पाहणाऱ्या भारताच्या सुपुत्रांना भारत पारखा झाला! अशा विस्मृति झालेल्या नरपुंगवांना भारत आतां पुन्हां परत बोलावीत आहे. भारतीय संस्कृतीचा प्रसार मध्य आशीया, चीन, जावा, सुमात्रा, बोर्नियो, मलाया, कांबोडिया, सयाम, ब्रह्मदेश, तिबेत, सिंहलद्वीप इत्यादि देशांत होऊन, तो करणारीं भारतमातेचीं मानवरत्नें यांना पुन्हां उजाळा देण्याचें कार्य आम्ही आरंभिलें आहे. त्यापैकी "कुमारजीवा"ची पुण्यस्मृति धर्मचक्राच्या 'मे महिन्याच्या' अंकांत वर्णिलेली आहे. या अंकांत 'बुद्धयश' या काश्मीरच्या धर्मप्रचारकाचा व विद्वान भिक्षूचा परामर्श घेत आहोंत.

—संपादक ]

काश्मीर हें भारताचें नंदनवन म्हणतात. म्हणजे चैन करण्यासाठीं, या ...नाचे भोग भोगण्याकरितां तें अप्रतिम स्थान आहे! साहेब लोकांचे ...शेगल बादशहा व मागून साहेब लोक तेथें जात व इन्द्रियविषय- ...निमुराद भोगीत. पण या काश्मीरच्या पवित्र भूमींत महान् त्यागी ...दार तत्वज्ञानी व सर्वभूतहिते रताः असे मुनिपुंगवहि निर्माण ... त्यांनीं भारताला सर्व जगांत ललामभूत केलें. त्यांनीं मध्य आशिया ...न यांत बौद्ध संस्कृतीचा प्रसार करून चीन देशांत संस्कृत भाषेंतील ...ल्य ग्रंथाचीं भाषान्तरें करून चिनी विद्वत्तेचा (scholarship) ...घातला. चिनांतील चरित्रकारांनीं ज्या भारतीय भिक्षूंचीं चरित्रें ...कारानें लिहिलीं आहेत, त्यांत "बुद्धयशा"ला फार मोठें स्थान प्राप्त ...आहे.

...द्धयश, हा काश्मीरमध्यें एका ब्राह्मण कुळांत जन्माला आला. त्याचें ...णी ब्राह्मणी धर्माचें केन्द्र असल्यामुळें त्याच्या बापाला बौद्धधर्माची चीड ... एक दिवस एक बौद्ध भिक्षु रस्त्यानें चालला असतां त्या शान्त ...्या निरूपद्रवी भिक्षूचें दर्शन त्याला असह्य झालें. त्यानें एक ...मित्त काढून त्यावर हल्ला चढविला. प्रतिकाराला अप्रतिकाराचें उत्तर ...मळाल्यामुळें तो कडक ब्राह्मण लौकरच थंडावला व बेचैन होऊन ...ी गेला. त्या ब्राह्मणाला या कृत्याचा झाडा तावडतोब द्यावा लागला. त्याच्या दोन्ही हातांना पक्षघात झाला! मूळचा ब्राह्मण असल्यामुळें त्याला पश्चात्ताप झाला व आपण केलेल्या पापाचें क्षालन करण्यासाठीं उपाययोजना करूं लागला. त्यानें त्या भिक्षूला घरी बोलावलें, त्याची क्षमा मागितली, व तो त्याला म्हणाला–भदन्त, माझ्या पापाचें प्रायश्चित मला मिळालेंच आहे. पण त्याची निष्कृति होण्यासाठीं मी माझा हा १३ वर्षांचा मुलगा आपणांस अर्पण करतो. आपण त्याचा स्वीकार करा."

लौकरच 'यश' हा प्रव्रजा घेऊन भिक्षू झाला व आपल्या गुरूच्या बरोबर दूर दूरच्या देशांत गेला व तेथें त्यानें बौद्धधर्मांच्या पवित्र ज्ञानाचें अध्ययन केलें. आपल्या वयाच्या २७ व्या वर्षी तो विद्यापारंगत व उपसम्पन्न भिक्षूहि झाला. त्यानें काश्मीरला रामराम ठोकला व दूरदूरच्या देशांत प्रवास करून तो काश्गरला गेला. तेथील राजानें ३००० भिक्षूंना एका धार्मिक उत्सवासाठीं बोलावलें होतें. त्या ज्ञानसत्रांत यशहि गेला होता. त्याची मुद्रा, त्याची वागणूक व एकंदर रुबाब हीं इतकीं वैशिष्ट्यपूर्ण होतीं कीं, त्या सर्वांचा त्या राजाच्या मनावर फार मोठा परिणाम झाला व त्यानें त्या भिक्षूस राजवाड्यांत निमन्त्रण दिलें व 'येथेंच तूं रहा' अशी प्रार्थना केली. त्याच वेळीं कुमारजीव काश्गरला गेला होता व तिथें त्या दोघांची भेट झाली. कुमारजीवानें कांहीं बौद्ध वाङमयाचा अभ्यास त्याचेजवळ केला व मग कूचीला परत गेला (मे महिन्याचा धर्मचक्राचा अंक पहा.) तेथें त्याला राजकीय घडामोडींत बंदिवान म्हणून चीनला जावें लागलें. कुमारजीव बंदिस्थ झाल्याचें वर्तमान ऐकून यशाचें चित्त विपर्यस्त झालें. पण काश्गरालाच यश १० वर्षें राहिला व नंतर तो कूचीला गेला. कूची हें त्यावेळचें मोठें प्रख्यात विद्यापीठ होतें. त्यानें तेथून कुमारजीवाला पत्र लिहिलें व 'मी तुमचेकडे येण्यास व तुमचे जवळ राहण्यास तयार आहे' असें त्याला कळविलें. तो कूची सोडून कुमारजीवाकडे गेला व "चँगनान" येथें बादशहाच्या मध्यस्थीनें तो त्याला भेटला. त्या दोघांनीं (कुमारजीव व बुद्धयश) कित्येक संस्कृत बौद्धग्रंथाचीं चिनी भाषेंत भाषांतरें केलीं व त्या दोघांनीं चीनमधील विद्वत्तेला बरीच कार्यक्षमता व कौशल्य आणून दिलें. पुढें कुमारजीवाच्या निर्वाणानंतर बुद्धयश पुन्हां काश्मीरला परत आला.

त्याचा स्वभाव करारी असून निरपेक्षता हा त्याच्या स्वभावांतला विशेष होता. बादशहानें त्याला कित्येक गोष्टी नजर केल्या असतांना त्यानें त्याचा स्वीकार केला नाहीं! 'अहह महतां निःसीमानश्चरित्रविभूतयः!'

# दोन भिन्नवैचारिकप्रणालिकांतून भारतदर्शन

[भारत स्वतंत्र झाल्यानंतर भारतांत अगदीं विभिन्न विचारप्रणालिकेंचे परदेशस्थ विचारवंत व विद्वान येतात. ते भारतांत हिंडून भारताचें निरीक्षण करतात व आपलीं पत्रकें छापून काढतात. अशांपैकीं दोन निवडक लेख खालीं उद्धृत केलीं आहेत. स्वतःचें कांहीं नाहीं.

संपादक]

१

## सोविएत पत्रकाराचे भारतांतील अनुभव

भारतीय लोकांविषयीं सोविएत नागरिकांच्या अंतःकरणांत नितांत आदर व सहानुभूति आहे. पण या महान् देशाची परिपूर्ण माहिती असलेले बरेच सोविएत युनियनमध्यें आहेत विशेषतः भारताचा पुराण इतिहास, संस्कृति, चालीरीति यांची माहिती बरीच अपुरी अशी आहे. त्यामुळें सोविएत युनियनमध्यें भारताविषयीं नवें पुस्तक प्रसिद्ध झालें कीं, तें मिळविण्याची उत्सुकता सोविएत युनियनमध्यें फार झपाट्यानें वाढत आहे हें होय.

## सोविएत पत्रकारचे ७ वर्षें वास्तव्य

भारतांमध्यें ७ वर्षें वास्तव्य करून त्यासंबंधींचे अनुभव लिहून काढले नाहींत तर वृत्तपत्रकाराचे व्यवसायास लांछन आणणारी ही गोष्ट ठरेल असें म्हणून सोविएत पत्रकार ओलेग ऑरेस्तीव यांनीं 'भारतांतील ७ वर्षें वास्तव्य' या नांवाचा एक ग्रंथ नुकताच प्रसिद्ध केला आहे.

ओलेग ओरेस्तीव हे १९४४ साली भारतांत आलेले सोविएत पत्रकार असून ७ वर्षांचे काळांतील स्वातंत्र्यपूर्व व नंतरच्या महत्वाच्या घडामोडी त्यांनी स्वत: डोळ्यांनीं पाहिलेल्या आहेत. भारतांतील बहुतेक इतिहास-प्रसिद्ध स्थळें, पदार्थ संग्रहालयें, ग्रामीण खेडीं, औद्योगिक केंद्रें इत्यादि ठिकाणें पाहून त्यासंबंधीचे त्यांचे अनुभव या ग्रंथांत दिलेले आहेत.

हिंदी नागरिक व बुद्धिवादी हे दुसऱ्याच्या मतांबद्दल सहिष्णुतावृत्ति धारण करणारे असल्यानें सोविएत मित्रानें व्यक्त केलेल्या स्पष्ट मतानें दुखावले जाणार नाहींत, असें विचार पत्रकारानें ग्रंथाच्या प्रस्तावनेंत मांडले आहेत.

## स्वातंत्र्याचें दानः साम्राज्यवाद्यांचा अपेक्षाभंग

युद्धानंतर ब्रिटिशांनीं उदार अंतकरणानें भारताला स्वातंत्र्य बहाल केलें ही साम्राज्यवाद्यांनी प्रसृत केलेली कल्पना भारतांत फार काळ रुजली नाहीं. कारण लष्कराचें बळावर भारतांत आपली सत्ता टिकवणें अशक्य असल्यानेंच अरिष्टांतून मार्ग काढण्यासाठीं स्वातंत्र्य देणें त्यांना भाग पडलें, ही बाब भारतीयांना चांगली असल्याचा अनुभव ओरेस्तीव यांनीं सांगितला आहे.

वॉशिंग्टन किंवा लंडन येथील साम्राज्यवाद्यांना परराष्ट्रीय धोरण ठरवितांना भारत काय म्हणेल, भारताचें मत काय, याचा कानोसा घेणें भाग पडत आहे या मध्येंच भारत स्वातंत्र्याच्या आकांक्षांचें व साम्राज्य-वाद्यांच्या अपेक्षभंगाचें प्रतिबिंब स्पष्ट होत आहे.

ब्रिटिशांच्या काळांत खरा भारतीय इतिहास लपवून ब्रिटिश हित-संबंधांना पोषक असाच इतिहास शाळा कॉलेजांतून शिकविला जात असे पण आतां शास्त्रज्ञांनी सत्य घटना उजेडांत आणण्याच्या मोठ्या कार्यास सुरवात केली आहे.

## स्फूर्तींदायक स्मारकांचा नाश

ओरेस्तीव यांच्या पुस्तकांत 'गौरवाची व मानखंडनेची स्मारकें' या विषयावर एक भाग लिहिलेला असून भारतीय शूरांचीं व देशभक्तांची स्मारकें कलकत्ता, लखनौ, मुंबई येथें फारच कमी असल्याचा खेदपूर्वक उल्लेख आहे. ते पुढें म्हणतात कीं, भारतीय मन मारण्याचा, राष्ट्रीय स्वाभिमान दुखविण्याचा पद्धतशीर प्रयत्न दिल्ली वगैरे ठिकाणीं ही स्मारकें नष्ट करून वसाहतवाद्यांनी केलेले आहेत. स्वातंत्र्योत्तर काळांत स्वातंत्र्य वीरांची उचित स्मारकें उभारलीं जातील असा विश्वास त्यांनीं प्रगट केलेला आहे.

## हिंदी स्त्रियांचा गौरव

हिंदी स्त्रियांच्या उच्च नैतिक गुणांचा व नम्रतेचाहि ओरेस्तीव यांनीं गौरव केला आहे. जातीबंधनें ही भारतीयांच्या एकजूट बांधण्याच्या कार्यांत मोठी अडचण असल्याचें सांगून भारतीय प्रजासत्ताक [illegible] मात करण्याचा कसा प्रयत्न करीत आहे याचीं उदाहरणें दि[illegible] 'अस्पृश्यता निवारणाचा कायदा' 'हिंदु कोड' हे काय[illegible] पुरोगामी दृष्टीकोनाचें द्योतक आहेत असे ते म्हणतात.

## नव्या भारताची उभारणी

राजकीय गुलामगिरीचीं बंधनें झुगारून दिल्यानंतर भारतीय [illegible] औद्योगिकदृष्ट्या बलवान राष्ट्र निर्माण करण्याच्या कार्यास ल[illegible] आहेत. तीन नवीन पोलादी कारखाने उभारले जात असून [illegible] पोलाद कारखान्याच्या बाबतींत ब्रिटिशांच्या जुन्या अनुभवामुळें सुर[illegible] हिंदी लोक साशंक असल्याचा उल्लेख ओरेस्तीव यांनीं केलेल[illegible] सोविएत सरकार जुनी यंत्रसामुग्री भारताला पुरवील हीच शंका [illegible] होती. पण प्रत्यक्षांतून त्यांची ही भीती दूर झाली. ट्रॉम्बे [illegible] 'अप्सरा' या अणुभट्टी-केंद्राबद्दल ओरेस्तीव यांनीं भारतीय बुद्धि[illegible] गौरव केला आहे.

(२)

## अमेरिकन तत्वज्ञान्याचें भारत-निरीक्षण

प्राध्यापक थिओडर एम्. ग्रीन हे अमेरिकन तत्वज्ञ सॉक्रेटीस या म[illegible] ग्रीक तत्वज्ञानाच्या परंपरेस अनुसरून प्रश्नोपप्रश्न विचारून भार[illegible] संबंधीं माहिती गोळा करीत आहेत. गेल्या जुलैपासून त्यांनीं पंतप्र[illegible]

नेहरूंसकट शंभरापेक्षां अधिक भारतीयांना गांठून जरूर ती माहिती मिळविली आहे.

प्राध्यापक ग्रीन हे आतां भारतांतून प्रयाण करण्याच्या तयारींत असून भारतीयांबरोबरच्या संपूर्ण संभाषणांनीं भरलेल्या त्यांच्या पांच वह्यांचें पुडकें हें त्यांच्या जवळचें अत्यंत बहुमोल सामान आहे. अमेरिकेंत पोहोंचल्यानंतर हीं भाषणें बव्हंशीं जशींच्या तशींच प्रसिद्ध करण्याचा त्यांचा विचार आहे.

## भारताला दुसरी भेट

डॉ. ग्रीन यांची भारताला वस्तुतः दुसऱ्यांदां भेट होत आहे. पहिल्या महायुद्धानंतर ते येथें दोन वर्षेपर्यन्त राहिलेले आहेत. लाहोर येथील "फॉर्मन ख्रिश्चन कॉलेज" मध्यें ते शिकवीत होते.

त्यानंतर त्यांनीं "येल" व "प्रिन्स्टन" या विद्यापीठांत तीसपेक्षां अधिक वर्षेपर्यन्त अध्यापनाचें काम केलें. त्यांना मोठमोठीं व्याख्यानें देण्याचा कंटाळा आला व ते कॅलिफोर्निआमधील क्लेर्मंट येथील "स्क्रिप्स" या लहान मुलींच्या कॉलेजमध्यें अध्यापन करण्यासाठीं गेले.

एक वर्षापूर्वी ते "फोर्ड फाउंडेशन" कडे गेले व तेथें त्यांनीं एक असामान्य सूचना मांडली. "कोणत्याहि प्रकारचीं बंधनें न लादतां व भारतीयांशीं केवळ बोलण्यासाठीं तुम्हीं मला एक स्वतंत्र लेखक म्हणून भारतांत पाठवाल काय ?" भारतांत परतण्याची आपली दीर्घकालीन इच्छा तृप्त करण्यासाठीं त्यांनीं ही युक्ति योजली.

या अंगीकृत कार्याचें सिंहावलोकन करतांना प्राध्यापक ग्रीन म्हणाले, "मी प्रत्येक क्षेत्रांतील वृद्ध व तरुण, पुरुष व महिला विचारवंत भारतीयांशीं प्राध्यापक, राजकारणी, व्यापारी, कायदेपंडित, डॉक्टर, सावकार, स्वामी, धर्मगुरू, सिनेमा दिग्दर्शक व सिनेनट यांच्याशीं बातचीत करीत आलेलों आहे." मद्रास शहर व त्याच्या आसपासचीं [illegible]द्रें यांनाच त्यांनीं मुख्यतः भेट दिली.

## नैतिक व अध्यात्मिक मूल्यासंबंधीं

[illegible] वादाच्या स्वरूपासंबंधीं बोलतांना डॉ. ग्रीन म्हणाले कीं, एखाद्या [illegible] विशिष्ट कार्यक्षेत्र व त्याचे उद्योगधंदे यांच्याकडे साहजिकच [illegible] जास्त लक्ष पुरविलें गेले.

[illegible] आमच्या संवादांची दिशा बदलण्याचा मी प्रयत्न केला नाहीं. [illegible] भारताच्या गौरवपर अगर टीकापर असें भारतीयांना मला जें कांहीं [illegible]ण्याचें होतें त्याचा विपर्यास करण्याची माझी इच्छा नव्हती. श्री नेहरू [illegible] "नैतिक व अध्यात्मिक मूल्यें" म्हणून संबोधतात त्यासंबंधीं [illegible] विशेष आस्था वाटत आहे. ज्या लोकांशीं मी संभाषण केलें त्यांच्या [illegible]भूत श्रद्धा व मूल्यें यासंबंधीं ते ज्यासाठीं जगतात व स्वार्थत्याग [illegible]याला अथवा मरण्यासहि तयार आहेत त्या गोष्टी संबंधीं मला आस्था [illegible]" असें प्रा. ग्रीन म्हणाले.

[illegible]निराळ्या लोकांशीं झालेल्या संभाषणासंबंधींचें आपलें सर्वसाधारण [illegible] व्यक्त करतांना प्रा. ग्रीन म्हणाले, "मला भारतांत उत्साह, काळजी, [illegible]ग व विफलता या भावना पुष्कळशा दिसून आल्या. भारतीय लोकांना [illegible]रताच्या प्रश्नासंबंधीं तीव्र तळमळ लागलेली आहे. भारतांत सध्यां [illegible]नसिक आरोग्य व जोम मोठ्या प्रमाणांत असल्याची माझी खात्री [illegible]विण्याला [illegible] पुरावा भरपूर आहे."

## प्रगल्भ बुद्धीचा मध्यम वर्ग हवा

तुमच्या भारतीय मित्रांच्या मनांत विशेषेंकरून घोळत असलेल्या कांहीं प्रश्नासंबंधीं तुम्हाला काय वाटतें, असा प्रश्न विचारला असतां डॉ. ग्रीन यांनीं सार्वजनिक हिताची कळकळ बाळगणाऱ्या नागरिकांच्या एका अत्यंत महत्त्वाच्या वर्गाची–म्हणजेच प्रगल्भ बुद्धीच्या मध्यम वर्गाची–समाजास अत्यंत जरूर असल्याचें सांगितलें.

आपला मुद्दा अधिक विशद करून सांगतांना ते पुढें म्हणाले, "तुम्हाला राजकारणांत व सरकारी कारभारांत छोट्या छोट्या अशा बऱ्याच नेहरूंची गरज आहे, तुम्हाला बरेचसे चांगले शास्त्रज्ञ, चांगले शिक्षक व विश्वासू व्यापारी मिळाले पाहिजेत."

लष्कराचा दृष्टांत देऊन ते म्हणाले, "तुमच्याकडे सेनापति व सैनिक आहेत, परंतु सार्जंटांच्या बाबतींत मात्र बहुधा तुम्हाला कमतरता भासत असावी. ज्या लष्करांत चांगले सार्जंट नसतील त्या लष्कराचें ईश्वर रक्षण करो."

"कमी पगार मिळणारे शिक्षक, शिकविण्याच्या यांत्रिक पद्धति आणि पदव्यांचा मोह मिळून तयार झालेल्या सध्यांच्या शिक्षण देण्याच्या पद्धतीबाबत भारतीय लोक सर्वसाधारणपणें नाकें मुरडीत असतात" असें ते म्हणाले. तथापि मोकळेपणाची चर्चा व अनियंत्रित निवड या लोकशाही मार्गानें अखेर हा प्रश्न आपोआपच सुटेल अशी बहुतेक लोकांना आशा वाटत असल्याचेंहि त्यांनीं सांगितलें.

## महिलांच्या शिक्षणाचा प्रश्न

या देशांतील महिलांच्या शिक्षणाच्या प्रश्नासंबंधीं चर्चा करतांना डॉ. ग्रीन यांनीं पंडित नेहरूंच्या बरोबर नुकत्याच झालेल्या एका मुलाखतीच्या वेळीं नेहरूंनीं काढलेले उद्गार पुढीलप्रमाणें उद्धृत केले. "शिक्षण व त्यांतल्या त्यांत स्त्रियांचें शिक्षण ही भारतांतील सध्यांची एक अत्यंत महत्त्वाची बाब झालेली आहे. या क्षेत्रांत आम्हीं अद्याप म्हणण्यासारखी विशेष कामगिरी करीत नाहीं तथापि स्त्रियांच्या शिक्षणांत झपाट्यानें [illegible] होईल अशी मला आशा वाटत आहे. कारण भारतांतील उगवत्या पिढीचें चारित्र्य तयार करण्याच्या बाबतींत कुटुंबांमध्यें त्यांचाच प्रभाव प्रचंड प्रमाणांत राहणार आहे."

या देशांतील अत्यंत कर्तबगार महिला व सर्वसामान्य महिला यांच्या दरम्यान फारच मोठें अंतर असल्याचें डॉ. ग्रीन यांना आढळून आलें, आणि त्यांनीं स्त्रियांना शैक्षणिक संस्थांतून व समाजामध्यें माणुसकीच्या समानतेनें व अधिक मोकळेपणानें वागविणें जरूरीचें असल्याचें सांगितलें.

"महिलांना बंडखोर न बनवितां अधिक स्वावलंबी करण्यासाठीं एखाद्या फार कल्पक शिक्षणपद्धतीची जरूरी भासणार आहे" असा त्यांनीं सावधगिरीचा इशारा दिला. "त्यामुळें सुकन्या, सुभार्या व समाजांतील सुनेत्या बनणें अधिकाधिक तरुण स्त्रियांना शक्य होईल. त्याप्रमाणेंच अशा स्त्रियांना अधिक मोकळेपणानें बोलणें व वागणें शक्य होईल." ते म्हणाले, "कांहीं वर्षेपर्यन्त कधींकधीं तुम्हांला म्हणण्यासारखें यश कदाचित मिळणार नाहीं. परंतु या लोकशाही यंत्रणेच्या द्वारें तुम्ही प्रयोग करीत राहिल्यास अखेरीला समाजांतून नेते वर येत राहतील अशी मला फार आशा आहे," असें डॉ. ग्रीन शेवटीं म्हणाले.

---

# कल्याण ( मानवता अंक )

## वर्ष ३३ वें १ ला

[illegible]वर्षीच्या शिरस्त्याप्रमाणें या विशेष अंकाच्या द्वारें ‘ कल्याण ’ [illegible]मासिकानें ज्ञानाच्या दालनांत अपूर्व समृद्धि व लालित्य यांची भर [illegible] आहे ‘ महाभारत, ’ ‘ नारी, ’ ‘ हिंदूसंस्कृति, ’ ‘ सन्तवाणी ’ [illegible], ’ ‘ भक्ति ’ वगैरे विशेषांक दरवर्षी काढून त्या त्या विषयासंबंधीं [illegible] माहिती वाचकांना देऊन त्या प्रश्नास स्वयंपूर्ण असें स्वरूप द्यावयाचें, [illegible] धोरण “ कल्याण ” च्या संपादकजींनीं ठेवलेलें दिसतें. त्याप्रमाणेंच [illegible]वता ’ हा अंक ही ‘ मानव धर्म ’ व “ मानवतावद ” ‘ HUM-[illegible]NITIES ’ या नवीन उघडलेल्या संशोधनक्षेत्रांत अवगाहन करून [illegible] शक्यतों परिपूर्ण व सर्वांगस्पर्शी साहित्य निर्माण करण्याचा [illegible] यशस्वी प्रयोग होय. अलीकडे ‘ मानवता ’ हा शब्दप्रयोग आपण [illegible] उच्चारतों व ऐकतों. देवाच्या मागें लागून त्याचें स्वरूप [illegible]ण्याचा खटाटोप व प्रयत्न करण्यापेक्षां मानवाच्या मागें लागा व त्याची [illegible], घडण व प्रातव्य हीं सुधारून त्याचा विकास करा; व सत्, चित् [illegible] आनंद याची प्राप्ति करून घ्या. ‘ ईश्वर ’ व ‘ मानवता ’ या एकाच [illegible]च्या दोन बाजू आहेत, असेंहि म्हणण्यापर्यंत जगांतील वैचारिक [illegible] मजल गेली आहे. पोप कवीनें तर म्हटलें आहे—KNOW [T]HY SELF presume not God to Scan; The Proper [St]udy of Mankind is Man ” भगवान बुद्धांनीं मानवाचा [illegible] अभ्यास करून ‘ निर्वाण ’ ‘ सत्य शोधून काढलें. त्यांनीं ’ [illegible] द्वारा एका बाजूस सारला व मानवावरच लक्ष केन्द्रित करून [illegible]खाली सम्बोधि ( सर्वज्ञता ) प्राप्त करून घेतली व जगाला [illegible] द्वार खुलें केलें. सर्व–धर्मीय–सन्त हे मानवतावादी असून त्यांनीं [illegible] ईश्वर पाहिला ’ व “ ईश्वर ” व ‘ मानव ’ यांचें समीकरण [illegible] ‘नराचा नारायण होईल’ कीं ‘नारायणांत मानव्य दिसेल !’ मानवतेचा [illegible] केला म्हणजे “ ईश्वर ” “ देव ” या संबंधींचीं भांडणें नाहींशीं [illegible] व मानवानें चालविलेल्या युद्धाचा शेवट होईल ! एवं च आधु-[nि]क वैज्ञानिक युगांत ‘ मानवताध्येया ’ चा पुरस्कार मोठ्या व्यापक [illegible] केला जाईल; म्हणून या असल्या वैचारिक क्रांतीच्या युगांत [illegible] ” च्या संपादकजींनीं ‘ मानवता अंक ’ काढून जनतेची फार [illegible] सेवा केली आहे, असें आम्हीं म्हणतों.

[illegible] ७०४ पानांच्या अंकांत प्रवेश करितांनाच डाव्या हातच्या [illegible] एक अद्यावत फॅशननें विनटलेला तरुण उभा असून [illegible] धूर सोडीत आहे; तर उजव्या हाताच्या कोपऱ्यांत हातांत [illegible] चालतांनाच मध्येंच थबकलेले गांधीजी दाखविलेले आहेत. [illegible] च्या पायाशीं “ प्रकृतिमें विश्वास ” व तदनुषंगिक दुर्गुणांची [illegible] वाचली असून, शेवटीं दुःख-विनाश; तर गांधीजींच्या पायाशीं [illegible] में विश्वास ” व तदनुषंगिक सद्गुणांची मालिका वाचली असून [illegible] ‘ आनन्द-जीवन.’ हें अत्यन्त सूचक असें चित्र आहे. आंत प्रवेश करून डोळ्यासमोर ‘ विविध आसुरी सम्पत्ति ’ चित्रित केली असून शंख, चक्र, गदा, पद्म हातीं घेऊन उभ्या असलेल्या विष्णूची मूर्ति उजव्या हातच्या कोपऱ्यांत दाखविली आहे.

यांतील विविध विषय हाताळलेले असे २०७ लहानमोठे लेख आहेत व त्यांचे लेखक सर्व पेशांतील व दर्जाचे आहेत. यांतील १०–१५ विषयांचीं नांवें उद्धृत करण्याचा मोह आवरत नाहीं :—‘ मानवता क्या है ? ’, ‘ मानवकी मानवता, ’ ‘ मानवताका आदर्श, ’ ‘ मानव, मानवता और मानवधर्म, ’ ‘ मानवकी समस्या, ’ ‘ मेरी मानवताही भगवत्ता है, ’ ‘ आदर्शमानवता, ’ ‘ मानवसेवा और भगवत्सेवा, ’ ‘ विशुद्धप्रेममयी मानवता, ’ ‘ मानवता अमर रहे, ’ ‘ मानवताका धर्म, ’ ‘ मनुष्य बनो, ’ ‘ व्यापकमानवताका आदर्श, ’ ‘ सेवाधर्म ही मानवता है, ’ ‘ मानव और दानव, ’ ‘ बौद्धधर्ममें मानवता, ’ ‘ मानवता और यज्ञ, ’ ‘ सन्तोंका मानवतावाद, ’ ‘ मानवता और अतिथि सेवा, ’ इत्यादि नुसतीं शीर्षकें जरीं वाचलीं तरी मानवतेचें विशाल क्षेत्र दृष्टीस पडेल. याच विषयाला परिपोषक ‘ कांहीं चित्तविषयक तथा घटनासंबंधीं और भावात्मक ’ लेख व कविता दिल्या असून त्या विषयवारीची संख्या ५९ आहे. ‘ माता–पिताके सेवक, ’ ‘ श्री रामका भेदरहित प्रेम, ’ ‘ आदर्श आतिथ्य, ’ ‘ कुष्ट–सेवक, ’ ‘ आदर्श–क्षमा, ’ ‘ धर्ममूर्ति, ’ ‘ धर्म–रक्षक, ’ ‘ त्याग ’ ‘आदर्शनारी,’ ‘ये मानव,’ ‘सच्चे साधु,’ ‘ सब ईश्वरकी आँखोंके सामने ! ’ ‘ पतनके स्थान,’ ‘भगवान् के लिये बलिदान. ’ यांचा नुसता [illegible] मानवतेच्या विश्वक्षेत्राची विशालता, वैचित्र्य व महत्ता हीं सम[illegible] पुरेसा आहे.

त्यानंतर पद्यसूचि दिली असून त्या पद्यांची संख्या ४९ [illegible] शिवाय ‘ संकलित पद्यें ’ हीं उद्धृत केलीं आहेत. त्यांचीं संख्या [illegible] आहे. पहिल्या वर्गांतील काव्यहिरकण्या तेजस्वी व सौंदर्यपूर्ण आ[illegible] या व दुसऱ्या भागांतहि ‘ मानवतेच्या ’च्या संशोधनासंबंधी अनेक[illegible] हाताळले आहेत. यांतील कलाकुसूर व शद्बकारागिरी निरनिर[illegible] अभिजात कवींनीं चित्रित केली आहे. त्यांत आर्तता, उपदेश, कळ[illegible] उत्तेजनसूर वगैरे आहेत. ‘पशु तो न बनो,’ ‘मानव कि घर,’ ‘मानवत[illegible] है,’ ‘ सबको प्यार करो,’ ‘मानवधर्म महान्’ ‘ मानव बनकर मानवता [illegible] करो ’ ‘ हरिसे सच्चा स्नेह करो ’ वगैरे हिरकण्यांतील कित्येक [illegible] संकलित करतां येतील.

‘ चित्रसूचीं ’ मध्यें चित्रसंपदा, वर्णसंपदा, भावसंपदा यांचीच [illegible] सांपडेल, असें नसून त्यांतील चित्रावरून मानव्याची उन्नति, [illegible] राखरांगोळी कशी होते याचें दृश्य, हृदय–स्पर्शी किंवा मर्मभेदक–चित्र[illegible] निरनिराळे प्रसंग रेखाटून केलेलें आढळेल. यांतच ‘ रेखा चित्रांचा ’ हि[illegible] समावेश करावा लागेल.

अशा या अमोल ग्रंथाचें संपूर्ण स्वरूपाविष्करण किंवा समीक्षण कर[illegible]

हें स्थानहि नाहीं किंवा त्यासंबंधी लागणारी पूर्ण तयारी संपादकाजवळ नाहीं. तथापि या विशेषांकाच्या प्रसिद्धीकरणानें 'कल्याण'च्या संपादकांनीं या प्रश्नाकडे अलमदुनियेचें लक्ष खेंचून घेतलें आहे, असें म्हटल्याविना राहवत नाहीं. माणुसकी असणाऱ्या प्रत्येक माणसानें हा अंक विकत घेऊन अवश्य संग्रहीं ठेवावा व आपण व आपलें कुटुंबियांच्या अवलोकनांत तो अवश्य आणावा. त्यायोगानें कुटुंबाचें, समाजाचें, व देशाचें क्षेमकल्याण झाल्याविना राहणार नाहीं, अशी आमची निष्ठा आहे. असा सर्वांग-सुंदर व सर्वांग परिपूर्ण विशेषांक काढल्याबद्दल संपादकास धन्यवाद व त्यांचें हार्दिक अभिनंदन—

---

## परामर्श

(१) **पुरुषार्थ-ईश्वरांक**-सं० श्रीपाद दामोदर सातवळेकर-**पारडी** जून १९५९ कि.-१=५०; पृष्ठसंख्या ३६८ 'परमेश्वर आहे कीं नाहीं ?' हा पंडितांचा वादविवाद अनादिकालापासून आहे. भारताची परंपरा मात्र परमेश्वर मानण्याची आहे. पाश्चात्यांच्या संगतीनें पहिल्या पिढीची आस्तिक्य बुद्धि विचलित झाली. पाश्चात्यांच्या शिक्षणानें आधिभौतिक व ऐहिक गोष्टींचें स्तोम आम्ही माजवावयास शिकलों. पहिली पिढी तर 'सब झूट आहे' अशा विचाराची होती. मिल्ल, स्पेन्सर यांच्या तत्त्वज्ञानाच्या अभ्यासानें त्या पिढींत संशयवाद उत्पन्न झाला. आमच्या महाभारत-रामायणाच्या गोष्टींना भाकड कथा म्हणून समजून त्यांतील दैवी विभूतींचें ऐहिक मूल्यमापन करणारे आङ्ग्लभाषाविभूषित साक्षर बंधु, आम्हांला मागचें असें कांहींच नाहीं, असें म्हणावयास लागले. मिशनरी व सनातनी हिंदूधर्मीय यांच्यांत झगडे होऊन विष्णुबुवा ब्रह्मचारी सारखे प्रभावी प्रचारक आपल्या धर्माची महती गात असले तरी एकंदरींत-भारतीय धर्म व संस्कृति हीं पाश्चात्यांच्या झगझगीत व ऐहिक प्रकाशांत निस्तेज दिसूं [illegible] . इंग्रजीभाषा व वाङ्मय व खिस्तीधर्म यांच्या अभ्यासामुळें त्यावेळचे [illegible]च पिढी निरीश्वरवादी बनली. विलायतेंतून परदेशीय शिक्षण [illegible] आलेले तरतरीत तरणेबांड तर 'तुमचा ईश्वर कोठें आहे ? तो [illegible] पाहूं आम्हांला !' असे प्रश्न करावयास लागले ! इंग्रज सरकार तर [illegible] चालून परधर्मीय! त्यांना आमच्या धर्माचें काय होय ? पण हळूंहळूं [illegible]त्य व मुख्यतः, शार्मण्यदेशीय पंडितानीं आमच्या वाङ्मयाचा [illegible]यास सुरूं केला. वेदांचा अभ्यास पद्धतशीर रीतीनें सुरूं झाला व [illegible]नात्मक भाषाशास्त्र व तुलनात्मक पुराणशास्त्र" हीं मागील शतकांच्या [illegible] बुद्धीची ज्वलंत प्रतीकें होत. त्यानंतर १८५८ नंतर राष्ट्रीय दृष्टि [illegible]च्यांत जास्त जास्त परिणत होत चालली. आपण जसजसे अन्तर्मुख [illegible] चाललों, तसतसें 'तुझें आहे तुझ्यासाठीं । परी तूं जागा चुकलासी" [illegible]चा प्रत्यय आमच्या विशाल भारतांतील प्रत्येक प्रान्तांतील विचारवंतांना, [illegible]याला अ[illegible] व राजकारणी पुरुषांना येत चालला. आर्य समाज, [illegible]" अ[illegible], थिऑसाफी, स्वामीरामतीर्थ, रामकृष्ण परमहंस, पंडित [illegible]न्द्रसेन स्वामीविवेकानंद, महर्षी रानडे वगैरे व्यक्तिनिष्ठ व धर्मनिष्ठ [illegible]लनांनीं भारतांत प्रचंड प्रक्षोभ व क्रान्ति सुरूं झाली. भाषा, इतिहास, [illegible]कीय चळवळी, स्वराज्य, बहिष्कार, स्वदेशी व राष्ट्रीय शिक्षण यांच्या [illegible]मन्त्रानें सरकारशीं सुरूं झालेल्या संघर्षांत परमेश्वराच्या आस्तित्वास आपो[illegible]च आवाहन होऊं लागलें. आमच्या तरुणांची ईश्वरविषयक बुद्धि स्थिर [illegible] लागली व 'कांहीं तरी आहे' ही निष्ठा स्थित व्हावयास लागून निरनिराळे धर्मपंथ, त्यांतील वादविवाद, त्यांचीं भाषणें वगैरे साधनांनीं तरुण पिढी धर्माबद्दल जास्त तल्लक व्हावयास लागली. मध्यंतरीं जी दोन महान् युद्धें झालीं त्यायोगानें तर मानवाच्या आस्तिक्यबुद्धीला स्थिरता येत चालली. भारतांत व इतर देशांत सर्वधर्मीय परिषदा भरून निरनिराळ्या धर्मांचा अभ्यास होऊं लागला व सर्वधर्मांना उभी राहण्यास समान बैठक शोधण्याचा प्रयत्न सुरू झाला. मानवतावादाचा उद्गम व विकास होऊं लागला. व शेवटीं तर 'एक धर्म,' 'एक सरकार' अशीं घोषणा होऊं लागली. अण्वस्त्रें पुढें येऊन तर मानवाच्या मनाला व विचाराला जबरदस्त धक्का बसला व तो इतर दृष्टीनें जीवनाकडे पहावयास लागला. हीही गोष्ट परमेश्वराच्या अस्तित्वाला परिपोषकच ठरली. आज तर पाश्चात्य व पौर्वात्य राष्ट्रें एकत्र येऊन 'मानवजात ही एक सलग व एकजिनसी आहे,' अशा विचाराप्रत आतां येत चाललों. अशावेळीं भारतांत 'कल्याण' मासिकानें 'मानवता अंक' काढणें किंवा पुरुषार्थानें 'ईश्वरी अंक,' प्रसिद्ध करणें या घटना विश्वाच्या म्हणजे एकंदर उत्क्रान्तिवादाच्या मार्गावरील टप्पेच होत व या दृष्टीनें आम्ही 'ईश्वरांकां'चें स्वागत करितों.

हा अंक 'कशासाठीं ?' या बद्दल संपादक म्हणतात—"अशा असह्य, आर्त, कष्टी, व दुःखग्रस्त जीवांना दिलासा लाभावा व ईश्वरीय शक्तीच्या आश्वासवाणीनें आणि त्याच्या वाणीप्रमाणें करणीकरून आपल्या जीवनाची पुष्करिणी पवित्र करणाऱ्या साधुसंतांच्या व साधकांच्या अविस्मरणीय ईश्वरानुभवानें लोकजीवन ईश्वरसन्मुख व्हावें, ह्याच ईश्वरी प्रेरणेनें अवतीर्ण झालेल्या 'ईश्वरांक' प्रकाशनाचा हेतु आहे." यादृष्टीनें पाहतां हा अंक म्हणजे ईश्वरासंबंधींचें आस्तिक्य, विचार, अनुभव, साक्षात्कार या संबंधी समाजांतील सर्व थरांच्या बंधु-भगिनींचें हें संकलन आहे. याचा हा पहिला भाग आज प्रसिद्ध होत असून दुसरा भाग दिवाळींत प्रसिद्ध होणार आहे.

यांतील विषयांचें आविष्करण प्रथम संपादकीयांत वेद व ईश्वर या लेख असून ईश्वर ही ध्येय-भावना वेदांपासून आढळते, याचा पुरस्कार व 'त्यानंतरच्या मागील वाङ्मयांत ती उत्पन्न झाली, अगोदर नव्हे' या मताचें खंडन केलें आहे. 'ईश्वर दर्शन' या वर्गांत साधकांना, उत्कट भावनेंच्या भक्तांना, त्यांच्या त्यांच्या आवडत्या स्वरूपांत दर्शन मिळाल्याचें सांगितलें आहे. परमेश्वर आहे एतद्विषयक विचार प्रवाहपतित आहे. त्याच्या कृपेचे अनुभव कांहीं कांहीं वेळां अनपेक्षित रीतीनें येतात. तेव्हां यांतील लेखांकरून परमेश्वर आहे, परमेश्वर मानवाच्या जीवनाच्या घडणीचा भार घेऊन त्या कामीं मानवाला मदत करतो, "जेथें जातो तेथें तूं माझा सांगाती," विविध संदर्भांत, विविध स्वरूपाचे मानवाला आलेले ईश्वरी कृपेचे अनुभव, शरणागतीचें श्रेष्ठत्व वगैरे प्रश्नांसंबंधीं पुष्कळच माहिती उपलब्ध होते. ईश्वरांकासाठीं आलेल्या संदेशांत सर्वांनींच ईश्वराचें सान्निध्य व अस्तित्व मान्य केलें आहे. 'ईश्वरांका' वर श्रीरामपंचायतनाचें सुंदर चित्र दिलें आहे. त्यावरूनच "ईश्वर" म्हणजे 'मानवाच्या हृदयींचा राम,' असा बोधहि होण्यास मदत होते. या अंकांत एका महत्त्वाच्या प्रश्नाबद्दलचीच चर्चा असल्यामुळें, हा अंक प्रत्येकानें संग्रहीं ठेवण्यासारखा आहे. [illegible] यांत कै. वामनराव जोशी यांच्या 'सुशीलेच्या देवा' तील 'देव' किं[illegible]

( पान ११ वर पहा. )

# मानवतेचीं प्रतीकें

## धन्य मानवता !

### १ गेल्या शतकांतली घटना

[illegible] नांवाचा फ्रेंच व्यापारी दुर्दैवानें आजारी झाला आणि आडर [illegible] किनारीं एका रम्य ठिकाणीं राहूं लागला.

एक दिवस सकाळीं नदीच्या दुसऱ्या कांठाला पाहतो तों एक घोडे- [illegible] घोड्याला ठाकठीक करीत होता. केव्हां तो लगाम ढिला करी [illegible] तो आवळतांच पुढल्या दोन पायावर उभें राहण्याचा घोडा [illegible] करी. कांहीं केल्या तो नाठाळ घोडा वठणीवर येईना. उधळत्या [illegible] स्वाराला अचानक नदींत फेकून दिलें. ‘स्वार बुडतो आहे’ हें [illegible] बघवेना. त्या तरुण घोडेस्वाराच्या प्राणरक्षणासाठीं म्हाताऱ्या [illegible] नें नदींत उडी मारली ! ही मानवतेची पुकार होती. त्याला [illegible] उंची वस्त्राचेंही भान राहिलें नाहीं. म्हातारा व्यापारी चांगला [illegible] होता; तरी भर ज्वानींतल्या त्या घट्टपुष्ट बुडत्या तरुणाला [illegible], हें सोपें काम नव्हतें. अक्षरशः तें प्राणसंकट होतें.

‘मी जिवंत असतां एक असहाय्य मानव प्राणाला मुकावा असं [illegible] होणार नाहीं’ या आत्मविश्वासाच्या व करुणार्द्र बुद्धीच्या अंत- [illegible] संजीवित होऊन हात पाय जोरानें मारीत त्या तरुणाला काठाला [illegible] त्या व्यापाऱ्यानें यश मिळविलें.

पवित्र मानवते ! मी तुझा अत्यंत ऋणी आहे. तुझ्याच नांवावर माझ्या [illegible] प्राण परत मिळाले. लबट आश्चर्यचकित झाला. जीवमात्राबद्दलच्या [illegible] त्याचं अंतःकरण विरघळलं आणि आपल्या नवजवान बेट्याला [illegible], प्रेमविव्हल होऊन त्यानें यास गाढ आलिंगन दिलें !

× × ×

### २ बाजीरावाची उदारता

इ. स. १७२८ सालीं मराठे आणि निजाम यांच्यांत गोदावरी कांठीं युद्ध [illegible]. मराठे विजयी झाले आणि मुस्लीम सैन्यांत अन्नाचा तुटवडा [illegible], त्यांतच एक मुस्लीम सणही आला.

निजामानें बाजीरावाकडे दूत पाठवून अन्नधान्याची मदत मागितली.

बाजीरावानें आपल्या सहाय्यकांची गुप्त बैठक भरवून तिच्यापुढें [illegible] प्रस्ताव ठेवला. प्रायः सर्वांनींच ‘अन्नधान्याची मदत करूं नये; [illegible] तंग करून आपली मतलब साधण्याची हीच संधि आहे,’ असा [illegible] दिला !

[illegible] बाजीराव पेशव्याला हा सल्ला पटला नाहीं. तो म्हणाला ‘आपणा [illegible], शत्रु बीमार क्षुधित आणि निद्रित, असतां त्याला धोकेबाजीनें [illegible] उचित नव्हे. नबाबानें केलेल्या मागणीपेक्षांही अधिक अन्न [illegible] पाठवून आपण त्यांचा सन्मान करूं या.

पेशव्यानें पांच हजार बैलांवर अन्न धान्य साहित्य लादून निजामाकडे पाठविलें. निजाम अत्यंत प्रसन्न झाला आणि लवकरच उभयतांची भेट होऊन तात्पुरता संधीही झाला !

---

( पान १० वरून )

‘ध्येय हाच देव’ असल्या प्रश्नांना वाव नाहीं. जेथें तर्क लुळा पडतो असा हा, परमेश्वराच्या अस्तित्वाचा व सर्व धर्मीयांच्या बुद्धीस भंडावून सोडणारा प्रश्न या ठिकाणीं उद्भवणार नाहीं. सध्यांच्या हालाखीच्या काळांत व मानव सर्व बाजूंनीं गांजला असल्यामुळें त्यास या वैराण जगांत जरा विरंगुळा देऊन क्षणभर त्याला शांत करणारा हा अंक सर्वांनाच आनंदित करो ! ‘अनाद्यनन्त, सर्वसाक्षी, निष्कलं, निष्क्रियं शान्तं, निरवद्यं, निरंजनं, अशा तेजास आमचा नमस्कार असो ! या ‘ईश्वरांका’च्या प्रकाशनानें हें शान्त तेजस् सर्वत्र प्रसृत होऊन निबिड घनांधकारांत गुरफटलेले हें विश्व शुद्धीवर येवो, ही प्रार्थना ! पुन्हां एकवार ‘ईश्वरांका’च्या संपादकांचें हार्दिक अभिनन्दन !

---

# प्र श्न रू पी

सृष्टीमध्यें साऱ्या
वाहती झुळझुळ झरे,
अन् सरिता संथ.
एक धर्म त्यांचा
सर्वांना शांतविणें
सर्वांना जगविणें !
सूर्याचीं सोनेरी हंसरीं किरणें
शिरतात गरीबाच्या झोंपडींत
थंडींत कुडकुडणाऱ्यास उबवायाला
अन् असतात
रेंगाळत राजमहालींहि
वैभवाचे, साजशृंगारांचे
देखावे पाहात...
हिरवीगार ती वनराई
अपुल्या पानांचे करूनिया पंखे
हलवूनि, वारा घालीत असतात
शेतांत राबणाऱ्या
काळ्या माणसाला...
पण गोरा प्राणी
कचरतो, तुच्छितो त्या काळ्या रंगाला !
निळ्या अथांग समुद्रावर
तरंगत असतात संथपणें मजेंत
भव्य बोटी अन् लहान होडकीं;
समुद्राच्या येत नाहीं कधीं मनांत
उडवून टाकावी
हीं क्षुद्र, भिकारडीं होडकीं हलकीं
[illegible]डवून काढावी आपुल्या पायांखालीं !
[illegible]री शेतांत
[illegible]परी खपतो सांजसकाळ
[illegible]हांत जळतें सर्वांग

परी मिळत नाहीं खावया त्याच्या पोरां
पोटभर ती साधी भाकर;
अंगावर नसतें कधीं
तें साधें लक्तर...
श्रमाचें फळ–'उपास मार !'
बिचाऱ्या जमीनीच्या
मनांतहि नसते
खपणाऱ्याच्या पदरीं
पडावी 'उपासमार'
तीं बिचारीं आनंदानें
कळा सोसून सगळ्या
बीजांना आपुल्या घेऊनी उदरीं
देत असतें जीवन;
खुलवित असते सारी सृष्टि
'सस्यशामल' समृद्धीनें
खपणाऱ्यांना,
जगणाऱ्यांना जगविण्या !
बिचाऱ्या ढगांनाहि
हें माहित नसतें...
आणतात आपुल्या पाठीवरून
भिस्त्यापरी दक्षतेनें
मोठमोठाल्या पखाली
भरलेल्या पाण्यानें;
वर्षवितात धारा
मोठ्या उत्साहानें
सृष्टीस फुलविण्या
खपणाऱ्यांना, जगणाऱ्यांना
जगविण्या !
...निसर्गा, हे निसर्गा
तूं अद्वैत–स्वरूप !...

# तरंग !

...पण आमच्या सुखाच्या हवेल्या
दुसऱ्यांच्या दुःखांवर,
आमच्या उच्चतेचीं शिखरें
दुसऱ्यांच्या नीचतेवर,
दुसऱ्यांच्या काळेपणावर
आमच्या गौरवर्णाचा
पोकळ अहंकार,
दुसऱ्याच्या रक्तानें
भडकलेली तृष्णा
आम्ही करितो गार...!!

...वैराचे झंझावात
फोफावत आहेत साऱ्या पृथ्वीवरी,
विषमतेचे भोंवरे
भिरकत आहेत पिसाटल्यापरी,
भडकलेल्या द्वेषाच्या ज्वाला
जाळीत आहेत प्रत्येकाला!

...आज काय ही स्थिति
उभी समोर?...
भयाण वातावरण
आक्राळ विक्राळ जबडा पसरून
भक्ष्य लक्षित आहे!
सुचत नाहीं कांहीं जीवाला!
कुठें पहावे आशेनें?
कुठें मिळेल निवारा?
बावरून जातो जीव
बिथरलेल्या हरिणापरी!

...पण अचानक
मनांतलें हें वादळ
हळूहळू जातें ओसरून
पिसाट वाऱ्यापरी सुटलेल्या वृत्तींना
मिळते शांति!

कुणी अद्‌भूत शक्ति घेऊनि
गुणगुणते गोड स्वरांनीं
कानांत गीत रसाळ—
'निसर्ग मानूं आपुला देव
मानवतेस आपुला धर्म
विश्व आपुली विशाल आई
आपण तिची लेकुरें सम!...'
कोण ती देवता?
किती मंजुळ स्वर?...

मनाच्या तळ्यांत
विचाराचा एक खडा पडतो
अन् तयांतून निर्माण होतात
प्रश्नरूपी तरंग वर्तुळें
—'हा विवेक सूर्य
कधीं उगवेल तेजानें सोनेरी
पृथ्वीच्या अंबरीं??

...हा विवेक-सूर्य...?
...हा विवेक-सूर्य...?
...कधीं उगवेल??
...कधीं उगवेल???...
...तेजानें सोनेरी
...पृथ्वीच्या अंतरीं...???

अनन्त कदम्ब

# स्वामी श्रीबुधगीरजी

अनुवादक०—श्री. भवानीशंकर नीळकंठ वागळे.

महात्मा श्रीबुधगीरजींचा जन्म सं. १८२७ मध्यें राजपुतान्यांमधील शेखावटी प्रांतांतल्या एका गांवांत झाला होता. बालपणांतच त्यांच्या अंतःकरणांत वैराग्याचा उदय झाला होता. वयांत आल्यानंतर ते जयपुर जिल्ह्यांतील 'नुंवा' नांवाच्या गांवांत गेले व त्यांनीं महात्मा श्रीलक्ष्मणगिरींचें शिष्यत्त्व पत्करलें. त्यांनीं शिष्यत्त्व पत्करल्यानंतर त्यांच्या गुरूनें त्यांना हिंगलाजदुर्गेच्या दर्शनार्थ जाण्याची आज्ञा दिली व वाटेंत आपला गुरुबंधु श्रीघोरीबाबा यांस भेटण्यास सांगितलें. गुरु-आज्ञेनुसार श्रीबुधगीरजीमहाराज श्रीघोरीबाबांना भेटले. श्री घोरीबाबांनीं योगबलानें बसल्या बैठकीवरच त्यांना हिंगलाजदुर्गादेवीचें दर्शन घडविलें व देवीचें पुन्हां दर्शन घेण्यासाठीं फत्तेहपुरहून दीड मैल दक्षिणेच्या बाजूला असलेल्या बोहडमधील एका उंच टेकडीवर जाऊन तप करण्यास आज्ञा केली. श्रीबुधगीरजींनी त्या ठिकाणीं जाऊन घोर तपश्चर्या केली व हिंगलाजदुर्गादेवीनें मूर्तिरूपांत जमिनींतून वर येऊन स्वामींना दर्शन दिलें. त्यानंतर त्यांची सर्वत्र प्रसिद्धी झाली. एकदां महाराव राजा लक्ष्मणसिंहानें त्यांना कांहीं गांव देण्याचा हट्टच धरला पण त्यांनीं साफ नकार दिला ! राजानें जेव्हां विशेष हट्ट धरला तेव्हां त्यांनीं राजाकडून दोन घरें व कांहीं जमीन घेऊन फतेहपुरच्या ब्राह्मणांना देवविली. त्यानंतर त्यांनीं भक्तांचा प्रसार केला व आपल्या वयाच्या पस्तिसाव्या वर्षीं सं. १८६२ मध्यें फाल्गुन कृष्ण त्रयोदशीस ( शिवरात्रीं ) त्यांनीं जिवंत समाधि घेतली. महाराव राजा लक्ष्मणसिंहानें बुधगीरजींच्या समाधि-[illegible]क मोठेंसे मंदिर बांधलें व त्यांत शिवलिंगाची स्थापना [illegible] म्हणतात कीं, समाधिस्थ झाल्यानंतर त्यांनीं आपल्या भक्तांना [illegible]र्शन दिलें होतें. त्यांची एक कविता येथें उद्धृत केली [illegible]

[illegible] मर गयी पट्ट सुमरण सेल लाग्या सट्टरी ।
[illegible]रड मँडी चोहट्टे आवो खेलो सट्टरी ॥
[illegible]सा ढाल्या प्रेमका तरविणीरे तट्टरी ।
[illegible] घोडा जीन मांड्या आवो चढ़ो झट्टरी ॥
[illegible]ने दातार दरसे खोज अपने घट्टरी ।
[illegible] जैसे फेरण लाग्या बाँस फेरे नट्टरी ॥
[illegible] शमें जगदीश दरसे अशर मारे शट्टरी ।
[illegible]नो पैडी चढ्या चार चढ्या खट्टरी ॥
[illegible]याला अ[illegible]र जूत मारे खोस नाखै जट्टरी ।
[illegible]" अ[illegible]र बोलिया म्हार सोहं 'शिखर' घर मट्टरी ॥ १ ॥

[illegible]गीरजींनीं राजपुतान्यांतल्या कित्येक भागांत भक्तीचा [illegible] आजतागाईत त्यांचे अनुयायी पाळीत आले आहेत. [illegible] देवा । तुझा विसर न व्हावा' हीच त्यांची शिकवण

---

# स्वीकार व सत्कार

## ( अ ) मराठी

**( १ ) श्री गुरुदेव**—संचालक-राष्ट्रसंत श्री तुकडोजी महाराज-मे १९५९ 'श्रीगुरुदेवा'चें अन्तरंग विविध रूपांत अवतीर्ण झालें असून त्यांत लेख, काव्य, कथा, सूक्ति वगैरेंनीं शोभा आणली आहे. मुख्यतः ग्रामीण जीवनाच्या विकासास वाहिलेलें "गुरुदेव" तो विकास घडवून आणो, ही सदिच्छा.

**( २ ) श्री साईलीला**—शिरडी संस्थानचें अधिकृत मासिक-जून १९५९-या मासिकाची मांडणी कुशल संपादकांच्या नेतृत्वाखालीं व्यापक व उद्बोधक झाली आहे. श्रीसाईबाबांची शिकवण मानव जातीकरितां आहे-किंवा सर्व प्राणीमात्रांकरितां आहे. त्या दृष्टीनें 'बाबांची लीला,' 'साईबाबांची शिकवण,' याशिवाय 'कुस्ती खेळणारा हुंडा' ( इ. स. १९०७ सालची घटना ) 'महात्मा वेणीपति मिश्र,' 'वाचा आणि विचार करा' ( विविध सूक्ति संकलन ) 'दोन शूरांच्या स्फूर्ति-कथा,' 'श्रीरामकृष्ण परमहंस यांच्या शब्दांत साधकांना मार्गदर्शन' वगैरे लेख व्यापक दृष्टीची साक्ष देतात. अन्य धर्मांतील संताच्या शिकवणीचा परामर्श घेतल्याविना श्री साईबाबांच्या विश्वव्यापी शिकवणीचें रहस्य भक्तांच्या गळीं उतरणार नाहीं. या दृष्टीनें श्री साईलीलाचें दर्शन अभिनन्दनीय आहे !

**( ३ ) धर्मयान**—भारतीय बौद्ध सभेचें अधिकृत मासिक-जून १९५९-धर्मयानाच्या नवीन स्वरूपांत आकर्षकता, विविधता, अभिनवता, विश्वसनीयता, व ध्येयनिष्ठा हीं दिसून येतात. कार्यकारी संपादक व संपादक मंडळ अभिनन्दनास पात्र आहेत. 'बोधि वृक्षाच्या छायें' तील किसागोतमीची गोष्ट फारच आकर्षक आहे. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या परिवर्तनापूर्वीच्या भाषणांतील उतारे देण्याची प्रथा योग्य आहे. तशीच त्या वेळीं त्यांनीं निरनिराळ्या लोकांना जीं पत्रें लिहिलीं आहेत त्यांतील उतारे जर देतां आले तर त्यांच्या मनाची बैठक समजण्यास व त्यांचें व्यक्तिमत्व अजमावण्यास मदत होईल "ऋषी-मुनींत जातिभेद नव्हता" हें ऐतिहासिक सत्य आहे. म्हणून तर भगवान् बुद्धानें "मी मागील ऋषींनीं जो धर्म शिकविला तोच शिकवीत आहे" असा दावा केला आहे. पूर्वींच्या ऋषींचा धर्म व्यक्तिनिष्ठ नसून "ऋत व सत्य" यावर आधारलेला होता. 'बौद्धधर्माचीं प्रश्नोत्तरें' हें एक फारच उद्बोधक सदर आहे. त्यायोगानें शंकानिरसन होऊन खरें ज्ञान मिळण्यास मदत होते. 'हिंदू समाज व बौद्धधर्म' हा लेख वाचनीय आहे. 'भगवान बुद्धाच्या वेळची अहिंसा' यावरील लेख या बाबतींतील भगवन्ताची शिकवण कळण्यास उपयोगी पडणारा आहे. मुखपृष्ठावरील चित्र फारच योग्य व प्रसन्न आहे. 'धर्मयाना'चें अभिनन्दन. त्याचा प्रसार सर्वत्र होवो" ही सदिच्छा.

---

# संपादकीय

मागील महिना सर्वच बाजूंनीं भारताला अनिष्ट गेला ! निसर्गाचा कोप, सांथीचे रोग, करवाढीमुळें व्यापाऱ्यानीं वाढविलेल्या पदार्थांच्या भरमसाट किंमती, मानवानें मानवाची चालविलेली गळचेपी व फसवणूक, राजकारणी पुरुषांमध्यें आपापसांत लढविलेल्या हिकमती व राजकारणांतील डाव, गरीबांचे हाल व त्यांच्या मनावर या सर्वांचा झालेला अनिष्ट परिणाम व शेवटीं त्याचें कृतींत रूपांतर—असे एक ना दोन परिवर्त घडून येऊन मानवाचें मन समुद्रांत भटकणाऱ्या नौकेप्रमाणें अनिर्बंधपणें हेलकावे खात होतें. मानवजातीवर संकटें कोसळलीं आहेत व त्यांवर जर वेळींच योग्य इलाज झाला नाहीं तर मानवजात वाचविणें अशक्य होईल. 'मानवजात संकटांत तर जागतिक शान्ति धोक्यांत' व हें सर्व टाळावयाचें तर काय इलाज करावा, या प्रश्नाची चर्चा करण्याकरितां नवी दिल्ली येथें राष्ट्राध्यक्ष डॉ. राजेन्द्रप्रसाद यांच्या राष्ट्रपतिभवनांत दोन दिवस सभा चालली होती. या सभेस निरनिराळ्या धर्मांचे प्रतिनिधी उपस्थित होते. या दोन दिवसांच्या परिषदेचा उद्देश जागतिक शान्तीसाठीं व मानवजातीच्या उन्नतीसाठीं संघटित प्रयत्न कसे करतां येतील, याविषयीं एक कार्यक्रम आखणें. या परिषदेचे पुरस्कर्ते जैन मुनि सुशिल कुंवरजी असून तिचें अध्यक्षस्थान श्री काकासाहेब कालेलकर यांनीं स्वीकारलें होतें. राजस्थानचे अर्थमंत्री हरीभाऊ उपाध्याय हे या संघटनेचे अध्यक्ष आहेत. या सभेस हजर राहिलेल्या सामाजिक कार्य कर्त्यांत कॉंग्रेसचे अध्यक्ष श्री. ढेबर, मौलाना हिफझूर रहमान श्री. मौलीचन्द्र शर्मा, सेठ अचलसिंग व वृंदावनचे स्वामी बॉन महाराज हे होते. या समितीनें नियोजित 'सर्व–धर्मसंघटने'ची घटना बनविण्यांसाठीं एक उपसमिती दिल्ली येथें नेमली असून निरनिराळ्या जागतिक धर्मांच्या तुलनात्मक अभ्यासास प्रोत्साहन देण्यासाठीं व त्यांत संशोधन करण्यासाठीं या घटनेचा उपयोग करण्याचें ठरलें. या परिषेदेंत मंजूर झालेल्या दुसऱ्या ठरावान्वयें जागतिक परिषद भरविण्यासाठीं एक तात्पुरती समिति नेमली असून त्यांत सेठ अचलसिंग, श्री. मौलीचन्द्र शर्मा, श्रीमति मनमोहिनी सेहगल, श्री. कुंजीलाल डुबे आणि बावा बचितरसिंग ही नांवें आहेत. अशा रीतीनें उशीरा कां होईना पण भारताला अशा बाबतींत पुढाकार घेण्याची आवश्यकता भासावी, ही सुदैवाची गोष्ट आहे. डॉ. राजेन्द्र प्रसाद यांनीं फारच मार्मिक व कळकळीचें भाषण केलें. त्यांत ते म्हणाले—

सर्व धर्मांच्या शिकवणीप्रमाणें मानवांनें एकमेकांवर प्रेम केलें पाहिजे, शान्तीचें जीवन व्यतीत करण्याकरितां ऐक्य आणि सदिच्छा याची वाढ झाली पाहिजे, व शेवटीं परमेश्वराजवळ गेलें पाहिजे. आज दिसून येणारीं पुष्कळशीं दुःखें धर्मांच्या नांवानेंच अस्तित्वांत आलीं आहेत. एकाकाळीं धर्माचा त्याग करण्याची प्रवृत्ति होती, कारण लोकांच्या मतानें त्याची आवश्यकता नव्हती. आजचें युग अशा प्रकारचें आहे कीं, त्यावेळीं निरनिराळ्या धर्मांत जें चांगलें आहे त्या सर्वांच्या प्राप्तीसाठीं संघटित युद्ध (संग्राम) केलें पाहिजे. माझी अशी निष्ठा आहे कीं, प्रत्येक धर्मांत शिकवलेलीं जीवनांचीं जीं मूलभूत आणि सारभूत तत्वें आहेत, त्यापासून जर आम्ही दूर जाऊं लागलों, तर मानवजातीवर ओढवलेल्या संकटांतून वाचविण्यास कांहींच उरणार नाहीं व माणूस व जनावर यांमधील फरक शोधून काढण्यास कांहींच गमक राहणार नाहीं. अशा परिस्थितींत लोकांना एकत्र आणण्याचा कोणताहि प्रयत्न करणें व त्यांच्यांत एकमेकांबद्दल मैत्री व प्रेम या मनोवृत्ती उत्पन्न करणें, हाच स्तुत्य मार्ग आहे. पण हें करीत असतांना जबरदस्ती किंवा धाकदपडशा याचा उपयोग न करितां मन वळविण्याचा उपयोग केला पाहिजे. या योगानें मानव जातीची मोठी सेवा केल्यासारखें होणार आहे म्हणून प्रत्येकानें या कार्यास शक्यतों हातभार लावावा." भारतांत अशा रीतीनें एका मोठ्या कार्याचा प्रस्ताव सुरूं झाला आहे. ज्या विश्वशान्तीसाठीं जपाननें १९५४ सालापासून आठ विश्वधर्मपरिषदा भरविल्या व प्रत्येक परिषदेंत भारतांतील प्रतिनिधी जाऊन त्यांनीं "अनानाईक्यों" या संस्थेस मदत केली, त्या कार्याची दखल भारत सरकारनें घेतली नाहीं; एवढेंच नव्हे, तर भारतीय प्रतिनिधींनीं केलेल्या कामाची माहितीहि सरकारानें लोकांना पुरविली नाहीं. सरकार जी गोष्ट आज करीत आहे, त्याचा श्रीगणेशा इ. स. १९५४ ला झाला आहे. त्या वेळीं ज्यांनीं तेथें जाऊन कार्य केलें त्याची माहिती सरकारला नाहींसें दिसतें. आज जीं नांवें उद्घोषित झालीं आहेत त्यांत श्री काकासाहेब कालेलकरांशिवाय दुसरें एक नांव नाहीं. अगदीं नवीन लोकांवर हे काम सोपेंविण्यापेक्षां ज्यांना याचा अनुभव आहे अशांचा समावेश या समितींत झाला पाहिजे, असें आमचे मत आहे. आज पंडित जवाहरलाल परदेशीं जाऊन ज्या तत्त्वांचा प्रचार करीत आहेत, तीच तत्त्वें जपानांत गेलेल्या भारतीय प्रतिनिधींनीं जपानांत इ. स. १९५४ सालीं प्रथम शिकविलीं आहेत. कांहीं झालें तरी "अकरणान्मन्दकरणं श्रेयः" या न्यायानें या उपक्रमाचें आम्हीं स्वागत करतों; व त्यास पूर्ण यश इच्छितों.

× × ×

मागील महिन्यांत महाराष्ट्रांतील साक्षात्कारशास्त्रविशारद, अध्यात्माच्या प्रान्तांतील मुरब्बी, उपनिषदासारख्या ग्रंथाचा सखोल अभ्यास करून त्यांचा "Constructive Survey"च्या रूपानें सुसंगति दाखविणारा अध्यात्मवादी संत, डॉ. रामचंद्र दत्तात्रय रानडे यांना स्वर्गवास घडला, हें वृत्त वाचून सर्व भारत हळहळला ! डॉ. एस. राधाकृष्णन् यांच्या तोलाचा व योग्यतेचा हा तत्वज्ञानी प्राध्यापक भारताचें भूषण होतें. त्यांचा जीवनपट इतरत्र सर्व वृत्तपत्रांनीं दिल्यामुळें

…वी पुनरावृत्ति आम्ही करीत नाहीं. पण त्यांची प्रकृति एकाकाळीं …ती क्षीण झाली होती कीं, त्यांना पंडुरोग लागून ते जगतात कीं …तात, अशी त्यांच्या मित्रांना काळजी पडली होती. पण ते आज …७ व्या वर्षापर्यंत जगले व त्या काळांत त्यांनीं निंबाळ (विजापूर तालुका) …थें अध्यात्मपीठ स्थापन करून शिष्य परंपरा निर्माण केली हे …त्यांच्या भारतीय तत्वज्ञानाच्या अथांग ज्ञानाचें व तें ज्ञान अंगीं पचवून …अनुमान वाढविल्याचें दृश्य फळ होय. त्यांचा पोषाख अगदीं साधा. यष्टि …शेवटपर्यंत कृश. त्यांना कानडी, मराठी व हिन्दी या भाषा येत होत्या. …तीनींतहि त्यांनीं ग्रंथरचना केली. तत्वज्ञानाच्या दृष्टि कोनांतून त्यांनीं …सर्व भाषांवर अनुभव मिळवून त्यांचा खोल परिचय करून घेतला. …अध्यात्माचा अभ्यास शरीराला उपकारक ठरतो, हें त्यांनीं स्वतःच्या उदा-…हरणानें दाखविलें! त्यांनीं गूढवादावर ग्रंथ लिहिला. 'ईश्वर प्राप्तीच्या सोपान …ग्रंथाला त्यांनीं एक इंग्रजी प्रस्तावना लिहून सोपानाची फोड सामान्य …जनतेला जेणें करून होईल, असा प्रयत्न केला. प्राचीन तत्वज्ञानाचा …अभ्यास करून त्याला त्यांनीं अर्वाचीन संतवाङ्मयाच्या अभ्यासाची जोड …दिली व अशा अभ्यासानें त्यांनीं भारतीय अध्यात्मतत्वज्ञानाचें सातत्य व …सार्वत्रिकता सर्वांना पटवून दिली. मुख्यतः " साक्षात्कार शास्त्र " हें काय …शास्त्र आहे, यावर त्यांनीं सोपपत्तिक प्रकाश पाडला. त्यांच्या शिष्या-…नीं ( श्री तुळपुळे ) साक्षात्कारशास्त्रावर प्रमाणभूत ग्रंथ लिहिले अशी …या गुरूची किमया होती. जसें अरविंदांचें अध्यात्मपीठ, जसा रमणम-…हर्षींचा अध्यात्ममठ, तसेंच निंबाळला डॉ. रानडे यांनीं अध्यात्मज्ञानाचें …केंद्र निर्माण करून तें चालविलें. त्यांच्या विद्वत्तेची कल्पना व दुसऱ्यास …प्रोत्साहन देण्याची उदार बुद्धि आम्हास आमच्या बंधूकडून कळली. आमचे बंधू दि. ब. रा. के. भागवत यांनीं समग्र ज्ञानेश्वरीचें इंग्रजीत …भाषांतर करून तें प्रसिद्धहि केलें. पण ते छापण्यास द्यावयाचे पूर्वी …ते निंबाळ येथें जाऊन त्यांनीं डॉ. रानडे यांना तें भाषांतर वाचून …दाखविलें व नंतर त्याला त्यांनीं आपली प्रस्तावना जोडली व …उदाररीतीनें त्याचापुरस्कार केला ! यामुळें आमच्या बंधूंना तें भाषांतर …करून घेतां आलें; कारण अधिकारी तत्वज्ञांकडून तें मंजूर झालें आहे, …अशी त्यांची खात्री पटली ! अशा या विद्वान, तत्वज्ञ, गूढ प्रदेशांत संचार …करून संशोधनाचीं रत्नें जनतेस बहाल करणारा असा हा अध्यात्मवादी …आधुनिक संत ! त्यांना आमचे शतशः प्रणाम ! ते तर निर्वाणाप्रत गेले …आहेतच ! त्यांच्यामागें त्यांचें पीठ उत्तम रीतीनें चालून हजारों तृषितांना …अमृत देत राहो, ही प्रार्थना ! डॉ. रानडे हे अमर आहेत !

× × ×

…मागील महिन्याच्या १३ जूनला लंडन येथें ' फ्रेंच इन्स्टिटयूट 'मध्यें …इंग्लंडमधील पुष्कळ बौद्धधर्मीय प्रेक्षकांसमोर बिमल रॉय प्रॉडक्शनचा "…गौतम दि बुद्ध" हा चित्रपट दाखविण्यांत आला. त्यावेळीं निरनिराळ्या …देशांतील परराष्ट्रीय अधिकारी व दुसरे ख्यातनाम व विश्रुत व्यक्ति हजर …होत्या. भगवान् बुद्धाच्या २५०० वर्षी केंद्र सरकारच्या "फिल्म विभागा"नें …हें चित्र तयार केलें असून त्याला भारताच्या अध्यक्षांचें सुवर्णपदकहि …मिळालें आहे. ज्या चित्राची ओळख भारतीयांना आहे तेंच हें चित्र …ते भारताच्या हायकमिशनर श्रीमती विजयालक्ष्मी पंडीत यांच्या …सहकार्यानें दाखविण्यांत आलें होतें. लंकेमध्यें या चित्राबद्दल टीका झाली होती. पण बिमल रॉय प्रॉडक्शननें, सर्व बाजूनीं उचित असा हा भगवान् बुद्धाचा चित्रपट काढून सर्वांचीच वाहवा मिळविली. लंडन मधील चित्र-पटाचे वेळीं दक्षिण आफ्रिकेतील हायकमिशनर व त्यांची पत्नी हि वेळेवर हजर झाल्या. तेथील वातावरण पाहून लोकांना वाटलें कीं, हे अधिकारी आफ्रिकेंतील काळ्या लोकांना दूर ठेवण्याचें धोरण विसरून त्यांच्यात मिसळ-ण्यास तयार झाले असावेत ! शेवटीं त्यांनीं पुढील उद्गार काढले :–प्रत्येक क्षण हें चित्र मला आवडलें ! भगवान् बुद्धानें केवढें विलक्षण जीवन व्यतीत केलें आहे ? " सर्वांना तें चित्र आवडलें. लंडन येथील बुद्धिस्ट सोसायटीचे चिटणीस म्हणाले—अतिशय नेत्रदीपक व परिणामकारक, सुंदर व कलापूर्ण असें हें चित्र आमच्या भगवानावर बसविलें आहे. या चित्रपटांत बुद्धगया, नालन्दा, राजगृह व अजंटा हीं आमच्याजवळ आणलीं आहेत. आम्हीं जें पाहिलें त्यानें आम्हीं भावनेनें वश झालों आहों. सिलोनमधील हायकमिशनर सर क्लॉड कोरिया हे तर खुष झाले. सिलोनेचे डेप्यूटी कमिशनर मिस्टर परेरा म्हणाले–गांधीजींची अहिंसेवरील शिकवण बुद्धाच्या शिकवणीवर आधारलेली आहे. पंडित नेहरूंच्या पंचशीलाच्या राजकीय तत्त्वज्ञाना संबंधीं बोलतांना ते म्हणाले, ही तर शंभर टक्के बुद्धाची शिकवण आहे; व भारतीय चित्रपट उत्पादकानें ही गोष्ट इतक्या प्रभावशाली पद्धतीनें आमच्या मनांवर ठसविली आहे " चित्रपटावर थोडी टीका झाली व ती म्हणजे भाष्यकाराचा आवाज पुरासा स्पष्ट नव्हता; म्हणून ऐकावयास येत नव्हता. दुसरी टीका त्या चित्रांत वाजवीपेक्षां फाजील आवाहन भावनेला केलें आहे. धार्मिक चित्रपटाचा भावनात्मक परिणाम पुष्कळ वेळपर्यंत माणसाच्या मनावर राहतां कामा नये ! अशा-रीतीनें कांहीं टीका जरी झाली असली तरी एकमुखानें त्यांची सर्वांनी स्तुति केली व ही गोष्ट आम्हा भारतवासीयांना अभिमानास्पद, भूषणा-स्पद आहे. आमच्या येथील कांहीं चोखदळ टीकाकारांना व धर्मश्रेष्ठींना त्यांत कांहीं विशेष आढळलें नाहीं; पण जगांतील राष्ट्रांच्या राजकारणी पुरुषाना व परदेशस्थ बौद्ध धर्मीयाना तें चित्र आवडून त्यांनीं मुक्तकंठानें त्यांची स्तुति करावी, हीच भगवान् बुद्धाच्या महनीयतेची साक्ष ! आम्ही बिमलराय प्रॉडक्शनचे अभिनन्दन करतों ! सुखो बुद्धान उप्पादो. "

× × ×

धर्मचक्राचा जुलै महिन्याचा १२ वा अंक वाचकांचे हातांत देऊन धर्मचक्राची नऊ वर्षें पुरी झालीं ! या वर्षांत " धर्मचक्रा " ला विविध अवस्थांतून जावें लागलें. बौद्ध जयंतीला मोठा अंक प्रसिद्ध केल्यानंतर जून जुलै व ऑगस्टचा जोड अंक काढण्याची पाळी संपादकां-वर आली ! त्यानंतर मात्र सप्टेंबर १९५६ ते जुलै १९५७ पर्यंत २४ पानांचा मोठ्या आकाराचा अंक वाचकांना दर महिन्यास नियमानें पोहोंचविण्याची शिकस्त आम्ही केली. धर्मचक्राची नऊवर्षांची आबाळ सांपत्तिक परिस्थितीमुळें झाली, हें सांगणें नको ! याची सर्व मीमांसा आम्ही ऑगस्ट १९५६ च्या संपादकीय निवेदनांत केलीच आहे, तेथील एक वाक्य आम्ही पुन्हां उद्धृत करीत आहोंत–"कोणत्याहि परिस्थितींत आपलें कार्य **शक्ति असे तोंपर्यंत** करावयाचें व स्वतंत्र भारताच्या या वैचारिक गोंधळांत व विपर्यस्ततेंत **आमच्या विचारसरणीची दिवली** तेवत ठेवावयाची, अशी आमची प्रबलेच्छा वाचकांपुढें व्यक्त करीत आहोंत." म्हणून या कठीण काळांतून "धर्मचक्रा"चें जीवन सुरूं

रहावें, अशी परिस्थिती उत्पन्न झाली. याला कारण संतांची कृपा, सज्जनांचा आशीर्वाद व ऋणानुबंधी यांचे प्रेम हेंच होय! जेथें "सह्याद्री" सारखें मासिक बंद ठेवण्याचा निर्णय घ्यावा लागला, किंवा नागपूरच्या "राष्ट्र शक्तीला" पूर्णविराम घ्यावा लागला तेथें आमची कथा काय! परिस्थितीच्या पुरांत हीं झाडें वाहून गेलीं. श्रीसंततुकाराम महाराजांनीं म्हटल्याप्रमाणें—"महापुरें झाडें जातीं। तेथें लव्हाळे वांचती॥" धर्मचक्राचें उद्दिष्ट नैतिकमूल्याची महनीयता पटविण्याचें असल्यामुळें व अहिंसा व प्रेम व बंधुभाव ह्यांच्या योगानेंच मानवतावादाचा प्रसार करण्याचें असल्यामुळें, त्याला भारतानें आश्रय देणें आवश्यक आहे. केन्द्रीय सरकारच्या शैक्षणिक खात्यानें आमची विनंति मान्य केली नाहीं. पंडितजी आज जें शिकवत आहेत तेंच आम्ही ९ वर्षें शिकवत असतांना त्याला सरकारची मदत मिळूं नये ही दुर्दैवाची घटना होय. आपल्या पायावर उमें रहावयाचें. तें द्रव्यबळ नाहीं! मानवतावादाचा पुरस्कार करणाऱ्या मासिकाला ९ वर्षें हालांतः काढावीं लागलीं. पण "धर्मचक्रा"च्या अन्तःसत्वानें व "सत्यमेव जयते" याप्रमाणें "गांधी स्मारक निधी" नें आम्हांस अंशतः मदत करण्याचें ठरविलें आहे, ही आनंदाची बातमी वाचकांना येथें कळवीत आहोंत. या कामीं कै. श्री. बाळासाहेब खेर यांचे कृतज्ञतापूर्वक स्मरण झाल्याविना रहात नाहीं. आतां लोकांनीं आपलें कर्तव्य केलें व ग्रंथालयांनीं व शाळा व कॉलेजें यांनीं "धर्मचक्रा"ची एक प्रत घेण्याचा निश्चय केला तर धर्मचक्र बंद पडणार नाहीं, येवढेंच नव्हे, तर त्यांत सुधारणा करावयास सांपडेल! या वर्षी श्रीतुकाराम विश्वविद्यालय संघाचाहि कायाकल्प झाला ही बातमीहि उत्साहवर्धक आहे. शेवटीं धर्मचक्रानें जें धोरण आखलें आहे, तेंच धोरण भारत सरकार अनुसरत आहे, एवढेंच नव्हे, तर जगांतसुद्धां नैतिक मूल्यांना मान मिळत आहे, ही गोष्ट रशियाच्या नुकत्याच झालेल्या बदलावरून दिसून येते. धर्मचक्राचें दहावें वर्ष निश्चित जावो व त्याची उपयुक्तता सर्वांना पटावयास लागो, अशी प्रार्थना येथें केल्यास ती आनाठयी होणार नाहीं! आम्ही सर्वांचे ऋणी आहोंत! त्यांचा लोभ असाच धर्मचक्रावर राहावा; कारण "धर्मचक्र" हें आमच्या पोटाचें साधन नाहीं, ही गोष्ट सर्वांना ठाऊक आहे. निरपेक्ष पणानें चालविलेल्या उपक्रमाला भारतांत शेवटीं आश्रय मिळतो; अशा निष्ठेला "धर्मचक्र" मात्र अपवाद ठरणार नाहीं अशी आशा आहे. पुन्हां एकवार सर्वांचे आम्हीं आभार मानतों व नऊ वर्षें सेवा घेतल्याबद्दल सर्वांस धन्यवाद!

• • •

# – स्वातंत्र्यसमरशताब्दि –

ज्याला भूतपूर्व इंग्रज लोकांनीं 'इ. स. १८५७ चें बंड' म्हटलें त्यालाच आम्ही–आज स्वतंत्र झालेल्या भारतानें–'स्वातंत्र्य समर' असें नांव दिलें आहे व तें सयुक्तिकच होय. इ. स. १८१८ त पेशावाई गेल्यानंतर इंग्रजांना पायबंद घालणारा असा कोणी प्रबळ शत्रूच राहिला नाहीं. त्यामुळें त्यांच्या महात्त्वाकांक्षेस थोपवून धरणारी अशी शक्ति राहिली नाहीं. त्यांचा सर्वस्वी आधार सैन्यावरच होता; पण भारतीय सैनिकांच्या जीवनाचें सत्व म्हणजे "धर्म" हा होय, हें त्यांना कळणें शक्यच नव्हतें. मानसिक प्रक्रियांची परीक्षा करण्याचें ज्ञान त्यावेळच्या इंग्रजी नेत्यांना सुचणें शक्य नव्हतें. आपण ज्याला 'शांतता प्रस्थापित केली' असें म्हणतों, त्याच्या खालीं धगधगीत विचारांची खाई आहे ही त्यांना जाणीवच झाली नव्हती. दारूचें कोठार तयार आहे, पण त्याला वात लावायचाच अवकाश आहे! इ. स. १८५७ त काडतुसांचें प्रकरण उद्भवलें! मोगलांचा अवशेष व पेशव्यांचा अवशेष, झांशीच्या राज्याचा अवशेष, नबाबाचे अवशेष, हे अद्यापि असल्यामुळें त्यांच्या सर्वांबद्दल राजनिष्ठेची भावना अद्यापि नष्ट झाली नव्हती. म्हणून सरकारनें आपल्या अदूरदर्शित्वानें भडका उडविण्यास मदत केली. पण दारूगोळा उडाला म्हणजे जसे काळे डाग शिल्लक राहतात, तशा त्या स्वातंत्र्यपिपासेच्या काळ्या स्मृति नष्ट झाल्या नाहींत. "मायबाप सरकार", म्हणणारी जनताहि 'इंग्रज हे परकी आहेत,' ही जाणीव विसरूं शकली नाहीं. सरकाराशी सनदशीर मार्गानें भांडणारांचा जरी एक पक्ष होता तरी तरुण व उच्छूंखल वृत्तीच्या स्वातंत्र्यपिपासू तरुणांचा पक्ष हळूहळू आपल्या चळवळी सर्वत्र पसरवित होताच. त्यांत आर्थिक व नैसर्गिक कारणांची भर पडली. या संघर्षांतूनच आमच्या स्वातंत्र्य प्राप्तींची मुळें रुजत होतीं. आमच्या या गुप्त चळवळींना इतिहास, महाभारत, रामायण, महाराष्ट्रीय व अन्य प्रांतीय सन्त यांच्या शिकवणीची व श्री छत्रपति शिवाजी महाराज यांच्या स्वातंत्र्य युद्धाच्या स्मृतीची साथ मिळाली. या योगाने लोकांच्या जीवनांत असुभमता, खळबळ, वावदूकता, हीं वाढत चालली. हिची सर्वत्र उठावणी झाल्याबरोबर सरकारनें दडपशाहीचे धोरण सुरूं केलें. पण त्याचा परिणाम चळवळ बंद न पडता ती फोफावण्यांतच झाला! स्वामी रामतीर्थ, विवेकानन्द, टागोर, आर्य समाजाचे अध्वर्यू श्रद्धानंदजी वगैरेंच्या प्रवचनांनीं भूमी तयार होत होतीं. राष्ट्राभिमान बळावत चालला. "भारत हमारा देश है." ही भावना सर्व भारतांत वणव्यासारखी पसरली व जरी कांहीं स्वार्थसाधू लोकांनीं खो घालण्याचा यत्न केला, किंवा जरी हिंदू मुसलमानांत फोड पाडून राज्य खंबीर करण्याचा इंग्रजांनीं प्रयत्न केला, तरी राष्ट्राच्या उज्ज्वल परंपरेच्या पायावर व सन्ताच्या शिकवणामुळें, नैतिक जीवनाच्या परमोच्य परिणतीच्या निष्ठेने, भारतीयांची अन्तःकरणें मातृभूमीसाठीं एकत्र येत होतीं. राजकीय आंदोलनानीं त्यांना वेग आला होता, क्रान्ति कारकांच्या चळवळीनी त्याला चेव आला व महायुद्धानें व महात्माजींच्या नैतिक शिकवणीनें तर परमोच्च बिंदू गांठून सरकारविषयीचा दरारा व भीति–स्त्री व लहान मुलें यांच्यासुद्धां– सर्वांच्या मनांतून–उडून गेली. तथापि महायुद्धांतहि भारतानें आपली मर्दुमकी गाजविली व या सर्वांचा सामुदायिक परिणाम म्हणजे सरकारला भारताचा ताबा सोडून द्यावा लागला! हें निदान आम्ही करतों. त्या नंतर ज्या वृत्तपत्रकारानीं विशेषांक काढले, त्यांतील चारच अंकाचा परामर्ष थोडक्यांत घेत आहों. नैतिक जीवनाचा परमोच्चविकास (सर्वांगीण) झाल्यामुळें स्वातंत्र्यप्राप्ति झाली व त्या कामीं तामसी वृत्तींच्या आळ्यांत स्वातंत्र्याचें बी जरी प्रथम पडलें असलें, तरी तामसी व राजसिक वृत्तींच्या उंच जाऊन जेव्हां सात्विक भावनांची परिणति भारतानें करून घेतली, तेव्हांच स्वातंत्र्याचें फळ भारतीयानां लाभलें! आरंभापासून शेवटच्या पूर्णाहुतीच्या प्रदात्यापर्यंत आम्हीं सर्वांना सादर व नम्रतापूर्वक वन्दन करतों व त्या हुतात्म्यांच्या व स्वातंत्र्यवीरांच्या हिमालयासारख्या उंचीकडे पाहून आमचीं वामनीमनें (Puny minds) आंत चूर होवोंत व त्या उंचीकडे पहात पहात, "सहवीर्यं करवावहै," अशी वृत्ति सर्वांच्याच हृदयांत बळावत जावो, म्हणजे स्वातंत्र्यसमरशताब्दीची फलश्रुति मिळाली असें होईल. "सर्वे भद्राणि पश्यन्तु" ही सदिच्छा.

## कांहीं विशेषांक

**(१) केसरी** (स्वातंत्र्य-समरशताब्दि विशेषांक) पुणें.

ज्या लोकमान्यांनीं महाराष्ट्रांत व पर्यायानें सर्व भारतांत "स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे." अशी उद्घोषणा करून भारताला तन्यपूर्ण करून स्वातंत्र्याची लालसा त्यांत उत्पन्न केली त्या लोकमान्यांच्या त्या केसरीनें इ. स. १८५७ स्वातंत्र्य शताब्दि विशेषांक काढावयाचा नाहीं, तर तो दुसरा कोण काढणार? हा विशेषांक ह्या काळांतील कित्येक अज्ञात घटनांवर नवीनच प्रकाश पाडून स्वातंत्र्य युद्धाचें खरें स्वरूप भारतीयांना कळण्यास फार उपकारक होय. ८८ पानांच्या या अंकांत चित्रें घालून त्या हुतात्म्यांची ओळख करून देण्याचा अभिनव प्रयत्न केला आहे. राणी लक्ष्मीबाईचें दलालनीं काढलेलें चित्र अभिमानास्पद व भारताच्या मनांत भावनांचा कल्लोळ उठविण्यास समर्थ आहे. प्रथमतः त्या असंख्य तेजस्वी ज्ञात-अज्ञात वीरात्म्यांना शतशः प्रणाम केले आहेत. लेखांची संपदाहि उच्च दर्जाची आहे. "शतसांवत्सरिक संग्रामाचें विहंगमावलोकन" (करंदीकर) वाचनीय आहे, सावरकरांचा लेखानें "धर्मयुद्ध नि स्वातंत्र्य युद्ध" दाखविण्याचा प्रयत्न करून वाचकांना नवीन दिशा दाखविली आहे. "माझी क्रान्ति कार्य कथा" "१९४२ मधील एक चित्तवेधक प्रसंग," 'निर्भय क्रान्ति वीर सरदार भगतसिंग' 'स्वातंत्र्यवीरांची अखंड परंपरा प्रसवणारी पंचनदाची पवित्रभूमि' वगैरे लेख वाचनीय आहेत. "वासुदेव बळवंतांचा उठाव" हा महाराष्ट्रीयांना विशेष पटणारा आहे. या बंडाचा उद्देश 'आम्हीं हिंदूधर्माकरतां इंग्रजांबरोबर लढत आहोंत' हाच असता तर इतर धर्मीयांनीं यांत भाग घेतला नसता. ते स्वातंत्र्य सर्वांनाच हवें होतें व तो उठाव सर्व भारतीयांनीं केला. एकंदरींत हा

केसरीचा अंक अभिमानास्पद असाच आहे. आम्हीं संपादकांचें अभिनन्दन करतों.

( २ ) **राष्ट्रशक्ति** ( स्वातंत्र्य-समरशताब्दि विशेषांक ) नागपूर

दर्शनी चित्र स्वातंत्र्य युद्धाची भूमिका व वातावरण हीं अत्यन्त चित्रोपम स्वरूपांत दाखविनें. व मानवाच्या विविध मनोवृत्ति त्यांच्या मुखावर प्रतिबिंबित करतात. संपादकीयांत संपादकांनीं हुतात्म्यांना नम्र श्रद्धांजलि अर्पण करून स्वातंत्र्यप्राप्तीबद्दल कृतज्ञतापूर्वक नम्रता व विलीनता व्यक्त केली असती, तर या प्रसंगाला उचित व वीराला शोभण्यासारखें झालें असतें. खरें वीर्य लीनतेंत आहे. पण संपादकांनीं यांत विनाकारण वाद उकरून काढला असून त्यायोगानें प्रसंगांच्या गांभीर्याला कमीपणा आला आहे. तें म्हणतात " कांहीं लोक इ. स. १९२० नंतरच्या चळवळींनांच श्रेय देतात. पण त्यांत 'खोटा', व्यर्थ आणि अनाठायी अहंकार आहे. " आज आपण स्वतंत्र आहोंत, हें सत्य आहे. मग आतां सर्वांनीं एकत्र होऊन स्वातंत्र्य टिकविण्याचा प्रयत्न करावयाचा कीं मागील उखाळ्यापाखाळ्या काढून त्याच्यायोगानें आम्हीं अद्यापि गुलामच आहोंत, असें दाखवावयाचें ! अस्तु. राष्ट्रशक्तींतील लेख संपदा वैचित्र्यपूर्ण व सर्वांनाच विचार करावयास लावणारी आहे ! " त्यांच्या जीवनयज्ञाची दाहकता आमची क्षुद्रता भस्म करो " हा गुरुजींचा संदेश सर्वांनाच आदरणीय आहे " यज्ञाची सांगता " " ५७ ते सुभाष, " " सेनापति चन्द्र शेखर आझाद, " " बहादूरशहा व त्याचीं वक्तव्यें " " नेताजी सुभाषचन्द्र बोस " " रासबिहारी बसू " वगैरे लेख विचार करण्यास योग्य असे आहेत. राष्ट्रशक्तीचें आम्हीं अभिनन्दन करतों.

( ३ ) **भालचंद्र**—( मे १९५७ )—नाशीक, किं. ८ आणे.

हा अंक लहान आहे. त्याची पृष्ठें ५० आहेत. आरंभीचें चित्र स्वातंत्र्यलक्ष्मी राणी लक्ष्मीबाईचें आहे. संपादकीयांत हुतात्म्यांना श्रद्धाञ्जलि आहे. ती सर्व ज्ञात आणि अज्ञात कीर्तिवीरांना आहे व " आज तुमच्या आशा आकांक्षा सुफलित झाल्या " असें सांगून त्यांना समाधानकारक बातमी पोहोंचविली आहे. इतर लेखांत ' चलो दिल्ली ' " १८५७ ची फलश्रुति " ' चारुचन्द्र बोस ', " होय, तें स्वातंत्र्य-समरच होतें ", " पूर्णाहुति ", स्वातंत्र्यलक्ष्मीच्या गळ्यांतील कौस्तुभ ", " रंगो बापूजी " वगैरे लेख उल्लेखनीय आहे.



( ४ ) **सह्याद्री**—पुणें, क्रांती विशेषांक, मे १९५७, किं १-०-०

सह्याद्रीचा हा विशेषांक माहितीपूर्ण आहे व केसरीच्या अंकांतील माहितीला पूरक आहे. हे दोन्ही अंक वाचले म्हणजे सामान्य वाचकाला १८५७ च्या स्वातंत्र्यसमराची आवश्यक पण विश्वसनीय माहिती मिळून त्याचें समाधान होईल. संपादकानीं या अंकाचें स्वरूप थोडक्यांत दिलें आहे. त्यांत लेखनाच्या भरांत " अशा ह्या राष्ट्रभक्त महापुरुषांच्या पादस्पर्शांनीं पावन झालेली ही भूमि स्वातंत्र्याच्या तीर्थस्थानाइतकी प्रतिष्ठा पावण्यास योग्य आहे " हें स्वारस्यपूर्ण वाक्य उच्चारून टाकिलें आहे. महत्त्वाच्या लेखांचा उद्देश मराठी वाचकांना परिचित असलेल्या माहितीचे नवे पैलू दाखवून देण्याचा आहे. त्यांत " गोपाळ अंताजीचें बंड " " नरगुंदच्या बंडाची हकीकत " " डॉ. सिल्व्हेस्टरची बखर " हे लेख त्याचीच पूर्तता करतात. ललित साहित्याच्या योगानें भावना व आनंद व समाधान यांची प्राप्ति होते. " क्रान्तीच्या तीर्थस्थानाची माहिती भौगोलिक पण नाविन्यपूर्ण पद्धतीनें मांडली आहे. इतर विषयांत या क्रान्तीवीरांच्या मानव्याची माहिती मिळवून देण्याचा यत्न केला आहे. अंक अत्यन्त बहुमोल व संग्राह्य आहे.

• • •

# एक व्यक्तिगत विचारमाला !

( आमचे खास बातमीदाराकडून )

" धर्मचक्र " दे. भ. जाजूकडे येत आहे. तो अंक पुष्कळ लोक वाचतात. इन्फ्यूएंझाचे साथींत ५० हजार लोकांची सेवा दे. भ. जाजूंनीं केली व करविली. आपण स्व. बाळासाहेब खेरांचा संदेश मागें जाजूजींकरितां पाठविला होता. तो आम्ही पाहिला आहे. आपलें पत्र आलें, तें पत्र आम्ही वाचलें आहे. धर्मचक्राकरितां जाजूजींनी गुप्त खटपट केली आहे. जाजूजी गांधीजींना देवासारखे मानतात. महाराष्ट्रीय मनोवृत्तीचे ते कट्टर विरोधी आहेत.

" कल्याण, परमार्थ " प्यारा बापू, भावनगर समाचार, गो. रक्षण, वगैरे पत्रे ते नियमित वाचतात. सोलापुरास जाजूजी लौकरच सांस्कृतिक मंडळांची स्थापना करून आपल्या सारख्या लोकांची व्याख्यानें करविणार आहेत. मागें होऊन गेलेले लोकांचें गुण जरूर घ्यावे; परंतु " बोले तैसा चाले " या म्हणीप्रमाणें धडाडीनें स्वतः आचरण करणारे लोकांना सदाचरणाचे धडे देवू शकणार, व आपल्या मागें ते येतील अशा जातीवर लिखाण करूं शकतात. बुद्ध, महावीर, येशूची गोष्ट वेगळी आहे व राम कृष्ण गांधीजीची गोष्ट वेगळी आहे. वैदिक लोक कोणाकडे पाहतात, सनातनी लोक कोणाकडे पाहतात, राजकारणी लोक कोणाकडे पाहतात व व्यसनी, गुंडगिरी करणारे, सिनेमा लिखाण करणारे, सिनेमा पाहणारे कोणास भितात ? नक्कलीपणा, कृत्रिमपणा, छिछोरपणा वाढला आहे, त्याला आळा कोण घालणार ? यावर कडक-स्पष्ट लिखाण येणार काय ! कोण लिहिणार यावर ? विचार-विनिमय होणें जरूरीचे आहे. "

• • •

# साभार स्वीकार :—

## ( १ ) मराठी विभाग

(१) **सोविएत देश** : अंक ११, ५ जून १९५७.

हा अंक मागील अंकाप्रमाणेंच वाचनीय आहे. मुखपृष्ठावरील चित्र 'पायोनियर' ही राष्ट्राची संपत्ति राष्ट्राच्या आघाडीवर नाहीं, असें कोण म्हणेल? अशा मुलांच्या संस्थेला पायोनिअर ( अग्रेसर ) असें कां म्हणूं नये! चौथ्या पृष्ठावर अमुर नदीच्या काठीं 'पोयोनियर' युवकांच्या शिबिराचें चित्र आहे. त्यांच्या मुखावर स्वर्ग पसरला आहे असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. लेखामध्यें कांहीं लेख उल्लेखनीय आहेत. 'जागतिक युवकमहोत्सवाची मुंबईतील तयारी' 'आमचें युवनिधान-बालकें' 'गिरणी व तिचे उपग्रह' 'चार भिंतीच्या आड,' महान् 'रशियन लेखक ॲन्टन चेकोव,' 'खोजा नासिरूद्दीन यांच्या आख्यायिका' वगैरे. या पाक्षिकानें जो मासिकाचा उत्तम नमुना भारतीय संपादकांसमोर ठेवला आहे, त्यांतून आपणास काय घेतां येईल, हें पहाणें आवश्यक आहे. रशियन जीवनाच्या विविध अंगांचे सम्यग् दर्शन झाल्यास आपणांस तें फारच उपकारक होणार आहे.

(२) **'श्री गुरुदेव'** : ( संचालक–राष्ट्रसंत श्री तुकडोजी महाराज ) गुरुकुंज, अंक ३ रा, जून १९५७.

या अंकाचें दर्शनी चित्र श्री वासुदेवानंद टेंबे यांचें आहे. मराठी लेखांतील 'तीर्थयात्रांचें सांस्कृतिक महत्त्व,' 'प्रारब्धाच्या सिद्धान्ताचें सूक्ष्मापन,' 'तीर्थयात्रेंतील नामदेवराय,' 'क्रियाशील वही साधू पंडीत' 'साधननिष्ठाकी कसोटी,' 'दो महान सन्तोंकी मुलाकात,' वगैरे लेख वाचनीय आहेत. श्री राष्ट्रसंतांचा उद्देश 'मानव समाजाची सर्वांगीण उन्नति' हाच असल्यामुळें अशाच मासिकांची आज गरज आहे.

(३) **जनताजनार्दन** : जून १९५७.

श्रीगाडगे बाबांच्या नांवानें निघालेल्या या मासिकांत बाबांचें तत्त्वज्ञान म्हणजे रोजची व्यवहारांतील वर्तणूक यावर जास्त भर दिला आहे. 'मी कुणाचा गुरु नाहीं. माझे कुणी शिष्य नाहींत' म्हणून 'कार्याच्या फलाची आशा न करितां सतत सत्कार्य करत राहणें" ही बाबाची शिकवण त्यांनीं दिली व शेवटपर्यंत आचरली. त्यांच्या विधायक कार्याची आज आम्हां सर्वांना गरज आहे. यांतील बाबांच्या गोष्टी उद्बोधक आहेत. अंक वाचनीय आहे.

(४) **प्रतिष्ठान**—जून.

या अभिजात मासिकांत विषयवैचित्र्य आहे व अभ्यासूवृत्ति आहे. "मराठवाडा विद्यापीठ" "मध्ययुगांतील भक्तिसंप्रदाय" ( तौलनिक अभ्यास ) "परीक्षणें," हीं सदभिरुचींची द्योतक आहेत.

(५) **सज्जनगड** ( मासिक पत्रिका )—सज्जनगड, अंक ८ वा.

समर्थांच्या कार्यभूमींतून निघालेली ही पत्रिका वंदनीय व भावनीय आहे. संपादकांनीं समर्थांच्या कार्यास उजळा देण्याचें कार्य हातीं घेतलें आहे व आजच्या या काळांत तें आवश्यक आहे. ज्या समर्थांनीं "आनंदवनभुवन" म्हणून महाराष्ट्राची महती गाईली व त्यावद्दलचें स्वप्नीं देखिलेलें चित्र साकार झालेलें पाहून हें सुंदर काव्य गाईलें त्या समर्थांच्या नेतृत्वाची व त्यांच्या नैतिक तेजस्वितेची आज फार मोठी गरज आहे. आणि याच दृष्टीनें आम्हीं या पत्रिकेकडे पाहतों.

( ६ ) **साहित्यसहकार** : अंक ३ रा, जून १९५७.

यांतील "विचार शलाका" विधायक दृष्टीची द्योतक आहे. "अमेरिकन सार्वजनिक ग्रंथालयें" हा श्री हिंगवे यांचा लेख माहितीपूर्ण आहे. "ग्रंथालयें व समाजजीवनांतील त्यांचें स्थान" वाचनीय आहे. संपादकद्वयाचें अभिनंदन.

## ( २ ) हिंदी विभाग

( १ ) **'अहिंसावाणी'**—तीर्थंकर भ० ऋषभदेव विशेषांक— अप्रैल-मई १९५७-संपादक श्री. कामताप्रसाद जैन.

आजपर्यंत "अहिंसावाणी" च्या निष्ठावान संपादकांनीं निरनिराळे विशेषांक काढून जैन साहित्य व संस्कृति यावर अमूप प्रकाश पाडण्याचा यशस्वी प्रयत्न चालविला आहे. विशेषकांत जास्तीत जास्त लेख घालतां येतात व विषयाची सांगोपांग चर्चा करण्यास पुष्कळसा वाव सांपडतो. या विशेषांकाला "ऋषभदेवांचें" नांव दिल्यामुळें तर त्याची योग्यता वाढली आहे. यांतील लेखक व त्यांनीं दिलेली विचारसंपदा या योगानें या अंकाचें मूल्य अमूप झालें आहे. प्रथम आंत तीर्थंकर भ. ऋषभदेव यांचें अत्यंत भावपूर्ण रंगीत चित्र आहे. आरंभी वृषभदेवांचें पूर्वाश्रमांतील जीवनाची झांक चित्रित केली आहे. लेखांत तर वैचित्र्य आहे ऋषभ देवाचें जीवन-ध्येय म्हणजे मानवतेचा विकास हें होय. **त्यांचा उपदेश विश्वासाठीं होता.** "जी कृति आम्ही करून अर्हंत, सिद्ध, भगवान् झालों, तीच करणी तुम्ही करा; 'म्हणजे नरका नारायण हो जायगा.' केशरियानाथ भ. ऋषभदेव हेंहि चित्र फारच नयनमनोहर आहे. या अंकांतील चित्रांची पखरण मनाला उल्हसित करते. सात्विक विचारांची गर्दी करून अकुशल मनोवृत्तींना हद्दपार करते. पण या चित्रसंपदेनंतर विचारसंपत्तीनें संपन्न अशा लेखाची मालिका वाचावयास लागलें म्हणजे बुद्धीला खाद्य मिळतें. बुद्धीला घर्षण मिळतें. विचार वन्हीचे स्फुलिंग उठतात व बुद्धीची परिणति होते. उदा० "चिनीबौद्धसाहित्यमें ऋषभदेव" (ले. नाकामुरा) "आदि तीर्थंकरकी प्राचीनता और उनके धर्मकी विशेषता" ( डॉ. हिरालाल जैन ), "श्रमण और ब्राह्मण संस्कृतिके उपास्य" ( रांका ) "मानवताके पहले शिक्षक" ( वीरेंद्र ); "ऋषभदेवका आध्यात्म दर्शन" ( श्रीप्रकाश हितैषी ), "हिंदु पुराणो मे ऋषभदेव" ( श्री. निवास वर्मा ) "स्याद्वादके आदिप्रवक्ता" ( राजेंद्रकुमार जैन ) वगैरे लेखांवरून या महाभागाची योग्यता पटण्यास मदत व्हावी. जैन धर्मांच्या मांडणीचें हें नवीन अद्यावत स्वरूप आजच्या काळांत

उपयोगी पडणारें आहे. वर्धमान महावीर व गौतमबुद्ध यांनी मानवतेला आवाहन करून मानवाचा दर्जा व त्याची महनीयता जगास पटवून दिली. नैतिक मूल्यांची विशेषता सिद्ध करून शीलप्रधान धर्मांची स्थापना केली व मानवजातीची अविभाज्यता व सत्य व अहिंसेची परमोच्चता विश्वाला पटवून दिली. ही गोष्ट आज सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट असतांना आम्ही या नररत्नांकडे डोळेझांक कां करतों! ती डोळेझांक करण्याची वृत्ति नाहींशी करण्याकरितां असले विशेषांक बाहेर पडले पाहिजेत! श्री संपादक यांनीं जे परिश्रम घेतले आहेत त्याचा पुरावा या अंकांवरून सहज मिळतो. आम्ही "अहिंसा वाणी"च्या या विशेषांकाचें स्वागत करतों.

(२) **धर्मदूत** (महाबोधि सभाका मासिक मुखपत्र) अंक १-२ मई-जून १९५७, **सारनाथ**

या जोड अंकाच्या आंत प्रवेश करतांच भगवान् बुद्धाच्या तिबेटच्या पद्धतीनें तयार केलेले चित्र मनास आनंदित करते. लेखापैकीं "प्रज्ञापारमिता" "बौद्ध उपासकों की साधना", "राहुलमाता का आदर्श", "स्तूपोंकी विशेषताएँ" "प्राचीन बौद्ध शिक्षाकेन्द्र", "महांकारुणिक तथागत", "बौद्ध धर्म और कला" हे लेख वाचनीय आहेत. भारतांत बौद्ध धर्माच्या प्रचाराचें वृत्त देतांना १ लाख लोक बौद्धधर्मीय झाले आहेत, असें वृत्त कथन केलें आहे. आगरा, झाड़गाँव, पुलगांव, डूअर्स (दार्जीलिंग) वगैरे ठिकाणीं मोठ्या संख्येनें बौद्धधर्माची स्वीकृती झाली आहे. भारतांतील या धर्मांतराची लाट ऐतिहासिक दृष्ट्या अत्यन्त महत्वाची आहे. तिची किंमत कमी करण्याचा प्रयत्न करणें म्हणजे मुद्दाम अज्ञान पांघरण्यासारखें आहे. अशा या लोकांसाठीं धर्मदूत मासिक फारच उपयोगी पडणारें आहे. त्यांतील लेख बुद्ध धर्माची माहिती सरळ व सोप्या हिंदी भाषेंत करून देऊं शकतात.

(३) **ऋषिजीवन** : अंक ६ वा (जून १९५७) श्री भगवान भजनाश्रम, वृंदावन.

या भक्तिप्रेमी मासिकाची बैठकच आकर्षक आहे. याची भाषा सोपी व सहज कळणारी आहे. भक्तीचें महत्त्व सांगतांना असें म्हटलें आहे—"भक्ति दुर्गुण और दोषों को दूर करनेमें रामबाण है!" यांतील 'भारतीय गृहिणीका क्या धर्म है' हा लेख विचारार्ह आहे. 'भगतिहीन मोहिं प्रिय नहिं सोऊ,' हा लेख वाचनीय आहे. हें मासिक प्रसन्नतेचें वातावरण निर्माण करते.

(४) **सत्संदेश** (सावन आश्रम) देहली, जून१९५७.

या मासिकांत श्री सन्त कृपालसिंहजी महाराजांचा उपदेश, त्यांनीं वचनें व पद्यें येतात. उदा. 'रामा हम दासन दास करीजे,' 'तज लाज अहंकार सब तजिये। मिल साधू संग रहीजे।' 'सब माया मोह विषम जग तरिये। सहजे हर रस पीजे।' वगैरे सुभाषित वाचतांना मनाला उत्साह येतो. लेखहि अनुरूप आहेत.

(५) **चुन्नू-मुन्नू** : जून१९५७, पाटणा.

या लहान मुलांना योग्य अशा मासिकांत सौंदर्य, सौकर्य, व सुव्यवस्था हें विशेष प्रामुख्यानें आढळतात. "भीम और हनुमान," "मृगदाव" "चन्द्रलोक की यात्रा" "अहंकार नहीं करो" हे लहान लेख लहानांकरितां उत्तम आहेत.

• • •

# " लेखकस्तत्र दुर्लभः "

"मराठी भाषेचें व्याकरण "– **सुबोध व्याकरण**–एक शतकापूर्वी लिहून कै. दादोबा पाण्डुरंग यांनीं महाराष्ट्रांत फार उच्चस्थान प्राप्त करून घेतलें, व मोठी सेवा केली. आतां दुसऱ्या एका अशाच लेखकाची फार जरूर भासत आहे. "शुद्ध कसें बोलावें व शुद्ध कसें लिहावें; हें शुद्ध कां व हें अशुद्ध कां हें व्याकरण शिकल्यानें समजतें," हें कै. दादोबांनीं सांगितलें. आतां त्यामुळें मराठी भाषा लिहणारे व बोलणारे आधुनिक लेखक व बोलक अधिक शुद्ध लिहूं अगर बोलूं लागले असें विधान करणें धाष्टर्याचें होईल; पण तो दोष दादोबांचा खास नव्हे. त्यांचें शिकवणें व्यर्थ नव्हतें, पण या गडबडीच्या व भाषांतरित मराठी लिहिणें व बोलणें भाग पाडणाऱ्या आँग्लभाषाधिरूढ कालांत व बेढब शब्द, अशुद्ध वाक्य-रचना, आणि अर्थनिरपेक्ष शब्दांस शब्द मानणाऱ्या वर्तमानपत्री युगांत, भाषाशुद्धि अथवा शब्दसौष्टव इत्यादिक शांतीच्या वेळीं सुचणाऱ्या गोष्टींकडे लोकांनी फारसें लक्ष दिलें नाहीं. स्वातन्त्र्य युद्धाचा हा काल होता. "प्रतिकार करा" हा संदेश निःसदिग्धपणें व्यक्त झाला म्हणजे झालें. आमच्या शाळेंतलें एक विनोदी मास्तर म्हणत त्याप्रमाणें "अस्माकं तु अर्थरि न तु शब्दरि तात्पर्यम्।" लोकमान्यांची मराठी भाषा म्हणजे आदर्श असें, असें मानल्यास हरकत नाहीं. काळकर्ते परांजपे यांची तर गोष्टच बोलावयास नको. हें जीवंत कार्यकर्ते होते व तेवढेच प्रभावी लेखकही होते. तात्यासाहेब केळकर, काकासाहेब खाडिलकर हेहि असेंच. परन्तु यानन्तरच्या युगांत कांहीं अपवाद सोडून दिले तर वर्तमानपत्रांत भाषेची बरीच गळेचेपी व ओढाताण झाली आहे. तो कांहीं व्याकरणकर्त्यांचा दोष नव्हे. पण ज्याप्रमाणें दादोबांनीं हें शुद्ध कां व हें अशुद्ध कां आणि शुद्ध कसें बोलावें व लिहावें हें शिकविण्यासाठीं पुस्तक लिहिलें, त्याचप्रमाणें आतां " सत्य कसें बोलावें व सत्य कसें लिहावें-**हें सत्य कां व हें असत्य कां** " हें लिहिणारा कोणीतरी लेखक जगापुढें आला पाहिजे. अर्थात त्याचें काम फार धोक्याचें आहे, ही सूचना आधींच देणें बरें. एका प्रख्यात तत्ववेत्त्यानें लिहिलें आहे—" जर तुम्ही व मी शुद्ध सत्य व केवळ सत्यच, पांच मिनिटें सांगितलें तर आपलें सर्व मित्र आपणास सोडून जातील; जर तसें सत्य दहा मिनिटेंपर्यंत सांगितलें तर आपल्याला देशाबाहेर हद्दपार करतील आणि जर पंधरा मिनिटें सांगितलें तर–मग ते आपल्याला फांसावर चढवितील. *

जर मी शीर्षकांत " लेखकस्तत्र दुर्लभः " असें म्हटलें व " लेखक पाहिजे " अशी Wanted सदरांत जाहिरातहि देण्याचा विचार मनांत आला, परंतु लेखक मिळण्याची फारशी आशा मला वाटत नाहीं. एक वेळ परोपदेशे पांडित्य किंवा परावलंबन न करतां स्वतःच हें काम आपण हातीं घ्यावें हा धाडसाचा विचारहि मनांत चमकून गेला. पण तो केवळ क्षणमात्रच! लगेच दुसऱ्याच क्षणीं मला कालिदासाचा श्लोक आठवलाः–

> आ जन्मनः **सत्य**मशिक्षितो य — ।
> स्तस्याप्रमाणं वचनं जनस्य ॥
> परातिसंधानमधीयते यै— ।
> र्विद्येति ते सन्तु किलाप्तवाचः ॥

शेजारी बसलेल्या माझ्या एका विद्वान संस्कृतज्ञांनीं मला सांगितलें कीं पहिल्या ओळींतला पाठ " आ जन्मनः शाठ्यमशिक्षितो यः " असा असून मी " शाठ्य "च्या ऐवजी " सत्य " शब्द चुकीनें वापरला. पण मला त्यांची दुरुस्ती आवडली नाही. कारण ते " शठं प्रति शाठ्यं, लठं प्रति लाठ्यं " या पंथाचे अनुयायी असल्याचें मला पक्के ठाऊक होतें. तेव्हां कोर्टकचेऱ्या व राजकारणाशी दूरचाहि संबंध आलेल्या मनुष्याचें हें काम नाहीं.–'तुका म्हणे तेथे पाहिजे जातीचें. लेचापेचाचे हें काम नाहीं.' प्राणाशी गांठ–या कामाला फार नीतिधैर्य पाहिजे. कुदळीला कुदळ म्हणणारा मनुष्य पाहिजे—कुदळीला " टकळी " म्हणणारा मनुष्य उपयोगी नाहीं.

इंग्रजी अंमलांत आपले लोक या स्पष्टवक्तेपणाच्या फंदांत फारसे पडत नसत. कारण कशावर गदा येईल याचा नेम नव्हता. स्वराज्य आल्या-नन्तर या गुणाचा बराच परिपोष झालेला आहे. राज्यकर्ते लोक, आपले जातभाई "अक्कलशून्य आहेत. हॅम्लेट आहेत–नीरो आहेत–त्यांना तुरुंगांत टाकलें पाहिजे" वगैरे पुष्कळसे धीटपणाचें आणि स्पष्टवक्ते-पणाचें उद्गार आतां घरोघरीं व रकानों रकानीं, कानीं व नजरेस पडतात. आतां असे लेखक पुढें येण्याचा अधिक संभव आहे. काम तसें धोक्याचें नी अवघड म्हटलें तर आहे, म्हटलें तर नाहीं–पण शेवटीं खरें–सत्य, म्हणजे काय? मन आणि वाणी यांचें ऐक्य–" वाङ्मनसयोर्यथार्थता " मनांत येते तें ओंठावर अगर लेखणीवर आणायचें एवढेंच कीं नाहीं? माझी वाणी बदलण्याची व सत्य सांगण्याची सुरुवात मी करून पाहिली; पण लगेच मला माझें मनच बदललें पाहिजे असा निर्णय करावा लागला. म्हणूनच कां रामदासांनीं म्हटलें, " पतित पावना जानकी जीवना। वेगीं माझ्या मना पालटावें।। " कांहीं असो, लेखक पाहिजे! लेखकस्तत्र दुर्लभः।

**अखेर**

---

* "This man From Lebanon," by Miss Barbara Young (लेबनॉनमधील हा माणूस, कुमारी बारबारा यंग कृत.)

# श्री तुकाराम विश्वविद्यालय संघ, पुरवणी

ह्या महिन्यांत देणगीदारांचीं सभासदपत्रकें भरून घेण्याचें काम सुरू झालें. देणगीदारांचा एकच वर्ग असल्यामुळें या देणगीची जबाबदारी एका वर्षापुरतीच आहे. फक्त नवीन घटनेप्रमाणें जो देणगीदार रु. २५ किंवा जास्त रुपयांची देणगी देईल त्याला संघाचे 'कायम देणगीदार' समजण्यांत येईल. आतांपर्यंत नवीन वर्गाप्रमाणें २५ देणगीदार नोंदले गेले आहेत.

× × ×

संघानें नेमलेल्या घटनासमितीची व विश्वस्त संस्थेची सर्वसाधारण सभा रविवार, ३० जून रोजीं भरली होती. त्यावेळीं घटनासमितीनें सर्व घटना व मंजूर झालेल्या सर्व सुधारणा यांसह संपूर्ण घटना अन्तिमस्वरूपांत मंजूर केली. व मागील तारेखस तहकूब होऊन आज भरलेल्या सर्वसाधारण सभेपुढें आपल्या शिफारसीसह ठेवून सर्वसाधारण सभेनें ती सर्वानुमतें मंजूर करून त्याप्रमाणें संस्थेचा कारभार चालावा, असा ठराव केला. ह्या घटनेची एक प्रत चॅरिटी कमिशनरकडे पाठविण्याचें ठरलें. नवीन घटनेनुसार पदाधिकारी नेमण्यासाठीं तहकूब झालेल्या सर्वसाधारण सभेची बैठक, रविवार, तारीख २८ जुलै रोजी धर्मचक्र कार्यालयांत भरणार आहे. सभेची वेळ सायंकाळीं ६ वाजतां ठरविली आहे. सभेचे अध्यक्ष, उपाध्यक्ष, सन्माननीय खजिनदार, सन्माननीय चिटणीस व इतर सभासद यांची त्यावेळीं नेमणूक होणार आहे. ज्यानीं अद्यावत आपली वर्गणी (जुन्या वर्गवारीप्रमाणें) किंवा देणगी (नवीन घटनेप्रमाणें) दिली असेल त्यांनीं अवश्य उपस्थित रहावें, अशी विनंति आहे.

× × ×

देणगीदाराचे माहितीसाठीं संघाचें उद्देश व हेतु खालील दिले आहेतः-

## श्री तुकाराम विश्वविद्यालय संघ, बृहन् मुंबई.

## उद्देश व हेतु

१. श्री तुकाराम महाराजांच्या अभंगवाणीचा **सर्वांगीण व व्यापक दृष्टीनें** अभ्यास करून त्यांत संशोधन करून त्या **वाणीचा** सर्वत्र प्रसार करणें.

२. श्री तुकाराम महाराजांच्या अभंगांच्या संक्षिप्त आवृत्त्या छापविणें व साहित्य व त्यांतील संस्कृति यांच्या अध्ययनास चालना देणें. हें कार्य मराठीच्या अभ्यासकांत, पण मुख्यतः सामान्य माणसांत, सुरू ठेऊन त्या द्वारें त्यांच्या नैतिक, आर्थिक आणि सांस्कृतिक जीवनांत सुधारणा करावी. परमार्थतः संतमहाराजांची उदात्त शिकवण माणसाच्या कृतींत शक्यतों उतरविण्याचा प्रामाणिकपणें प्रयत्न करावयाचा व त्यांच्याकडून करवून घ्यावयाचा.

३. सर्व मनोभूमिकांच्या व वृत्तींच्या, सर्व दृष्टिकोणांच्या व विशिष्ट सांप्रदायिक संस्कृतीच्या बंधुभगिनींच्यासाठीं **जागतिक व सर्वसंग्राहक धर्माची बैठक निर्माण करणें.** तसेंच सन्तमहाराजांनीं मानवतावादी आणि सर्वभूतहितानुकंपी जो संदेश दिला आहे त्याचा प्रसार करणें, रोजच्या मानवहितसंबंधांत व व्यवहारांत **हिंसा व वैर** यांची संपूर्ण वैय्यर्थ्यता व विफलता दाखवून **अहिंसा** व **प्रेम** यांचें सामर्थ्य सिद्ध करून देणें.

४. सर्व तरुण व उच्छृंखल वृत्तींच्या लोकांना उपकारक व वरील उद्देशास अनुरूप शिक्षण देऊन त्यांच्या मार्फत संघाचे हेतु साध्य करून घेणें व त्यांचा सर्वत्र प्रसार करणें.

५. भारतीय व अन्य देशीय व धर्मीय **सन्तरत्नांची** चरित्र सामग्री एकत्रित करणें, त्यांच्यावरील उपलब्ध वाङ्मय जमा करणें, व त्या मार्फत तुलनात्मक अभ्यासाचा पायंडा पाडणें. या कार्याच्या सफलतेसाठीं **"सन्तसमागम"** नांवाचें **एक** विस्तृत **चरित्रग्रंथालय** (Library) तळेगांव दाभाडे (जिल्हा पुणें) येथें स्थापन करून अध्यात्मशास्त्र व सन्तमानस-शास्त्र यांच्या संशोधनासाठीं साधनसामुग्री तेथें सांठविणें, तें स्थळ सर्व धर्मीय सन्तांचें जेणेंकरून **पावनक्षेत्र** होईल, असें वातावरण उत्पन्न करणें.

६. त्याशिवाय अन्य समाजहितवर्धक व जेणेंकरून संघाचे हेतु व उद्देश फलद्रूप होण्यास मदत होईल किंवा जें जें करणें आवश्यक वाटेल अशा सर्व गोष्टी करणें.

वरील उद्देश व हेतु मान्य होऊन ज्यांना देणगीदार व्हावयाचें असेल त्यांनीं ताबडतोब "धर्मचक्र कार्यालयाचें" पत्यावर, संचालक श्री. तु. वि. संघ, बृहन्मुंबई यांना लिहावें. देणगीची रक्कम १ रुपयापासून १००० रुपयापर्यंत आहे.

× × ×

या महिन्यांत पांडुरंगाच्या पांडुरंगपुराला लक्षावधी पारकरी (वारकरी) यांचा मेळावा आषाढ शु॥ एकादशीच्या निमित्तानें जमला होता व त्यावेळीं पांडुरंगाचें दर्शन सर्वांनीं घेऊन आपली जीवनयात्रा सुखानें जावी अशी प्रार्थना केली. पांडुरंग व पांडुरंगपुर हीं मूळचीं नांवें असून पांडुरंग हा काञ्चनवर्णसन्निभः (गौरांग) आहे, अशी कित्येक शतकापासून जगाची निष्ठा व श्रद्धा आहे. **वारकरी** या शब्दाला आज जो संकुचित अर्थ आला आहे, त्यावरहि संशोधन झालें पाहिजे. वारकरी हा सांप्रदाय-निरपेक्ष असून, त्याचा उद्देश म्हणजे पंढरपुराला वारी करणें, एकादशी व्रत करणें, बुका लावणें, भजन करणें; निशाण घेऊन पंढरपुरचा "वारकरी" होणें एवढाच खास नाहीं. अगोदर **"वारकरी"** यावर शब्दशास्त्र दृष्ट्याविचार केल्यास असा अर्थ होतो कीं जो **"पारकरी"** (पारं गमयति; पारं करोति) म्हणजे संसाररूपी सागराच्या पार नेऊन सोडतो तो वारकरी. या पारकऱ्यानीं जनतेस (बहुजनसमाजाला) नीतिप्रधान, भक्तिप्रधान, विश्वबंधुत्वप्रधान असा सत्य, अहिंसा व, प्रेम,

(पान १७ वर)

# " इस जन्म के पूज्य और उस जन्म के प्राप्य "

[ लेखिका :—सुधि ]

रेखा अपने स्वाध्याय-मन्दिर में आरामकुर्सी पर बैठी प्रसादकृत 'स्कन्दगुप्त' नाटक पढ़ रही थी। देवसेना के लोकोत्तर चरित्र से उसका हृदय अभिभूत हुआ जा रहा था। अन्तिम दृश्य था। स्कन्दगुप्त ने अपने समस्त विरोधियों को परास्त कर दिया था। विजयश्री ने उस का वरण किया था। किंतु यह क्या? समस्तराज़्य को जीत लेने के बाद और समस्त शत्रुओं को पराजित करने के बाद भी उसने वह राज्य अपने छोटे भाई को दे दिया। उसे ऐसा लगता था कि अधिकारसुख नरक और सारहीन है। महान् त्याग था। यह और देवसेना उसके चरणों पर विनत थी—'तुम मेरे इस जन्म के पूज्य और उस जन्म के प्राप्य हो।'

रेखा तन्मय थी। ठीक इसी समय दरवाजे की आवाहन-घंटी घनघना उठी। चिट्ठी रसा के हाथ से कई पत्र लिये घर का नौकर भीतर आया। वह पत्र मेजपर रखकर चला गया।

अन्यस्क एक भाव से पत्रों को उलटते पुलटते एक लिफाफे के पते को देखकर वह रुक गयी। लिपि परिचित थी। पत्र सुधा का था। पढने पर मालूम हुआ कि गर्मी की छुट्टियाँ विताने वह पहाड पर गयी हुई थी और अब वह सपरिवार लौट रही है। रेखा के यहाँ कुछ दिनों तक रुकेगी। पत्र में मसूरी के प्राकृतिक दृश्य का बडा ही भव्य चित्र खींचा गया था। ऊँचे ऊँचे वृक्ष झाडियाँ, गहरी घाटियाँ, फलफूलों से लदी हरी वादियाँ पहाड, झरने, सुबह का स्वर्णिम बर्फानीं प्रदेश दोपहर को चाँदी ही चाँदी, शाम को पुनः सोना ही सोना। एक विशेष हर्ष की बात भी लिखी हुई थी कि सुधा अब सुधाकर की माँ भी बन गई है। सुधाकर का जन्म हुए लगभग डेढ़ माह बीत रहे हैं।

पत्र पढ़ते-पढ़ते उसकी आँखों में अतीत की सारी बातें तैर गईं।

सुधा और रेखा दोनों बचपन की सहेलियाँ थीं। एक ही साथ बढ़ी थीं। सुधा कालेजमें रेखा से एक साल पहले प्रविष्ट हुई थी। कॉलेज में जिस दिन आई तो भौचक्की सी रह गयी। तीन दिनों तक उसे पता न चला कि पढ़ने के रूम किधर हैं। वह इधर से उधर भटकती फिरीं। चौथे दिन बी. ए. के एक छात्र के साथ वह कलास में गयी। उस विद्यार्थी ने पढ़ाई लिखाई, और कोर्स आदि के विषय में उसे बहुत कुछ बताया, क्षणिक परिचय ने धीरे-धीरे साहचर्य का रूप धारण किया। वे कभी-कभी स्टेशन तक साथ-साथ जाते। एक दूसरे की किताब ...त्र से सहायता करते। सुधीर अपनी कक्षा का सर्वोत्तम छात्र था। ... आड़ में उन दोनों की बातें करते। दोएक विद्यार्थियों को छोड़कर ... सभी की दृष्टि में सुधा और सुधीर पवित्र आदर्श के प्रतीक थे। ...र वर्ष रेखा भी उसी कॉलेज में आई। एक दिन चाय पर सुधाने ...और सुधीर का परस्पर परिचय कराया। 'मीट माई फ्रेन्ड सुधीर, ...स्टुडेन्ट आफ् द ईयर।' रेखा ने हाथ जोड़ते हुए अपना ...परिचय हिन्दी में दिया।

कॉलेज में सुधीर की यशकीर्ति सुनकर सभी उसके प्रति आदर और प्रेम का भाव रखते थे। रेखा से सुधीर प्रायः मिल जाया करता था। कभी रस्ते में, कभी पुस्तकालय में, कभी कलास में, कभी अन्यत्र। सुधीर लजालु प्रकृति का आदमी था। किन्तु दोनों एक दूसरे के प्रति स्नेह रखते थे। कई बार रेखा ने सुधीर को अपने घर चाय के लिए बुलाया। घंटो तक दोनों बातचीत करते रहते। रेखा के पिता उन दोनों को बातचीत से प्रसन्न होते।

उस दिन रेखा सुधा के यहाँ पूर्वसूचना के बिना ही चली गयी। सुधा अपनी प्रिय सहेली को पाकर फूली न समायी। चाय की प्याली देते हुए सुधा ने मजाक में ही कहा—

" रेखा, तू तो अब सयानी हो गयी, शादी के लायक। "

चाय की प्याली मुँह से हटाते हुए लजाई-सी रेखा ने उत्तर दिया—'तुझे तो मजाक ही सूझती है। तू पहले अपनी फिकर कर, मेरे लिए क्यों मरी जाती है?'

" मैनें तो......सुधीर। "

और रेखा खिलखिलाकर हँस पड़ी। परन्तु सुधा को लगी कि रेखा की हँसी करुणा बरसा रही है।

सुधा से विदा लेकर वह घर की ओर चली। दोनों के घरों की दूरी केवल दस मिनिट की थी।

उस दिन वह कुछ विक्षिप्त-सी थी। उसे लगा कि आज शहर का नकशा ही बदल गया। ऐसा लगा, मानो इस सड़क पर कभी-आई ही नहीं। रिक्शेवाले ने पूछा,-" सा'ब, चौक चलना है क्या? "

रेखा ने क्रोध से आंखे तरेर ली। अतीत की रसमीनी स्मृतियों में विभोर रेखा को याद आए सुधीर के साथ विताए गये सुनहले दिन। उस दिन सिनेमा हाल में सुधीर ने उसका हाथ अपने हाथों में लेकर कहा था— रेखा, तुम्हें मैंने अपना सब कुछ दिया, किन्तु मैं आज भी भिखारी हूँ। तुम्हांरा हृदय पाकर संसार का सबसे बड़ा धनी हो जाऊँगा। उसको ऐसा लगा कि आकाश ने धरती पर सारे रत्न वार दिये थे। धरा गद्गद् हो उठी। उसकी जन्मजन्म की साध उस दिन पूरी हुई। स्नेहाश्रुओं से डबडबाई आखों से रेखा ने क्षितिज की और देखा। धरती और आकाश एक दूसरे से मिल रहे थे।...

काफी रात गये जब वह घर लौटी तो उस रात उसे नींद नहीं आई, उसने सोचा कि सुधीर और सुधा एक दूसरे के लिए सर्वथा उपयुक्त हैं। सुधीर अपने पिता का इकलौता पुत्र है। वे राय साहब हैं। उसका भविष्य उज्ज्वल है। सुधा भी धनी माँ-बाप की लाडली बेटी है। पढी-लिखी भी है। धनी परिवार की लडकियाँ धनी घरानों में ही ठीक तरह से रह सकती हैं।

कालेज बन्द होने में चार दिन शेष रह गये थे। सुधा की तबियत

खराब थी, इसलिए वह कालेज नहीं जा सकती थी। अतः रेखा को अकेले ही कॉलेज जाना पड़ता था। सुधीर सुधा को कितना चाहता था, यह बात रेखा से छिपी नहीं थी। उसे विश्वास था कि सुधीर सुधा से अभिन्न है। सुधा की अनुपस्थिति में उसने सुधीर के मन की बात जान लेना अच्छा समझा।

"सुधीर, तुमने बी० ए० की परीक्षा दे ही दी। तुम्हारी माँ कह रही थी कि इस साल सुधीर की शादी हो जायगी। सो हमें शादी की दावत कब मिल रही है।"

"आज तुम्हें यह बात कैसे सूझी? क्या मेरे लिए कोई लड़की देख रखी है, कौन है वह लड़की, जरा मैं भी सुनूं।"

"हाँ देख तो रखी है। पर पहले तुम यह बताओ कि तुम्हें कैसी लड़की चाहिए?"

सुधीर ने रेखा को कनखियों से देखा और अन्यमनस्क भाव से कहा—

"भई, हमने तो अपने लिए लड़की ढूँढ़ ली है। इसके लिए अब तुम्हें चिन्ता नहीं करनी चाहिए।"

रेखा को अब विश्वास हो गया कि वह लड़की सुधा ही है।

"अच्छा नाम तो बताओ आखिर वह है कौन?"

सुधीर ने नाम बताने में आनाकानी की। रेखा उसे सहज में ही क्यों छोड़ी देती? आखिर सुधा का आग्रह देखकर सुधीर ने कहा—"दोही तो अक्षर हैं, तुम अपने हृदय से पूछो कि वह नाम क्या हो सकता है?"

अब रेखा को दृढ निश्चय हो गया कि वह नाम 'सुधा' का ही है। लेकिन वह उसको सुधीर के ही मुँह से सुनना चाहती थी। सुधीर ने भी मुँह से न कहकर कागज पर लिख दिया। रेखा ने समुत्सुक भाव से उसको पढा। वह सन्न रह गयी। सर घूम गया। उसे अपनी आँखो पर विश्वास न हुआ। उसे लगा, जैसे वह आकाश से धरती पर गिर गयी हो। इस आकस्मिक परिवर्तन से सुधीर एकदम घबरा उठा। पूछा "रेखा, तुम्हें एकाएक क्या हो गया?" एक क्षण के लिए उसे ऐसा लगा कि वह संसार की सबसे बड़ी भाग्यवान् लडकी है। बारबार वह कागज के टुकडे को ही देखती रही। जाते समय उसने कहा—

"सुधीर, तुम भटक गये हो।"

सुधीर ने सपने में भी ऐसा नहीं सोचा था। किंकर्तव्यविमूढ़ की तरह जाती हुई रेखा को देखता ही रहा। बार-बार वह अपने प्रस्ताव पर विचारने लगा। अनेक प्रश्न उसके सम्मुख थे। रेखा को मेरा प्रस्ताव पसन्द क्यों नहीं आया? मैंने उससे क्या अनुचित कह दिया?

कई दिनों तक रेखा स्वयं को संयत करने की चेष्टा करती रही। सुधा का अभाव और सुधीर के भाव ने उसे विचलित कर दिए थे। उसने सुधीर को पत्र द्वारा वास्तविकता से अवगत कराना चाहा। पत्र इस प्रकार था:—

प्रिय सुधीर,

आज बहुत सोचने के बाद तुम्हे पत्र लिखकर वास्तविकता से अवगत कराने जा रही हूँ। सुधा मेरी बड़ी बहन है। वह तुम्हारे लिए सर्वथा उपयुक्त है। मैं नहीं चाहती कि उसकी खुशियों का स्वर्ग छीनकर उसे नरक की ओर ढकेल दूँ। तुम्हारे प्रति मेरे हृदय में स्नेह है, प्रेम है, और है श्रद्धा। सच्चे प्रेम के लिए मनुष्य को बलिदान करना पड़ता है। यदि तुम जन्म-जन्म के लिए रेखा का प्रेम प्राप्त करना चाहते हो, तो तुम्हें वासना से ऊपर उठना पड़ेगा। त्याग और बलिदान का जीवन व्यतीत करना पड़ेगा।

तुम्हें यह जानकर हर्ष होगा कि मैंनें अपना कर्त्तव्य-पथ निर्धारित कर लिया है। पिताजी और सुधा के पिताजी-दोनोंनें मेरी बात मान ली है। मैं आगामी जुलाई से 'अखिल भारतीय महिला-विद्यापीठ' की स्थापना करने जा रही हूँ। यह अपने ढंग की भारतवर्ष में एक निराली संस्था होगी। सुधा के पिताने पाँच लाख रुपये देने का वचन दिया है। पिताजीने भी सारी सम्पत्ति उसके लिए दान में दे दी है। सुधा के माँ और बाप तुमसे उसकी शादी करने के लिए राजी हैं। रेखा सदैव तुम्हारे जीवनकी रेखा रहेगी और रहेगीं विद्यापीठ के लिए। ऐसा करके वह सुधा और सुधीर दोनोंके प्रति अपने कर्त्तव्यका पालन करेगी। मुझे विश्वास है कि त्याग, बलिदान और प्रेम की ही विजय होती है।

तुम्हारी ही-
रेखा।

और बहुत देरतक स्कन्दगुप्तके चरणोंमें झुकी हुई देवसेनाका रूप रूप उसकी आखोंके सामने झूलता रहा। • • •

# मैथिल कोकिल विद्यापति

( लेखिका—सुश्री कृष्णा टंडन )

'घर का जोगी जोगड़ा, आन गाँव का सिद्ध'वाली कहावत विद्यापति पर पूर्ण रूप से चरितार्थ होती है। इनका मान अपने ही घर मिथिला में नहीं हुआ परंतु बंग प्रदेश वालों ने इन्हें अपनाकर उनकी ख्याति को आगे बढ़ाया और उन को अपना आदि कवि घोषित कर गौरवान्वित होते रहे। परंतु, कब तक हिंदी प्रदेश और मिथिलावासी अपने इस घर के जोगी को भुलाते, जब 'जोगी' की ख्याति दूर दूर फैलने लगी, और अन्य लोग उस पर अपना स्वत्व जताने लगे, तब इन्हें भी अपने भुलाय गए जोगी का ध्यान आया, और फिर उसे प्राप्त करने के लिये कोई भी प्रयत्न उठा न रखा।

विद्यापति को बंगला का आदि कवि तो कब से घोषित किया जा रहा था। परंतु डॉ. ग्रियर्सन ने सर्व प्रथम उन्हें मैथिल कवि बताया और उसके पश्चात् अनेक वाग्वितण्डावाद होते रहे इन्हें हिंदी, मैथिली और बंगला का कवि मानने के लिए यह सब वाग्युद्ध आदि विद्वानों का संघर्ष ठीक भी था। क्योंकि कौन व्यक्ति ऐसा है, जो मिले हुए धन को, जिसे वह अपना समझ चुका है, प्रसन्नता से तथा स्वेच्छा से उसके असली मालिक को दे देता है। अस्तु०।

कविराज शेखर, अभिनव जयदेव, कवि कंठहार आदि उपाधियों से सुशोभित मैथिलकोकिल विद्यापति ही एक ऐसे कवि हैं, जिनका तीन तीन प्रांतों में समान रूप से आदर होता है, और तीनों ही प्रांत उन्हें अपनाने में अपना गौरव समझते हैं। परन्तु खेद की बात है कि जन-जीवन को प्रकाशित करने वाले इस कवि के जीवन पर प्रकाश डालने वाली विशेष सामग्री उपलब्ध नहीं है। इनका परिचय, इनका जीवन, इनकी कृतियों में यत्र तत्र बिखरा है, जिसके आधार पर प्रमाणित रूपरेखा तैयार करने का प्रयत्न किया जाता है जो कि संशयरहित नहीं कही जा सकती फिर भी क्योंकि यह जीवन भर राज्याश्रित रहे थे इसलिए इनका जीवनवृत्त हिंदी तथा संस्कृत के अन्य कवियों की अपेक्षा अधिक प्रामाणिक है। कुछ प्राप्त प्रमाणों के अनुसार इनका जन्म मिथिला प्रांत के बिशपी ग्राम में वि. १४०७ में हुआ था। शताब्दियोंसे ही देवी सरस्वती का वरद हस्त इनके पूर्वजों पर रहा था, और उनके नाम संस्कृत साहित्य के अन्तर्गत आते हैं। बाल्यावस्था से ही मेधावी विद्यापति ने हरिमिश्र से शिक्षा प्राप्त की थी और यह अपने, पिता गणपति के साथ गणेश्वर के दरबार में जाया करते थे। शिक्षा समाप्त करने के पश्चात् यह कीर्तिसिंह के दरबार में जाने लगे और तभी अपने आश्रयदाता राजा के लिए इन्होने अपनी सर्वप्रथम रचनाएं—कीर्तिलता और कीर्तिपताका—की, जो कि 'अवहट्ठ' भाषा में लिखी गई थीं।

विद्यापति दीर्घायु थे इसलिए एक ही वंश की चार पीढ़ियों के यह आश्रित रहे परंतु सर्वाधिक सम्मान इन्हें राजा शिवसिंह के समय में प्राप्त हुआ था और अपनी पदावली में राजा शिवसिंह और रानी लखिमा का नाम कई बार लिया है। इस रसिक दम्पति की विद्यापति पर कृपादृष्टि थी और वे इन्हें पग पग पर प्रोत्साहित करते रहते थे। विद्यापति शिवसिंह के दरबारी कवि ही नहीं थे, वे उनके अंतरंग मित्रोंमें से थे, इस लिए जब शिवसिंह स्वर्ग सिधार गए तब अपने अभिन्न मित्रकी मृत्युके कारण उनका मन संसारकी ओरसे निराश हो गया और तब उनकी प्रवृत्ति शृंगार रससे विमुख हो भक्ति की ओर गई और इन्होंने शिवकी नचारियां, दुर्गा आदिकी स्तुतियां लिख अपने निराश मनको शांतिप्रदान करनेका प्रयत्न किया।

जीवनके अंतिम वर्षोंमें कविकी संसारके प्रति अरुचि, जिसका बीज शिवसिंह के स्वर्गवास पर पड़ गया था, और बढ़ गई और संसारको सब कुछ समझने वाला कवि जो कि उसके प्रत्येक अंगको भोग्य मानता था अब जनताके सम्मुख अपने दार्शनिक विचार प्रकट करने लग गया। यथा—

जतन जतेक धन पाप बटोरल मिलि मिलि परिजन खाय।
मरक बेरि हरि कोई न पूछय करमसंग चलि जाय॥
तथा—तोहें सेवइत जन्म बहल तै ओन अपना मेला।

संसार से विरक्त होने के पश्चात् कवि शिव की नचारी और कृष्ण का यशगान करते हुए अपना जीवन बिताने लगा, और अंत में भगवान का गुणगान करते हुए वि. स. १४९७ में कार्तिक शुक्ल त्रयोदशी को इन्होंने अपनी इहलीला समाप्त की।

विद्यापति ने शास्त्राध्ययन तो किया था परंतु शास्त्रों से इनका संबंध उतना ही था, जितने की राजदरबार में आवश्यकता होती है। इनकी बुद्धि अत्यंत कुशाग्र थी। संस्कृत में धर्म तथा नीति विषयक ग्रंथ रचना करने के पश्चात् इनका ध्यान मातृभाषा की ओर आकृष्ट हुआ और अवहट्ठ की भांति अब यह देसिल बअना में कविता करने लगे।

'देसिल बअना सब जन मिट्ठा
तैं तैसन जंपओं अवहट्टा'।

इनकी अयहट्ट में संस्कृत का सुंदर समावेश है। कीर्तिलता और कीर्तिपताका की अवहट्ठ में रचना की थी, परंतु यह देसिल बअना की तरह आहत नहीं थी, फलस्वरूप इन्होंने मैथिली में रचनाएं की और समय समय पर मिथिला के राजाओं द्वारा सम्मानित और प्रोत्साहित होते रहे। अपनी कविता के विषय में इन्होंने लिखा है।

सुजाता सिद्धार्थाला पायस (दुधाची खीर) अर्पण करीत आहे हें चित्र फारच लोभनीय आहे. बोधिवृक्षाबद्दल जगांतील लोकांना जो आदर वाटतो त्याची उपपत्ति दिली आहे. धर्मपदांतील मौलिक विचार फारच मूल्यवान आहेत. जातकाची एखादी एखादी कविता, प्रचलित बौद्धहितविषयक प्रश्नाची चर्चा कथा, व मतप्रदर्शन अशी या पत्राची मांडणी आहे. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या जीवनाचें दर्शनहि मधूनमधून होत असतें. एकंदरींत "बोधिसत्वा" सारखी नियतकालिकें जितकीं निघतील तितकीं हवीं आहेत. मात्र त्यांचा उद्देश्य सामाजिक कटुता उत्पन्न करण्याचा असतां कामा नये. दोन समाजांतील समजुतदारपणा व एकमेकांचा दृष्टिकोण समजून घेण्याची सदिच्छा या दोन गोष्टी आज हव्या आहेत व या दृष्टीनेंच आम्ही संपादक यांचें अभिनन्दन करतों व त्यांना त्यांच्या अंगीकृत कार्यांत सुयश इच्छितों.

**(८) धर्मयान** : मुंबई ऑगस्ट १९५७.

या अंकांत संपादकांनीं विषय वैचित्र्य साधलें आहे. "आनंदा" च्या चरित्रांतून व्यक्तिदर्शन उत्तम झालें आहे. जातककथा, राजा मिलिन्दाचे प्रश्न, " हे लेख वाचनीय आहेत अष्ठ सालिनींत "स्त्री"चें चित्र, "बुद्ध आणि जातिसंस्था" हे स्फुट लेख उद्बोधक आहेत. यांत मधून मधून सुभाषितें किंवा 'मौलिक विचार' असे घातल्यानें त्याची उपयुक्तता वाढेल. मधून मधून योग्य पद्यें द्यावींत; म्हणजे कलावंतांना तीं म्हणतां येऊन जनतेचें मनरंजन करतां येईल.

## (२) हिंदी विभाग.

**(१) कल्पवृक्ष : उज्जैन-जुलाई १९५७.**

अध्यात्मविद्येच्या या हिंदी मासिकांत निरनिराळे विषय सोप्या हिंदींत विद्वानांनीं विशद करून दाखविले आहेत. "आत्मस्थिति की भावना" हें स्वर्णसूत्र नितांत सुंदर आहे. "सत्य, ईश्वर, प्रेम, स्वर्ग, पूर्णता सब कुछ यहीं है जहाँ मैं हूँ। मैं अपने व्यवहार में इन्हें साक्षात कर रहा हूँ।" हें वाक्य कोणत्या पांथस्थाला दीपाप्रमाणें होणार नाहीं ? "महान् बनने के सूत्र" यांत १४ सूत्रें दिलीं आहेत तीं सर्वांनाच उपकारक होतील. "मत्सर," "गुरु का परमतत्व" "स्वास्थ्य-अध्यात्म समाचार," "गीता का सन्देश" "यशोधरा की भेट" वगैरे साहित्य मधुर व समाधान उत्पन्न करणारें आहे.

**(२) सत्संदेश**—सावनाश्रम—दिल्ली, ऑगस्ट १९५७ "प्रारंभिक प्रवचनां" त "जिन्दगी (जीवन) क्या है ?" यावरील विचार आदरणीय आहेत. "वचन सत्संदेश" यांत, मॅडॅम ब्लाव्हाटस्कीच्या जीवनांतील एक गोष्ट सांगितलेली आहे. त्या लाहोरांत असतांना एक प्राध्यापक त्यांना भेटावयास गेले व ते त्यांना म्हणाले—बाईसाहेब, आपण जें सांगतां तें सर्व दन्तकथा होय. "छपरांतून फुलें पडलीं," असें कधीं होणार आहे कां ? "त्यावर त्यांनीं चमत्कारासंबंधी आपलें मत सांगितलें. सृष्टीचे असे कांहीं गुप्त नियम आहेत कीं आजपर्यंत त्यांची आम्हांस कल्पनाहि नाहीं. पण असे नियम आहेत. ते ज्याला ज्ञात झाले त्याचे हातून कार्य निर्माण होतेंच ! तो चमत्कार अज्ञात कारणाचें फळ होय !" कविताहि वाचनीय आहेत. वाचनानें मनाला उल्हास येतो.

**(३) ऋषी-जीवन**—ऑगस्ट १९५७

यांत निरनिराळ्या विषयांवर सोप्या भाषेंत विवरण आहे. "भाग्यवाद और कर्मवाद" यांत भाग्य हें कर्मावर अवलंबून आहे कीं स्वतंत्र आहे हा प्रश्न उपस्थित करून "अतः नियति और कर्म दोनो के मिलाने से जो रंग होगा वह आनंददायक होगा। कर्म और भाग्य का सुंदर समन्वय आवश्यक है।" ही फलश्रुति सर्वांनाच आवडणारी आहे. "पूजा की लगन" या लेखाचा शेवट यांत आहे. 'वाणी महत्त्व' यांत वाणीचें महात्म्य वर्णिलेलें आहे. संतांची वाणी धन्य आहे असें दाखवून सूरजचंदाचे उद्गार दिलेले आहेत. तो म्हणतो—

> "जय कल्याणी 'जय सुखदानी'
> जय संतों की निर्मल वाणी।
> क्रोध, लोभ, छल, मानमर्दिनी,
> शाश्वत सुखदायिनि निर्वाणी"

हें वाणीचें वर्णन कोणास सन्तोष देणार नाहीं !

**(४) गुरुकुल-पत्रिका**—कांगडी-जुलै १९५७

यांत विचारपूर्ण लेख येतात. लोकमान्यांची स्तुति चार संस्कृत पद्यांत आली आहे. त्यांच्या 'स्वातंत्र्य हा माझा जन्म सिद्ध हक्क आहे' याचें संस्कृत रूपांतर असें केले आहे :--

> "स्वातंत्र्यमस्ति सहजो मनुजाधिकारः
> तल्लप्स्यते खलु मयेति जुघोष वीरः।
> सेहे तदर्थमिह भीषणयातना यः
> तं लोकमान्यतिलकं विनयेन नौमि ॥

"हम अपने राष्ट्रको कैसे सुंदर बनाये" या लेखांत माझ्यावर राष्ट्राचें ऋण आहे, असा आरंभ केला आहे, साधु महात्म्याचें कर्तव्य, ब्राह्मणमहोदयांचें कर्तव्य, राष्ट्राच्या सरकारचें कर्तव्य, राष्ट्रासंबंधी करावयाचें अध्यापकांचें कर्तव्य, भारतासंबंधानें नवयुवकाचें कर्तव्य यांची जाणीव करून दिली आहे. "ब्रह्मचर्य और दीर्घायु" "विद्यार्थी और सदाचार," "प्राचीन भारत शिक्षण पद्धति," वगैरे लेख वाचनीय आहेत.

**(५) धर्मदूत** : (महाबोधि सभा का मासिक मुखपत्र) अगस्त १९५७.

यांत "बोधिसत्व" ध्येयाचें स्वरूप दाखवून या बोधिसत्वांत प्रज्ञा और महाकरुणा का समन्वय झाला असतो असें दाखविले आहे. महायनाचे विशेष दाखविले आहेत. बोधिसत्व हा आपल्या साधनेचें सर्व फळ सर्व प्राण्यांच्या दुःख हरणाकडे लावून देतो तो म्हणतो—

> एवं सर्वमिदं कृत्वा यन्मया ऽ ऽ सादितं शुभम्।
> तेनस्यां सर्वसत्वानां सर्वदुःखप्रशान्तिकृत् ॥

या उदार व व्यापक ध्येयामुळेंच भगवान् बुद्धाचा धर्म जगतीतलावर पसरला. दुसरा महत्त्वाचा लेख म्हणजे—"सन्तो के जीवन दर्शनमें बाद्ध दर्शनके अवशेष" हा फारच उद्बोधक लेख आहे. सन्तांच्या द्वारा भगवान् बुद्धाच्या सामाजिक एकतेचा संदेश प्रसृत झाला ! "बुद्धं सरणं गच्छामि" हें रोडियोरूपक फारच आकर्षणीय आहे. "स्तूपपरंपरा का अध्ययन" याचें महत्त्व ऐतिहासिकदृष्ट्या मोठें आहे. हें मासिक आम्ही नवबुद्धधर्मीयांच्या विशेष नजरेस आणूं इच्छितों. त्यांनीं या मासिकाचे वर्गणीदार होऊन दर महिन्यास त्यांतील लेख वाचावेत व धर्माप्रमाणें आचरण करण्यास शिकावें.

• • •

# संस्कृताचें अध्ययन आणि अंजीर

अंजीर कुणाला आवडत नाहींत असें नाहीं-बहुतेकांनां आवडतात. पण हें खरें कीं इंग्रजी भाषेंत अंजीराबद्दल तुच्छतादर्शक शब्दप्रयोग रूढ आहे. I care a fig for your opinion-("तुमच्या अभिप्रायाबद्दल मला अंजीराइतकी पर्वा आहे") म्हणजे पर्वा नाहीं, असा अर्थ करतात. हा प्रयोग कां, कसा व केव्हां प्रचारांत आला याचा इतिहास मला अवगत नाहीं. पण तो मनोरंजक असला पाहिजे. अंजीराबद्दल इतकी तुच्छता कां म्हणून ? सफरचंद, अंजीर, द्राक्षें, चेस्टनट या फळांनीं इंग्रजी वाङ्मयांत बरेंच महत्त्वाचें स्थान प्राप्त केलेलें दिसून येतें. सफरचंद हें अदम आणि ईव्ह, आद्य नरनारी, यांच्या पतनाचें कारण म्हणून तसेंच डॉक्टरांच्या व त्यांच्या अन्योन्य वैरभावावरून "An apple a day keeps the doctor away" ("रोज एक सफरचंद खा कीं डॉक्टरची जरूर पडणार नाहीं-") या म्हणीवरून सुप्रसिद्ध आहे. "द्राक्षें आंबट" ( sour grapes ) ची गोष्ट तर संस्कृत, ग्रीक, लॅटिन, इंग्रजी, मराठी सर्व भाषांतून सुपरिचित झाली आहे. दुसऱ्याकडून अडचणीचें काम करून घेणें, "पाहुण्याकडून साप मारविणें" या अर्थी इंग्रजींतील 'आपलीं चेस्टनटें विस्तवांतून आपला हात भाजूं न देतां दुसऱ्याच्या हातानें बाहेर काढणें' या म्हणीमुळें "चेस्टनट" ही विख्यात आहे. जशीं या कांहीं फळांची तशींच कांहीं धान्यांचीही वाङ्मयांत बरीच महती आहे. लोखंडाचे "चणे" ब्रम्हपदीं नाचूं इच्छिणाऱ्यांना खावें लागतात. अंगाचा 'तिळपापड' होतो व हृदय "तिळतिळ" तुटते. "डाळ" शिजत नाहीं. या सर्व फळांची व धान्यांची मला आठवण होण्याचें कारण आमच्या शेजारचे वामनराव. मी वर सांगितल्याप्रमाणें बहुतेकांना अंजीर आवडतात; पण अंजीर पाहिल्याबरोबर वामनरावांची मुद्रा कावरीबावरी होते—अंगाला कंप सुटतो. एवढा धट्टाकट्टा मनुष्य "अंजीर खातां कां वामनरावजी ?" असं म्हटलें कीं त्यांची मोठी अनुकंपनीय स्थिति होते. ते घामाघूम होतात व लोच तेथून पलायन करण्याच्या मार्गाला लागतात. मी एकदां दोनदां हें पाहिलें; तेव्हां संकोच दूर करून स्पष्टच विचारलें. पण त्यांनीं उडवाउडवीच केली. पण आग्रह केला; तेव्हां त्यांनीं मला खालील प्रकार सांगितलें.

वामनरावांचे वडील गणपतराव एक खाऊनपिऊन सुखी गृहस्थ होते. त्यांचें शिक्षण त्यावेळची मुलकी परीक्षा पास करण्याइतकें झालेलें होतें. नवनीत, व्युत्पत्तिप्रदीप, वृत्तदर्पण त्यांना अवगत होतें; आणि मराठी भाषेला संस्कृत भाषेमुळें केवढी प्रौढी आलेली आहे! मराठीचें चांगल्याप्रकारचें ज्ञान व्हावें अशी इच्छा असल्यास संस्कृताचा अभ्यास करणें कसें अत्यावश्य आहे याची त्यांना जाणीव होती. ते स्वतः इंग्रजी शिकलेले नव्हते. परंतु आपला एकुलता एक मुलगा वामन आधुनिक इंग्रजी विद्वान व्हावा असें त्यांस वाटे. जुन्या बाळबोध वळणाच्या "लालयेत्पंचवर्षाणि। दशवर्षाणि ताडयेत्।" हा मुलाबरोबर वागण्याचा शिरस्ता गणपतरावांना पसंत होता. संस्कृतचा अभ्यास करायचा तर उच्चार व वाणी शुद्ध होण्याकरतां फार लहानपणापासून—आणि जुन्या शास्त्री पद्धतीप्रमाणें शिकवणें—फायदेशीर असें गणपतरावांना वाटत असे. वामन पांचवे संपून सहा वर्षांचा झाला, तेव्हां त्यांनीं त्याला रूपावली--समासचक्र स्वतःच शिकविण्याचा निश्चय केला. गीर्वाणवाणीमध्यें एवढें कांहीं गांभीर्य, माधुर्य आणि पावित्र्य आहे कीं भगवद्गीता, महिम्नस्तोत्र, गंगालहरी कुणी म्हणूं लागलें कीं आमची आजी त्यांतलें अक्षर देखील कळत नसायचें; पण लगेच हातांतलें काम सोडून ऐकायला येऊन बसायची, नी शक्य तितक्या वेळां हात जोडायची ! त्यांतून 'जयजय', 'नमो', 'समाप्त' हे शब्द कानीं पडलें कीं मग विचारूच नका. अगदीं हटकून हात जोडायची नी सद्गदित गंभीर मुद्रा करायची ! साधारण लिहितां वाचतां येणारे संस्कृतचा फारसा गंध नसलेले आमचे शेजारी विष्णुपंत तर इंप्रेशन मारण्यासाठीं शक्य तेवढे संस्कृत शब्द आपल्या नित्याच्या बोलण्यांत आणायचे आणि कित्येकवेळां त्यांचा अर्थ माहीत नसल्यामुळें स्वतःला हास्यास्पद बनवून घ्यायचे. त्यांचा उच्चारही नीट नसायचा. त्यामुळें अर्थाचा अनर्थ व्हायचा. उगीच नाहीं—

> "यद्यपि बहुनाधीषे तथापि पठ पुत्र व्याकरणम् ॥
> सकलं शकलं न स्यात् सबलं शबलं-सकृत् शकृत् ।"

हा श्लोक प्रचलित झाला. विष्णुपंतांच्या गड्याला रात्रीं विंचू चावला. दुसरे दिवशीं "रात्रौ आमच्या घरीं परम दुर्धर प्रसंग, हलाहल झाला. आमच्या सेवकाच्या पादांगुलीस वृश्चिक दंश घडला" असा आमच्या घरीं त्यांनीं रपोट केला. अशा त्यांच्या अनेक मौजा मला आठवतात. पण वामनरावांचा संस्कृतचा अभ्यास हा प्रस्तुत विषय असल्यामुळें त्या सांगण्याचा मोह आवरणें प्राप्त आहे.

संस्कृतचा अभ्यास पक्का करण्यासाठीं व उच्चार शुद्ध होण्यासाठीं पहाटे उठून संस्कृत शिकणें जरूर असें गणपतरावांनीं ठरविलें होतें. पण सहाव्या सातव्या वर्षी लहान मुलांना झोंप किती गाढमूढ येते आणि ती किती प्रिय असते याचा अनुभव बहुतेकांस असेलच. पहांटे चार वाजतां वामनाला उठवून रूपावली शिकविण्याचा बेत करणें सोपें होतें, पण तो अमलांत आणणें तितकेंच कठीण होतें. अगोदर झोंपाळू वामनाला

चार वाजतां जागें करण्याचे अनेक प्रयत्न फुकट गेल्यावर गणपतरावांना एक युक्ति सुचली. वामनाला अंजीर फार आवडत. तेव्हां सुंदरपैकीं दोन अंजीर एक दिवस पहांटे चार वाजतां त्याला उठवून त्याच्या हातांत दिल्याबरोबर त्याची झोंप अंमळ उडाली. त्याचा फायदा घेऊन "रामो हरिः करी भूभृत्" म्हण आतां, गणपतराव उद्गारले. वामन म्हणाला "रामो हरिः करी भूर्भुत." बऱ्याच प्रयासानें "भूभृत्" व "भूर्भुत्" ची लढाई गणपतरावांनीं जिंकली. "भानुःकर्ता च चन्द्रमाः" सुरू झाले. पण "च चंद्रमाः" देखील बराच जड गेला. गणपतरावांचा उत्साह दुर्दम्य; पण राग अनावर होता. इतके अंजीर संपले तरी अजून वामनला संस्कृतची गोडी लागेना. उलट अंजीरांची बेपर्वा होऊं लागली, हें त्यांना खपेना. अंजीराच्या वाटीच्या शेजारीं वामनच्या उशाला एक छम् छम् वाजणारी वेताची छडी येऊन बसूं लागली व तिचा प्रयोगही वारंवार होऊं लागला.

पुढें ज्या गांवांत गणपतराव राहात होते तेथें ओल्या अंजीरांचा पुरवठा बंद झाला. रोज पार्सल आणविण्याइतके गणपतरावाजवळ द्रव्यबळ नव्हतें. तेव्हां त्यांनीं सुके अंजीर आणवून साठा करून ठेवला. रात्रीं १।२ अंजीर एका वाटींत दूध घालून त्यांत भिजत घालावे. झोंपेतून वामनाला उठवून अंजीरांपेक्षां छडीच्याच बळावर त्यांनीं रूपावली तर पुरी करून घेतली. त्याच्याच बरोबर दुपारीं रामशास्त्र्यांच्या घरीं जाऊन अमरकोश सुरू करविला. "यस्य ज्ञान दयासिंधो" येवढें पाठ करून घ्यावें, नंतर "रगाधस्यानघा गुणाः"ची संथा. जरा चुकलें कीं शास्त्रीबुवांना खोड होती कान जोरानें उपटून बरोबर संथा येईपर्यंत हलवायचे. वामनाचे कान समूळ उखडतात कीं काय अशी त्याला धास्ती पडली. रूपावलीच्या छडीला निदान अंजीराची तरी सोबत असे, पण. पँगत पँगत "रगाधस्यानघा गुणाः" मात्र केवळ कानाच्या सुरक्षिततेच्या भयानेंच पार पडला. काय मानसशास्त्राचा सिद्धांत असेल तो पावलोव जाणे! कुत्र्याला घंटा वाजवून पुढें दुधाची थाळी ठेवली म्हणजे प्रथम थाळींतल्या दुधाच्या दर्शनानें त्याच्या तोंडाला लाळ सुटत असे. पुढें पुढें दुधाच्या दर्शनानें सुटणारी कुत्र्याच्या तोंडांतली लाळ दुधावांचूनही नुसती घंटा वाजवतांच सुटूं लागलीं, असा त्याचा अनुभव होता. रूपावली शिकतांना अंजीरावाचून नुसता छडीचाच प्रयोग कधीं वामनरावावर झाला होता कीं काय त्यांना आठवत नाहीं. पण छडीची भिती अंजीरावर जाऊन बसली असावी. काय झालें असेल ते असो. वामनरावांना छडीच्या भीतीमुळें म्हणा किंवा छडीच्या व कान उपटण्याच्या संयुक्त भितीमुळें म्हणा, संस्कृतची गोडी लागायच्या ऐवजीं अंजीराची दहशत बसली. पुढें कांहीं वर्षांनी गणपतराव मेले. वामनरावांनी मॅट्रिकलाच फ्रेंच घेतलें. अंजीर-अंगूर किंवा असाच कांहीं शब्द किंवा पदार्थ त्यांच्यापुढें आला कीं त्यांच्या अंगावर अजून कांटा उभा राहतो. आणि संस्कृत तर बुडालेंच!

—अखेर

# धर्म आणि श्रद्धा

श्री वसंत नाफडे

रविवारचा दिवस होता नि सायंकाळची वेळ. ५–५॥ वाजले असतील. जानेवारीचा महिना असला तरी वातावरणांत अजूनही बराच गारवा होता. किंबहुना हिंवाळा जातां जातां आपला हात दाखविण्याची कसूर करीत नव्हता, असंच म्हणाना! व जरी पूर्ण अंधकार झालेला नसला तरी सूर्य पश्चिमेकडील उंच पर्वताआड लपून गेलेला होता. आसमंतांत धूसर प्रकाश निर्माण झालेला होता नि किंचित् उदासपणाची छटा दूरवर व्याप्त झालेली भासत होती.

परीक्षा अगदींच जवळ आल्यामुळें आतां मन लावून अभ्यास सुरू केला पाहिजे, असा विनयच्या मनांत विचार आला. पण निसर्गानें जग किती विचित्र निर्माण केलं आहे, बघा! कोणतीही गोष्ट करावयाची म्हणून निश्चय करण्याचाच अवकाश कीं कांहींना कांहीं तरी अडचणी समोर 'दत्त' म्हणून उभ्याच! त्यानें अभ्यास नियमितपणें करण्याचा विचारच करावयाचा उशीर नि त्याला आठविलें कीं, त्याचीं दोन पुस्तकं तर रमेशकडेच पडलेलीं आहेत! पण आज त्याचा निर्धार नक्की झाला होता. रोमरोमांत भिनलेल्या आळसाला त्यानें बाजूला सारलें, नि दुचाकी घेऊन तो रमेशकडे जाण्यास निघाला.

पण कदाचित् निसर्ग माणसाची नेहमीं कसोटीच पहात असावा. कारण सुरुवातीला अडचणी येतात नि त्याही पण एखाद दुसऱ्या नसतात. एकामागून एक अगदीं कशी त्यांची रीघ लागलेली असते. आतांच पहा, ना! तो रमेशकडे पोंहोंचला पण त्याच्या घरीं कुलूप लागलेलें होतें! एक तर सायंकाळच्या वेळीं कोणी तरुण घरीं भेटणं कठीण! किंबहुना सायंकाळीं घरीं भेटतो तो तरुणच नव्हे, असंच म्हणाना! अन् त्यांतल्या त्यांत, रमेश विनयचा समवयस्क मित्र जरी असला तरी, तो एका श्रीमंत बापाचा नि एकुलता एक मुलगा होता, व स्वभावतःच लाडोबा म्हणून वाढला असल्यामुळें अभ्यासांत त्याला फारशी रुचि नव्हती. अर्थात्च रमेशचं कार्यक्षेत्र फार मोठं होतं व म्हणून त्याचं घरीं भेटणं सहसा नेहमींच दुर्मिळ असे.

ह्या वस्तुस्थितीविषयीं विचार विनयच्या डोक्यांत घोळतच होते, तोंच शेजारच्या खोलींतून एक मध्यम वयाचे गृहस्थ बाहेर आले. किंचित् गोरा चेहरा, गोल पायजमा नि साधीच खमीज घातलेली ती व्यक्ति समोर येऊन उभी राहिली नि तोंडावर कांहींसें स्मित आणून म्हणाली, "आपण शेजारच्या रमेश बाबूकडे आलां होतांत कां? ते तर दुपारचेच बाहेर गेलेले आहेत."

ह्या कांहींशा अनपेक्षित प्रश्नानें विनयचें विचारचक्र एकदम थांबलें नि तो म्हणाला, "आलों तर रमेशकडेच होतों."

पण ह्या उत्तरानें कदाचित् त्या व्यक्तीच्या मनाला संतोष वाटला नसावा. ती परत म्हणाली, "जर आपणांस कांहीं अडचण वाटत नसेल तर आपण मला आपलें नांव सांगूं शकतां किंवा आपला कांहीं निरोप असेल तर तो मुद्दां मी रमेशबाबू घरीं आले म्हणजे त्यांना कळवून देईन."

विनय त्या अतिथीच्या अनाहूत सौजन्यानें कांहींसा स्तंभित झाला होता. आणि त्याला काय उत्तर द्यावें म्हणून तो विचारच करीत होता. इतक्यांत ती व्यक्ति परत म्हणाली, "माझा फारसा आग्रह नाहीं. जर आपल्याला कांहीं अडचण असेल, तर आपण राहूं द्या."

इतका वेळ मौन राहिल्याबद्दल विनय मनांतल्या मनांत वरमला नि तत्काळ त्या व्यक्तीला म्हणाला, "नाहीं, नाहीं. आपला गैरसमज होत आहे. मला रमेशकडून स्वतःचीं पुस्तकं घ्यावयाचीं होतीं नि म्हणून मी मुद्दाम आलों होतों. आपल्याला त्रास तर होईल. पण तो आला म्हणजे त्याला जमल्यास आजच पुस्तकं परत करण्यास कळवून द्या."

"अवश्य, अवश्य सांगेन मी त्यांना. आपण निष्काळजी असा," ती व्यक्ति ताबडतोब म्हणाली.

नंतर आपली दुचाकी वळवून विनय परतला. त्याला त्या व्यक्तीच्या अभिजात सौजन्याचें नि विनयाचें राहून राहून आश्चर्य वाटत होतें. नि अरे हो! शेवटीं तो आपलें नांव सांगण्यास विसरलाच होता. पण त्याला नंतर स्वतःचें नांव सांगितलें नाहीं हृ एका रीतीनें चांगलचें झालें, असें वाटल्यावाचून राहिलें नाहीं. त्याला वाटलं, आपण केवळ नांवाचे, विनय. खरा विनय म्हणजे ती व्यक्ति! नव्हे, ती व्यक्ति म्हणजे विनयाची साक्षात् मूर्ति होती!

जेव्हां रात्रीं रमेश पुस्तकं पोंहोंचविण्यासाठीं आला, तेव्हां विनयनें सहजसुलभ औत्सुक्यानेंच त्याला त्या व्यक्तीबद्दल प्रश्न विचारले. रमेशनें सांगितलें कीं त्या गृहस्थाचें नांव नसीमखां होतें नि पत्नीशिवाय आणखी त्याला ह्या संसारांत कोणीसुद्धां नव्हतें. होय, त्याला पोरंबाळं सुद्धां कांहीं नव्हतीं! त्या दोघांची जीवन यात्रा चांगल्या रीतीनें चालूं शकेल इतका पैसा नसीमखांजवळ होता. तो केवळ विनयशीलच नसून, विनोदीही पण आहे. त्याचा विशेष म्हणजे तो नेहमीं दुसऱ्याच्या उपयोगी पडण्यासाठीं तत्पर असतो, असंही तो म्हणाला. त्या गृहस्थाविषयीं साधारणपणें विनयनें जे अनुमान नि ग्रह आपल्या मनाशीं केले होते त्यांना रमेशनें पुष्टि दिल्यामुळें विनयचें मत नसीमखां विषयीं अनुकूल असेंच बनलें.

त्याची दुसरी भेट झाली ती तीन चार दिवसांनंतर. विनयची सर्व मित्रमंडळी आपापल्या अभ्यासांत मग्न होती. विनय मात्र त्रिपोलीच्या राजमहालाच्या मागच्या बाजूस असलेल्या गोविन्दजीच्या मंदिराच्या

आवारांत बरीच मोठी बाग असल्यामुळें सायंकाळच्यावेळीं तो सहलीसाठीं म्हणून तेथें जात असे. तसें पाहिलें तर जयपुरला फिरण्यासाठीं ठिकाणांची वानवा नव्हती. 'रामनिवास म्हणून' म्यूझियमच्या आसपास अफाट बाग होता. सहसा लोक हवाखोरीसाठीं तिथेंच जात असत. पण तिथें इतका कोलाहल असावयाचा कीं विनयचें दिवसभराच्या अभ्यासानें थकलेलें मन अगदीं विटून जात असे. म्हणून तो मंदिराच्या बागेंत येऊन पडून रहात असे.

राजवाड्याचा पार्श्वभाग मावळत्या सूर्याच्या प्रकाशांत विलक्षण सुंदर भासत असे. जुन्या पद्धतीनें पोशाख केलेले हुजरे इकडे तिकडे वावरतांना दिसत. सर्व दूर चित्रविचित्र फुलांचा सुगंध दरवळत असे. विनयनें डोळे मिटेल कीं त्याला भास व्हावयाचा की आपण कोणी मोंगल राजवटींतले राजपुत्र असून ऐषआरामांत पडलों आहोंत, सुखांत आहोंत.

आज तो आला तेंव्हां त्याला थोडा उशीर झाला होता. मंदिरांत आरती सुरूं झाली नि गोविंदजीच्या पुढचा पडदा बाजूस सारला गेला. वृद्ध स्त्रीपुरुषांचा बराच मोठा समुदाय एकत्रित झालेला होता. घंटा जोर जोरानें वाजत होती. पुजारी हातांत आरती घेऊन गोविंदजीला ओवाळीत होता. नि सर्व समुदाय म्हणत होता. :—

यशोदा मैयाँ खोल किवडीया,
ग्वालो आयो धेनु चराया !

(हे यशोदे । दार खोल ! कृष्ण गाईंना चारून परत आलेला आहे !)



वातावरणांत स्वभावतःच एक प्रकारची उदात्त पण वात्सल्यमय भावना पसरलेली होती. त्याचा प्रभाव विनयच्या मनावर झाल्यावाचून राहिला नाहीं. तो थांबला. त्यानें समोर पाहिलें. नि त्याला आश्चर्याचा एक जबरदस्त धक्का बसला. समोर नसीमखां उभा होता, आवाराच्या बाहेर डोळे मिटून, मग्न! त्याचे हात टाळ्या वाजविण्यांत गुंतले होते नि तोंड अविरत भजन म्हणण्यांत गुंतलें होतें:—

ग्वालो आयो धेनु चराय,
यशोदा मैयाँ खोल किवडीया,
ग्वालो आयो धेनु चराय.

आरती संपली. पुजाऱ्यानें पुजेचें पाणी सर्व मंडळींच्या अंगावर शिंपडलें. नसीमखां अजून ही आवाराच्या बाहेरच उभा होता, सर्व मंडळीहून वेगळा, अगदीं दूर.

त्यानें डोळे उघडले. बाहेरूनच मूर्तीच्या पायां पडला. नि परत घरीं जाण्यासाठीं वळला. तितक्यांत त्याची विनयशीं दृष्टादृष्ट झाली.

"नसीमखां! आपण इथें!" विनयच्या विचारण्यांत कुतूहल होतें.

"होय! गेलीं दहा वर्षं मी येथें बहुतेक रोज येत असतों." नसीमखां उत्तरला.

"आणि नेहमींच आपण बाहेर उभे रहातां?" विनयला आश्चर्य वाटलें.

"होय! त्यांत आश्चर्य वाटण्यासारखें काय आहे? मला ह्याचें वाईट वाटत नाहीं. माझ्या मनाला शांति मिळते ती दर्शन घडलें म्हणजे. झालें! आंतून काय नि बाहेरून काय?"

"मला नेहमीं वाटतं, रामाच्या देवळांत बसून तुलसीचें 'रामचरितमानस' वाचावें. पण येथें मीराच्या अगाध कृष्णप्रेमानें रामाची हकालपट्टी केली आहे. रामाचें कोठें मंदिरच आढळत नाहीं, हो।" नसीमखां कळवळ्यानें म्हणाला.

पण विनयचें कदाचित् तिकडे लक्ष नसावें. तो कसल्यातरी विचारांत निमग्न होता. त्याला वाटत होतें कीं, हिंदु-समाज खरंच उदार नि सहिष्णु आहे कां? नसीमखांला मंदिरप्रवेश मिळणं खरंच कठिण असावं कां? त्याला वाटलं, एक तर हिंदु-समाज उदार किंवा सहिष्णु तरी नाहीं किंवा शब्दांना कांहीं अर्थच नसावा. जर बाहेरून आलेल्या जाती भारतांत येऊन स्थायी झालेल्या आहेत, तर ह्याचें कारण हिंदु लोक त्यांना बाहेर हकलून लाविण्यास कमजोर होते, हें होय. जर हिंदु-समाज सहिष्णु असता तर अशा व्यक्तींना हिन्दु बनविणें कठिण नसतं. कोणाचेंही जबरदस्तीनें धर्मपरिवर्तं करावें, हें तर कोणालाही पटण्यासारखें नाहीं. पण नसीमखां सारखीं विरळीं माणसं, जीं रामांत रमून जातात नि तुलसीच्या दोह्यांबरोबर नाचतात, बागडतात, त्यांना कमींत कमी मंदिरप्रवेशही दिला जाऊं नये, ही किती लाजीरवाणी गोष्ट!

माणसाला कधीं कोणती लहर येईल हें कांहीं सांगतां येत नाहीं. आता नसीमखांचेंच बघाना! उतार वय होतें, जवळ रगड पैसा होता, मागें पोरंबाळं नव्हतीं नि खरं म्हणजे आतां सुखांत दिवस घालविण्याचा त्याचा काळ होता. पण माणसाचा स्वभाव कांहीं मेल्यावाचून जात नाहीं.

उद्योग नसल्या कांहीं तरी करीत रहावयाचें, हा नेहमींच नसीमखांचा स्वभाव असे नि अलिकडे शेतीवाडीमधें बराच फायदा होत असल्यामुळें त्यानें गांवच्या बाहेरच मुद्दाम एक जमीन विकत घेतली नि आतां तो उतार वयांत शेती करण्यासाठीं तेथें जाऊन राहिला होता.

परीक्षा संपलेल्या होत्या नि तितक्यांतच 'शबरात' चा सण आला. नसीमखाने रमेश नि विनयाला जेवावयास बोलावलें. पण परगांवीं जाऊन त्याच्याकडे जेवावयाचें त्यांना अवघड वाटत असल्यामुळें प्रथम त्यांनीं आढेवेढे घेतले; पण नसीमखांचा बराच आग्रह पडल्यामुळें शेवटीं त्या दोघांना नसीमखांचें निमंत्रण नाईलाजानें स्वीकारणें भागच पडलें.

ते दोघे शेतावर पोंहोंचले तेव्हां दिवे लागणीची वेळ होती. उष्णता कमी झाली असून मोकळ्या मैदानावर मंद गतीनें वारा वहात होता. आकाशांत पांढरे शुभ्र बदकांचे कळप दक्षिणेकडून उत्तरेकडे रांगेनें जात होते. त्या दोघांनीं शेतावरील कुव्यांतील पाण्यानें तोंड धुतलें. चहूंकडे पसरलेली हिरवळ, पश्चिम क्षितिजावर पसरलेला संधिप्रकाश नि दूर दूरवर विखुरलेल्या तुरळक झोंपड्यांनीं विनयचें मन आकर्षित करून घेतलें.

रात्रीं जेवणं झालीं अगदीं शुद्ध नि शाकाहारी. 'निराळे' पदार्थ जेवणांत नसलेले पाहून विनयला आश्चर्य वाटलें. जेव्हां त्यानें ह्या बाबतीत पृच्छा केली तेव्हां 'असले' पदार्थ या घरांत वर्ज्य असल्याबद्दल त्याला सांगण्यांत आलें.

गोष्टींना तर ऊत आला. नसीमखा आपल्या गतजीवनांतील सुख-दुःखाच्या स्मृतींनीं कांहींसा उदास झाला होता. सर्वांत मोठं दुःख त्याला निपुत्रिक असल्याबद्दलच बोचत होतं. तो म्हणाला, "कधीं कधीं मनाला वाटतं, जर आपणांस एखादं संतान असतं तर! माझ्या आईला सुद्धां पोरं होत होतीं, पण तीं वाचत नव्हतीं. कसेंतरीं नवस सायास करून मी वांचलों; पण त्याचीच पुनरावृत्ति माझ्याही बाबतींत घडली. लग्नापासून एक अशीं माझ्या बेगमला सात पोरं झालीं, अन् ते सर्व मुलगे होते. पण त्यांच्या पैकीं एक देखील वांचला नाहीं. जेव्हां बेगमला पहिला मुलगा होणार होता, तेव्हांच मी हौसेनें सर्व खेळाचें सामान नि कापड वगैरे बाजारांतून घेऊन आलों होतों. वाटावयाचं "मी शिक्षण घेऊं शकलों नाहीं; पण आपल्या मुलांना मात्र आपण अवश्य शिकवावें. माझ्याजवळ पैसा होता नि अखेर त्याचा उपयोग तरी काय होणार होता? पण सर्व मुलांनीं जन्म घेण्याबरोबरच मृत्यूला आलिंगन दिल्यामुळें माझी तीव्र निराशा झाली! त्याच्या इच्छेपुढें कोणाचें कांही चालत नाहीं."

रात्र बरीच झाली होती. वाटेंत जनावरांची भीति असल्यामुळें नसीमखाने विनय व रमेशला तिथेंच झोंपण्याचा आग्रह केला. शेतावर झोंपण्याचा हा त्यांना पहिला अनुभव होता.

सकाळीं त्यांची झोंप झाली, तेव्हां शुक्राचा तारा पूर्वेकडे लकाकत होता. मंद प्रकाशाची अंधुक झाक प्राचीवर खेळत होती. शेजारच्या झोपडींत एक व्यक्ति एकतारीवर कापऱ्या आवाजांत खालील पद गात होत्या.

**मैंने राम रतन धन, पायो ॥ टेक ॥**
**जन्म जन्म की पूंजी पाई, जग में सबै खोवायो ॥**

नसीमखां सहकुटुंब रामप्रहरीं रामगानांत मग्न होता. विनयला वाटलें, मनाचा मोठेपणा असावयास शिक्षणाची किंवा शहरांत रहाण्याची गरज नाहीं. ल्हानशा झोपडींत नि मोकळ्या मैदानांतहि व्यापक नि विशाल मनाची माणसं वास्तव्य करूं शकतात तर मग!

• •

# मुंबई राज्यांतील लाखों गोवंशांची हत्त्या बंद करण्याची संधि!

काश्मीर, पतियाळा संघ, राजस्थान, सौराष्ट्र, मध्यप्रदेश आदि राज्यांमध्यें इंग्रजांचे वेळेपासून गोहत्त्या बंद होती. स्वराज्य-प्राप्तीनंतर गोहत्त्या निरोध समितीच्या प्रयत्नांमुळें व जनतेच्या आंदोलनामुळें पंजाब, उत्तर-प्रदेश, बिहार, अजमीर आणि भोंपाळमध्यें गोहत्त्या निषेध कायदे करण्यांत आले. या आंदोलनामुळें सरकार व जनतेचें लक्ष रचनात्मक कार्याकडेही गेलें.

नवीन मुंबई राज्यामध्यें सौराष्ट्र, कच्छ व विदर्भांचा जो भाग सामील केला गेला आहे त्यामध्यें गोहत्त्या बन्दीचे कायदे अस्तित्वांत आहेत. पूर्वीचें मुंबई राज्य आणि हैद्राबादमधील मराठवाड्याचें जे जिल्हे मुंबई राज्यांत समाविष्ट करण्यांत आले आहेत त्यामध्यें गोहत्त्या बंद करण्यासाठीं कोणताही कायदा नाहीं. या भागांत सुमारें ७-८ लाखांच्या वर गोवंशाची हत्त्या केली जात आहे. मुंबई सरकार सर्व राज्यासाठीं एका प्रकारचेच कायदे करण्याच्या विचारांत आहे असें समजतें. त्यामुळें गोहत्त्या निरोध कायद्याचाही सरकार निर्णय करील. जर या वेळीं जनमत जागृत व संघटित करून मुंबई राज्यांत गोहत्त्या बंद केली गेली नाहीं तर सौराष्ट्र, कच्छ व विदर्भामधील जो गोहत्त्या बंदीचा कायदा आहे तो रद्द केला जाईल. गोहत्त्या पुनः सुरू होईल. देश, विशेषतः उत्तर-भारतांतील सर्वांत मोठमोठ्या राज्यांतून गोहत्त्या बंदीचे कायदे करण्यांत आल्यानंतर आणि मुंबई सरकारच्या सर्व राज्यासाठीं एक कायदा करण्याच्या विचारामुळें, सर्वसाधारण प्रचारामुळें व जनमत जागृत आणि संघटित केल्यानें मुंबई राज्यांतही गोहत्त्या बंदीचा कायदा केला जाईल अशी आशा आहे. म्हैसूरमध्यें १९४८ पासून गोहत्त्या बन्द आहे. आन्ध्र सरकारनें गाय व म्हैस यांच्या हत्त्या बंदीचें विधेयक प्रवर समितीकडे सुपूर्त केलें आहे. कृपया आपण मुंबई राज्यांत गोहत्त्या करण्यासाठीं पुढील नम्र सूचना लक्षांत घेऊन उपकृत करावें.

(१) मुंबई राज्यांत होणाऱ्या गोहत्त्येबद्दल माहिती संकलित करणें.

(२) जिल्हा व जेथें शक्य होईल तेथें तालुका केन्द्रांना गोहत्त्या निरोध समिती स्थापन करणें.

(३) गोरक्षा चित्र-प्रदर्शन व गोसाहित्याचा प्रचार.

(४) मुंबईच्या मुख्य मंत्र्यांना, तसेंच आपल्या मतदार संघाच्या विधान-सभा सदस्यांस गोहत्त्या बंदी कायदा करण्यासाठीं ठराव व पत्र पाठविणें.

(५) सभा, मिरवणुका आदिद्वारा जनमत जागृत व संघटित करून मुंबई राज्य तसेंच त्या त्या मतदानक्षेत्रांतील विधान-सभा सदस्यांकडून गोहत्या बंदी कायद्याची मागणी करणें, तसेंच हें आंदोलन यशस्वी करण्यासाठीं अन्य उचित आवश्यक कार्य करणें.

ज्या व्यक्ति व संस्था सहयोग व सहाय्यता देण्यास तयार असतील त्यांनीं कृपया पुढील पत्त्यावर पत्रव्यवहार करावा ही विनंति.

**हरदेव सहाय**
मंत्री, गोहत्त्या निरोध समिती,
३, सदर थाना रोड, दिल्ली ६.

# "पाश्चात्य देशों में बौद्धधर्म का अध्ययन"

भिक्षु धर्मरत्न, एम्. ए.

अब तो यह बात सर्वविदित है कि भारत भगवान बुद्ध की लीलाभूमि रही है, लेकिन एक समय ऐसा था, जब कुछ पाश्चात्य विद्वान् इस मत को मानने के लिए तैयार नहीं थे कि भगवान बुद्ध जैसे महापुरुष कभी संसार में हुए थे। इस मनोवृत्ति के पीछे दो बातें थी—एक तो तथागत की महत्ता और दूसरी एशिया खंड में, सो भी भारत में, उनका प्रादुर्भाव।

उस समय एशिया के अधिकतर देश पाश्चात्य शक्तियों के अधीन हो गये थे। इन पराधीन जातियों को सतत दबाए रखने की उन पाश्चात्य शासकों की कूटनीति रही है। उस कूटनीति को सफल बनाने के लिए उन्होंने उपलब्ध सभी उपायों का उपयोग किया था। इसमें उन्होंने मनो-विज्ञान की भी सहायता ली।

किसी जाति के जीवन में उसके इतिहास का बड़ा महत्त्व है। पतन की अवस्था में भी उसे जाग्रत करने की शक्ति उसमें रहती है। हमारे शासक इस बात को जानते थे। इसीलिए उन्होंने हमारे इतिहास को गौण बनाने का भरसक प्रयत्न किया। वे कहने लगे कि हमारा कोई इतिहास ही नहीं। हमारा इतिहास सब ऊटपटांग है। इस नीति के सिलसिले में वे कहने लगे कि भगवान बुद्ध कोई ऐतिहासिक पुरुष नहीं अपितु एक काल्पनिक भगवान हैं और उनकी जीवनी एक दंत-कथा है।

सभी बातों में वे हमे गौण बनाते थे और अपने को महान। इस प्रचार का उद्देश्य था हमारे मन में आत्मग्लानि पैदा करना। जिस व्यक्ति या जाति में यह मनोवृत्ति पैदा हो जाती है, उसका पतन अवश्यम्भावी है। वह व्यक्ति या जाति प्राण रहते भी जड़वत हो जाती है, चेतना रहते भी मृतवत् हो जाती है। इसलिए यह मनोवृत्ति अणुबंब से भी अधिक भयानक और हानिकारक होती है।

उस प्रकार का बहुत कुछ असर हम लोगों पर पड़ा। बहुत से लोग आत्मग्लानि के शिकार हो गये। लेकिन सौभाग्य से कुछ ऐसे लोग भी निकले जो अपनी अतीत महत्ता को भूलते नहीं थे। उनके अतिरिक्त कुछ ऐसे पाश्चात्य विद्वान हो गये जो सच्चे दिल से हमारे इतिहास का अध्ययन करने लगे। उनकी प्रेरणा से पुरातत्त्व विभाग की स्थापना हुई और ऐतिहासिक स्थानों की खुदाई होने लगी। इससे ऐतिहासिक बौद्धस्थान प्रकाश में आने लगे।

जब लुम्बिनी की खुदाई आरम्भ हुई, तब जमीन के अन्दर से एक शिलास्तम्भ निकला। उस पर एक लेख भी है। वह लेख ऐसी लिपि में है, जो किसी समय इस देश की लिपि रही है और वर्त्तमान लिपियों की जननी भी रही है। लेकिन हम अपने आपको इतने भूल गये थे कि इस देश में कोई ऐसा व्यक्ति नहीं रहा, जो इस लिपि को पढ़ सके।

अब क्या होता है कि 'प्रिंसप' नामक एक पाश्चात्य विद्वान् आ जाते हैं और इस लिपि को पढ़ने में अपना सारा जीवन लगा देते हैं। वे हमारी वर्त्तमान लिपियों से उसकी एक एक मात्रा मिलाते हैं और पच्चीस वर्षों की कठिन साधना के बाद उस लिपि को पढ़ने में सफल हो जाते हैं। ब्राह्मी लिपि का अनुसन्धान इस प्रकार हो जाता है। उपर्युक्त शिलालेख का एक वाक्यखंड इस प्रकार है :—'इध भगवा जातो।' अर्थात् 'यहाँ पर भगवान् का जन्म हुआ था।'

यह शिलालेख सम्राट अशोक का खुदवाया हुआ था। त्रिशरण-शरणागत उपासक होने के बाद सम्राट तथागत के जीवन से सम्बन्ध रखनेवाली पुण्यभूमियों के दर्शनार्थ गये थे और आनेवाली पीढ़ियों को उनकी याद दिलाने के लिए उन्होने लेखसहित स्तम्भों की स्थापना की थी। इस प्रकार तथागत की जन्मभूमि का पता लगा।

खुदाई और अनुसंधान का कार्यक्रम जारी रहा आर एक एक ऐतिहासिक स्थान प्रकाश में आने लगा। बुद्धगया जहाँपर तथागत को सम्यक् सम्बोध की प्राप्ति हुई थी; सारनाथ जहाँपर उन्होंने प्रथम उपदेश दिया था; कुशीनगर जहाँपर उनका निर्वाण हुआ था—ऐसे और उनके जीवन से सम्बन्ध रखने वाले और भी कितने ही स्थान प्रकाश में आगये। उन स्थलों में विहार, स्तूप तथा शिलालेख निकले, तथागत तथा उनके प्रधान शिष्यों की पवित्र अस्थियाँ भी मिलीं। जगद्दला ओदन्तपुरी, विक्रमशिला, नालन्दा इत्यादि विश्वविख्यात बौद्धविद्यापीठों का भी पता लग गया, जहाँ पाश्चात्य जगत में सभ्यता का अरुणोदय होने के पहले जम्बुद्वीप संसार को मानवता का पाठ पढ़ाता था और शील, समाधि तथा प्रज्ञा की, शिक्षा देता था। इन जबरदस्त शोधों से उन प्रचारकों के मुख बन्द हो गये, जो यह कहने की धृष्टता करते थे कि भगवान बुद्ध कोई ऐतिहासिक महापुरुष नहीं, अपितु एक मनगढ़न्त भगवान हैं।

इन शोधों से गुणग्राही पाश्चात्य विद्वान दंग रह गए। किसी समय जब नये नये भूखंडो, नये नये द्वीपपुंजो और नये नये महाद्वीपों का पता लगने पर पाश्चात्य देशों के लोग जिस प्रकार धन-दौलत के लिए, सोना-चांदी के लिए दौड़ पड़े, उसी प्रकार गुणग्राही पाश्चात्य विद्वान इन शोधों से आकर्षित हो गये। वे इतिहास और पुरातत्व ही नहीं अपितु धर्म और दर्शन का भी गूढ अध्ययन करने लगे।

[...]र रूस में चेरवोस्क प्रभृति कितने प्रकांड विद्वान् हो गये, जिन्होंने [...] अकादमी में भारतीय धर्म तथा दर्शन के अंतर्गत बौद्धधर्म तथा [...] के अध्ययन के लिए एक विशेष विभाग की स्थापना की। उन्होंने [...] तिब्बती तथा मंगोलियन अनुवादों के साथ मूल ग्रन्थों के अध्ययन [...] अपने गवेषणात्मक मन्तव्य संसार के सामने रख दिए। दूसरी [...] रिस डेविड्स जैसे विद्वान् ने सिंहल में जाकर पाली भाषा के अध्ययन [...] इंग्लैंड में 'पालि टेक्स्ट् सोसाइटी' की स्थापना की और मूल [...] ग्रन्थों तथा उनके 'अनुवादों' को प्रकाशित किया। होग्सन [...] ने नेपाल से बहुत से अमूल्य ग्रन्थों को प्राप्तकर इस विषय पर [...] भी प्रकाश डाला। मैक्समुलर जैसे और कितने ही विद्वान् इस [...] में काम करने लगे।

[...]अमेरिका तथा यूरोप के विश्वविद्यालयों में इसके अध्ययनार्थ अलग [...] बने, अध्ययन-मंडल बने और सोसाइटियाँ बनीं। इस अध्ययन [...] फलस्वरूप एक ओर मानवता के क्षेत्र में धर्म तथा दर्शन के क्षेत्र में [...]गत की महत्ता को लोग समझने लगे और दूसरी ओर पाश्चात्य [...]चार पर उसका बहुत कुछ प्रभाव पड़ा। यह तुलनात्मक और [...]नात्मक अध्ययन अब भी जारी है।

[प]ाठक के मन में यह प्रश्न उठ सकता है कि ये पाश्चात्य देश जिनका [धर्]म दूसरा है, जिनकी संस्कृति दूसरी है, तथागत के धर्म तथा दर्शन के [अ]ध्ययन में इतनी दिलचस्पी क्यों लेते हैं। तथागत के संदेश की [...]ता ही इसका कारण है। उनका संदेश किसी काल विशेष या जाति [वि]शेष के लिए नहीं है, वह अमर संदेश सारे संसार के लिए है, [सा]री मानव जाति के लिए है। वह कोई संप्रदायवाद या दृष्टिवाद नहीं है। वह जीवन-संबंधी एक मार्ग है, एक दर्शन है। आज से ढाई [ह]जार वर्ष पूर्व उसमें जो सजीवता और उपादेयता थी, वह आज भी है। इसीलिए आज भी लोग उसके अध्ययन तथा अनुसंधान में [ल]गे हुए हैं।

भगवान् बुद्ध को महापरिनिर्वाण प्राप्त हुए गत वैसाख पूर्णिमा को [दो] हजार पाँच सौ वर्ष पूरे हो गये। इस कालान्तर में संसार के इतिहास [में] शस्त्र और हिंसा के बल पर कितने ही विशाल साम्राज्य बने [और] बिगड़े, लेकिन मैत्री और करुणा के बल पर सत्य और [अहिं]सा के बलपर निर्मित तथागत का धर्मसाम्राज्य आज भी कायम है और जबतक मनुष्य में सत्य तथा धर्म के प्रति प्रेम बना रहेगा तबतक [व]ह कायम रहेगा।

बौद्धधर्म, संसार को भारत की सबसे बड़ी देन है। इस सन्देश के [आध]ार भारत ने एक बार संसार में धर्मविजय की थी। इसी के बलपर [भ]ारत फिर भी धर्मविजय प्राप्त कर सकता है।

# भगवान् बुद्ध की धर्म-दीक्षा के नाम पर विरोध और कटुता कैसी ?

इधर कुछ दिनों से नवदीक्षित बौद्धों और कुछ सनातनी हिन्दुओं के बीच जो कटुता की भावना फैलायी जा रही है जिस के कि—कारण दो एक स्थानों पर जो दंगे हुए हैं और कुछ भाइयों के सिर भी फूटे हैं—यह देख कर कौन ऐसा हिंदू या बौद्ध होगा जिसे हार्दिक दु:ख और खेद न हुआ होगा। राजनीतिक उद्देश्य से जो लोग हिन्दुओं के प्रति द्वेष की भावना फैला कर बौद्ध धर्म का प्रचार करना चाहते हैं, उन्हें कदाचित् यह ज्ञान न होगा होंगे। यदि ज्ञात भी होगा तो अनुचित स्वार्थवश वे कदाचित् इस बात को भुला देते कि भगवान् बुद्ध के नाम पर कटुता, घृणा या विरोध की बात करना उन के उपदेशों के सर्वथाही विरुद्ध है। भगवान् बुद्ध ने तो प्रेम, सत्य, अहिंसा, त्याग और प्राणिमात्र के लिए अनुकम्पा और दया का ही उपदेश दिया है।

हिन्दू धर्म और बौद्ध धर्म दोनों मूलतः एक ही हैं तथा सहोदर भाई के समान एक दूसरे के सहयोगी और सहायक हैं। दोनों एकही धर्म –वृक्ष की दो महान शाखाओं के समान हैं। वे एक दूसरे से कदापि अलग नहीं रह सकते। बौद्ध धर्म की महायान शाखा तो सनातन हिन्दू धर्म के अत्यन्त निकट और घनिष्ट है। भगवान् बुद्ध ने अपने उपदेशों को आर्य धर्म, आर्य सत्य या सद्धर्म बोल कर ही उपदेश दिया है। ये उपदेश प्राचीन आर्य हिन्दू धर्म के उपदेशों से भिन्न नहीं हैं जैसा कि निम्न उद्धारणों से प्रगट है:—

आरोग्यं परमा लाभा सन्तुठी परमं धनं।
विस्सास परमा जाती निब्बानं परमं सुखं॥ (धम्मपद–१५,८)

निरोग होना परम लाभ है, संतोष परम धन है, विश्वास सबसे बड़ा बन्धु है, और निर्वाण या मोक्ष सबसे बड़ा सुख है।

यावजीवम्पि चे बालो पण्डितं पयिरुपासति।
न सो धम्मं विजानाति दब्बी सूपरसं यथा॥ (धम्मपद–५, ५)

यदि मूर्ख जीवन भर पण्डित के साथ रहे तो भी वह धर्म को वैसे ही नहीं जान सकता, जैसे कि का कली दाल के रस को नहीं जान सकती।

धम्मपीती सुखं सेति विप्पसन्नेन चेतसा।
अरियप्पवेदिते धम्मे सदा रमति पडितो॥ (धम्मपद–६, ४)

धर्म रस का पान करने वाला प्रसन्न चित्त से सुखपूर्वक सोता है। पण्डित आर्यों के उपदिष्ट किये हुए धर्म में सदा रमण करता है।

धम्मं चरे सुचरितं न तं दुच्चरितं चरे।
धम्मचारी सुखं सेति अस्मि लोके परम्हि च॥ (धम्मपद १३,८)

धर्म के अनुसार सदाचार का आचरण करे। दुराचार का आचरण न करे। धर्म के अनुसार आचरण करने वाला इस लोक में और परलोक में सुख से रहता है।

यथा बुब्बुलकं पस्से यथा पस्से मरीचिकं।
एवं लोकं अवेक्खन्तं मच्चु राजा न पस्सति॥ (धम्मपद १३,४)

जो इस लोक को पानी के बुलबुले की तरह और मृग मरीचिका की तरह देखता है, उसको यमराज नहीं देखता-अर्थात् वह जन्म मरण से मुक्त हो जाता है।

किच्छो मनुस्सपटिलभो किच्छं मच्चान जीवितं।
किच्छं सद्धम्मसवणं किच्छो बुद्धानं उप्पादो॥ (धम्मपद–१४,४)

मनुष्य का जन्म पाना कठिन है, मनुष्य का जीवित रहना कठिन है, सद्धर्म का श्रवण करना कठिन है और बुद्धों का उत्पन्न होना कठिन है।

सब्बपापस्स अकरणं कुसलस्स उपसम्पदा।
सचित्तपरियोदपनं एतं बुद्धान सासनं॥ (धम्मपद–१४, ५)

सब पापों से बचना, पुण्य का संचय करना, अपने चित्त को शुद्ध रखना यक्ष बुद्धों की शिक्षा है।

न तेन अरियो होति येन पाणानि हिंसति।
अहिंसा सब्बपाणानं अरियोति पवुच्चति॥ (धम्मपद–१९, १५)

प्राणियों की हिंसा करने से कोई आर्य नहीं होता, सभी प्राणियों की हिंसा न करने से मनुष्य आर्य कहा जाता है।

सुखा मेत्तेय्यता लोके अथो पेत्तेय्यता सुखा।
सुखा सामञ्ञता लोके अथो ब्रह्मञ्ञता सुखा॥
(धम्मपद–२३, १३)

ससार में माता और पिता की सेवा करना सुख देने वाला है। श्रमण भाव या संन्यास सुखकर है और ब्रह्मज्ञ होना सुखकर है।

सब्बदानं धम्मदानं जिनाति सब्बं रसं धम्मरसो जिनाति।
सब्बं रतिं धम्मरती जिनाति तण्हक्खयो सब्बदुक्खं जिनाति॥
(धम्मपद–२४, २१)

धर्म का दान सब दानों से बढ़ कर है; धर्म का रस सब रसों से प्रबल है; धर्म से प्रेम सब प्रेमों से उत्तम है; तृष्णा का विनाश सब दुःखों को जीत लेता है।

बाहितपापोति ब्राह्मणो समचरिया समणोति वुच्चति।
पब्बाजयमत्तनो मलं तस्मा पब्बजितोति वुच्चति॥
(धम्मपद–२६, ६)

जिसने पाप को धोकर बहा दिया है वह ब्राह्मण है; जो समता का आचरण करता है वह श्रमण है; जिसने अपने चित्त से मलों को हटा दिया है वह प्रव्रजित कहा जाता है।

न ब्राह्मणस्स पहरेय्य नास्स मुंचेथ ब्राह्मणो।
धि ब्राह्मणस्स हन्तारं ततो धि यस्स मुञ्चति॥ (धम्मपद–२६, ७)

...ब्राह्मण पर प्रहार नहीं करना चाहिए और ब्राह्मण को भी उस ...प्रहार करने वाले पर क्रोध नहीं करना चाहिए। जो ब्राह्मण को मारता ...उसको धिक्कार है और जो ब्राह्मण उस मारने वाले पर क्रोध करता ...उसे भी धिक्कार है।

नत्थि रागसमो अग्गि नत्थि दोससमो गहो।
नत्थि मोहसमं जालं नत्थि तण्हासमा नदी॥ (धम्मपद–१८, १७)

...राग के समान कोई आग नहीं; द्वेष के समान कोई ग्रह (भूत) नहीं; ...मोह के समान कोई जाल नहीं और तृष्णा के समान कोई नदी नहीं।

इसयो पुब्बका आसुं सञ्ञतत्ता तपस्सिनो।
पंच काम गुणे हित्वा अत्तदत्थं अचारिसुं॥
न पसू ब्राह्मणानासुं न हिरञ्ञं न धानियं।
सज्झायं धनधञ्ञासुं ब्रह्मं निधिमपालयुं॥

...पहले के ऋषि लोग बड़े संयमी और तपस्वी होते थे। वे अपने को ...वश में रखते थे। ब्राह्मणों के पास पशु, सुवर्ण, धान्य आदि नहीं होते ...थे। स्वाध्याय ही उनका धन था और वे ब्राह्म निधि की भलीभांति ...रक्षा करते थे।

...वेद, उपनिषद् गीता आदि हिन्दू धर्म के ग्रन्थों की शिक्षायें भी इससे ...भिन्न नहीं हैं। अनेक स्थानों पर तो दोनों की शिक्षायें शब्दशः एक ...दूसरे से मिल जाती हैं, जैसा कि निम्न उद्धरणों से प्रगट है:—

एकोदिभूतो करुणाधियुत्तो निरामगन्धो विरतो मेथुनस्मा।
एत्थ ठितो एत्थ च सिक्खमानो पप्पोति मच्चो अमतं ब्रह्मलोकं ति॥
(दीघ निकाय)

...अर्थात् ममता को छोड़ कर एकान्त में रहना, करुणाभावयुक्त ...होना, पापों से अलग रहना तथा मैथुन कर्म से विरत रहना (ब्रह्मचर्य ...पालन)—इन्हीं का अभ्यास कर मनुष्य अमृत ब्रह्मलोक को प्राप्त ...करता है।

...इसी भाव को लिये हुए प्रश्नोपनिषद् का निम्न अवतरण है:—

तेषामेवैष ब्रह्मलोकः येषां तपः सत्यं येषु ब्रह्मचर्यं प्रतिष्ठितं।
तेषामसौ विरजो ब्रह्मलोको न येषु जिह्ममनृतं न माया॥

...अर्थात् इस ब्रह्मलोक (मोक्ष) की प्राप्ति उनको ही होती है जिन ...में कुटिलता, असत्य और अविद्या नहीं है तथा जिनमें तप, सत्य और ...ब्रह्मचर्य है।

सब्बे सत्ता सुखी होन्तु सब्बे होन्तु च खेमिका।
सब्बे भद्राणि पस्सन्तु मा कञ्चि दुखमागमा॥

...सब प्राणी सुखी हों, सब निरोग हों, सब मंगल प्राप्त करें, कोई भी ...दुःखी न हो।

...इसी भाव का निम्न संस्कृत श्लोक बहुत प्रसिद्ध है:—

सर्वे भवन्तु सुखिनः सर्वे सन्तु निरामयाः।
सर्वे भद्राणि पश्यन्तु मा कश्चित् दुःखभाग् भवेत्॥

न हि वेरेण वेराणि सम्मन्तीध कुदाचन।
अवेरेण सम्मन्ति एस धम्मो सनन्तनो॥ (धम्मपद—१, ५)

...वैर से वैर कभी शान्त नहीं होता; वह अवैर से ही शांत होता है, ...यह सनातन धर्म है।

इसी भाव का मनुस्मृति में यह श्लोक है:—

क्रुध्यन्तं न प्रतिक्रुध्येदाक्रुष्टः कुशलं वदेत्।

अर्थात् क्रोध करने वाले पर क्रोध न करे, गाली देने वाले को भी आशीर्वाद दे।

अक्कोधेन जिने कोधं असाधुं साधुना जिने।
जिने कदरियं दानेन सच्चेनालीकवादिनं॥ (धम्मपद—१७, ३)

अर्थात् अक्रोध (क्षमा) से क्रोध को जीते, असाधु को साधुता से जीते, कंजूस को दान से जीते और झूठ बोलने वाले को सत्य से जीते।

बिलकुल इसी भाव का तथा इन्हीं शब्दों में महाभारत का यह श्लोक है:—

अक्रोधेन जयेत्क्रोधम् असाधुं साधुना जयेत्।
जयेत्कदर्यं दानेन जयेत् सत्येन चानृतम्॥

न तेन थेरो होति येनास्स पलितं सिरो।
यम्हि सच्चं च धम्मो च अहिंसा संयमो दमो॥ (धम्मपद–१६, ५)

सिर के बाल पकने से कोई स्थविर नहीं होता। जिसमें सत्य धर्म, अहिंसा, संयम और दम हो तथा जो मलरहित और धीर हो वही स्थविर है।

बिलकुल इसी भाव का तथा इन्हीं शब्दों में मनुस्मृति का निम्न श्लोक है:—

न तेन वृद्धो भवति येनास्य पलितं शिरः।
यो वै युवाप्यधीयानः तं देवाः स्थविरं विदुः॥

न जच्चा वसलो होति न जच्चा होति ब्राह्मणो।
कम्मना वसलो होति कम्मना होति ब्राह्मणो॥

जन्म से न कोई ब्राह्मण होता है और न नीच होता है। कर्म से ही मनुष्य ब्राह्मण होता है और कर्म से ही नीच।

न जटाहि न गोत्तेहि न जच्चा होति ब्राह्मणो।
यम्हि सच्चं च धम्मो च सो सुची सो च ब्राह्मणो॥
(धम्मपद—२६, ११)

न जटा से, न गोत्र से, न जन्म से ब्राह्मण होता है। जिसमें सत्य है और धर्म है वही पवित्र है और वही ब्राह्मण है। यही भाव महाभारत के निम्न श्लोकों में भी है:—

न योनिर्नापि संस्कारो न श्रुतं न च सन्ततिः।
कारणानि द्विजत्वस्य वृत्तमेव तु कारणम्॥
वृत्ते स्थितश्च शूद्रोपि ब्राह्मणत्वं स गच्छति।

ब्राह्मण कुल में जन्म, संस्कार, विद्या यह सब ब्राह्मणत्व के कारण नहीं हैं। किन्तु ब्राह्मणोचित सदाचार ही उसका कारण है। जो सदाचार में स्थित है वह शूद्र भी ब्राह्मण बन जाता है।

सत्यं दानमथाद्रोह आनृशंस्यं त्रपा घृणा।
तपश्च दृश्यते यत्र स ब्राह्मण इति स्मृतः॥
शूद्रे चैतद् भवेल्लक्ष्म द्विजे तच्च न विद्यते।
न वै शूद्रो भवेच्छूद्रो ब्राह्मणो नैव ब्राह्मणः॥

सत्य, दान, अद्रोह, अक्रूरता, बुरे कामों से लज्जा, दया, तप आदि गुण जिसमें दिखायी दें, वही ब्राह्मण है। यदि शूद्र में ये गुण दिखायीं

हैं और ब्राह्मण में नहीं तो वह शूद्र कुलोत्पन्न शूद्र नहीं है और वह ब्राह्मण ब्राह्मण नहीं हैं।

अत्ता हि अत्तनो नाथो अत्ता हि अत्तनो गति।
तस्मा सञ्ञमयत्तानं अस्सं भद्रं व वाणिजो ॥ (धम्मपद-२५,२१)

मनुष्य अपना स्वामी आप है, अपनी गति आप ही है। इस लिए अपने को संयमी बनाये, जैसे कि अपने सुंदर घोड़े को व्यापारी संयत रखता है।

यही भाव गीता के निम्न श्लोक में हैं—

उद्धरेदात्मनात्मानं नात्मानमवसादयेत्।
आत्मैव ह्यात्मनो बन्धुरात्मैव रिपुरात्मनः॥ (गीता—६, ५)

मनुष्य को चाहिए के वह अपना उद्धार आप ही करे, वह अपनी अवनति आप ही न करे। क्योंकि प्रत्येक मनुष्य स्वयं अपना बन्धु है और स्वयं अपना शत्रु है।

अहिंसका ये मुनयो निच्चं कायेन संवुता।
ते यन्ति अच्चुतं ठानं यत्थ गत्वा न सोचरे॥ (धम्मपद-१७,५)

जो मुनि लोग अहिंसक तथा सदा शरीर को वश में रखते है वे उस अच्युत स्थान (जिस स्थान पर पहुँच कर फिर गिरना नहीं होता) को प्राप्त होते हैं, जहाँ जाकर फिर शोक नहीं रहता।

इसी भाव का निम्न श्लोक गीतामें भी है :—

योन्त सुखोन्तरारामस्तथान्तर्ज्योतिरेव यः।
स योगी ब्रह्मनिर्वाणं ब्रह्मभूतोधिगच्छति॥ (गीता—५, २४)

जो अन्तःकरण में सुखी हो, जो अपने आप में आराम पाने लगे और जिसे अन्तः प्रकाश मिल जायं, वह योगी ब्रह्म रूप हो जाता है और उसे ब्रह्म निर्वाण अर्थात् ब्रह्म में मिल जाने का मोक्ष प्राप्त हो जाता है।

अभिवादनसीलिस्स निच्चं वुड्ढापचायिनो।
चत्तारो धम्मा वड्ढन्ति आयु वण्णो सुखं बलं॥

जो विनीत और अभिवादनशील है, जो सदा वृद्धों की सेवा करता है, उसकी चार बातें बढ़ती हैं—आयु, सौन्दर्य, सुख और बल।

बिलकुल यही भाव इन्हीं शब्दों में संस्कृत के निम्न श्लोक में है:-

अभिवादनशीलस्य नित्यं वृद्धोपसेविनः।
चत्वारि तस्य वर्द्धन्ते आयुर्विद्या यशो बलम्॥

बुद्ध भगवान् की पंचशील की शिक्षा निम्न प्रकार है :—

१—पाणातिपाता वेरमणी सिक्खापदं समादियामि।
२—अदिन्नादाना वेरमणी सिक्खापदं समादियामि।
३—कामेसु मिच्छाचारा वेरमणी सिक्खापदं समादियामि।
४—मुसावादा वेरमणी सिक्खापदं समादियामि।
५—सुरा-मेरय-मज्ज-पमादट्ठाना वेरमणी सिक्खापदं समादियामि।

१—मैं प्राणिहिंसा से अलग रहने की शिक्षा ग्रहण करता हूँ।
२—मैं चोरी से अलग रहने की शिक्षा ग्रहण करता हूँ।
३—मैं पर-स्त्री-गमनादि नीति-विरुद्ध कामाचार से अलग रहने की शिक्षा ग्रहण करता हूँ।
४—मैं झूट से अलग रहने की शिक्षा ग्रहण करता हूँ।
५—मैं मद्य आदि मादक द्रव्यों के सेवन तथा प्रमाद के स्थान, जुए आदि के खेल से अलग रहने की शिक्षा ग्रहण करता हूँ।

बौद्ध धर्म में पंचशील और पातंजल योग दर्शन में निर्दिष्ट पंच यम (पांच यम नियम) में कोई भेद नहीं है। जैसा कि निम्नलिखित पातंजल योग सूत्र से प्रगट है :—

अहिंसासत्यास्तेयब्रह्मचर्यापरिग्रहा यमाः।

अर्थात् अहिंसा (मन, वाणी और शरीर से किसी को कष्ट न देना) सत्य (सत्य भाषण तथा सत्य व्यवहार) अस्तेय (चोरी न करना) ब्रह्मचर्य (मन, वाणी और शरीर से ब्रह्मचर्य का पालन करना) और अपरिग्रह (अपने स्वार्थ के लिए ममतापूर्वक धन सम्पत्ति आदि का संचय न करना) ये पांच यम हैं।

भगवान् बुद्ध ने गोरक्षा पर भी बल दिया है जैसा कि ब्राह्मणधम्मिक-सुत्त के निम्न श्लोकों से प्रगट है :—

यथा माता पिता भाता अञ्ञे वापि च ञातका।
गावो नो परमा मित्ता यासु जायन्ति ओसधा॥
अन्नदा बलदा चेता वण्णदा सुखदा तथा।
एतमत्थवसं ञत्वा नास्सू गावो हनिंसु ते॥

जिस प्रकार माता, पिता, भाई और अन्य जाति बन्धु हैं उसी प्रकार गाय हम सबों की परम मित्र है। इनसे औषधि उत्पन्न होती हैं। गायें अन्न देने वाली, बल देने वाली, ओज देने वाली, सुन्दरता देने वाली तथा सुख देने वाली हैं। अतएव हितकारी समझ कर गायो को कोई कष्ट न दो।

ठीक इसी भाव का ऋग्वेद (गोसूक्त) का निम्नलिखित मन्त्र है :-

यूयं गावो मेदयथा कृशंचित् अश्रीरं चित् कृणुथा सुप्रतीकम्।
भद्रं गृहं कृणुथ भद्रवाचो वृहद् वो वय उच्यते सभासु॥
ऋग्वेद (६-२८-६)

हे गौओं! तुम निर्बल को सबल बनाती हो, कुरूप को सुरूप करती हो। हे भद्रवाणी वाली गौओं! तुम घर को सुखधाम बनाती हो और सभी समाजों में तुम्हारे अन्नदान को बहुत बखाना जाता है।

बौद्ध धर्म तथा हिन्दू धर्म में कितनी समानता और घनिष्ठता है इसका यहां केवल दिग्दर्शन मात्र कराया गया है। ऐसी दशा में हिन्दुओं और बौद्धों के बीच कटुता और द्वेष फैलाना कभी दोनों में से किसी के लिए भी हितकर नहीं है। भगवान् बुद्ध ने अपने उपदेशों में प्रेम, मैत्री, करुणा, दया अहिंसा पर सब से अधिक बल दिया है। इसके विरुद्ध राग, द्वेष, कटुता आदि फैलाना बुद्ध भगवान् की इन शिक्षाओं के विरुद्ध आचरण करना है। अतएत नवदीक्षित बौद्ध भाइयों से निवेदन है कि भगवान् बुद्ध की इन शिक्षाओं का पालन करें। तभी उनकी पंचशील की दीक्षा सार्थक होगी।

● चन्द्रमणि भिक्षु,
महास्थविर, कुशीनगर, देवरिया।

(पान २० वर.)

# काव्य कुसुमाञ्जलि :

कवि—प्राध्यापक पंडित माधवाचार्य
सिद्धार्थ कॉलेज, मुंबई.

है आत्मबोध महान, इससे भगे भ्रम भान।
लखि, मुक्ति पावै जीव, हो ब्रह्म सव गुण शीघ्र।
हो द्वैत या अद्वैत, पर मुक्त, बन्धातीत।
कर यही हृदयविचार, दे छोड़, सब संसार।

---

धन का न कर मान, कर ले मनुज दान,
भरले हृदय ज्ञान, हरि का भवन जान।

---

ब्रज के गुपाल, धरि पुष्प माल।
हम को दयाल, कर दो निहाल।'
महिमा अपार, नहिं पारवार।
चहुं ओर वाल, निरखें रसाल।
तुम हो कृपाल, जगके नृपाल।
करते उदार, बन में विहार।

---

श्रुत होहिं बुद्धि विलास, लखि नित्य ब्रह्म प्रकाश।
मिथ्या न भावै कोइ, चाहैं सुरस बहु होइ।'

---

प्रभु एक मोह भव करन।
तुम मन मोहन–भव तरन।
प्रकृति परे हो, दुख हरण।
दीन दयालो, मैं शरण।

---

जो भक्ति कहीं मैं पाता, अपनाता देर न होती।
अर्जुन सम होता तेरा, प्रज्ञा सब पातक धोती।
तू साथ सदा ही होता, मन बुद्धि और कृत्यों में।
मेरी मति तेरी अर्चा, करकर आनंदित होती।
ये लोभ मोह माया के, बन्धन सारे कट जाते।
कर सत्य प्रेम तुम मोहन, कहुं एकवार मिल जाते।

---

योग हमें अब भाया हो, मन से निकली माया हो।
चल चित्त रोकि, मन रोका, मति भी हो गई विशोका।
जब एकतानता भाई, देखी समाधि अधिकाई।
इस रस को कोई जाने, माये! मायेश बखाने॥

---

होता न जो सन् मार्ग से, विचलित कभी मति अंध हो।
तो विश्व में होता प्रकट, परिपूर्ण शक्त महेन्द्र हो।
आशा न होती इष्ट की, नैराश्य भी वे भान है।
इन्द्रादि गोचर की जहां, नहिं प्राप्ति तो-मतिमान हैं॥

---

भजन है सार भुवनों में,
यही सर्वस्व सुजनों में।
इसी की नाव से कलि में,
तरें भवसिन्धु इस भव में।

---

राधा रमण दर्श चित दै,
जीवन लाभ अरे नर लै।
भूल न उसे, विश्व में कभी,
जप ले नाम, समय है अभी।

---

सदा प्रकाशित—तेरा धाम,
तू ही करता—पूरण काम।
धरें भक्त जन—तेरा ध्यान।
सब से पाते—नित बहु मान।

---

चित्त वृत्ति ना—गहै विकार।
मूक साधना—बनै प्रकार।
कुत्सित भाव—न करैं प्रवेश।
तो हिरदे में—बसें ब्रजेश।

---

जो जग जीव गही मलिनाई।
सो बिन आत्मबोध नहिं जाई॥
अतो भक्तजन विमल विशंका।
सब तजि भक्ति गहैं निज अंका॥

---

भूपर न वेद – सा, ग्रन्थ अन्य,
पाया न कहीं – निजनाम धन्य।
अध्यात्म तत्त्व – अतिगूढ सत्त्व।
जिसने समझा – तोड़ा ममत्व।
उपनिषदें गी.ता – व्यास सूत्र।
हो कर सुकण्ठ – हो मोक्ष सूत्र।

---

अपनी चिन्ता छोड़ मनावै,
ज्ञानगम्य में समय बितावै।
बोलै सब से मीठी वानी।
सच्ची सीधी – सुधा समानी।

---

दिन में बैठो गिरि कन्दर में।
हरि को देखो मन मंदिर में।

गहरी निदिया प्रभुचिन्तन हो।
प्रेमाश्रुवारि – पदसिंचन हो।

---

कामिनी कंचन – यही जग जाल है।
पकड भी इनकी – महा विकराल है।
विश्व में वे ही – परम सुख पा गये।
जो न इन के वश – न उसको काल है।

---

सदा तू अकेला है – मित्र मेरे।
न साथी कोई – यहां साथ तेरे।
तुझे तेरे सुख दुःख ज्ञात होंगे।
राति के साथी नहीं प्रात होंगे।
समझ ले कि – दुनियाँ है एक कहानी।
नहीं सोच अपनी वो है वीरानी॥

---

अद्भुत प्रभा देख प्रियतम की,
सब कुछ भूला जाता हूं।
मुझे न पूछो, अभी मैं,
अपने रूप, समाता हूं।

---



तू है शुभ की मूर्ति, दया तेरा भूषण है।
सदा रहे निर्लेप, नहीं कोई दूषण है।
जो जन जपता तुझे, वही प्रिय ! तुझ को पावै।
तेरे सिवा न ताहि, यहाँ कुछ और सुहावै।
पहुंचै वह कृति सत लोक में,
जहाँ न मिथ्या शोक है
ओ ! मुक्ति भुक्ति अधिपति सदा–
तेरा उज्वल ओक है।

---

जीते हैं वे ही हरि के नहीं, रहा न जिनमें मान।
सोते है सुख से, छूटे दुख से भूले जग का मान।
पृथ्वी पर नभ में, सारे जग में, नहीं दूसरा काम।
निशि दिन मन तुझ में, राखि विलोकैं, छवि लोचन अभिराम।

---

तूं आनंदघन है, जीवन धन है, महिमा तेरी न्यारी।
तू पूर्ण ब्रह्म है, पूर्ण काम है, भक्ति तुझे है प्यारी।
जो तुझ को ध्यावैं, शुभ फल पावें, कमी न कोई भासै,
करि प्रिय अनुकंपा, भक्तहृदय में, जब तू आय प्रकाशै।

---

लगी हुई है सभा तुमारी, इसका भी कुछ ख्याल करो।
मेरा कहकर मुझे मत, इतना प्रिय ! पामाल करो।
तुमें सुमिरता मैं जीता हूँ, तुम मेरे जीवन स्वामी।
पार लगादो हरे समझलो। न हो तुमारी बदनामी।

---

प्रभो ! तेरे दर्शन, सदा चाहता हूँ।
दया तेरी रघुवर। सदा चाहता हूँ।
तुम्हीं हो दयालो ! दयासिन्धु निश्चल;
मैं तेरी शरण को–गहा चाहता हूँ।

( पान १८ वरून. )

- भिक्षु जगदीश काश्यप, नालन्दा।
- धर्माधार महास्थविर, बौद्ध धर्मांकुर विहार, कलकत्ता।
- भिक्षु तेंजो वातानावे, जापान सद्धर्म विहार, वर्ली नाका, बम्बई।
- पिन चाओ, चीना मन्दिर, सारनाथ
- चू लामा, तिब्बती बौद्धविहार, सारनाथ
- ऊ० कित्तमा, बर्मी बौद्ध विहार, सारनाथ।
- चेन छांग, चीना मन्दिर, सारनाथ।

( अखिल आर्य (हिंदू) धर्मसेवा संघ, देहली के सौजन्य से )

# धर्मचक्र

(The Wheel of the Moral Law)

[ बौद्ध शिकवण, जीवन व कला यांच्या विश्वसनीय दर्शनानें महात्माजींची मूलभूत शिक्षा सिद्ध करून दाखविणारें मराठींतील पहिलेंच मराठी-हिंदी सांस्कृतिक मासिक ]

• दर महिन्याच्या १५ तारखेस प्रसिद्ध होतें. •

मुख्य संपादक ( मराठी व इंग्रजी विभाग ), मुद्रक व प्रकाशक :

प्रा. ना. के भागवत, एम्. ए., ( मुंबई विश्वविद्यालय, पाली ग्रंथ प्रकाशन—सन्मान्य संपादक )

प्रा. शिवसहाय पाठक, एम्. ए., साहित्य रत्न, के. सी. कॉलेज : संपादक हिंदी विभाग

वर्ष १० वें ] १५ ऑक्टोबर, १९५७ [ अंक ३

## अनुक्रमणिका

### मराठी विभाग



### हिंदी विभाग



### World Religion Supplement :



### वर्गणीचे दर :

१ : भारतांत पोस्टेजसह रु. ५-०-०

२ : महाभारतांत पोस्टेजसह रु. ७-०-०

३ : किरकोळ अंकास ७५ नये पैसे

बुद्धजयंती विशेषांक रु. १-७५ नये पैसे (२४ मे १९५६ चा)

### जाहिरातीचे दर : ( एक वेळचे )

अत्यन्त सवलतीचे आहेत.

कृपा करून पत्र पाठवून तपास करा.

### वर्गणीदारांस विज्ञप्ति : ( वर्गणींत वाढ )

**वि. सूचना :** धर्मचक्राचा आकार, पृष्ठसंख्या व अन्तर्बाह्य सुधारणा यासंबंधी हा अंक पाहूनच आमच्या वर्गणीदारांची खात्री पटेल. ह्या वाढत्या खर्चामुळें १५ ऑगस्ट १९५६ पासून वार्षिक वर्गणी रु. पांच केली आहे हें येथें कळवीत आहोंत, अर्थात १५ ऑगस्ट १९५६ च्या पूर्वी झालेल्या वर्गणीदारांना ही वाढ १५ जुलै १९५७ पर्यंत लागू नाहीं, हें सांगणें नकोच ! धर्मचक्राचे वरील लोभ पूर्वीप्रमाणेंच आमच्या वाचकांनीं कायम ठेवावा, ही सविनय प्रार्थना !

ना. के. भागवत.

मुद्रक व प्रकाशक : प्रा. ना. के. भागवत, धर्मचक्र कार्यालय, सुगतनिधान, १५ वा रस्ता, प्लॉट नं. ४६३, खार, मुंबई २१

मुद्रण स्थळ : मुंबई वैभव प्रेस, सरदार वल्लभभाई पटेल रोड, गिरगांव, मुंबई, नं. ४

World Religion Supplement

# धर्मचक्र

THE WHEEL OF THE MORAL LAW

[ वर्ष १० वें ] १५ ऑक्टोबर १९५७ [ अंक ३ रा

## जिण्याचें सार्थक !

माझ्या जिण्याचें सार्थक झालें ।
धारातीर्थिं मरण मज आलें ॥ ध्रु० ॥

केलें युद्ध महा घनघोर
रात्रंदिन म्यां केला जागर ।
मनिं चिंता हि सदोदित फार
हरिनामाचा केला गजर ॥
माझ्या जिण्याचें सार्थक झालें ।
धारातीर्थिं मज मरण आलें ॥ १ ॥

कामासि दिला बहु मार
क्रोधावरि केलें वार ।
लोभासहि केला ठार
नरकाचीं द्वारें तीन केलि म्यां बंद ॥
सौ ख्य मि ळा लें ।
माझ्या जिण्याचें सार्थक झालें ।
धारातीर्थिं मरण मज आलें ॥ २ ॥

—अखेर

# संपादकीय

मागील महिन्याच्या ( सप्टेंबर ) तारीख ११ रोजीं परम पूज्य आचार्य विनोबा यांनीं ६२ व्या वर्षांत पदार्पण केलें ! महात्माजींच्या मागें त्यांनीं भारतांत साम्यवादाचीं रुजत चाललेलीं विषारीं मुळें नाहींशी करण्यासाठीं ' भूदान ' चळवळ सुरूं केली— ज्यांना जमिनी नाहींत त्यांना जमिनी द्या. त्यांना काम करीत राहून पोट भरण्याचें साधन मिळवून द्या. म्हणजे सर्वांचा उदय होऊन भारतांत शान्ति स्थापन करण्याचा प्रश्न सुटण्यास मदत होईल. इ. स. १९५१ च्या एप्रील महिन्यापासून त्यांनीं तेलंगणात प्रथम पदयात्रेला सुरुवात केली व १८ एप्रील ते जून २० पर्यंत तेलंगणांत त्यांनीं १२००० एकर जमीन भूदानांत मिळविली. त्याकाळापासून आजपर्यंत त्यांनीं पदयात्रेच्याद्वारें देशांत केवढी प्रचंड क्रान्ति घडवून आणली ! जयप्रकाश नारायणासारखे अधिकारी व कर्तबगार पुढारी त्यांना लाभल्यामुळें तर त्यांच्या या उपक्रमाचें महत्व जास्तच पटत चाललें आहे.

या सर्व पदयात्रेच्या योगानें आजपावेतों काय प्रगति झाली व पुढें काय करावयाचें याचा आढावा घेण्यासाठीं म्हैसूरपासून १० मैलावर असलेल्या येलवाल नांवाचें खेडें आहे, तेथे २० ते २२ सप्टेम्बर पर्यंत एक संमेलन भरलें होतें. त्याचे विनोबाजो हे अध्यक्ष होते. त्यासाठीं डॉ. राजेंद्रप्रसाद, पं. नेहरु, पंडित पंत, कॉंग्रेसचे अध्यक्ष श्री. ढेबर, केरळचे मुख्य मंत्री नंबुद्रीपाद वगैरे पुढारी उपस्थित होतें. तेथें भरलेल्या परिषदेनंतर जें पत्रक प्रसिद्ध झालें आहे त्यावरुन फार महत्वाची माहिती उपलब्ध होते. आतांपर्यंत ३००० ग्रामदानें मिळालीं आहेत. यापेक्षां हजारो पटीनें महत्वाचें कार्य म्हणजे किती माणसांच्या हृदयाचा पालट विनोबांनीं केला ! जमीनदारी व शेतकरी या दोघांच्याहि कल्याणाचे ते आशास्थान झाले आहेत. वारा असो, पाऊस असो. त्यांची यात्रा सुरूं आहे. एका कवीनें म्हटल्याप्रमाणें

Men may come men may go; I go on for ever !"

त्यांच्या विषयीं शंकराव देव म्हणतात—गांधी गेले व विनोबा प्रकटले; गांधींनीं सुरूं केलेल्या सौम्य, सौम्यतर व सौम्यतम सत्याग्रहाची धुरा विनोबांनीं आपल्या खांद्यावर घेतली. श्री. पु. ह. पटवर्धन म्हणतात— विनोबांचें जीवन व कार्य पाहिलें कीं, उपनिषदांतील ऋषी किंवा शंकराचार्य–रामानुज परंपरेंतील एखादा प्रतिभासंपन्न धर्मप्रवर्तक किंवा तुकाराम–ज्ञानेश्वरांच्या परंपरेंतील भगवद्भक्त पुन्हां अवतरला आहे असें वाटतें. आम्ही म्हणतों–विनोबांनीं भूदान आंदोलनानें जें धर्मचक्रप्रवर्तन सुरूं केलें आहे, त्यावरून त्यांची तुलना एखाद्या बोधिसत्वाशी करावीशी वाटतें. ज्याप्रमाणें बोधिसत्व हा परदुःखहरण हें ध्येय डोळ्यापुढें ठेऊन अमूप करुणेनें प्रेरित होतो व त्यासाठीं त्या सेवेस आपला देह सर्वस्वी लावतो, त्याच्या कृतींत गर्वाचा लेश नसतो, त्याप्रमाणें विनोबाचें सर्व जीवन बोधिसत्वाच्या जीवनावर आधारलेलें आहे. पंडितजी २३ तारखेस हैद्राबाद येथील विश्वविद्यालयीन विद्यार्थ्यांपुढें भाषण करतांना बोलले तेंच खरें वाटतें. ते म्हणाले–आज सकाळीं मी आचार्य भावे यांचा निरोप घेण्यास गेलों. तेव्हां मला मानवाचा आत्मा किती थोर आहे, हें दिसून आलें. त्यांच्याकडे पाहून मला महात्मा गांधींचें स्मरण झालें ! गांधीजींचें आत्मतेज हें अणुबॉंब पेक्षांहि अधिक सामर्थ्यशाली होतें. मी विनोबांना पदयात्रेंत पाहिलें आहे. तेव्हां त्यांचे ठायीं मला मानवी आत्म्याची शक्ति नकळत पण प्रभावीपणें कसा बदल घडवून आणते हें दिसून आलें !" विनोबांचा जन्म १८९४ सालीं झाला. या सर्व आयुष्यांत त्यांची कमाई म्हणजे त्यांनीं मिळविलेलें सन्तपण ! सामाजिक ऐक्य साधण्याकडे त्यांचें लक्ष सर्वस्वी लागून राहिलें आहे. सरकारी धोरणहि ग्रामदान चळवळीला विरोधी नसून पोषकच आहे. त्यांच्या या वर्षीच्या वाढदिवसांत विशेष स्वारस्य आहे. आपल्या भूदान आंदोलनांतील एक पर्व पुरें होऊन, आतां ते महाराष्ट्रांत दौरा काढणार आहेत. तेलंगणांतील लोकांचीं मनें ज्यांनीं बदलून टाकलीं, त्या विनोबांना महाराष्ट्रांत यश मिळावें व त्यांच्या या पदयात्रेच्या निमित्तानें कां होईना, महाराष्ट्राची विसकटलेली घडी पुन्हां बसावी, अशी आम्ही प्रार्थना करीत आहोंत. अशारीतीनें भारताच्या या "कल्याणमित्राला", "या बोधिसत्वाला" "करुणासागराला" "आत्मत्यागाच्या देहधारी अवताराला" उदंड आयुष्य व कार्य करण्याचें बळ लाभों, व भारताच्या या नवीन मिळालेल्या स्वातंत्र्यास स्वास्थ्य व स्थिरता मिळण्याचे कामीं त्यांचें मार्गदर्शन प्रभावी ठरो, अशी प्रार्थना ! आचार्य विनोबांनी "धर्मचक्राला" पहिला आशीर्वाद दिला आहे; म्हणून त्याचें ऋण "धर्मचक्र" विसरूं शकणार नाहीं. त्यांना आमचे शतशः प्रणाम !

× × ×

मागील महिन्यांत पंडित सातवळेकर यांच्या अखंड क्रियाशील जीवनाला ९० वर्षें पुरीं झालीं. या प्रसंगानें मुंबई येथें त्यांच्या गौरवार्थ एक मोठा सूचक समारंभ घडून आला. पंडितजींचें कार्य कोणतें असा प्रश्न अजूनहि लोक विचारतात. वेदांचा अभ्यास पोटाकरितां ? जुन्या भाष्यकारांची री ओढण्याकरितां ? विशिष्ट सांप्रदायाप्रमाणेंच वेदांचा अर्थ लावण्याकरितां ? किंवा डॉक्टरी मिळविण्यासाठीं ? पण पंडितजींची पद्धति डोळस व यहून अगदीं भिन्न आहे. राष्ट्राचें कल्याण होण्यास वेद, रामायण व महाभारत या ग्रंथांतील तेजस्वी आदर्शवाद लोकांच्या आचरणांत उतरला पाहिजे. हें होणार कसें ? व केव्हां ? त्यांनीं तर प्रयत्न चालविला आहे, त्याप्रमाणेंच त्यांच्या विचारसरणीशीं सहमत होणाऱ्या ज्या संस्था आहेत त्यांनींही तरुण पिढीवर परिणाम करणाऱ्या सर्व साधनांनीं उद्योग

आहे :— भारत लढवय्या झाला पाहिजे, विजिगिषु झाला पाहिजे, सर्व विश्व जिंकण्याची महत्वाकांक्षा त्यानें धरली पाहिजे, "शठं प्रति शाठ्यम्" ह्या विचार पद्धतीचा त्यानें अवलंब केला पाहिजे— ह्या उद्देशानें वेदांचा अभ्यास करून लढाऊ राजकारणाचा संदेश वेदांचे मार्फत पोहोंचवला पाहिजे. यूरोप खंडांतहि असा लढाऊ राजकारणाचा मोका हिटलर, मुसोलीनी यांनी उत्पन्न केला होता. त्यानंतरच महायुद्धें झालीं व मनुष्य हा शुद्धीवर आला, लाखों माणसें मेलीं, संपत्ती नष्ट झाल्या, जीवन विस्कळीत झालें, बेचिराख अरण्या- सारखे यूरोप खंड झाल्यावर नवीन विचारसरणी (माणुसकीच्या धर्माची) तेथें जागृत झाली. पंडितजींना पुन्हां लढाऊ राजकारण भारतांत सुरू करावयाचें आहे असें म्हणतात! पण त्याबरोबरच पुढील जोखीमहि पत्करावयास सर्व भारत तयार होईल काय? हा प्रश्न विचारणीय आहे. भारतीय अन्य धर्मांनीं नैराश्यवाद व पलायनवाद शिकविला; पण त्याबरोबरच उच्च प्रकारचा ध्येयवाद व आशावादहि दिला, ही गोष्ट डोळेझांक करून चालावयाची नाहीं. 'सर्वं दुःखं, सर्वं क्षणिकं' हा केवळ बौद्धाचा नसून उपनिषदांचाहि तो वाद आहे. नैराश्य- वादाची बैठक घेऊन त्यावर क्रियावाद व विश्वधर्मवाद शिकविणाऱ्या बुद्धानें त्यावर आपलें शिक्कामोर्तब केलें व २५०० वर्षानंतरहि बौद्ध धर्माचा स्वीकार डॉ. आंबेडकर व त्यांचे लाखों अनुयायी करीत आहेत, हे सत्य डोळेआड करून चालायचें नाहीं. पंडितजींनीं वेदाभ्यासासंबंधी भार- तांत नवा दृष्टिकोण निर्माण केला हे खरें! राष्ट्रीयतावाद म्हणजेच वेदांचा अर्थ हा अट्टाहास आजच्या युगांत मान्य होण्यासारखा नाहीं. **खरा ध्येयपणा हा माणुसकींत आहे**. हजारो लोकांची कत्तल करून किंवा हजारो टन दारूगोळा उडवून लढाई जिंकली, हा विजयाचा पौराणिक दण्डक कोणीहि शिकवण्यासारखा राहिला नाही. "वेदाभ्यास जड," हें एक टोक, तर "वेद विश्व जिंकण्याकरितांच होत," हें दुसरें टोक! या दोन्ही टोकांमध्ये वेदाचा अभ्यास बसविण्याचा प्रामाणिक यत्न झाला, तर "आम्ही श्रेष्ठ" असला अहंगड नाहींसा होईल. "आम्हांला दुसऱ्याकडून कांहींच शिकण्यासारखें नाहीं. आम्ही स्वयंपूर्ण आहोंत. दुसऱ्यांनीं आमच्या पायाशीं यावें, मग त्यांना आम्हीं तत्वज्ञान शिकविणार व मग सर्व मानवजातीचा विकास होणार!" असल्या वृत्तीचीं माणसें अजून भारतांतच सापडतात व तशीच तीं दक्षिण आफ्रिकेंतील वसाहतवाद्यांतहि सांपडतात. पाश्चात्यांनीं वेदांचा अभ्यास लाखों रुपये खर्च करून जो केला व उत्तम रीतीनें, व शास्त्रीय रीतीनें संपादित करून जे ग्रंथ उपलब्ध करून दिले ते आमच्या अहंगडांच्या पूर्ततेकरितां नव्हे, तर मानवीजीवनाचा व मानवजातीचा विकास कसा होतो याचें सम्यक् ज्ञान करून घेऊन त्यावर मानवशास्त्राचे मूलभूत सिद्धान्त शोधून काढण्यासाठीं होत. वेदांचा संदेश सर्वत्र गेला पाहिजे, असें आम्हींहि म्हणतों. पण तें कशाकरितां? वेदांतील सिद्धान्त दिक्काल यांच्या बंधनानीं आंखडलेले नाहींत. त्यांतील संदेश विश्वांतील मानव जातीचें रहस्य ओळखून त्यांच्यांत प्रेमभावाचा संचार उत्पन्न होण्याकरितां आहे. आमचे सर्व विचार, उच्चार व आचार मानवतावादाच्या पातळीवरूनच घडून आले पाहिजेत. गोरा, काळा, तांबडा असल्या रंगवर्णावरून मानवाची उच्चनीचता किंवा उन्नति अवनति अजमावयाची नसून मानवाच्या एका विशाल व व्यापक दण्डकानेंच ती अजमावयाची आहे. वेदांच्या उर्ज्वस्वलतेंत

आडमुठेपणा किंवा एकांड्या शिलेदाराची वृत्ति नसून तींत परस्परा- विषयींची उदारता, सहकार्य करण्याची जातिवंत स्फूर्तता, 'विश्वचि माझें घर' या सारखी खरीखुरी ध्येयनिष्ठता, विश्वकल्याण साधण्याकरितां निरपेक्ष व अहंभावनिरस्त अशी बोधिसत्वचर्या तींत सामावलेली आहे. ती वर्ण, जात, पोषाख, रीतरिवाज यासारख्या बाह्य उपाधीवर अवलंबून नाहीं. ती सर्व मानवजात सामान्यतेवर आधारलेली आहे. सप्तसिंधूच्या निसर्गरमणीय प्रदेशांत ज्या आर्यांची प्रतिभा उस्फूर्त होऊन त्यांनीं ऋग्वेदाची सुंदर सूत्रें गाइलीं, त्या लोकांचें अन्तर्दर्शित्व व विश्व- कल्याणाची आर्तता ही कोणीकडे, तर आज हिंदू, जैन, बौद्ध असल्या बाह्य उपाधींवर बोट ठेऊन, आमच्या लोकांच्या अवनतीची मीमांसा करण्याचा एक देशीय अतएव अपूर्ण व अशास्त्रीय प्रयत्न कोणीकडे? भगवान् बुद्धानें ऋषींचा धर्म-मूळच्या स्वरूपांतील-डोळ्यापुढें ठेऊन मानवकल्याणावर आपली दृष्टि केन्द्रित केली व वेदांतल्या खऱ्या विश्व- धर्माची उद्घोषणा करून भारतीय वैदिक संस्कृति विश्वाच्या काना- कोपऱ्यांत नेऊन पोहोंचविली. आम्ही मात्र इतर जंजाळांत सांपडून अडकून पडलों. तोच आमचा धर्म विसरून "ब्रह्मसत्यं जगन्मिथ्या" याच्या काथ्या- कूटांत मग्न झालों व आमच्या खऱ्या संबंधाला (धर्माला) विसरलों! म्हणून पंडितजींचें अभिनंदन आम्ही आज जें करीत आहोंत, ते यासाठीं कीं त्यांनीं आमची भारतीयांची दृष्टि आपल्या ग्रंथाकडे खेंचून घेतली व त्यांच्यांत आपल्या पूज्य ग्रंथाबद्दल आदर व अभिनवेश निर्माण केला! आमच्या समाजांत अशा आत्मपरित्यागेनापि कार्य करण्याची वृत्ति अगोदरच दुर्मीळ व जरी असली तरी अल्पजीवी. पण पंडितजींच्या ध्येयनिष्ठेच्या प्रखरतेनें त्यांनीं नेत्रदीपक असें कार्य करून भारताच्या सुपुत्राचें कर्तव्य करून जें मातेचें ऋण अंशतः फेडण्याचा यशस्वी प्रयत्न केला, त्याबद्दल आम्हीं त्यांचें अभिनंदन करतों व त्यांना दीर्घायुष्य चिन्तितों! विश्वधर्माचा प्रसार करण्याच्या कामीं आपल्या उर्वरित आयुष्याचा त्यांनीं उपयोग करावा व विश्वऋण फेडावें अशी त्यांना विनंति करतों! जीवस्तु सरदं सतं।

× × ×

बुधवार २ ऑक्टोबर रोजीं महात्मा गांधींची ८८ वी जन्मजयंती सर्व भारतांत व जगांत, जेथे जेथे भारतीय प्रजा राहते तेथें तेथें, मोठ्या भावनात्मकतेनें साजरी करण्यांत आली. मुंबई व उपनगर येथें सर्वत्र गांधीजींच्या जयन्तीच्या निमित्तानें शाळा, संस्था, कल्याणकेंद्रें व इतर ठिकाणें जनसंमर्दानें गजबजून गेलीं होतीं. ध्वजवंदन, सार्वजनिक सभा, सामुदायिक सूतकताई, प्रार्थना संगीत वगैरे नेहमीचे कार्यक्रम पार पडले. त्या दिवशी मुंबईंत तीन देवळें हरिजनांना खुलीं करण्यांत आलीं— महालक्ष्मी, बाबुलनाथ आणि माधवबाग. हीं आतांपर्यंत हरिजनांना खुलीं नव्हतीं. अस्पृश्यता गेली पाहिजे ह्याची वाढती जाणीव जनतेस होत आहे, यांची ही घटना म्हणजे प्रत्यन्तरें होत. मुंबई कॉंग्रेस समितीचे अध्यक्ष श्री. के. के. शहा यांनीं झेंडावंदन करतांना सर्वांना आवाहन केलें. गांधीजींनीं जी विधायक कार्याची योजना आंखली होती तिची प्रगति व विकास करण्यासाठीं आपलें जीवन खर्च करण्याचा त्यांनी सर्वांना उपदेश केला. गांधीजींचें विधायक कार्य जर मूर्तस्वरूपांत आणतां आलें, तर देशांतील बेकारी व दारिद्र्य नाहींशीं होण्यास खात्रीनें मदत होईल. जैन साधू आचार्य

विजय वल्लभ सूरि म्हणाले—गांधीजींचा संदेश जीवनांत उतरविण्याचा प्रामाणिकपणे सर्वांनी प्रयत्न करावा व त्यांची ध्येयें प्रत्यक्षांत दिसतील या साठीं आटोकाट झटावें. "पीपल्स हॉल" मध्यें सामुदायिक सूत कताईचा कार्यक्रम पार पडला. भारताच्या राजधानींत राजघाटावरील समाधीचें दर्शन हजारों लोकांनीं घेतलें व राष्ट्रपित्याला वंदना दिली. पंडित नेहरू हजर राहून त्यांनी तासभर सूत कातलें. पुष्पांच्या माळाचा खच पडला! युगोस्लोव्हाकियाचे उपाध्यक्ष यांनीं पुष्पमाला अर्पण केली! राष्ट्रपति-भवनांत डॉ. राजेंद्रप्रसाद व त्यांचे कुटुंबियांनीं भजनें गाइली व महात्मा-गांधींच्या आत्मचरित्रांतील उतारे वाचून दाखविले. सेवाग्राम येथें मोठाच समारंभ झाला! अखिल भारतीय भूदान पदयात्रा संपवून तेथें सर्वजण उपस्थित होते. गांधीजींच्या झोंपडीच्या बाहेर जाहीर सभा होऊन तिचे अध्यक्ष श्री. ढेबर यांनीं स्वीकारलें. तेथें श्री धीरेन्द्र मुझु-मदार, श्री चेरियन थॉमस, डॉ. सुशीला नायर, व राष्ट्रसंत वंदनीय तुकडोजी महाराज यांची भाषणें झालीं. शिलॉंग, अलहाबाद, राजकोट, अहमदाबाद, पाटणा, एर्नाकुलम्, लंडन वगैरे ठिकाणीं सभा झाल्या. गांधीजी जसे जसे काळान्तराने दूर दूर जात आहेत तसे तसे त्यांची मूर्ति जवळ जवळ येत आहे. भारताला राजकीय, सामाजिक, आर्थिक, धार्मिक ज्या समस्या भेडसावित आहेत, त्यांच्यायोगाने गांधीजींच्या उपस्थितीची जाणीव जास्त जास्त तीव्रतेनें भासत आहे. कांहीं लोकांच्या मतें गांधीजींची स्मृति आता अंधुक अंधुक होत आहे. व दरवर्षींचा गांधीजयन्तीचा कार्यक्रम एक मामुली बाब होऊन राहिली आहे, व तिच्यांत आता भावनेचा जीवंत जिव्हाळा राहिला नाहीं. पण आम्हांस ह्यांत सत्य वाटत नाहीं. उलट जसजसें भारतांत पक्षोपपक्ष निर्माण होत आहेत, व त्यांचे एकमेकांमधील संघर्ष वाढत आहेत, तसतशी, या सर्वांना पायबंद घालणारीं एकच महान विभूति होती व ती म्हणजे महात्माजी, याची जाणीव आतां प्रत्येक पक्षालाही होऊं लागली आहे. हें जें गांधीजीच्या स्मृतीचे सर्वत्रीभवन, हेंच गांधीजीवनाचें रहस्य होय! मदनाला शंकरानें जाळल्यावर जसा तो मनोभव झाला, तसाच गांधीजींचा पार्थीव देह गेला तरी त्यांचे अस्तित्व व उपस्थिति दरवर्षीं **सर्वांना सारखीच** भासत आहे. त्यामुळें कोणत्याहि पक्षाच्या पुरस्कारानें प्रगट सभा भरली असली व त्या सभेंत कॉंग्रेसवर कितीहि शिव्याशाप पाखडल्या गेल्या, तरी त्याबरोबरच गांधीजीवर स्तुतिसुमनें उधळल्याशिवाय ती सभा पारच पडत नाहीं! आतां हें खरें कीं, गांधीजींच्या कांहीं कट्टर अनुयाया-प्रमाणें खादी, सूतकताई, वगैरे गांधी तन्त्राच्या बाबी सर्व लोक पाळीत नसतील. तरी गांधीजींची शिकवण, त्यांची हिमालयाची उंची, अखिल मानवजातीला उपयोगी पडणारी शिक्षा—व तिच्याशिवाय जागतिक शान्ति निर्माण होणार नाहीं किंया लाभणार नाही, याविषयीची बालंबाल खात्री, ह्या गोष्टींची प्रतीति म्हणजे गांधीजींच्या वैयक्तिक महनीयतेचा विजय होय! गांधीजींनी जगाच्या वैचारिक संपदेत महत्वाची भर टाकली ही गोष्ट कोणीहि नाकबूल करीत नाहीं. असा हा युगपुरुष आम्हांस वारंवार स्फूर्ती देवो व आम्हीं मिळविलेलें नवीन स्वातंत्र्य बाळसेदार करो व आमचा भविष्यकाळ सर्वांस उन्नतिप्रद होंवो, हीं प्रार्थना आम्हीं या निमित्तानें करीत आहोंत. 'अहह महतां निस्सीमानश्चरित्रविभूतयः।' हें त्रिवार सत्य!!!

× × ×

मागील महिन्यांतील 'लोकमान्यां'त धर्मचक्रावर जो अभिप्राय आला आहे, तो आम्ही खालीं छापला आहे. ९ वर्षे जनतेची सेवा केल्यावर व दहावें वर्षांत पदार्पण केल्यावरहि महाराष्ट्रीय वृत्तपत्राच्या जगतांत **एकतरी वृत्तपत्र असें सांपडावें कीं**, त्यानें धर्मचक्राचे मूल्यमापन निर्विकारमनानें करावें. **हीच आमची दहा वर्षांतील कमाई, असें आम्ही समजतों; व त्या वृत्तपत्राचे आभार मानतों.**

---

# धर्मचक्र

प्रा. ना. के. भागवत व प्रा. शिवसहाय पाठक यांच्या संपादकत्वाखालीं निघणाऱ्या 'धर्मचक्र' या मासिकाचा दहाव्या वर्षाचा पहिला अंक गेल्या स्वातंत्र्यदिनीं प्रसिद्ध झाला आहे. संकुचित जातिभाषा, पंथा-दिकांच्या अभिमानास बळीं न पडतां बुद्ध, ज्ञानेश्वर, तुकाराम, गांधीजी इत्यादि संत–महात्म्यांनीं उपदेशिलेली विचारसरणी जनतेपुढें ठेवणें आणि सर्वसमावेशक, सहिष्णु व प्रेमप्रेरित धर्माचा मार्ग लोकांना दाखविणें हें या मासिकाचें सर्वसामान्य स्वरूपाचें कार्य आहे. गेलीं नऊ वर्षे हें कार्य हें मासिक करीत असून प्रतिकूल परिस्थितीला तोंड देऊन संपादकांनी तें धैर्यानें आणि उत्साहानें चालविलेलें आहे. मासिकांत मराठी, हिंदी व इंग्रजी असे तीन विभाग आहेत. तिन्ही विभागांत व्यासंगपूर्ण आणि वाचनीय लेख येत असतात. मासिकाचें सोज्वल, सात्त्विक आणि सुसंस्कृत स्वरूप लक्षांत घेऊन वाचकांनीं खरोखरी या मासिकाला आस्थेनें सतत आश्रय दिला पाहिजे. चालू अंकांत 'श्री तुकाराम विश्वविद्यालय संघा'ची माहिती आली आहे. हा संघ निर्माण होण्यास 'धर्मचक्रा'ची प्रेरणा कारणीभूत झाली आहे. धर्मचक्राच्या या उज्ज्वल अपत्याला सर्वांनीं उदारहस्तें साहाय्य करणें अगत्याचें आहे. धर्मचक्र आणि श्री तुकाराम विश्वविद्यालय या दोहोंनीं चालविलेल्या सात्त्विक आणि समाजहितकर कार्याला संस्कृतिप्रेमी सज्जनांनीं अहमहमिकेनें पुढें होऊन प्रोत्साहन दिलें पाहिजे.

—द. पा. खांबेटे.
('लोकमान्या' वरून)

# साभार स्वीकार :—

## मराठी विभाग

(१) **प्रेमानन्द** : ( नैतिक, आध्यत्मिक व भक्तिप्रेमधर्मास वाहिलेलें मासिक )–संपादक-साधुदास, वर्ष १ लें, अंक ६ वा सप्टेंबर १९५७.

या ल्हानशा मासिकाची बैठक भावनात्मक कृति करण्यास मदत करणारी आहे. त्याचा उद्देश बहुजन समाजांत लोकभाषेंत सत्यसाहित्यांचा अल्पमूल्यांत प्रचार करणें. भाविकजनांनीं या तार्किक मतवादी लोकांचा नाद सोडून टाकून द्यावा असा उपदेश केला आहे. यमधर्म नियमधर्म पाळण्यांतील मुख्य अडचण इन्द्रियविषयाधीनता ही होय. यांत कर्मयोग व ज्ञानयोग हे तर या युगांत आक्रमणें "**कठिणतर**" झालें. म्हणून भक्तिमार्ग हा सोपा आहे व त्याचा स्वीकार करणें सर्वांनाच उपकारक आहे. "समाधिमंदिरें" यांत चिदानन्द रस व प्रेमानंद रस याचें अनुकरण करणेंच श्रेयस्कर होय. गुणदोष पाहूं नयेत. यांत दुसऱ्याचे गुणदोष पाहून आपली पारमार्थिक हानी करून घेऊं नये हें बहुमोल तत्त्व शिकविलें आहे. सेनाजी महाराजांचें चरित्र फारच रसाळ आहे. द्वादश भागवत संताची नामस्मरणी देऊन प्रत्यकाची थोडक्यांत ओळख करून दिली आहे. ही नामावली प्रख्यात "परम भागवतान् स्मरामि" याहून निराळी आहे. बलिप्रतिपदेची कथा सूचक आहे. खरोखरच रोजच्या व्यवहारांत व धकाधकीच्या मामल्यांत जर अशीं मासिकें सामान्य संसारीमाणसानें वाचलीं, तर खरोखरच भारतीय संस्कृतीचें सम्यक ज्ञान होऊन त्रिविध कल्याण साधण्यास मदत होईल. मासिकाचें आम्ही अभिनन्दन करतों.

(२) **स्थानिक स्वराज्य** ( मराठी ) सप्टेंबर १९५७. यांत स्थानिक-स्वराज्याच्या विविध अंगाची चर्चा उद्बोधक आहे. "पंचायतीच्या उत्पन्नाचीं साधनें", "ग्रामीण स्वराज्य" वगैरे लेख वाचनीय आहेत. ग्रामीण संस्थांतून काम करणाऱ्या सज्जनांनीं अभ्यासपूर्वक जर या संस्थांत प्रवेश करून काम केलें तर त्यांचा व समाजाचा, दोघांचाही फायदा होईल. आतांपर्यंत स्थानिक संस्थांतील कारभार बेशिस्त पद्धतीनें चालल्यामुळें राज्यकारभारांत कित्येक भानगडी उत्पन्न होतात. जनतेच्या हिताकडे पाहण्यापेक्षां स्वार्थावर दृष्टि द्यावी अशीच दुर्वासना उत्पन्न होते. हें सर्व जावयाचे असेल तर प्रसिद्ध मासिकें वाचून विचारपूर्वक कार्यप्रवृत्त होणें हाच एकमेव ओनामा होय.

(३) **जनता जनार्दन**–सप्टेम्बर १९५७. संत गाडगे महाराजांची स्मृति अजूनहि लोकांच्या स्मरणांत स्थिरतर होऊन राहिली आहे. ती अधिक उजळली पाहिजे. त्यासाठीं असलीं मासिकें फार उपयोगी होत. 'संतांचें महत्व' मानवी जीवनाच्या विकासास फार उपकारक होय हें अनेक रीतीनें लेखकानें दाखविलें आहे. "कर्मवीर भाऊराव पाटील" ( व्यक्ति-कार्य ) हा लेख फारच महत्वपूर्ण आहे. भाऊरावांच्या कार्यांचें मोल बहुजन समाजास समजलें म्हणजे त्यांच्या श्रमाचें चीज झालें ! "हेच खरे संत" यांत बाबांचें मूल्यमापन एकाच वाक्यानें झालें आहे-"गाडगे बाबा हे खरोखरच अनाथाची कामधेनू होते !" "हा भक्त मला आवडतो" यांत महात्मा मस्तरामजी यांचें हृदय स्पर्शी चरित्र आहे. दर्शनी गाडगे महाराजांचें चित्र बरोबर ओळख पटविते.

(४) **धर्मयान**—संपादक—का. वि. सवादकर—सप्टेंबर १९५७. अंक ६ वा.

या अंकाचें नांव बौद्ध-शिक्षण-विशेषांक-असे आहे व तें सार्थहि आहे. याचें दर्शनी चित्र बोरबोडोरचें असून अत्यन्त भावनीय आहे. यांत बहुतेक लेख अत्यन्त वाचनीय व उद्बोधक आहेत. प्राचीन विद्यापीठांपैकीं नालन्दा, विक्रमशीला व उदन्तपुरी यांची माहिती कोणाहि वाचकास मोहित करील अशीच आहे. अंगुलिमालाची गोष्ट अत्यन्त सूचक आहे. "बौद्ध शिक्षण पद्धतीचें ध्येय" हा सौ. बीना गोखले यांच्या लेखानें या अंकांतील उच्चांक गांठला आहे. हा अंक खात्रीनेंच मागील अंकापेक्षां सरस व वाचनीय व अतएव अभिनंदनीय आहे. त्यांत वैचित्र्य आहे व बौद्धसंस्कृतीचें सारसर्वस्व आहे.

(५) **बोधिसत्व** ( धर्मचक्र प्रवर्तन विशेषांक )—संपादक वि. रा. रणपिसे. पुणें; ३-१०-५७. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनीं विजयादशमीच्या समुहूर्तावर सीमोल्लंघन करून भारतांतील इतिहासांत जी क्रांती निर्माण केली त्याला "धर्मचक्रप्रवर्तन" हेंच नांव समिचीन आहे. भारतांतील आधुनिक इतिहासांतील ही महत्वपूर्ण घटना पुढील इतिहासकारांना 'युगप्रवर्तक' म्हणूनच संबोधावी लागेल! ज्या दलितवर्गाला हिंदू धर्मांत सामान्य माणुसकीचेहि स्थान नव्हतें, त्या धर्मांतून बौद्धधर्मांत प्रवेश केल्याबरोबर त्याचा केवढा कायाकल्प झाला ही गोष्ट सूर्यप्रकाशा-इतकी स्पष्ट आहे. डॉ. बाबासाहेब आज जर हयात असते, तर तें क्रांतीपर्व त्यांनीं उत्तम रचनात्मक योजनेनें आंखून ठेवलें असतें व त्याप्रमाणें त्यांचें सर्व मनोरथ पूर्ण झाले असते! पण भवितव्यता निराळी होती ! ज्या कार्याचा आरंभ त्यांनीं नागपुरास केला व 'आधीं केलें मग सांगितलें' या न्यायानें स्वतः धर्मान्तर करून हजारों लोकांना दीक्षा दिली तें कार्य त्यांच्या परिनिर्वाणानन्तर स्थगित तर झालें नाहींच, पण उलट जोरानें व प्रत्याघातानें उफाळून चालू आहे व लाखों लोक बौद्धधर्माचा स्वीकार करून आपल्या जीवनाला नवीन पथ्यकर वळण देत आहेत. त्या गोष्टीला या दसऱ्याला वर्ष होणार म्हणून संपादकांनीं औचित्य साधून हा अंक मोठ्या साक्षेपानें काढला आहे. त्यांत संपादकीय लेख 'धर्मचक्रप्रवर्तन' याच शीर्षकानें सुरू केला आहे. डॉ. आंबेडकरांच्या या प्रवर्तनाचें मूल्यमापन करण्याचा संपादकांनीं प्रयत्न केला आहे. '७२९ शिळांवर बौद्धांचा त्रिपिटक ग्रंथ' ही ऐतिहासिक घटना ब्रह्मदेशांतील मिंडन

राजाच्या आश्रयाखालील होय. विनयपिटकाच्या १११ शिळा; अभिधम्मपिटकाच्या २०८, व सुत्रपिटकाच्या ४१० अशा संगमरवरी शिळांवर त्रिपिटक ग्रंथ खोदण्यांत आला. सिलोनमध्यें 'अलु' विहारांत वट्टगामणी अभय राजाच्या कारकीर्दींत पुस्तकारूढ "संगीति" भरविण्यांत येऊन त्रिपिटक ताडपत्रावर लिहिण्यांत आलें. त्यानन्तरची ही ब्रह्मदेशाची सुधारलेली आवृत्ति होय. हा सर्वच लेख अतिशय माहितीपूर्ण आहे. त्याशिवाय "संकिस्सा", डॉ. बाबासाहेब यांची बौद्धधर्मावरील जीं भाषणें झालीं, त्यांतील उतारे देऊन संपादकांनीं त्यास अपूर्ण महत्व प्राप्त करून दिलें आहे. आम्हीं त्यांचें मन-पूर्वक अभिनन्दन करतों.

(६) **सोविएत देश**–अंक १७ वा (१२ सेप्टेंबर) हा अंक सर्व बाजूंनीं मुख्यतः सांस्कृतिक दृष्टया फारच स्पृहणीय आहे. मॉस्कोमध्यें ११ऑगस्ट रोजीं जो सहावा जागतिक युवक आणि विद्यार्थी महोत्सव झाला, त्याची इत्यंभूत माहिती करून देणारा अंक कोणाला आवडणार नाहीं! मधून मधून "महोत्सवाची रोजनिशी" म्हणून जी माहिती पुरविली आहे, ती तर फारच मनोरंजक व वाचनीय आहे. या एकाच घटनेवर अनेक लेख आहेत. त्याशिवाय सोविएत् युनियन भारताचा स्वातंत्र्य-दिन कसा साजरा करीत आहे. हा लेखहि चिंतनीय आहे. मधुकर देशमुख मॉस्कोमध्यें अध्ययन करीत आहेत. ही बातमी भारतीयांना उत्साहवर्धक आहे. या महोत्सवांत एकूण ३४००० युवकयुवतींनीं भाग घेतला होता. या महोत्सवाचें वर्णन एका वाक्यांत केलें आहे–'हा महोत्सव म्हणजे नाजूक व प्रेमळ, सखोल व विषण्ण, आनंदी, खेळकर अशा विविधमानवीभावनांच्या सुरांच्या आरोह व अवरोहाचें संवेदनक्षम नृत्यगीतच होय! "हिरोशिमाची पुनरावृत्ति होऊं देणार नाहीं" असें छातीठोकपणानें सांगणारी हिसाकोनगाता, कोणाला प्रफुल्लित व मन्त्रमुग्ध करणार नाहीं? प्रदर्शनें, चित्रपट महोत्सव, मिरवणुकी, विविधक्रीडा स्पर्धांचा आढावा–सर्वच अंक शेवटपर्यंत वाचल्याशिवाय सोडवत नाही, छायाचित्राच्या रेलचेलीनें प्रत्यक्ष वातावरण अनुभवण्यास सांपडतें. मानवजातीची अविभाज्यता व बंधुभाव यांचें हें खरें प्रात्यक्षिक होतें!

---

# हिंसात्मक युद्ध बंद पाडण्याविषयींची महात्मा गांधींची मोहीम !

[ 'गांधी मार्ग' नांवाचें त्रैमासिक इंग्रजींत 'गांधी स्मारक निधी' ... प्रसिद्ध होत असून त्याचा उद्देश गांधीजींच्या विचारसरणीची ... जगांत करून द्यावी असा आहे. पहिल्या वर्षाच्या तिसऱ्या ... (जुलै १९५७ च्या) **जॉन एस. हायलंड** यांनीं वरील ... देऊन एक लेख लिहिला आहे. तो खरोखरच आदरणीय ... श्री. हायलंड हे गांधीजींचे मित्र असून कित्येक वर्षें भारताची ... सेवा केली आहे. नागपूरच्या हिस्लॉप कॉलेजचे कांहीं दिवस ते ... होते कित्येक वर्षांपूर्वी त्यांनीं 'क्रॉस पूर्वेकडे चालला आहे' ... ग्रंथ लिहिला होता. आतां ते विलायतेंत परत गेले आहेत. ... लेखाचा धर्मचक्रासाठीं मराठींत अनुवाद करण्याची परवानगी ... मार्ग'च्या प्रकाशकांनीं (श्री टी. के. महादेवन्) यांनीं ... दिली, याबद्दल आम्ही संपादकांचे ऋणी आहोंत. या लेखाचा ... अनुवाद न करतां मुख्य मुद्यांचा विस्तार खालीं आढळून ... या महिन्यांत गांधीजींची जयन्ती असल्यानें या महिन्यापासून ... क्रम सुरू केला आहे. तो वाचकास आवडेल अशी उमेद आहे.]

**संपादक**

... जगाच्या इतिहासांतील महात्मा गांधींचें स्थान निश्चित आहे. ... जन्मभर सत्याचे प्रयोग करणाऱ्या' महात्माजींनी एक नवीन तन्त्र ... टाकलें. त्याची पार्श्वभूमि चलत् स्वरुपाचा ध्येयवाद. त्याचा ... हेतु जगांत कोठेंहि स्वातंत्र्य आणि न्याय यांच्या सिद्धीकरणा... हत्यारांचे युद्धाचा पाठपुरावा न करितां तीं साध्य करून घेणें. या ... महान् प्राप्तीच्या शेवटीं शेवटीं—म्हणजे त्यांच्याच समकालीन— ... ची परिणति व त्याचा प्रथमच केलेला उपयोग. त्यांच्या ... नंतर ॲटम बॉंबची जागा आतां हायड्रोजन बॉंब घेऊन बसला ... व प्रत्यक्ष लढाई सुरू होण्याचे पूर्वींच निव्वळ त्या बॉंबच्या **चांच**... व पूर्णावस्थेस **नेण्यासच** मानवजातीचें भवितव्य धोक्यांत ... आहे. जगांतल्या वैज्ञानिकांनीं एकामागून एक असें आपलें ... नोंदून ठेवलें आहे कीं, या हायड्राजन बॉंबच्या चांचणीचा अटळ ... म्हणजे 'स्ट्रोनियम' वीष सर्वत्र पसरून पुरेसें नुकसान अगो... झालें आहे ! या पिढींत जन्मास येणारीं कित्येक हजारों मुलें ... व्यंगांनीं युक्त होतात; एवढेंच नाहीं, पण प्राणीहि विद्रूप ... ! अशा मुलांचें संगोपन करतांना त्यांच्या आईबापांना केवढ्या ... होत असल्या पाहिजेत व त्याचमुळें मानवजातीच्या साधन... केवढा मोठा भाग त्याकडे लावावा लागत असला पाहिजे.

... दोन वर्षांपूर्वीं ईस्टर व खिस्तमस सणांच्या वेळीं सर्वत्र ... केलेल्या संदेशांत **पोपनीं** मानव जातीला याविषयीं गंभीर ... करण्यासाठीं आवाहन केलें. नवीन युगांतील अण्वस्त्रांचें युद्ध ... एका राष्ट्रानें दुसऱ्या राष्ट्रावर अस्त्रें फेकणें; मग मध्यें समुद्र असो किंवा खंड असो किंवा त्यामधील अंतर ५००० मैलांवरचें असो हायड्रोजन बॉंब बसविलेलें एक रॉकेट सोडून दिलें कीं झालें ! असलें रॉकेट एकच नव्हे, तर एकामागून एक अशा वर्षावांच्या स्वरूपांत किंवा संघातच्या स्वरूपांत पाठवतां येईल, असें अमेरिकेच्या अध्यक्षासारखे अधिकारी सांगतात. असली आठ रॉकेटस पाठविलीं तर बहुतकरून संयुक्त राज्य, त्याचे उद्योगधंदे व त्याची सर्व प्रजा यांचा निकाल लावण्यास पुरेशीं आहेत ! असली युद्धपद्धति म्हणजे मनोवृत्तींना भयानक व थरारून सोडणारें स्वप्न नसून मागील नोवेंबर महिन्यांत रशियाच्या श्रेष्ठींनी संयुक्त राज्याच्या विरुद्ध अशी धमकी दिली होती. अशा अंतिमोत्तराचा उद्देश म्हणजे ब्रिटिश व फ्रेंच राष्ट्रांना पोर्ट सैय्यद मधून माघार घेण्यास त्यांचेवर दडपण आणण्याचा होता.

याचा अर्थ एकच होतो. तो म्हणजे अण्वस्त्रांच्या या युगांत इतर मागील युगाहून सर्वस्वी भिन्न प्रकार आढळून येतो. कारण हैड्रोजन बॉंबच्या चांचणीची तयारी करणें म्हणजे पुढच्या काळांतील पिढ्यांना विष घालण्यासारखें होय. असल्या प्रकारचें युद्ध म्हणजे भविष्यकाळीं मानवीप्रजेचें ताबडतोब व पूर्ण निर्दालन करणें, एवढेंच नव्हे, तर आजहि सर्वत्र अण्वस्त्र—युद्ध—पद्धतीनें विष चारणेंच होय ! या सर्व संदर्भांत पोप महाराजांचा संदेश म्हणजे एका **नवीन प्रकारच्या नैतिक विचारसरणीस** आवाहन करणें होय. या नैतिक विचारसरणींत दोन्ही गोष्टींचा अन्तर्भाव होतो—एक भविष्य काळांतील दूरच्या पिढ्यांचें हित पाहणें; व आजचे युद्धाचा प्रतिकार करणारे तसेंच युद्धासाठीं बद्धपरिकर झालेले अशांच्या हिताचा परामर्ष घेणें !

असल्या प्रकारची भविष्यकालीन **नैतिक विचारधारा** पूर्णपणें यशस्वी होण्यास सर्व मानव जातींनें एकतत्व व तेंहि पूर्णत्वानें मान्य केले पाहिजे. ज्यामुळें युद्धें सामान्यतः घडून येतात, त्यांचा उद्देश्य **इतर मार्गांनीं** साध्य करून घेण्यासाठीं **एक नैतिक वैकल्पिक मार्ग** अगोदरच विद्यमान आहे.

मागील नोवेंबर महिन्यांत ईजिप्तवर जो अतिप्रसंग (RAPE) करण्यांत आला तो रशियन लोकांना इतक्या तीव्रतेनें जाणवला कीं, मार्शल बुल्गानिनच्या अन्तिमोत्तर संदेशामार्फत ते **निव्वळच संयुक्त-राज्याचें नव्हे**, तर रशियन लोकांच्या विस्तीर्ण टेहळणीच्या योगानें सर्व मानव जात धोक्यांत टाकण्यास तयार होते ! त्यांचा हेतु एकमेव होता. जेथें ब्रिटिश लोकांना जाण्याचा हक्क नाहीं त्या लहानशा प्रदेशांतून त्यांना हुसकून लावणें ! एक दोन आठवड्यांतच कांहींशा उलट परिस्थितीनें तितकाच महा अनर्थावह प्रश्न इंगेरींत उत्पन्न झाला ! असल्या घटना पुढें जगांत घडून येणारच नाहींत, असा वेडसरपणाचा आशावाद बाळगणारा कोणी असेल काय ? किंवा एकादे दिवशीं मुख्यतः हुकुम-

शाही बेजबाबदार सरकारकडून ही सर्व भयंकर प्रक्रिया गतिमान् होणार नाहीं, असलाहि वेडेपणाचा आशावाद बाळगणारा कोणी निघेल काय ? एका विख्यात जागतिक राजकारणी पुरुषानें उच्चारलेल्या प्रख्यात वाक्यांत सांगितल्याप्रमाणें "मानव जात खोल दरीच्या काठा वरूनच अगोदरच खाली पहावयास लागली आहे." जसें जसें हायड्रोजन बॉंबची रास वाढत चालली आहे तसें तसें असल्या संशयात्मक अवस्थेंत आम्हास रहावें लागणार आहे ! गांधीजींनी जें साध्य केलें त्याचें रहस्य शेवटीं मानव जातीला कळेपर्यंत अनिश्चित परिस्थिति चालू राहणारच ! गांधीजींनी आयत्या-वेळीं युद्धाची फलश्रुति साध्य होण्यासाठीं कोणतें साधन मिळवून दिलें व **प्रत्यक्ष युद्ध न खेळतां** ती फलश्रुति कशी द्रुतगतीनें आणि रामबाण पद्धतीनें मिळवून दिली, या त्यांच्या रहस्याची जाणीव मानवजातीला होईतों पर्यंत असली परिस्थिति राहणारच !

महात्मागांधीचे या बाबतींतील पहिलें खरें कार्य दक्षिण आफ्रिकेंत इ. स. १९१३ मध्ये सुरूं झालें; हें त्यांचें कार्य म्हणजे मानव वंशाच्या उन्नत्तीसाठीं व परमेश्वरजन्य प्रयोगाचे संरक्षणासाठीं एक फार मोठें धाडस होतें ! युनियन सरकारनें भारत-विरोधी कायदे करण्याचें योजिले असतांना त्याचा निषेध करण्यासाठीं नेटल ते प्रिटोरिया पर्यंत कोळशांच्या खाणीवाल्यांचा एक मोर्चा नेण्याचें नेतृत्व त्यांनीं स्वीकारलें होतें. सत्याचें संरक्षण सत्यांनीं करणारे ते **सत्याग्रही** त्यांनां रस्त्यावरच पकडण्यांत येऊन तुरुंगांत टाकण्यांत आलें ! परंतु या यात्रेचा (March) **नैतिक परिणाम** एवढा मोठा झाला कीं, सरकारला तसे अनभिमत कायदे करण्याचे बाबतींत हार खावी लागली !

इ. स. १९१५ त ते भारतांत परत आले. त्यावेळींहि वारंवार असे प्रसंग उद्भवूं लागले कीं, गांधीजींना अन्यायाचें परिमार्जन करण्यासाठीं अहिंसात्मक प्रतिकाराची पद्धति (सत्याग्रहाची पद्धति) अंमलात आणणेंच योग्य, असें वाटूं लागलें. जमिनदारी, अन्या-यानें कर बसविणें, दारू, औषधें व मीठ या संबंधीची सरकारची मक्तेदारी (monopoly), भारतीय संस्थानांतील व सरकारी गोंधळ, हिंदू व मुसलमान यांमधील कायमचे झगडे; व सर्वांवर ताण म्हणून निरनिराळ्या स्वरुपांत दिसणारा साम्राज्यवाद ! यांपैकीं प्रत्येकाचे बाबतींत सत्याचे प्रयोग करण्याची आवश्यकता उपस्थित झाली. प्रत्येक वेळीं आपल्या अनुयायांचे प्रमुख म्हणून ते आघाडीवर असत. त्यामुळे संपूर्णपणें संरक्षित संस्थांतून सुद्धां दिसून येणाऱ्या साक्षात् दुष्टवासनेचे परिणाम त्यांना स्वतःच्या शरीरावर भोगावे लागत. असल्या प्रायश्चित्ताचे स्वरूप वैयक्तिक उपोषणांत दिसून येई; व त्याचा परिणाम त्यांच्या प्रकृतीवर होऊनसुद्धां पुन्हां ते अमलांत आणीत. यामुळें ते वारंवार म्हणत, या किंवा त्या जुन्या अन्यायास विरोध करण्यासाठीं रामबाण उपाय म्हणजे 'सत्याग्रह'! या एकाच माणसाचें वारंवार अगदी एकटें पडलेले व्यक्तिमत्त्व अखिल मानव जातीच्या अन्तिम परिणतीसाठीं सूचक ठरे; व यासच आम्हीं 'भविष्यकाळाचे नैतिक तत्वज्ञान' असें नांव दिलें आहे. या पद्धतीनें स्वातंत्र्य व न्याय यांचा विजय. मानव जातीचा संहार न होतां, होई.

गांधीजीची युद्ध बंद पाडण्याच्या दृष्टीनें विशेष महत्त्वाची हीच पद्धति होय ! हिंदू व मुसलमान यांच्यामध्यें आन्तरप्रान्तीय युद्ध सुरूं झालें. त्यांत इतर सर्व आन्तरदेशीय युद्धाचे सर्व विशेष होते. त्याचें स्वरूप अतिशय भयंकर व पाशवी होते. १९४७–४८ मध्यें लक्षावधी लोक मारले गेले व घरदार सोडून निर्वासित बनले ! अशा लोकांच्या अंतःकरणांत दुसऱ्या बाजूच्या माणसाबद्दल भयंकर द्वेष भरून राहिला होता ! कारण आपल्या स्वतःवर व कुटुंबियावर कोणते अनर्थ कोसळले होते याची दीर्घस्मृति कायम होती ! इ. स. १९२४ सालापर्यंत गांधीजींनी आपला वैयक्तिक प्रायश्चित्ताचा प्रयोग सुरूं ठेवला होता व त्यांत त्यांना डोळ्यांत भरणारें यश मिळालें होतें ! व त्यांतूनच समजुतीचे व सामोपचाराचे मार्ग उत्पन्न होत होते. पण त्यांच्या मरणाचे शेवटीं शेवटीं एकमेकांतील भांडणें व कत्तलीहीं जास्त जोरानें पसरत चालली व त्यांनीं भयानक स्वरूप धारण केलें. अशावेळीं त्यांनीं "**शाश्वततेचा प्रवासी**" या भूमिकेंत जेथे युद्ध दारुण स्वरूपाचें झाल्यामुळें जास्त भयंकर परिणाम घडले होते, त्या प्रान्तातून पदयात्रा सुरूं केल्या ! या नवीन उपक्रमाची हळूंहळूं फळें दिसावयास लागलीं. त्यांच्या भोंवती निष्ठावान् अनुयायाचें वर्तुळ वाढावयास लागलें. स्वातंत्र्य व न्याय हीं मिळण्यास लागणारी "सदिच्छा वृत्ति" नेहमीं जागृत असतें व ती सर्व गोष्टींचा त्याग करण्यास व प्रसंगोपात्त स्वतःचा बळी देण्या-सहि ती नेहमी तयार असते. पण तें स्वातंत्र्य व तो न्याय मिळविण्यासाठीं व त्याचा विजय दाखविण्यासाठीं **सर्व प्रकारच्या हिंसामय साध-नाचा** त्याग करण्यास ती सदिच्छा वृत्ती तयार असते. फार काय ! त्या दुष्ट व लढाऊ वृत्तीच्यापायीं आत्मबलिदान करण्यास ती आनंदानें तयार

...ह्या गोष्टी त्यांनीं आपल्या पदयात्रेंतून दाखवून दिल्या ! गांधीजींनीं ... घालून दिलेली ही वृत्ति जशी बळावत चालली तशी माणसा... [सं]शयशील भितीवरून ती उड्या मारूं लागली. हिंसात्मक युद्धाचा संपूर्ण ... करण्याचें कामीं त्यांना वाढत्या प्रमाणावर अनुयायी मिळत चालले ... आपसांत भांडणाऱ्या समाजांत चमत्कार घडून यावयास लागला. व ... त्यांच्यांत शांतता प्रस्थापित व्हावयास लागली ! व त्याचें दृश्य ... नौआखाली, कलकत्ता, दिल्ही व भारतांतील इतर हजारों ठिकाणीं ... [दिसाव]यास लागलें ! गांधीजी हे जिंकण्यास कठीण अशा सदिच्छेचा ... असून त्या आत्म्याचे नेहमीं पुनरुज्जीवन करण्यावर ते अवलंबून ... या दृष्टीनें त्यांची युद्ध विरुद्ध युद्ध पुकारण्याची सत्याग्रहाची कार्य... [ए]का अर्थानें निर्बल व अल्पजीवी वाटे. कारण तो आत्मा थडावला ... युद्धपिपासूवृत्ति पुन्हां वर येण्यास लागे. जागतिक पातळीवरुन ... तरी हायड्रोजन बॉंब विरुद्ध जागतिक सत्याग्रही लोकांनीं मानव... ...च्या भविष्यासंबंधानें जरी विरोध दर्शविला तरी ती वृत्ति थंडावत ... असें दिसून येतें. भविष्यकाळचे त्यांचें नीतिशास्त्र ही एक ... [आत्]मिक लढाई आहे, व गांधीजींच्या बाबतींतहि ती तशाच ... होतीं. ज्या विश्वशांतीचें कार्य त्यांनीं सुरू ठेवलें होतें व गरज ... मरण्याचीहि त्यांची तयारी होती— व गांधीजींनीं मृत्यूला ...लेंहि--त्या विश्वशांतीची हमी, प्रतिपक्षाला नेस्तनाबूद करण्या... ...भूत जागतिक अस्त्रसामग्री तयार असतांना कधींच मिळणार ... उलट ज्या अधिकाऱ्याचें हातांत त्यांचें नियन्त्रण आहे त्याच्याकडूनच ... व न्याय यांच्या विरुद्ध त्यांच्या दुरूपयोगाची शक्यता ... सत्याग्रहाच्या वृत्तीच्या अविरत पुनर्भवनावर शान्ति अवलंबून ...; व ती वृत्ति गांधीजींत आरंभापासून शेवटपर्यंत वास करून ...हि होती. त्यांनीं वारंवार सांगितल्या प्रमाणें शेवटच्या पृथःकर... ...च्या चष्म्यांतून पाहिलें तर **शान्ति मानवाच्या हृदयांत [ई]श्वराचें अस्तित्व व शक्ति यांवर अवलंबून आहे !**

[गां]धीजींच्या परंपरेत वाढलेल्या मानव जातीच्या प्रेमीजनापुढें ... जरुरीचा व अत्यन्त व्यावहारिक प्रश्न व त्यांना जरूरीचा जो ... सुचवला आहे तो असा :

... पृथ्वीवर कोठेंतरी एकमेव राज्य कसें अस्तित्वांत येईल ? आजच्या ...स्थितीची जरुरी तें राज्य कशारीतीनें ओळखेल ? असलें राज्य ... सरकाराला प्रत्येकास निःशस्त्रीकरण करण्यास कसें भाग पाडेल ? ... युद्ध करण्याची सर्व सत्ता त्यांच्याकडून कशी हिसकून घेईल ? ... बरोबर जेथें एखादा संघर्ष शिजावयास लागेल तेथे ...च्या पाठीवर कोणत्याहि प्रदेशांत ) तरुण लोक ( गांधीजींच्या ... तरुण स्त्रियाहि ) पाठवून त्यांच्या करवी शान्ति कशी ... करतां येईल ? व ती शांतीची प्रस्थापना **गांधी-**...च्या पद्धतीनें विधायक व सेवावृत्तीच्या मैत्रीनें ( उदाहरणार्थ– ... येथें ) कशी घडवून आणतां येईल ? या जागतिक विमुक्तीच्या ... मोहिमेंत गांधीजींचा आवडता भारत पुढाकार घेवो, हीच ...!

---

# “ मरावें परी कीर्ति रूपें उरावें ! ”

[ हा महिना गांधीजींच्या जन्म स्मृतीनें पावन झाला आहे. म्हणून आमचे आकाशवाणीवर परमपूज्य कै. बी. जी. खेर यांनीं या निमित्तानें २–१०–१९५४ रोजीं जें भाषण केलें होतें तें आम्ही खालीं देत आहोंत. खेर कुटुंबीयांनीं हें भाषण धर्मचक्रांत छापण्याची परवानगी दिली त्याबद्दल त्यांचे ऋणी आहोंत. **—संपादक** ]

आज गांधी जन्मदिनानिमित्त मी थोडावेळ आपणांशीं बोलणार आहे. ‘ सदा बोलण्यासारखे चालताहे। अनेकीं सदा एक देवासि पाहे ॥ अशाच मनुष्याला लोक ‘ महात्मा ’ म्हणतात. महात्माजींचे जीवनकार्य आपल्या स्मृतींत अजून ताजें आहे. त्या पासून आपण काय निष्कर्ष काढावयाचा, कसें वागावयाचे, हे शिकणें, याचा विचार करणे, हा जयंतीदिन साजरा करण्याचा मुख्य हेतु असतो. आपण प्रत्येकानें असें केलें कीं जग सुखी होईल.

आर्थिक समता व बंधुभाव समाजांत प्रस्थापित करण्याच्या उद्देशानें साम्यवादी रशिया व चीनमध्यें लक्षावधी लोकांना सफा... नाहींसें करावे लागले; पण अजून बंधुभाव प्रस्थापित झालेला दिसत नाहीं. येथें आपल्या देशांत भूदान, श्रमदान, संपत्तिदान या चळवळीं दिवसेदिवस जोर धरीत आहेत. दुनियेचे लक्ष त्यांचेकडे जात आहे. नुकतेंच असें प्रसिद्ध झालें कीं बिहार प्रांतांतील ‘ पलामऊ ’ जिल्ह्यांतील एका सबंध खेड्यानें आपलीं सर्व जमीन भूदानानिमित्त देऊन टाकली व येथून पुढें गावांतील लोक त्या जमिनीची सामुदायिक लागवड करून सर्व उत्पन्न सारखे वाटून घेतील विनोबा भाव्यांनीं, ‘ संग्रहमुक्त ’ समाज बनवून जगभर विश्वकुटुंब भावनेच्या प्रसारासाठीं झटूं या, असा संदेश त्यांना दिला व आपण जुनीं मानवीं मूल्यें बदलल्यावांचून देशास तरणोपाय नाहीं, असें सांगितलें. विनोबा भावे हे गांधीजींचे कट्टे भक्त...पट्टशिष्य...व त्यांचेंच कार्य पुढें चालविणारे त्यांचे अनुयायी आहेत व केवळ त्यांच्या प्रचारामुळें लाखों एकर जमिनीवरील मालकी लोकांनीं आनंदानें सोडून दिली. उत्साही तरुणांचे लक्ष त्यांचेकडे वेधावें हें स्वाभाविक आहे.

भारताची परंपरा...उत्क्रांति. संस्कृति सर्व जगांत शांतिधर्म, नीतीच्या कल्पना व बंधुभाव प्रस्थापित करण्यास पोषक आहेत, असें इतिहासावरून दिसून येतें. व्यक्तींव्यक्तींतील, समाजाचे गटांगटातील अगर राष्ट्रां-राष्ट्रांतील झगडे संघर्षावाचून आणि युद्धावाचून मिटवावे व सलोखा प्रस्थापित करावा, ही आजच्या समाजाची अत्यंत मोठी गरज आहे. जागतिक युद्धांत भयंकर शस्त्राच्या शोधामुळें सर्वनाश झाल्यावांचून राहणार नाहीं.

जगांत संयुक्तराष्ट्र–संस्था ( U. N. O. ), विश्व–स्वास्थ–संस्था ( *W. H. O.* ) युनेस्को ( U. N. E. S. C. O. ), अित्यादीचे प्रयत्न व धडपड चालू आहे. त्या पासूनहि हाच निष्कर्ष काढला पाहिजे कीं, मानवी समाजाच्या मनाची ओढ... त्याची आकांक्षा, संघर्षाकडून शांतीकडे... क्षुद्रापासून विशालाकडे... संकुचिताकडून विस्तृताकडे जाण्याची आहे. व्यक्तींचें कल्याण समुदायाच्या हिताशीं निगडित आहे. परंतु व्यक्तींचे आचरण व कृति मात्र, ‘ स्वार्थ ही कांहीं वेगळी वस्तु आहे,’ अशा समजुतीनें आपापला वेगळा स्वार्थ साधण्याच्या हेतुनें प्रेरित झालेलीं असतात. या नियमाला संतांचे, लोकोत्तर पुरुषांचे आचरण हें अपवादरूप असतें. त्यांच्या बाबतीत “ जगाच्या कल्याणा संतांच्या विभूती ” असें म्हणावें लागतें. **अशा लोकोत्तर पुरुषांत महात्मा गांधी अग्रगण्य आहेत.** त्यांच्या जीवनांत संतांची बहुतेक लक्षणें आढळून येतात.

आज त्यांचा जन्म होऊन ८५ वर्षे झालीं. व लवकरच त्यांच्या मृत्यूलाहि सात वर्षे होतील. त्यांच्या जीवनाचे ध्येय त्यांनींच आत्मकथेच्या प्रस्तावनेंत सांगितलें आहे. ते लिहितात, “ जी वस्तु मला साध्य करावयाची आहे...आज ३० वर्षांपासून जिच्यासाठीं मी प्रयत्न करीत आहे, ती वस्तु आत्मदर्शन ईश्वराचा साक्षात्कार...मोक्ष ही होय. माझ्या जीवनाची प्रत्येक क्रिया याच दृष्टीनें होत आहे. मी जे कांहीं लिहितों, तेंही याच उद्देशाने, व राजकारणांत मी जो पडलों तोही हीच गोष्ट नजरेसमोर ठेवून.” ईश्वराचा साक्षात्कार याचा काय अर्थ करावयाचा ? तेही आपण त्यांच्याच शब्दांत पाहूं या. ते पुढें म्हणतात, परमेश्वराच्या व्याख्या अनेक आहेत. कारण त्याच्या विभूतीही अनेक आहेत. त्या विभूती मला आश्चर्यचकित अवश्य करतात...क्षणभर मुग्धही करतात. **परंतु मी पुजारी मात्र सत्यरूप परमेश्वराचा आहे.** बाकी सर्व मिथ्या आहे. परंतु हे सत्य अजूनपर्यन्त माझ्या हातीं लागले नाहीं...मी अजून त्याचा शोधकच आहे. त्या शोधासाठीं प्राणाहून प्रिय वस्तुचाही मी त्याग करावयास सिद्ध आहे. त्या शोधरूप यज्ञांत माझ्या शरीराचा होम...त्याची आहुतिहि देण्याची तयारी मी केली आहे. ही शक्ति माझ्यांत आहे, अशी माझी श्रद्धा आहे. परंतु या पूर्ण सत्याचा जों पर्यन्त मला साक्षात्कार झाला नाहीं, तों पर्यन्त माझा अंतरात्मा ज्याला सत्य मानतो...त्याच काल्पनिक सत्याच्या आधारावर ..त्यालाच माझा दीपस्तंभ समजून आणि त्याच्या साहाय्यानेंच मी माझें जीवन कंठीत आहे. शेवटीं शरीराची आहुती त्यांनीं “ हे राम ” म्हणून दिली !

“ आदौ राम तपोवनादि गमनं...एतद्धि रामायणम् ॥ ” या श्लोकांत रामचरित्राचा संक्षिप्त उल्लेख केला आहे. त्या प्रमाणें महात्माजींचें समग्र जीवन आपणासमोर आहे. आणि दहा पंधरा मिनिटांत त्यांतील निराळ्या घटनांचा संक्षेपानें उल्लेख करणें शक्य आहे; पण शक्य असले तरी ते नुसते पठण करून आपल्याला त्याचा उपयोग होण्यासारखा नाहीं. ते जन्मले त्या काळची धार्मिक, सामाजिक व राजकीय परिस्थिति व आजची धार्मिक, सामाजिक व राजकीय परिस्थिति, यांच्यांत किती

[..] पडलें आहे ? ते जन्मले त्या वेळीं ब्रिटिशांची अप्रतिहत सत्ता [..]या देशावर अनियंत्रित प्रभुत्व गाजवीत होती. ते मृत्यु पावले त्या [..]ती नामशेष झाली होती. सामाजिक मूल्यांत तर फारच मोठे [..] घडून आलें ! बाह्यस्वरूप प्रथम पाहूं. कपड्याचीच गोष्ट घ्या. [..]ळीं नवशिक्षितांत इंग्रजीपद्धतीचे विलायती कपडे घालून मिरवणें [..]श्रीमंतीचें व शिष्टपणाचें द्योतक मानलें जात होतें. तें पुढें लज्जास्पद [..] कपडे कमी, साधे, हातानें कातलेल्या सुताचे व हातानें विणलेल्या [..]भरड्या कापडाचे शिवलेले वापरणें शिष्टसंमत झालें. खादीच्या [..] व सदरे व्हॉइसरायच्या दरबारांत शिरले व चर्चिलच्या शब्दांत [..]याचे तर "एका नंग्या फकीराचा" प्रवेश ब्रिटिश बादशहाच्या [..]त मान्य झाला !

[..]ळ्या...ओवळ्याच्या...विटाळाच्या कल्पना तर इतक्या जलद [..]ल्या कीं "अस्पृश्य" हा शब्द लोकांना बोंचूं लागला व त्याचे जागीं [..]जन' शब्द रूढ झाला. स्त्रियांनाहि एक नवीनच, पुरुषांच्या [..]चें मानाचें स्थळ, एक प्रकारचा निर्भयपणा समाजांत प्राप्त झाला. [..] गरिबाला भिकारडा न म्हणतां "दरिद्रनारायण" मानूं लागले. गिर- [..] मजूर,–निदान अहमदाबादेंपुरते म्हटले तरी,–मालकांना "हम [..]जे कायदा" अशा स्थितींत जे वागत होते त्या ऐवजीं वांकून [..]च्या धोरणानें त्यांना वागावे लागले. अशी परिस्थिति गिरणी [..] निर्माण करूं शकले. सरकारी अधिकारी हवेतसे लोकांना तुच्छ [..] बेदरकारपणे वागत होते त्यांना 'कायदे भंग' हा नवा शब्द [..] लागला व त्याचा प्रयोग सहन करून आपले अरेरावी धोरण [..] नमावें लागलें. **भोग** हेंच जीविताचें सूत्र न मानतां **त्यागमय** [..] वागणारा मनुष्य समाजांत श्रेष्ठ झाला. गरीबी व फकीरी [..]ashionable' (शिष्टसंमत) झाली. धर्म समजुतींत अहंकाराचा [..] कमी होऊन समभाव व आदर वाढला. हें मूल्यपरिवर्तन घड- [..] महात्माजींचे जीवन व मरण हीं पुष्कळ अंशी कारणीभूत झालीं. [..] एक नवी जीवनपद्धति आपल्या देशांत रूढ केली. सर्व जगभर [..] खळबळ उडाली. मनु बदलला. नव्या युगाला सुरवात झाली !

[..]१९३९ सालीं म्हणजे स्वराज्य प्राप्तीच्या आधीं सात वर्षे, जॉन होम्स [..] लिहिलें, "हिंदुस्थानांस कधीं तरी जेव्हां स्वराज्य मिळेल, तेव्हां [..] श्रेय इतर कोणाहि व्यक्तीपेक्षां गांधीनांच अधिक द्यावे लागेल. [..] देशबांधवांच्या उपजत संस्कृतीचें पुनरुज्जीवन करून, त्यांचा [..]भिमान व व्यक्तिमत्व जागृत करून आणि त्यांचे जीवन संयमी व [..] बनवून, त्यांना अध्यात्मिक तसेच राजकीय स्वातंत्र्य मिळवून [..] त्या स्वातंत्र्याला लायक करण्याचे श्रेयही त्यांनाच (गांधिजींना) [..] येईल."*

---

*[..]To Gandhi more than to any other Indian, will be [..]uted the independence of India when this indepen- [..] is at last won. To him also will be attributed the [..] achievement of making his people worthy as well as [..] of independence by reviving their native culture, [..] their sense of personal dignity and self-respect, [..] their lives to self-control and making them [..] as well as politically free." **JOHN HOMES.**

या विधानाची सत्यता कोणीही निःपक्षपाती मनुष्य मान्य करील.

'अभय' ही पहिली दैवी संपत्ति महात्माजींचे अंगीं सिद्ध झाली होती. १९३७ सालीं कांहीं कल्पना किंवा आकांक्षा नसूनही मुंबई-प्रांताचे मुख्य प्रधानपद स्वीकारण्याचा प्रसंग एकाएकीं माझ्यावर गुजरला. त्यापूर्वीच्या जीवनांत २९ वर्षे मी कोर्ट न्यायालयांत प्रतिदिन फिर्यादि, अरजी, कैफियती इत्यादींच्या चिंतनांतच घालविलेलीं. त्यामुळें मला कायदेमंडळ व तेथील रिवाज अगदीं माहीत नव्हते. आणि राज्यकारभार करण्याचा अनुभव तर कांहींच नव्हता. तेव्हां ही जबाबदारी माझ्याकडून नीट पार पडेल असा आत्मविश्वास मला नव्हता. मंत्रिपदें स्वीकारण्यापूर्वी थोडेच दिवस महात्माजींनीं होऊं घातलेल्या सर्व मुख्य मंत्र्यांना, भेटीस बोलाविलें होतें व सुमारें ४० मिनिटें त्यांच्या काय अपेक्षा होत्या, यावर त्यांनीं आपले विचार सांगितले. मोठ्या व निर्भय मनुष्याचा हा गुण आहे कीं, त्याच्या सान्निध्यांत लहान व मित्रे लोकही थोडेतरी मोठे व निर्भय होतात, व अवघड कार्यही त्यांना सुलभ वाटतें. विश्वास व हिम्मत हीं प्राप्त होतात. याचा अनुभव मला यावेळीं आला. पुन्हां १९४४ सालीं महाबळेश्वरीं ते असतांना अत्यंत विषण्ण करणारी परिस्थिति देशांत निर्माण झाली होती. तेव्हां त्यांची ईश्वरनिष्ठा व रामनाम हा एकच आधार त्यांना होता. त्याच्याच जोरावर ते काळ कंठीत होते. माझ्या सर्व आयुष्यांत मी होऊन त्यांना एकच प्रश्न विचारला, 'महात्माजी, तुम्ही रामनाम हाच जीवनाचा आधार आहे असें नित्य म्हणतां, त्याचा अर्थ काय ? दशरथनंदन राम यांचेंच नामस्मरण करावें असा आहे काय ?' ते म्हणाले, 'नाही, **राम म्हणजे माझा परमेश्वर सत्य.** रामराम म्हणण्याच्या ऐवजीं God, God म्हटलें तरी फरक पडणार नाहीं, स्मरण व निष्ठा हीं मुख्य आहेत."

त्यांचा अहर्निश प्रयत्न...सत्य आणि अहिंसा आपल्या प्रत्येक विचारांत, शब्दांत व कृतींत उतरविण्याचा असे. आणि स्वराज्याची प्राप्तीही अशाच शुद्ध साधनांनीं करून घेण्याचा त्यांचा निश्चय होता. आपल्या सभोंवती अज्ञान, दारिद्र्य, दुःख जनतेला पीडीत आहे, हें त्यांना दिसत होतें. तें त्यांना सहन करवत नव्हतें. त्यांना सुखी करण्या-साठीं प्रथम स्वतंत्र करणें अवश्य होतें. म्हणून ते राजकारणांत पडले. परंतु त्यांचा स्वराज्याचा अर्थ केवळ स्वातंत्र्य एवढाच नव्हता. "सर्वोदय" या त्यांच्या ध्येयानेंच त्यांचें विश्वप्रेम सूचित होतें व त्यांच्या प्राप्तीचा मार्ग त्यांनीं 'सत्याग्रह' हाच सांगितला व आचरला. त्यांच्या विधायक अथवा रचनात्मक कार्यक्रमाचें नित्य आचरण व त्याची पूर्ति यांचेंच नांव स्वराज्य असें तें म्हणत. व म्हणूनच राजकारणांत अहिंसा व सत्याग्रह, आर्थिक व्यवस्थेंत खादी व ग्रामोद्योग, सामाजिक बाबतींत अस्पृश्योद्धार व जातीय ऐक्य आणि धार्मिक आचारात सर्वधर्मसमभाव हीं त्यांनीं योजिलीं होतीं. त्यांचा विधायक कार्यक्रम सर्वजीवनव्यापी आहे. पण सर्वांच्या मुळाशीं त्यांच्या सत्याच्या **उपासनेचा अखंड प्रयत्न व प्रवाह आहे.** बेसिक (वर्धा) शिक्षण पद्धति हा त्यांचा शिक्षणाच्या क्षेत्रांतील अहिंसेचा प्रयोग होता. ते आपणांस सनातनी म्हणवीत. खरे पाहूं जातां पतंजलीनें योगसूत्रांत सांगितलेलें यम नियम म्हणजे अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य, अपरिग्रह, शौच,

(पान १४ वर)

# – श्री. तुकाराम विश्वविद्यालय संघ, पुरवणी –

मागील अंकांत 'पुरवणी' न नेण्याचें कारण म्हणजे गणेशोत्सवामुळें सांस्कृतिक कार्यक्रम आंखण्यास अवसरच मिळाला नाहीं. शिवाय मागील अंकांत कळविल्याप्रमाणें ज्यांना साधारण सभेनें कार्यकारी मंडळावर निवडून दिलें होतें त्यांचे स्वीकृतीचें पत्र आलेलें नव्हतें मुख्यतः अध्यक्षांच्या बहुविध कार्यबाहुल्यामुळें त्यांना उत्तर धाडण्यास विलंब लागला. पण त्यांनीं २१ सप्टेंबर रोजीं संचालकांना पत्र लिहिलें तें असें :—

This is to inform you that as per wishes of the General Body expressed at a Meeting held on Sunday, 28th July 1957, I am willing to acept the Presidentship of Shri T. V. V. Sangh and hope to carry on the work with the Cooperation of the Members.

Pending the meeting of the First Managing Committee I authorise you, as a Sanchalak, to carry on the routine work of the Sangha.

Your Faithfully
(Sd) V. Nimbkar.

अध्यक्षांनीं अधिकार स्वीकृतीकरून संघाला उपकृत केलें, ही त्यांची मेहेरबानी. आमची पूर्ण खात्री आहे कीं, त्यांच्या नेतृत्वाखालीं व मार्गदर्शनानें संघाची प्रगति झाल्याविना राहणार नाहीं त्यांनीं अधिकार दिल्याप्रमाणें संचालकांनीं चॅरिटी कमिशनर यांना भेटून सर्व घटना समजून सांगावयाच्या, घटनेची प्रत त्याना द्यावयाची व नवीन कार्यकारी मंडळाचीं नांवें वाचून दाखवावयाची. तळेगांव येथील जागेसंबंधींचा व्यवहारहि समजून सांगावयाचा, असें ठरविलें आहे.

× × ×

मध्यंतरीं श्री नारायणदास तुळशीदास (नंदूभाई) सान्ताक्रूझ, श्री. बी. एच्. मन्त्री (वरळी) व श्री एस्. आर. म्हात्रे (मुंबई). यांचेकडून स्वीकृतीचीं पत्रें आलीं आहेत.

× × ×

या महिन्याच्या आश्विन कृष्ण एकादशीच्या दिवशीं (११।१०।५७) रात्रौ प्रो. परचुरे (सिद्धार्थ कॉलेज, मुंबई), यांचें 'श्रीकृष्ण चरित्र' वर ९ वाजतां कीर्तन ठरविलें आहे. तेथून या मोसमच्या कार्यक्रमास सुरवात होईल.

× × ×

या रजेंत तळेगांव येथें जाऊन संघाचा प्रचार करण्याचें कामीं वाचस्पति क्षीरसागर यांनीं सहकार्य करण्याचें कबूल केलें आहे तेथें त्यांची दोन तीन प्रवचनें करून स्थानिक सल्लागार मंडळ स्थापण्याचें कामीं यत्न होईल.

× × ×

आतां सर्वांना एकच विनंति. ती म्हणजे पुढील तुकाराम बीजेला तळेगांव येथें संघाच्या इमारतीचा पाया घालणें. या कार्यास रु २०,००० लागतील. तुकाराम महाराजांच्या प्रेमीभक्तांनीं मनांत आणल्यास ही गोष्ट अशक्य नाहीं. "इमारत फंड" म्हणून निराळें दालन खोललें आहे. शिवाय देणगीदारांना असें सुचवूं इच्छितों कीं, हा 'संघ' सार्वजनिक विश्वस्त कायद्याखालीं नोंदला असल्यामुळें यास दिलेल्या रकमेवरहि प्राप्तीचा कर माफ केला जातो! श्रीमंत लोकांना हजारों रुपये कर द्यावा लागतो. त्यापैकीं जर कांहीं भाग संघाच्या इमारतफंडास दिला तर 'एक पंथ दो काज' या न्यायानें दोघांचेंहि कार्य साधेल! महाराष्ट्रांत श्री संततुकाराम महाराजांचें तळेगांव येथें "सन्तसमागम" नांवाचें भरीव स्मारक व्हावें, असें कोणास वाटणार नाहीं? शिवाय कार्यकारी मंडळाचे सभासद हि वजनदार व प्रातिनिधिक स्वरूपाचे आहेत. तरी सधन व तुकाराम प्रेमी जनतेनें विश्वधर्माचें हें मंदीर बांधण्यास मदत करावी व पुण्य संपादन करावें. वर्गणीची रक्कम संचालक, श्री तु. वि. वि. संघ. C/o धर्मचक्र कार्यालय, १५ वा रस्ता, सुगतनिधान, खार, मुंबई २१. या पत्त्यावर चेकनें पाठवावी. त्यांना पावती तावडतोब पाठविण्याची व्यवस्था होईल.

"सत्य संकल्पाचा दाता भगवान।
सर्व करी पूर्ण मनोरथ॥

याची सत्यता पटल्याशिवाय कशी राहील?

---

( पान १३ वरून )

संतोष, तप, स्वाध्याय व ईश्वरप्रणिधान. या दोन हजार वर्षांपूर्वी आपणांस शिकविलेल्या दहा तत्त्वांचे, सध्याच्या समाजांत आचरण व त्यांची परिस्थित्यनुरूप योजना यापलीकडे नवीन असें त्यांनीं कांहीं प्रतिपादन केलें नाहीं. पण जीवन व सत्य हीं नेहमीं नवीनांत नवीन असतात. Truth does not repeat itself. आपला प्रत्येक विचार, उच्चार व आचार या वरील तत्त्वांना सोडून होऊं नये, या त्यांच्या निष्ठेंत व सत्याग्रहांत त्यांच्या जीवनाचें व सिद्धीचें मर्म आहे. हीं तत्त्वें त्रिकालाबाधित आहेत. ती विशिष्ठ समाजासच लागूं आहेत, असें नाहीं. **तो मानवधर्म आहे**. पण तो आपण व दुसरे लोकही विसरलो आहोंत. **तो मार्ग पुनः जगास आचरून दाखविणें हेंच महात्माजींचे जीवनकार्य होय**. भारताचें स्वराज्य हा त्याचा एक अत्यंत इष्ट पण दुय्यम परिणाम (By-product) त्यांना साध्य झाला; पण याहूनही दुष्कर कार्य त्यांनीं केलें. तें हे कीं, सर्व राष्ट्रांतील सर्व जगांतील, विचारी लोकांच्या अंतरात्म्याला त्यांनीं खडबडून जागें केलें. "संघर्षाच्या चढाओढीच्या...विनाशाला नेणाऱ्या मार्गापासून सहकार्याच्या, सत्याग्रहाच्या शांतीच्या मार्गाकडे वळून सर्वोदय साधणें हें मानवी जीवनाचें उद्दिष्ट असलें पाहिजे; तरच मानवी जीवन 'मानव' या नांवाला पात्र होईल, त्यांतच व्यक्तिचें व राष्ट्रांचेंहि श्रेय साधेल. त्यांतच देहाचें कल्याण, देशाची सेवा, व देवाची भक्ति समाविष्ट आहेत," असें त्यांनीं गर्जून सांगितलें. व्यासाप्रमाणें, "ऊर्ध्वबाहुर्विरौम्येष, न च कश्चित् शृणोति माम्" असें त्यांना म्हणावें लागूं नये, हीच मंगल याचना प्रभूपाशीं आपण आजच्या पवित्र दिवशीं करूं व 'असतो मां सत् गमय ..तमसो मां ज्योतिर्गमय...मृत्योमां अमृतं गमय...' ही प्रार्थना आपण ईश्वरापाशीं करूं.

जयहिंद

प्रश्नांवर कवितेंत उत्तरें द्यावयास लावलीं व त्याची खात्री करून दिली कीं शेवटचें प्राप्तव्य 'निर्वाण' नव्हे तर 'शिव' आहे!!! शिस्तवारपणाचें महत्त्वहि फार आहे!" शेवटच्या प्रवचनाचा विषय "विद्यार्थ्यांचें कर्तव्य" यासंबंधी शाळेंत अध्ययनास सुरवात होण्याचें पूर्वी जर प्रार्थना म्हटली तर त्याचा परिणाम मोठा होतो, असें त्यांनीं सांगितलें. इतर धर्मांच्या दृष्टीनें पाहिलें तर हिंदुधर्म हा सर्वांत जुना धर्म आहे! विद्यार्थ्यांनीं त्यांतील शिकवण आत्मसात करून भारताच्या धर्मांचा दीप प्रज्वलित ठेवावा, अशी त्यांना आग्रहाची विनंति केली. या तऱ्हेनें श्रीशंकराचार्य कामकोटी पीठ यांनीं हा जो उपक्रम करून नवरात्रीच्या उत्सवांत ज्ञानदान व व्यावहारिक भूकिकेवरून धर्मांची शिकवण देण्याचा यत्न केला, त्या बद्दल आम्ही श्रीशंकराचार्यांचें ऋणी आहोंत. शंकराचार्यांनीं नवीन दृष्टि आत्मसात करण्याची आवश्यकता **या शंकराचार्यांना** कांहींशीं पटली, असें म्हणणें भाग आहे. हाच पायंडा इतरांनींहि पाडण्याची वेळ आली आहे! आम्ही कामकोटी पीठाचे शंकराचार्य यांचे साभिवादन अभिनंदन करतों.

× × ×

नोव्हेंबरच्या दुसऱ्या तारखेस अहमदाबादेस "भारत साधु समाज" याची परिषद विद्यानंदनगर येथें भरली होती. परिषदेचें अधिवेशन तीन दिवसांचें होतें. त्यासाठीं भारतांतून जवळजवळ १००० साधू जमा झाले होते. त्या परिषदेसाठीं भव्य, सुशोभित व विविध रंग सुसज्जित असा मंडप घातला होता. ज्या साधूंनीं काम, क्रोध, लोभ, मोह, मद आणि मत्सर हे सहा धुऊन टाकले आहेत, त्यांना 'साधु' असे म्हणतात. तेव्हां अशा पुण्यवान् साधूंचें दर्शन तेथे जमलेल्या उपस्थित नागरिकांना झालें! या साधूंनीं आतां भारताच्या संसाराचा अंगिकार केला आहे. सर्वसंगपरित्याग करणारे हे महाभाग आतां भारताची उन्नति करण्यासाठीं बद्धपरिकर झाले आहेत. या साधूंच्या मेळाव्याकडे निरनिराळया मनोवृत्तींचीं माणसें निरनिराळ्या चष्म्यांतून पाहणार हें उघड आहे! 'साधू' व 'भोंदू–' असे परस्परविरोधी शब्द समाजांत रूढ झाले आहेत! पण त्यामुळें साधूंची मूळची माननीय व वन्दनीय भूमिका मुळींच कमी होणार नाहीं. साधू म्हणजे समाजाच्या धार्मिक प्रवृत्तीवर पोसणारे ऐतखाऊं सामाजिक-घटक असेहि म्हणणारे लोक आहेत व सध्यांच्या वैज्ञानिक व अधि-भौतिक युगांत तर साधूना अवहेलने शिवाय दुसरी बिदागी लाभतच नसते! असें जरी असलें आपल्या स्वातंत्र्याच्या युगांत साधूना सुद्धां स्वतंत्र भारतांत कांहीं कर्तव्य निष्कामबुद्धीनें करावयाचें असतेंच! त्यानांहि सामाजिक सेवा करावयाची आहेच. त्यांचे अज्ञानी, भोळसर, अन्धश्रद्धबहुसमाजावर वजन असतेच. त्याचा फायदा घेऊन त्यांच्या द्वारें समाजाचे एकंदर नैतिक जीवन जर सुधारतां आलें, तर ती राष्ट्रसेवाच होय. जनतापरमेश्वराची सेवा केल्याचें पुण्य तरी त्यांना लागेल. अशा विविध विचार तरंगाच्या पार्श्वभूमीवर या परिषदेचें महत्व फारच दूरगामी आहे. म्हणूनच या परिषदेचे उद्घाटन करण्यासाठीं भारतगणराज्याचें अध्यक्ष डॉ. राजेंद्र प्रसाद हे आले होते. डॉ. राजेंद्रप्रसाद यांची वृत्ति सत्वशील, धर्मशील व विनयशील असून साधूंच्या परिषदेचें उद्घाटन करण्यास ते सर्वथैव योग्य आहेत. त्यांनीं आपल्या भाषणांत बहुमोल विचारांची खैरात वाटली आहे. ते म्हणाले—'आर्थिक उन्नतीबरोबरच सामाजिक व नैतिक पुनरुज्जीवनाचीं चिन्हें सर्व भारतांत दिसावयास लागलीं आहेत. सामान्य माणसावर अजून साधूंचे वजन बलाढ्य आहे. म्हणून साधुसमाजानें या बाबतींत रोजच्या सन्निकर्षांच्या योगानें या विचारांची दृढता करतां येण्यासारखीं आहे. नियोजित कार्यक्रम आंखून साधुसमाजास नव्या युगाच्या संदेशधारकाची भूमिका आजहि बजावतां येईल. गणराज्य यन्त्रांत एंजिनिअर व यन्त्रशास्त्रविशारद यांचें जसें स्थान सर्वमान्य व सम्मत आहे, तसेंच नैतिक उन्नतीच्या प्रांतांत साधूंना तेंच स्थान प्राप्त करून घेता येणे शक्य आहे! कल्पनांचा आवेग व लोकमताची कार्यक्षमता यांच्याबद्दल दुमत होणें शक्य नाहीं व साधुसमाज या दोघानांहि योग्य नियंत्रण घालून राष्ट्रकल्याण करण्यास समर्थ आहे. राष्ट्रांतील सामान्य माणसानें नैतिक जीवन व्यतीत करावें व त्यासाठीं त्यास शिक्षण देऊन मार्गदर्शन करण्याचे काम साधूंनीं आपल्या अंगावर घ्यावे. असें करण्यांत ते फक्त भारताचे क्षेम कल्याण करीत नसून अखिल मानवजातीचें कल्याण साधणारआहेत. परिस्थितिच अशी आली आहे कीं जर भौतिक जीवन जगावायचे असेल तर त्याला अध्यात्माचा पाठिंबा असलाच पाहिजे. प्राचीन काळीं आमचा भारत परिमितता व सुखदुःख समस्थिति या गोष्टींत विख्यात होता. जीवनांतील आध्यात्मिक अंगाकडे दुर्लक्ष न करितां किंवा ऐहिक जीवनाची पूर्ण उपेक्षा न करितां त्यांनीं या दोन्ही भागांचे सुंदर मीलन केलें. ती सुसंवादता व एकीकरण बुद्धि आज पुन्हां उज्ज्वलित करण्याची वेळ आली आहे; व त्यामुळेंच समृद्ध भारताची संघटना करितां येईल व त्याबरोबरच लोकांचें नैतिक जीवनमानहि उंचावत जाईल. या दोन्हीं अंगाचें सम्मीलन करण्याचे कामी साधूंनीं सहकार केल्यास त्यांचा उद्धार व त्याबरोबरच राष्ट्राचाहि उद्धार होण्यास मदत होईल. आमच्या धर्मग्रंथांतहि जगासंबंधीं साधूने बेफिकिरी दाखवावी, असें कोठेहि लिहिलेलें नाहीं. राष्ट्रांतील प्रत्येक माणसांनें व संस्थेनें पूर्ण सहकार करून साधु समाजाची उद्दिष्टें व ध्येये पूर्ण केलीं पाहिजेत. साधूचा वर्ग विचारी व सद्सद्विवेकबुद्धि जागृत ठेवणारांचा आहे. आपण ज्या जगांत राहतो तें जग व जें जग प्राप्त होण्यासाठीं आम्हीं धडपड करून राहिलों आहो, तें जग यांत फार निकटवर्ती संबंध आहे. आपलें ऐहिक कर्तव्य करून मानवसमाजाच्या सुखासाठीं सर्व आवश्यक गोष्टी केल्याविना म्हणजे जगासंबंधीचें ऋण फेडल्याविना परलोकातील प्राप्ति अशक्य आहे, हीच आमच्या धर्मग्रंथाची शिकवण आहे. या जगांतील आपली कर्तव्यें अनासक्त होऊन करीत राहणें, हाच पाठ आमच्या द्रष्ट्यांनीं आम्हांस दिला आहे. तुम्ही जी भूमिका पत्करली आहे, त्याच भूमिकेवरून जगाविषयीचे कर्तव्य करण्यास आपण पुढें यावें, अशी आपणास माझी प्रार्थना आहे." अशा विचाराचें भाषण डॉ. राजेन्द्र प्रसाद यांनीं केलें. साधू म्हणजे निव्वळ निवृत्ति मार्ग नव्हे. भगवान् बुद्धाच्या हजारों शिष्य व शिष्यिणींनीं सर्वसंग परित्याग करून आपल्या वैयक्तिक सुखावर पाणी सोडून अखिल मानवजातीची सेवा करून तिचें कल्याण केले व आपलें ज्ञान दानाचें कार्य अव्याहत सुरू ठेऊन आपलें नांव जगांत अजरामर केलें! ही ऐतिहासिक घटना डोळयापुढें ठेऊन आमच्या साधूंनीं जर कार्यक्रम आंखला व त्याप्रमाणें आपणास कार्यप्रवृत्त करून घेतलें, तर भारत साधुसमाजानें फार मोठें कार्य केलें असें होणार आहे. ते कार्य करण्यास परमेश्वर त्यानां सद्बुद्धि व वासना देवो, हीच आमची प्रार्थना! • •

# – श्री. तुकाराम विश्वविद्यालय संघ, पुरवणी –

आश्विन शु॥ एकादशी रोज शनिवार, तारीख १९ ऑक्टोबर रोजीं रात्रौ ९ वाजतां मोटवानी यांच्या कृष्णमंदिरांत श्री तु. वि. विद्यालय संघाचे विद्यमानें सिद्धार्थ कॉलेजचे प्राध्यापक **द. दि. परचुरे** यांचें **श्रीकृष्णचरित्रावर** फारच उद्बोधक व श्रवणीय कीर्तन झालें. प्रा. परचुरे यांनीं आपल्या सौजन्यानें संघावर जो अनुग्रह केला व आपुलकीच्या भावानें सांस्कृतिक कार्यक्रम देण्याचें जें कबूल केलें त्याबद्दल आमच्याजवळ पुरेसे शब्द नाहींत. त्यांच्या चिरंजीवांनीं गेय्य बाजू सांभाळल्यामुळें तर श्रोतृवृंद ११-४५ पर्यंत तटस्थ बसला होता. अर्वाचीन श्रीकृष्ण चरित्रासारखा विषय, रंगविणारा विद्वान् व भक्तिमान् कीर्तनकार व त्यास साथ देणारा उत्तम गायक व तबलजी-असा त्रिवेणी संगम जमल्यावर तो कार्यक्रम यशस्वी कां होणार नाहीं ? त्यांनीं विनावेतन ही संघाची जी सेवा केली तीबद्दल संघ त्यांचा सदैव कृतज्ञतापूर्वक ऋणी राहील. आरतीचे पैसे सुद्धां त्यांनीं संघास देणगी म्हणून दिली! प्रा. परचुरे यांनीं वारंवार येथें येऊन व्याख्यान, प्रवचन किंवा कीर्तन यांच्या द्वारें आमच्या या कार्यास मदत करावी, अशी त्यांना नम्र विनंति. डिसेंबरच्या ७ पासून वाचस्पति यांची श्री तुकाराम महाराजांवर २१ डिसेंबरपर्यंत प्रवचनें होणार आहेत. त्यांनीं खारच्या श्रोतृवृंदावर छाप बसविली आहेच. त्यायोगानें ही प्रवचनमाला पूर्ण यशस्वी होईल यांत, संशय नाहीं.

× × ×

कार्तिकी एकादशीस पंढरपूर येथें यात्रा भरली होती. त्या निमित्तानें आजचीं आम्ही श्री. तुकाराम महाराजांना श्रद्धांजलि अर्पण करीत आहोंत:

## श्री. तुकाराम महाराजांचा आत्मप्रत्यय

आजच्या कार्तिकी एकादशीच्या निमित्तानें कांहींतरी श्री तुकाराम महाराजांच्या अभंगवाणीचा आस्वाद घ्यावा. श्री तुकाराम महाराजांनीं जी आज विश्वगुरुची पदवी मिळविली आहे, तीसाठीं त्यांनीं किती परिश्रम केले, केवढा स्वार्थत्याग केला, कशी जननिंदेची पर्वा केली नाहीं, केवढा कंठस्फोट केला याची माहिती त्यांच्या अभंगावरून सर्वांना होण्यासारखी आहे. तुमची साधना कोणतीहि असूं द्या, एकच ध्येय मनांत असलें पाहिजे. श्री तुकाराम महाराजांच्या एकंदर साधनेचें पर्यवसान त्यांच्या आत्मप्रत्ययाच्या प्रातींत झालें! आणि शेवटीं अशी एक स्थिति येऊन ठेपली कीं, श्रीतुकाराम महाराज हरस्वी, वर्चस्वी व तेजस्वी होऊन बसले! अग्नीचा धर्म ज्याप्रमाणें प्रसरणशीलता व विघ्नांचा नाश, त्याप्रमाणें जेथें जेथें ते जात, तेथें तेथें सर्व त्यांना शरण येत, त्यांच्या अलौकिकतेची सर्वांना साक्ष पटे व आपल्या वैयक्तिक, स्वार्थविषयक संकुचित भावनाप्रधान, एकदेशीय अशा जीवनाची वैय्यर्थता पटून त्यांचा पूर्ण निरास होई. श्रीतुकाराम महाराजांच्या संतपणाची बैठक (परम) आत्मगौरवता, (परम) आत्मज्ञान, व (परम) आत्मपूजन यावर अधिष्ठित होती. भक्तिमार्गाच्या अविरत सेवनानें, त्यांच्या अहंवृत्तीचा पूर्ण नायनाट होत होत त्यांना " सर्व विष्णूमय, वैष्णवांचा धर्म, वर्णावर्णभेद अमंगळ " ह्याचा साक्षात्कार झाला! " आपण " म्हणून असणाऱ्या जाणीवेचें पूर्ण विकेन्द्रीकरण झाल्यामुळें त्यांच्या अंतरंगांत परमात्म्याच्या भव्य तेजाचा प्रवेश झाला! त्यांचा पूर्णपणें कायाकल्प झाला! जेथें जेथें ते जात तेथें तेथें असणारीं दिवाभीतें पळून जात. परमेश्वराच्या आत्मनिविष्टतेमुळें प्रखर प्रकाश देणारा व चैतन्यपूर्ण अशा सूर्याप्रमाणें जेथें जेथें ते जात तेथें भव्यता, समृद्धि, दुष्टमनोविचारांचा सर्वस्वी लोप, सोज्वल मनोवृत्तींचें वितरण होऊन सर्वजण त्यांचेपुढें नम्र होत; व जीवनाची माधुरी व उदात्तता त्यांना अनुभवावयास मिळे. त्यांच्या हजारों अभंगांतून कांहीं कांहीं अभंग या त्यांच्या विकासपरिसीमेची व त्यायोगानें त्यांच्या भोंवतालच्या तेजोवलयाची साक्ष पटवून देतात! येथें अभिमान नाहीं, ताठरपणा नाहीं, अहंगंडाची भावना नाहीं; पण **आत्मप्रतीतीचा परमोच्च-बिंदू** गांठलेला आहे! असे दोनच अभंग आम्ही या पवित्र एकादशीच्या परम मंगल प्रसंगानें उद्धृत करीत आहोंत—

तोंवरि तोंवरि जंबुक करि गर्जना । जंव त्या पंचानना<br>देखिलें नाहीं ॥ धृ ॥<br>तोंवरि तोंवरि सिंधु करि गर्जना । जंव त्या आगस्ती ब्राह्मणा<br>देखिलें नाहीं ॥ १ ॥<br>तोंवरि तोंवरि वैराग्याच्या गोष्टी । जंव सुंदर वनिता दृष्टि<br>पडिली नाहीं ॥ २ ॥<br>तोंवरि तोंवरि शूरत्वाच्या गोष्टी । जंव परमाईचा पुत्र दृष्टि<br>देखिला नाहीं ॥ ३ ॥<br>तोंवरि तोंवरि माळामुद्रांचीं भूषणें । **जंव तुक्याचें दर्शन झालें नाहीं** ॥ ४ ॥ ( २७८३ )

तोंवरि तोंवरि शोभतील गारा । जंव नाहीं हिरा प्रकाशला ॥ १ ॥<br>तोंवरि तोंवरि शोभति दीपिका । नुगवता एका भास्करासी ॥ २ ॥<br>तोंवरि तोंवरि सांगती संतांचिया गोष्टी । **जंव नाहीं भेटी तुक्यासवें** ॥ ३ ॥ ( २७८४ )

आज स्वतंत्र भारतांतील प्रत्येक बंधुभगिनीला ही आत्मप्रतीति उत्पन्न झाली पाहिजे! तरच संतांचे मार्ग चोखाळण्याचा उपयोग!

× × ×

कार्तिक शु. पौर्णिमेस गुरूनानक यांचा जन्म झाला. म्हणून हा दिवस शीखधर्मीय बांधव दरवर्षी साजरा करतात. श्री. तुकाराममहाराज व गुरूनानक यांच्या शिकवणींत पुष्कळच साम्य आहे. आत्मशुद्धि, आत्मत्याग, मानवजातींच्या सेवेसाठीं अर्पण केलेलें जीवन या बाबतींत दोघांची शिकवण सारखी आहे. गुरूनानक यांनीं शीख धर्माची प्रतिष्ठापना केली. शाश्वतसत्य, प्रेम व जागतिक बंधुभाव याचे धडे गुरूनानकसाहेबांनीं सर्वत्रांना दिले. त्यांनीं प्रवासहि फार केला होता. त्यांच्या समाज संघटनेचें स्वरूप समाजसत्तावादी होतें. हिंदु-मुसलमानांमध्यें सलोखा निर्माण करून त्यांच्यातील विसंवादी वृत्ति नाहींशी करण्यासाठीं गुरूनानक म्हणजे एक पूलच होत! त्यांनीं ब्राह्मण्याच्या जानव्याचें खरें स्वरूप नैतिक परिभाषेत दाखविलें आहे. नुसतें सुताचें जानवें त्यांना नको होतें. नानक म्हणतात—" जानव्याचा **कापूस** म्हणजे दया करणें; जानव्याचें **सूत** म्हणजे समाधान; **जानव्याचे दोरे व ते बद्ध करणें** म्हणजे सत्य; व **जानव्याची गांठ** म्हणजे ब्रह्मचर्य. व हें जानवें घालून जीवनापर्यंत मानवजातीची सेवा करण्याचे ध्येयाचा अंगीकार करा. नुसतें जानवें घालून ब्राह्मण होत नाहीं, ब्राह्मण्याचे गुण अंगीं आणा, हा त्याचा संदेश श्री तुकाराम महाराजांच्या उपदेशाहून निराळा नाहीं. पुष्कळशा फकीरांबरोबर त्यांनाहि कारागृहवास भोगावा लागला! मंत्रविद्या व जादूटोणा यांनाही त्यांनीं तोंड दिलें. आज गांगरलेल्या जनतेस नानकसाहेब खरे मार्गदर्शक होतील! त्यांना अनेक प्रणाम!

# गणपतरावांची शेळी

आतां शेळी हा प्राणी इतिहास पुराण प्रसिद्ध आणि अजरामर झाला आहे. लोकांना जोंपर्यंत महात्मा गांधींचें स्मरण राहील, तोंपर्यंत त्यांच्या शेळीचें स्मरण राहील. ही गोष्ट, महात्मा गांधींच्या पसंतीमुळें, शेळीला जें केवळ अखिल भारतीयच नव्हें, पण आन्तरराष्ट्रीय महत्व, आतां प्राप्त झालें आहे, त्याच्या पूर्वींची आहे. १९०७/८ साली आम्ही मुंबईच्या उपनगरांत राहत असूं. तेव्हां प्रत्यक्ष पाहिलेली आहे !

पूर्वींसुद्धां शेळीला आपल्या वाङमयांत स्थान नव्हतें असें नाहीं; पण तें फार प्रतिष्ठित नव्हतें. तिच्या पुत्राची यज्ञांत अनिवार्यपणें जरूर पडत असे म्हणून तिला महत्व होतें. "अजापुत्रं बलिं दद्यात्"! बिचाऱ्याला बुद्धानें वांचवीपर्यंत मोठें निष्ठुर मरण यायचें आणि मारणारें स्वर्गाला जायचें ! 'शेळीसुद्धां जिवानिशी' जायची आणि वर खाणारा 'वातड' म्हणून निंदा करायचा ! तिचे कान 'गोसाव्याच्या हातांत' असायचे ! तिच्या गळयांतील लोंबणाऱ्या स्तनांची तर संस्कृत कवींनीं कुचकामी ( good for nothing ) पुरुषांना उपमा देऊन फारच टवाळी केली. "अजागलस्तनस्येव तस्य जन्म निरर्थकम्" याप्रमाणें शेळीला फार अपमान सोसावा लागत होता. पण ज्याप्रमाणें प्रत्येक कुत्र्याला त्याचा दिवस ( संधी ) प्राप्त होतो ( every dog has his day ) त्याप्रमाणें प्रत्येक शेळीला, नाहीं तरी कांहीं शेळयांनां, गांधीजींच्या धर्मसंकटामुळें सोन्याचे दिवस आले. धनगराच्या कोंडवाड्यांतून तिची सफर थेट लाटसाहेबांच्या महालापर्यंत होऊं लागली. लंडनमध्यें तिचीं नुसतीं चित्रेंच नव्हे, तर व्यंग चित्रेंही निघूं लागली ! खुद्द चर्चिल-साहेबांनीं नागड्या फकीराबरोबर त्यांच्या शेळीचा उल्लेख केला. शंकरांचा नंदी, यमधर्माचा रेडा, दत्तात्रेयाची गाय व कुत्रे या सन्मान्य व्यक्तींच्या बरोबरीचा दर्जा आतां शेळीला प्राप्त झाला आहे.

१९०७ सालीं बिचारी शेळी अजून अप्रसिद्ध आणि अज्ञात अवस्थेंतच असे. पण पुढें येणाऱ्या तिच्या वैभवाची जणूं कांहीं नांदीच आमच्या गणपतरावांनीं केली. मुंबईची राहणी फारच महाग, मुंबईंत जेवढें भाडें द्यावें लागे तेवढ्याच भाड्यांत त्यावेळीं विलेपार्लें, सांताक्रूझ वगैरे ठिकाणीं त्याच्या दुप्पट जागा मिळत असे. आठ रुपयांत मुंबईंत दोन खोल्या मिळायच्या. पण पार्ल्यांत दोन खोल्या तेवढाच एक हॉल, व्हरांडा अशी स्वतंत्र जागा मिळायची. तेव्हां काटकसरीचा पण सुखाचा संसार करण्यासाठीं त्यांनीं मान्यांच्या चाळींत एक गाळा आठ रुपयाला घेतला. तळमजल्यावर दोन गाळे. शेजारच्या गाळ्यांत प्रभुदेसाई नांवाचे गृहस्थ राहात. मोठीं देवभोळी, धार्मिक, जुन्या चालीचीं माणसें. आतां गणपतराव त्यांचे शेजारी झाले. मुलाच्या संसाराला, मांसाहार न करणाऱ्या माणसाला भाजीपाला आणि दुधदुभत्याची अधिक जरूर पडते. गणपतरावांनीं मनांत एक विचार आणला. भाजीपाल्याची तर शक्यता नाहीं. कारण मालकीची जागा नाहीं. पण दूधदुभतें जरा अधिक झालें म्हणजे मुलामाणसांना अंमळ सुख होईल. आपण एक शेळी आणावी म्हणजे तेवढीच दुधाची टंचाई कमी पडेल. सोळा रुपयाला एक पांढरी शुभ्र शेळी व तसेंच शुभ्र कोंकरू गणपतरावांनीं एक दिवस विकत आणलें. पण चाळींत शेळीला बांधायचें कुठें ? मालक मोठे करारी ! ते म्हणाले, "भाड्यानें गाळा व ओटा दिला आहे, बाहेरची रिकामी जागा नाहीं" तेव्हां नाईलाजानें गणपतरावांनीं ठरविलें कीं, दिवसा शेळी ओट्यावर बांधायची नी रात्रीं घरांत–कारण कोणी सोडून चोरून विकून नेली तर ? शेळी फार गुणाची होती. लहानग्या बाळूला तर कोंकरू पाहून जो आनंद झाला तो पुसतां नये. शेळी दिवसास चांगली १। शेर १॥ शेर दूध देई. पण दुसरी एक खुबी होती. तिला हवे तेव्हां दूहता येत असे. कोणी पाहुणा आला कीं, गणपतराव चहा तयार करवीत आणि शेळीचा पाय पकडून चहापुरतें दूध काढून तिला सोडून देत. असा प्रयोग अनेक वेळां करतां येत असे. दुसरें दिवशीं कोंकरू शेजारच्या गाळयांत एक धार्मिक, ( orthodox ) श्रद्धाळू गृहस्थ राहात असत, त्यांच्या स्वयंपाकघरांत सहज बागडत गेलें. नर्मदाबाई सोंवळयानें देवाची पूजा करीत होत्या. कोंकरू लडिवाळपणानें त्यांस बिलगलें व चाटूं लागलें नर्मदाबाईंना विटाळ तर झालाच, पण पोटीं क्रोधाचा एवढा उमाळा आला कीं, त्या एकदम तणतणत बाहेर आल्या. वास्तविक दुसऱ्याची सेवा करण्याचें पुण्य त्यांना लाभलें असतें. "शुनि चैव श्वपाके च पंडिताः समदर्शिनः," असा धार्मिक विचार त्यांच्या मनांत आला नाहीं. प्रभुदेसाई यांना कायदेशीररीत्या Distress Damage Feasant चे टॉर्ट अथवा अपकृत्यशास्त्राचें तत्व लावून आपल्या घरांत आलेल्या कोंकराचें Roast lamb and mint sauce ( कोंकराची मेजवानी ) करण्याचाही हक्क प्राप्त झाला होता. पण यापैकीं कांहींच न करतां, कोंकराच्या पाठींत लगुडप्रहार करून गणपतरावांना शेलक्या शिव्या देण्यास सुरुवात केली. खरोखर, बहुजनसमाज फार गतानुगतिक ( Conservative ) असतो. वास्तविक एक मुष्किलीचा प्रश्न सोडविण्याचा अभिनव प्रयत्न केल्याबद्दल अभिनंदन करण्याचें सोडून प्रभुदेसाई यांनीं सुरुवात केली :—"चांगली ब्राह्मणाची जात ! पण काय तुम्हाला अवदसा सुचली. धनगरासारखें शेळ्या मेंढ्या काय घरांत बाळगण्याची अवदसा तुम्हाला आठवली आहे ? बरें, बाळगल्यात तर त्यांना घरांत तरी सांभाळाल कीं नाहीं ?—पुन्हां माझ्या घरांत तुमचें कोंकरू किंवा शेळी आली तर—!" धमकी अर्धवटच राहिली. शेळीला जोंधळे, भाजीपाल्याची डेखें वगैरे आहार चालत असे; पण मोकळपणानें फिरण्याची तिला संवय असल्यामुळें तिची मोठी कुचंबणा झाली. संध्याकाळचे गणपतराव तिला दोरी बांधून अंमळ पाय मोकळे करायला नेत; तेव्हां चौपाटीसारखी प्रेक्षकांची गर्दी जमायची ! त्यांतून तिनें कुणाची तुळस किंवा कांहीं झाड खाल्लें मग तर विचारूंच नका. सर्व पार्लेभर 'गणपतरावांची शेळी' हा एक चर्चेचा विषय होऊन

( पान ११ वर )

# गांधीतत्त्वप्रणालीचें भारतांतील भवितव्य*

* [ **गांधीमार्ग**—अंक ३ रा, जुलै १९५७. संपादकाच्या सौजन्यानें ]

सर्व महासंतांनीं जगाला कांहींतरी नवीन विचार दिले. मानवी आयुष्यामध्यें भरलेल्या खोल अर्थाचा उलगडा करण्याचा प्रयत्न अनेक संतानें केला. त्याचप्रमाणें गांधीजींनीही सत्य आणि अहिंसा ह्या दोन महान् तत्त्वांचा अंगिकार करण्याचा आदेश जगाला दिला, कीं, त्यामुळें व्यवहारिक आयुष्य कष्टमय झालें; परंतु जीवनाच्या नैतिक मूल्याची किंमत जगाला कळली. गांधी–युग–जें त्यांच्या आयुष्यांत तीस वर्षे टिकलें–त्यांनें आपल्या देशाच्या विचार–आचारांत आमूलाग्र बदल घडवून टाकला. जगांतील लाखों लोकांच्या जीवनाच्या तत्त्वज्ञानावरही त्यांच्या आदेशाचा परिणाम झाला. त्यांच्या दक्षिण आफ्रिकेंतील व इंग्लंडमधील विरोधकांनीं सुद्धां शरीरापेक्षां आत्म्याचा श्रेष्ठपणा मान्य केला, त्यावरच त्यांचें 'आत्मबलाचें' तत्वज्ञान अधिष्ठित झालें आहे.

आपलें स्वातंत्र्य सुद्धां आपण परत मिळविलें, व तें गांधीजींच्या अहिंसात्मक प्रतिकाराच्या जोरावरच. हिंदी आयुष्यक्रमाची घडणही आतां गांधीजींच्या एकंदर शिकवणीवरच आधारित केली गेली आहे. अनेक पाश्चिमात्य विचारवंत तर आतां नैतिक बल आणि उत्कर्षाकरितां आपल्या भारताकडेच मोठ्या आशेनें पाहत आहेत.

गांधीजींच्या मृत्यूनंतर नऊ वर्षांनीं आपण खरोखरच त्यांची शिकवण अनुसरीत आहोंत कां? असा प्रश्न उत्पन्न होतो. गांधीजींचें जीवन–तत्त्वज्ञान खरोखरीच भारतीयांच्या जीवनांत कायमचें टिकेल कां? किंवा कांहीं वर्षांनीं त्या उच्च तत्त्वांचा त्यांना पूर्ण विसर पडेल! कृष्ण, बुद्ध, येशू ख्राईस्ट, कॉनफ्यूशिअस् ह्या थोर धर्मतत्त्ववेत्यांच्या विचारांत जसे अनेक विचारप्रवाह मिसळून गेले, त्याचप्रमाणें गांधीजींच्याही विचारांत कालानुसार दुसरे विचारप्रवाह मिसळून निराळ्या समाजव्यवस्थेखालीं ते निराळींच रुपें धारण करतील?

खरी वस्तुस्थिति काय आहे ती पाहूंया. बौद्धिक दृष्ट्या आपण गांधीजींची शिकवणूक एकदम मान्य करतों. अनेक लोक आपल्या सामाजिक आयुष्यांत स्वतःला मोठ्या अभिमानानें 'गांधीजींचे शिष्य' म्हणवितात. सरकार सुद्धां गांधीजींच्या आदेशानुसार आपला राज्यकारभार चालत असतो, असें जाहिर करते. आंतरराष्ट्रीय प्रश्नांत सुद्धां अहिंसा आणि साधन–शुचितेवर आपलें सरकार भर देत आहे. गांधीजीं सारखे शांतता आणि मानवी कल्याणाचे शुद्ध विचार मनांत धरून जवाहरलाल नेहरू आपल्या देशावर होत असलेल्या अन्यायाचा प्रतिकार करण्याकरितां अहिंसात्मक प्रतिकाराचें धोरण ठेवतात. आपल्या देशाबद्दल ज्यांच्या मनांत गैरसमज नाहींत, ज्यांनीं भारतीय मनाची घडण–जी गांधीजींनी बनविली आहे ती–बरोबर समजली आहे, त्या सर्व देशांना आपल्या देशाबद्दल आदराची भावना आहे. शांततामय सहजीवन, व लोकशाही ह्या दोन गोष्टींमुळें आज आपलें राष्ट्र जगामध्यें आदरणीय झालें आहे.

वस्तुस्थितीचें अवलोकन केल्यानंतर साहजिकच दोन प्रश्न उत्पन्न होतात. गांधीजींनी प्रसृत केलेल्या ह्या उच्च विचारसरणीचें रूप पुढें कसें राहिल? गांधीजींचें हें स्वार्थत्यागी तत्त्वज्ञान इतकें खोलवर आपल्या जीवनांत मुरून जाईल कीं त्यांच्या इच्छेप्रमाणें खरोखरीचें 'रामराज्य' हळुहळु भारतांत प्रस्थापित होईल?

ह्या प्रश्नांची उत्तरें द्यावयाचीं म्हणजे सर्व जागतिक परिस्थितीचा विचार करावयला पाहिजे. आपल्या राष्ट्रीय जीवनांवर आंतर–राष्ट्रीय घडामोडींचा परिणाम होत आहे. सर्व जगामध्यें ज्या आर्थिक घडामोडी होत आहेत, जी शास्त्रीय प्रगती केली जात आहे त्यामुळें सर्व जगामध्यें एकसूत्रीपणा आला आहे. कोणताही देश त्यापासून अलग राहूं शकत नाहीं. आपल्या देशाबद्दल सांगायचं तर आम जनता आपल्या राजकीय हक्काबद्दल अधिकाधिक जागृत होत आहे, व देशांतील आर्थिक घडामोडीच आपल्या राजकीय जीवनांला वळण देत आहेत.

कॉंग्रेसनें तर समाजवादी तत्त्वावर समाजाची आर्थिक पुनर्घटना करण्याचें ठरविलें आहे. कॉंग्रेस आणि समाजवादी पक्ष ह्यांचा मतभेद आतां फक्त धोरणाबद्दल आहे. समाजवादाचें तत्त्व कॉंग्रेसला मान्य आहे. जो मतभेद आहे तो समाजवाद देशांत प्रसृत करण्याच्या पद्धतीबद्दल. त्यामुळें दुसरा प्रश्न उत्पन्न होतो, कीं गांधीजींची 'सर्वोदया'ची कल्पना आणि कॉंग्रेसनें अंगीकारलेला समाजवाद एकच आहेत कां?

समाजवाद म्हणजे लोकांच्या राजकीय आणि आर्थिक उन्नतीकरितां तयार केलेले कांहीं सिद्धांत आहेत, कीं त्यामुळें समाजांतील सर्व तऱ्हेची विषमता नाहींशी होईल. सामाजिक विषमता दूर करण्यासाठीं जरूर ते कायदे करावे, न जमल्यास जनतेनें स्वतःच असहकार करून विषमता दूर करावी, व तेही न जमल्यास हुकुमशाही प्रस्थापित करून सामाजिक विषमता नेस्तनाबूत करावी. जर्मनींतला नाझी पक्ष आणि रशियाचा साम्यवादी पक्ष हुकुमशाही तऱ्हेनें राज्यव्यवस्था ठेवूनही स्वतःला समाजवादी म्हणवीत आहेत. अशा प्रकारच्या समाजवादाचे परिणाम आपल्याला गेल्या युद्धांत चांगलेच अनुभवास आले आहेत.

समाजवादाचा प्रसार करण्याकरितां एकाच पक्षाचं सरकार स्थापन करून त्याच्या हातीं सर्व महत्वाचीं खातीं व उद्योगधंदे द्यावेत, म्हणजे एक प्रकारचे समाजवादी सरकार स्थापून जास्तींत जास्त लोक त्यांच्या अमलाखालीं, देखरेखीखालीं आणावेत. पण अशा समाजवादी सरकारच्या अधिकाराखालीं जनता म्हणजे संपत्ति–उत्पादनाचें एक प्रभावी अस्त्रच होऊन बसेल, आणि स्वखुषीपेक्षां सरकारी जबरेनेंच ती हें संपत्ति निर्माण करण्याचें काम करील. ज्या तत्त्वांवर समाजवादाचे सर्व प्रकार अधिष्ठित झाले आहेत, तीं तत्त्वें माणसाची फक्त व्यवहारिक–आर्थिक–बाजूच जमेस धरीत असते. परंतु जीवनाचे असा भाग पाडणें अनैसर्गिक आहे. मनुष्याच्या जीवनाचा विचार त्याच्या नैतिक, आर्थिक आणि अध्यात्मिक गरजा लक्षांत घेऊनच केला पाहिजे. ज्यावेळीं जनतेला आयुष्याच्या नैतिक मूल्याची कल्पना येईल तेव्हांच ती मानव जातीच्या खऱ्या कल्याणासाठीं

झटेल. नुसत्या आर्थिक प्रलोभनावर कोणतेही सिद्धांत जनतेच्या मनाची पकड घेणार नाहींत, व ते पक्षही यशस्वी होणार नाहींत. येथेंच गांधीजींच्या सर्वोदयाची कल्पना व हे सर्व 'इझम्' ह्यांच्यांत असलेला मूलभूत फरक आपल्या नजरेस येतो. व हे सर्व 'इझम्' अर्थ–सत्यावर अधिष्ठित झाले आहेत, ह्याची सत्यता पटते.

जेव्हां प्रत्येक व्यक्ति स्वतःला समाजाचा एक महत्वाचा क्रियाशील घटक मानील, त्याचें सामाजिक जीवन कोणत्याही कायद्याच्या दडपणाखालीं किंवा दुसऱ्या कोणत्याही बाह्य शक्तीच्या जबरदस्तीपेक्षां स्वतःची नैतिक जबाबदारी जाणून ती पार पाडील; व्यक्तिगत कल्याणापेक्षां समाजाच्या कल्याणाचा विचार जेव्हां प्रत्येक व्यक्ति करील तेव्हांच हे वर्गकलह, हें अधिकार लालसेचं राजकारण, ते आंतरराष्ट्रीय झगडे या सर्वांना पूर्णविराम मिळेल. ही आदर्श परिस्थिति निर्माण करावयाची असेल तर जीवनाच्या मूल्याची कल्पना आपण एकदम बदलून टाकली पाहिजे. व्यक्ति स्वयंस्फूर्तीनें समाजाशीं एकरूप झाली पाहिजे कोणत्याही बाह्य दडपणापेक्षां अंतःप्रेरणेनें जेव्हां व्यक्ति समाजाशीं एकरूप होईल तेव्हांच ती एकरूपता टिकेल, व समाजाचें कल्याण तेंच व्यक्तीचें कल्याण हें तत्त्व आचरणांत येईल. गांधीजींच्या आत्मबलाचा हाच खरा अर्थ आहे; व हें आत्मबलच सर्व परिवर्तनाचा पाया आहे.

स्वातंत्र्य मिळाल्यावर राष्ट्राच्या दुर्दैवानें गांधीजी लवकरच आपणांतून निघून गेले. त्यांच्या मार्गदर्शनाचा लाभ आपल्याला मिळाला नाहीं. आपल्या लोकसत्ताक राज्य स्थापनेच्या कार्याला त्यांचा अनुभव अनमोल ठरला असता.

आपली राज्यघटना अहिंसा आणि लोकशाही तत्त्वावरच अधिष्ठित आहे. घटनेनुसार स्त्री, पुरुष, स्पृश्य अस्पृश्य, गरीब श्रीमंत सर्वांनांच स्वतंत्र व्यक्तित्व व हक्क मान्य केला आहे. घटना कितीही उत्तम असली





तरी ज्या जनतेसाठीं ती बनविली आहे त्या जनतेनें तिचा योग्य फायदा करून घेतला पाहिजे.

लोकशाही म्हणजे एखादी सार्वजनिक संस्था नाहीं, तर ती एक मनाची परिणतअवस्था आहे कीं, जींत आपण दुसऱ्यांचे न्याय्य हक्क मान्य करतों. लोकशाहीचा आविष्कार निरनिराळे कायदे करून होत नसतो, वर जनतेच्या विकसित मनोवृत्तीनें खऱ्या लोकशाहीची प्रस्थापना देशांत होते. लोकशाहीच्या संरक्षणासाठीं आपण कायदेकानू करण्यापेक्षां लोकशाहीचीं तत्वें प्रत्यक्ष आचरणांत आणणाऱ्या व्यक्ती आपण समाजांत निर्माण केल्या पाहिजेत. गांधीजींच्या आयुष्यक्रमाच्या नुसत्या अवलोकनानेंच जगाला अनेक गोष्टींचे एवढें ज्ञान झालें आहे कीं तितकें ज्ञान संबंध वाचनालयाचीं पुस्तकें वाचून झालें नसतें. मनुष्य स्वतःच्या शुचिर्भूत आणि निःस्वार्थी आयुष्यानें जितकें परिवर्तन करतो तितकें अनेक व्याख्यानें देऊन होणार नाहीं. स्वतःच्या विशुद्ध आयुष्यक्रमानें प्रत्येक व्यक्ति एक अमोघ शक्ती उत्पन्न करूं शकते व ती दिवसेंदिवस वाढत जाते.

राजकारणांत तर आपण लोकसत्ताकपद्धतीचा अवलंब केला आहे. पण निर्भेळ लोकशाही शाश्वत टिकेल अशी कांहीं शक्ति आपण संपादन केली आहे का ? स्वातंत्र्य प्राप्तीनंतर आपल्या सामाजिक वातावरणांतून आपल्याला कांहीं स्फूर्ति मिळाली आहे कां कीं ज्याचा परिणाम आमच्या वाढत्या पिढीवर व्हावा व त्यांनीं आपल्या इच्छेप्रमाणें आदर्श देशाच्या निर्मितीचा प्रयत्न करावा ?

आपण आपल्या स्वतःच्या आयुष्यावरून आजच्या तरुण स्त्री पुरुषांना 'आदर्श भारतीय नागरिक' होण्यास मदत करीत आहोंत कां ? असे कांहीं गंभीर प्रश्न आज विचारवंतांच्या मनांत येत आहेत.

पंचवार्षिक योजना यशस्वी करावयाची असेल तर आपल्याला आज इंजिनिअर्स, डॉक्टर्स, अर्थशास्त्रज्ञ, यंत्रविशारद ह्यांची गरज आहे. उच्च शिक्षणावर जितके जास्त पैसे खर्च करूं तितके हे लोक जास्त तयार होतील. पण पंचवार्षिक योजनेची यशस्विता फक्त त्यांच्यावरच अवलंबून नाहीं; तर उत्साही, प्रामाणिक आणि हुशार नागरिक आपण तयार केले पाहिजेत. नागरिकत्वानें जास्त अधिकार मिळतात; पण जबाबदारी त्याहूनही अनेक पटीनी वाढते. जोंपर्यंत आपल्या विश्वविद्यालयामधून फक्त विद्वान आणि अनेक विषयाचे तज्ज्ञच बाहेर पडतील, आपली नैतिक जबाबदारी जाणणारे नागरिक बाहेर पडणार नाहींत, तोंपर्यंत समाजवादाची बीजें आपल्या समाजांत रुजणार नाहींत.

समाजाच्या सर्वांगीण उत्कर्षाकरितां गांधीजींच्या सर्वोदयाच्या तत्वांचाच अंगीकार केला तरच समाजामध्यें एक प्रकारचा नैतिक उत्साह उत्पन्न होईल. समाजवादाचा राजकीय–आर्थिक विकासाचा कार्यक्रम अपूर्ण आहे. आजकाल निष्काम सेवेपेक्षां आणि मनाच्या शुचिर्भूततेपेक्षां अधिकारलालसेचेंच राजकारण अधिक खेळलें जात आहे.

आपलें सरकार आपल्याला कशा तऱ्हेनें मदत करूं शकेल ? गांधीजींच्या विचाराप्रमाणें चालविल्या जात असलेल्या कांहीं संस्था जनतेच्या मनांत निष्काम सेवाधर्माची आवड उत्पन्न करण्याचा स्तुत्य प्रयत्न करीत आहेत. खेडोपाडीं जनतेच्या सहकार्यानें अनेक लोकोपयोगी कामें होत आहेत व गांधीजींनीं दाखविलेल्या मार्गांनीं जाण्याचा प्रयत्न करीत आहेत. सरकारनें आतां विश्वविद्यालयांत सुद्धां गांधीजींच्या तत्वज्ञानाचे प्राध्यापक नेमले पाहिजेत. गांधी–वाङ्मय प्रसिद्ध करून सरकार

…त्या तत्वज्ञानाचा उत्तम प्रसार करूं शकते. . पण सरकारच्या …ला सुद्धां कांहीं मर्यादा आहेतच. जर जनता उत्साहानें पुढें येऊन …ली जबाबदारी पार पाडील तरच कांहीं फल आपल्या पदरांत पडेल. …तु अनेक वर्षें गुलामगिरींत राहिल्यामुळें प्रत्येक वेळीं सरकारवर अवलंबून …ण्याची संवय आपल्याला झाली आहे. अनेक वेळां आपलें कर्तव्य न …तां विनाकारण आपण सरकारलाच त्याबद्दल दोष देतों.

आपल्या मनाला योग्य सुविचाराचें वळण लावण्याचा प्रयत्न आपणच …ला पाहिजे, आपण निवडून दिलेले लोक देशाचा राज्यकारभार करतात. …पल्या मानसिक उत्कर्षाकरितां त्यांच्याकडे कार्यक्रम नाहीं. तो आप… …तयार केला पाहिजे. समाजाचें, जास्तींत जास्त जनतेचं कल्याण …वें असें जर वाटत असेल, तर संयम, शिस्त, दूरदृष्टि आणि स्वार्थत्याग …सारखे अलौकिक गुण अंगीं बाणण्याचा प्रयत्न केला पाहिजे. …पल्या मनाला जिंकण्याचा प्रयत्न आपणच करूं शकतो; बाहेरील …क दडपणाचा उपयोग होत नाहीं. ' जो स्वतःला जिंकतो तोच खरा …विजय.' जीवनाच्या लढाईत हें अनमोल शस्त्र आहे. **हें तत्त्व आपण आत्मसात केलें तर आपल्या देशांत गांधी-मार्गाचें भवितव्य उज्वल आहे.**

परंतु आपण शास्त्रज्ञ, राजकारणी, उत्तम राजकर्ते, अनेक विषयाचे …ज्ञ निर्माण केले तरच देशांत ऐहिक सुखाचा व संपत्तीचा पाऊस पडेल. …ण ह्या सर्व ऐश्वर्याला अध्यात्माची जोड नसेल, तर पाश्चात्य राष्ट्रां… …प्रमाणें आपल्याकडेही जनतेचा मानसिक ताण वाढेल, झगडे निर्माण होतील, युद्धें चालूं राहतील व शान्तता आणि समाधान कोणालाही …मिळणार नाहीं.

आपली प्राचीन भारतीय संस्कृति पुष्कळशी गांधीं-मार्गासारखीच आहे. परंतु राजकीय आणि औद्योगिक प्रगतीच्या झगझगाटापुढें …पूर्वींची जीवनाबद्दलची उच्च विचारसरणी लुप्त झाली आहे. त्या विचार… …सरणीचें पुनर्जीवन करणें—आजच्या प्रतिकूल परिस्थितींतहि—इच्छा …शक्तीस शक्य आहे. जर आजच्या तरुण पिढीनें तें मनावर घेतलें, तर …आपल्या देशाचा भावीकाल उज्ज्वल आहे. कारण एक दिवस असा …येईल कीं, जगाला राजकारणाचा, अर्थिक घडामोडीचा कंटाळा येईल …व तें गांधीजींच्या जीवन-तत्वज्ञानाकडे वळेल. **तो दिवस अणु-युग …जवळ आणीत आहे.**

पाश्चात्य देशांतील कांहीं विचारवंत लोकांना आतां असें वाटूं लागलें …आहे कीं, **गांधीजींच्या जीवनाच्या साध्या सुध्या तत्वांवरच पाश्चात्य संस्कृतीची उभारणी करण्यास हरकत नाहीं.**

आजकाल जनतेंत एकप्रकारचे औदासिन्य आणि नैराश्य पसरलें आहे. …आंतरराष्ट्रीयत्वाची भावना वाढीस लागली आहे. परंतु जोंपर्यंत तिला …त्या **पवित्र तत्वाचं** महत्व मिळणार नाहीं, तोंपर्यंत अधिकार… …लालसेनें केल्या जाणाऱ्या राजकारणावर त्याचा कांहींही परिणाम होणार नाहीं. आपल्या देशावरही त्याचा परिणाम झाला आहे; पण अशा तऱ्हेच्या …स्वार्थी राजकारणांपासून आपण आपल्या देशाला वांचविलें पाहिजे. …ज्या देशांत गांधीजींच्या सारख्या अलौकिक व्यक्ती निर्माण होतात …त्या देशांनीच जगाला मार्गदर्शन केलें पाहिजे. जात, धर्म वगैरे बाबतींत …संकुचित वृत्ति सोडली पाहिजे. स्वतःच्या आत्म्याच्या उद्धारापेक्षां …आपण ज्या समाजांत राहतों त्या समाजाशीं पूर्ण एकरूप झालें पाहिजे.

गांधी-युग भारतामध्यें तीस वर्षें टिकलें, " गांधी बोले हिंद हाले " अशी परिस्थिति होती. त्यांच्या मृत्यूनंतर निम्मे वेळांतच **भारताला त्यांच्या शिकवणीचा विसर पडला असें न घडो!**

—भाषांतर—**सौ. रतन दिवे**

( पान ८ वरून )

जागोजाग, काय उपाय योजून शेळीस निर्वासित करतां येईल त्याची चर्चामंडळें बसूं लागलीं. पण गणपतराव कांहीं लेचेपेचे नव्हते. कायद्यानें कुणासही त्यांस प्रतिबंध करतां येत नव्हता. एक दिवस दुपारीं बांधून ठेवलेली शेळी दोरी तोडून पळाली आणि तिनें मालकाच्या बागेंत यथेच्छ फराळ केला. मालकांनीं तिला पकडून तिचें दूध काढून घेतलें व तिला कोंडवाड्यांत पाठवली. कोंकरू तर एक दिवस गुप्तच झालें. तें पुन्हां दृष्टीसच पडलें नाहीं. गणपतरावांनीं कोंडवाड्यांत जाऊन व पैसे आठ आणे भरून शेळी सोडवून आणली. दुसरे दिवसापासून पार्ल्यांस शेळी सत्याग्रह सुरू झाला. मालक गणपतराव हपिसांत गेलें कीं, शेळीला नुसते कोंडवाड्यांतच पोंचवीत नसत, पण दूधही काढून घेत. यामुळें बिचारे गणपतराव दुहेरी संकटांत सांपडले. दूधही मिळेनासें झालें. रोजचे आठ आणे भूर्दंडही भरावा लागे आणि शेजारी-पाजारी तर विचारूं नका. एवढाले डोळे त्यांच्यावर काढायचे कीं विचारूं नका. शेवटीं त्यांचा धीर खचला. एक दिवस पांच रुपयांस ती शेळी विकून आले व दुसऱ्या दिवसापासून गवळ्याचें म्हणजे म्हशीचें पाण्याचें दूध चहांत घालून पिऊं लागले!

—अखेर

# भगवान बुद्धाच्या धर्मदीक्षेच्या नांवावर विरोध किंवा कडवेपणा काय म्हणून ?*

अलीकडे कित्येक दिवस बुद्ध धर्माची नवीन दीक्षा घेतलेले बौद्ध व सनातनी हिंदू या दोघांत कडवेपणाची भावना पसरत चालली आहे; आणि एक दोन ठिकाणीं दंगे होऊन कांहीं बांधवांचीं डोकींहि फुटलीं—हें चित्र पाहिलें म्हणजे कोणत्या हिंदूला किंवा बौद्धधर्मीयाला हार्दिक दुःख किंवा खेद होणार नाहीं ? राजकारणी उद्देश डोळ्यापुढें ठेऊन जे हे लोक हिंदूंच्या संबंधीं द्वेषाची भावना फैलावून बौद्धधर्माचा प्रचार करूं पहात आहेत, अशांना कदाचित् हे ठाऊक नसेल किंवा ठाऊक असूनहि अनुचित स्वार्थाला बळी पडून कदाचित् ह्या गोष्टीचा त्यांना विसर पडला असेल कीं, भगवान् बुद्धाच्या नांवानें कडवेपणा, घृणा, किंवा विरोध यांची गोष्ट करणें म्हणजे त्यांच्या उपदेशाच्या सर्वस्वी विरुद्ध वर्तन करणें होय ! भगवान् बुद्धानें तर प्रेम, सत्य, अहिंसा, त्याग आणि प्राणीमात्राविषयीं अनुकम्पा किंवा दया हीं शिकविलीं आहेत. हिंदूधर्म आणि बौद्धधर्म हे मूलतः एकच आहेत; त्याप्रमाणेंच एका आईच्या पोटांतून बाहेर आलेल्या दोन भावांप्रमाणें एकमेकाशीं सहयोग करणारे व मदत करणारे आहेत. एकाच धर्मवृक्षाच्या या दोन शाखा असून एक शाखा दुसऱ्या शाखेहून कधींहि निराळी राहूं शकत नाहीं. बौद्धधर्माची महायान शाखा तर सनातन हिंदू धर्माला अत्यन्त जवळ असून घनिष्ठ आहे. भगवान बुद्धानें आपल्या शिकवणीला आर्यधर्म, आर्यसत्य, किंवा सद्धर्म असें नांव देऊन तिचा उपदेश केला आहे. तो उपदेश किंवा ती शिक्षा प्राचीन आर्य हिंदू धर्माच्या उपदेशाहून मुळींच भिन्न नाहीं. ही गोष्ट खालीं उद्धृत केलेल्या अवतरणांवरून स्पष्ट होणारी आहे.

आरोग्यं परमा लाभा सन्तुट्ठी परमं धनं ।
विस्सास परमा ञाती निब्बानं परमं सुखं ॥ (धम्मपद—१५, ८)

निरोगीपणा (उत्तम प्रकृति) हा फार मोठा लाभ आहे; संतोष हें परमश्रेष्ठ धन आहे; एकमेकांवर विश्वास हाच मोठा नातलग आहे. निर्वाण हें सर्वोत्तम सुख आहे.

यावजीवम्पि चे बालो पण्डितं पयिरुपासति ।
न सो धम्मं विजानाति दब्बी सूपरसं यथा ॥ (धम्मपद—५, ५)

जन्मभर जरी मूर्ख माणसानें पंडिताच्या संगतींत त्याची सेवा केली, तरी त्याला धर्माचें खरें ज्ञान होणार नाहीं. लाकडाच्या पळीला कालवणाची चव कळेल काय ?

धम्मपीती सुखं सेति विप्पसन्नेन चेतसा ।
अरियप्पवेदिते धम्मे सदा रमति पण्डितो ॥ (धम्मपद—६, ४)

प्रसन्न अन्तःकरणानें धर्मरस प्राशन करणारा सुखांत राहतो. आर्यांनीं शिकविलेल्या धर्मांत पंडित सदोदित रममाण असतो.

धम्मं चरे सुचरितं न तं दुचरितं चरे ।
धम्मचारी सुखं सेति अस्मिं लोके परम्हि च ॥ (धम्मपद—१३, ८)

धर्माच्या शिकवणीप्रमाणें सदाचाराचें आचरण करावें; दुराचारानें वागूं नये. धर्माप्रमाणें आचरण करणारा मनुष्य या लोकीं आणि परलोकींहि सुखांत राहतो.

यथा बुब्बुलकं पस्से यथा पस्से मरीचिकं ।
एवं लोकं अवेक्खन्तं मच्चुराजा न पस्सति ॥ (धम्मपद—१३, ४)

पाण्याच्या बुडबुड्याप्रमाणें किंवा मृगजळाप्रमाणें या जगाकडे पाहणारा माणूस मृत्युराजाच्या नजरेंत येत नाहीं. (तो अमर होतो)

किच्छो मनुस्सपटिलाभो किच्छं मचान जीवितं ।
किच्छं सद्धम्मसवणं किच्छो बुद्धानं उप्पादो ॥ (धम्मपद—१४, ४)

मनुष्य होण्याचा लाभ मिळणें हेंच कठीण; माणसानें जगणें हेंही कठीण; सद्धर्म कानावर पडणें हेंहि कठीण; बुद्धांचा जन्म होणें हेंहि कठीण.

सब्बपापस्स अकरणं कुसलस्स उपसम्पदा ।
सचित्तपरियोदपनं एतं बुद्धान सासनं ॥ (धम्मपद—१४, ५)

सर्व पापापासून दूर राहणें (पापचरण न करणें); पुण्यकारक गोष्टी करणें; व आपलें चित्त शुद्ध करणें हाच बुद्धांचा धर्म होय ?

न तेन अरियो होति येन पाणानि हिंसति ।
अहिंसा सब्बपाणानं अरियोति पवुचति ॥ (धम्मपद—१९, १५)

जो प्राण्याची हिंसा करतो, त्याला आर्य म्हणतां येत नाहीं. सर्व प्राण्यांची अहिंसा करणाऱ्यासच "आर्य" असें म्हणतात.

सुखा मेत्तेय्यता लोके अथो पेत्तेय्यता सुखा ।
सुखा सामञ्ञता लोके अथो ब्रह्मञ्ञता सुखा ॥ (धम्मपद—२३, १३)

या जगांत माता किंवा पिता यांची सेवा करणें सुखप्रद आहे. श्रमणाचें जीवन हें सुखकारक आहे. ब्रह्मज्ञ होणें सुखकर आहे.

सब्बदानं धम्मदानं जिनाति सब्बं रसं धम्मरसो जिनाति ।
सब्बं रतिं धम्मरति जिनाति तण्हक्खयो सब्बदुक्खं जिनाति ॥
(धम्मपद—२४, २१)

सर्व दानामध्यें धर्मदान हें श्रेष्ठ आहे. धर्माचा रस (गोडी) हा सर्व रसांत श्रेष्ठ आहे. सर्व प्रेमांत धर्म प्रेम उत्तम आहे. तृष्णेचा विनाश करणें म्हणजे सर्व दुःख जिंकण्यासारखें आहे.

वाहितपापोति ब्राह्मणो समचरिया समणोति वुच्चति ।
पब्बाजयमत्तनो मलं तस्मा पब्बजितोति वुच्चति ॥ (धम्मपद—२६, ६)

ज्यानें सर्व पापी विचारांना बाहेर घालून दिलें आहे, तो ब्राह्मण; जो शम (शांति) आचरण करीत आहे तो श्रमण; आपलें चित्ताचा मळ दूर करतो तो प्रव्रजित म्हणावा.

न ब्राह्मणस्स पहरेय्य नास्स मुंचेथ ब्राह्मणो ।
धि ब्राह्मणस्स हन्तारं ततो धि यस्स मुञ्चति ॥ (धम्मपद—२६, ७)

---

* अखिल भारतीय आर्य (हिन्दू) धर्मसेवा संघ या संस्थेच्या सौजन्यानें पुनर्मुद्रण

...णावर प्रहार करूं नये व ब्राह्मणानेंहि आपणांवर प्रहार करणारावर ...तां कामा नये. ब्राह्मणावर प्रहार करणाऱ्याचा धिःकार असो! जो ...न प्रहार करणारावर क्रोध करतो त्याचाहि धिःकार असो!

नत्थि रागसमो अग्गि नत्थि दोससमो गहो।
नत्थि मोहसमं जालं नत्थि तण्हासमा नदी॥ (धम्मपद-१७,१८)

...कामासक्तिप्रमाणें दुसरा अग्नि नाहीं. द्वेषासारखा दुसरा ग्रह नाहीं. ...सारखें दुसरें जाळें नाहीं व तृष्णेसारखी दुसरी नदी नाहीं.

...इसयो पुब्बका आसुं सञ्ञतत्ता तपस्सिनो।
पंच काम गुणे हित्वा अत्तदत्थं अचारिसुं॥
न पसू ब्राह्मणानासुं न हिरञ्ञं न धानियं।
सज्झाय धनधञ्ञासुं ब्रह्मं निधिमपालयुं॥

...पूर्वीचे ऋषि लोक मोठे संयमी आणि तपस्वी होते. पांच कामसुखांचा ...त्याग करून आत्म्याला उपकारक गोष्टींचें आचरण करीत. ब्राह्मणाजवळ ...पशु सोनें, धान्य नव्हतें. स्वाध्याय हें त्यांचे धन–धान्य होतें. ब्रह्मनिधीचें ...रक्षण त्यांनीं केलें.

वेद, उपनिषदें, गीता वगैरे हिंदूंच्या धर्म ग्रंथांतील शिकवण याहून ...वेगळी नाहीं. कित्येक ठिकाणी तर दोघांची शिकवण शब्दशः एक ...मेकांत जुळून जाते, ही गोष्ट खालील अवतरणावरून उघड होते.

एकोदिभूतो करुणाधियुत्तो निरामगन्धो विरतो मेथुनस्मा।
एत्थट्ठितो एत्थ च सिक्खमानो पप्पोति मच्चो अमतं ब्रह्मलोकंति॥
(दीघ निकाय)

...चित्ताला एकत्रित स्थित करून करुणाभाव युक्त होणें; पापमनोवृत्ती... ...पासून विरक्त होणें; मैथुन कर्मापासून दूर राहणें, यांचा अभ्यास केल्यास ...मनुष्य अमृत अशा ब्रह्मलोकांप्रत (दीर्घकाळ) जातो. अशाच अर्थाचे ...प्रश्नोपनिषदांतील खालील अवतरण वाचा.

तेषामेवैष ब्रह्मलोकः येषां सत्यं येषु ब्रह्मचर्यं प्रतिष्ठितं।
तेषामसौ विरजो ब्रह्मलोको न येषु जिह्ममनृतं न माया॥

ज्यांच्यांत तप, सत्य, ब्रह्मचर्य प्रतिष्ठित झालीं आहेत त्यांनाच ...ब्रह्मलोकाची प्राप्ति होते. ज्यांच्यांत वक्रता खोटे भाषण व कापट्य नाहीं ...त्यांनाच हा पवित्र (निर्मलता) ब्रह्मलोक मिळतो.

सब्बे सत्ता सुखी होन्तु सब्बे होन्तु च खेमिका।
सब्बे भद्राणि पस्सन्तु मा कञ्चि दुक्खमागमा॥

सर्व प्राणी सुखी होवोंत; सर्व प्राणी सुरक्षित होवोत; सर्व प्राणी मंगल ...पाहोत--कोणालाहि दुःख प्राप्त न होवो.

याच अर्थाचा खालील संस्कृत श्लोक प्रख्यात आहे :—

सर्वे भवन्तु सुखिनः सर्वे सन्तु निरामयाः।
सर्वे भद्राणि पश्यन्तु मा कश्चित् दुःखभाग् भवेत्॥

न हि वेरेन वेरानि सम्मन्तीध कुदाचन।
अवेरेन सम्मन्ति एस धम्मो सनन्तनो॥ (धम्मपद—१, ५)

वैरानें वैर शमन होत नाहीं; अवैरानेंच तें शांत होतें; हा सनातन धर्म ...आहे. याच अर्थाचा मनुस्मृतींतील हा श्लोक पहा--

क्रुध्यन्तं न प्रतिक्रुध्येदाक्रुष्टः कुशलं वदेत्।

रागावलेल्या माणसावर रागावूं नये. शिव्या देणाऱ्याला आशीर्वाद द्यावा.

अक्कोधन जिने कोधं असाधुं साधुना जिने।
जिने कदरियं दानेन सच्चेनालीकवादिनं॥ (धम्मपद—१७, ३)

अर्थात् अक्रोधानें (क्षमा) क्रोधाला जिंकावें असाधू (दुष्ट) माणसास सज्जन भावान जिंकावें, क्रुद्ध माणसास उदारपणानें जिंकावें, खोटें बोलणाराला सत्यवचनानें जिंकावें. अगदीं याच अर्थाचा व त्याच शब्दांत सांगितलेला महाभारतांतील खालील श्लोक आहे—

अक्रोधेन जयेत्क्रोधं असाधुं साधुना जयेत्।
जयेत्कदर्यं दानेन जयेत् सत्येन चानृतम्॥

न तेन थेरो होति येनास्स पलितं सिरो।
यम्हि सच्चं च धम्मो च अहिंसा संयमो दमो॥ (धम्मपद—१६,५)

डोक्यावरील केस पिकल्यानें मनुष्य स्थविर होत नाहीं. ज्यांत सत्य, धर्म, अहिंसा, व संयम व दम आहेत. ते स्थविर होय.

अगदींच याच अर्थाचा व त्याच शब्दांत सांगितलेला पुढील श्लोक आहे—

न तेन वृद्धो भवति येनास्य पलितं शिरः।
यो वै युवाप्यधीयानः तं देवाः स्थविरं विदु॥

न जच्चा वसलो होति न जच्चा होति ब्राह्मणो।
कम्मना वसलो होति कम्मना होति ब्राह्मणो॥

जन्मानें कोणी ब्राह्मण होत नाहीं; किंवा शूद्र होत नाहीं कर्मानच मनुष्य ब्राह्मण होतो; कर्मानेंच शूद्र होतो.

न जटाहि न गोत्तेहि न जच्चा होति ब्राह्मणो।
यम्हि सच्चं च धम्मो च सो सुची सो च ब्राह्मणो॥
(धम्मपद-२६, ११)

जटा वाढवून, गोत्रानें किंवा जन्मानें ब्राह्मण होत नाहीं. ज्यामध्यें सत्य, व धर्म आहेत तोच पवित्र होय, तोच ब्राह्मण होय. या अर्थाचा महाभारतांतील खालील श्लोक आहे—

न योनिर्नापि संस्कारो न श्रुतं न च सन्ततिः।
कारणानि द्विजत्वस्य वृत्तमेव तु कारणम्॥
वृत्ते स्थितश्च शूद्रोपि ब्राह्मणत्वं स गच्छति।

ब्राह्मण कुळांत जन्म, संस्कार, विद्या हीं सर्व ब्राह्मण होण्याचीं कारणें नाहींत. जो सदाचार पाळतो तो शूद्रही ब्राह्मण होतो—

सत्यं दानमथाद्रोह आनृशंस्यं त्रपा घृणा।
तपश्च दृश्यते यत्र स ब्राह्मण इति स्मृतः॥
शूद्रे चैतद् भवेल्लक्ष्म द्विजे तच्च न विद्यते।
न वै शूद्रो भवेच्छूद्रो ब्राह्मणो नैव ब्राह्मणः॥

सत्य, दान, अद्रोह, अक्रूरता, वाईट काम करण्याची लाज वाटणें, दया, तप वगैरे गुण जेथें दिसून येतात तो ब्राह्मण होय. जर शूद्रामध्यें हे गुण दिसून आले पण ब्राह्मणामध्यें ते दिसून न आले, तर तो (शूद्र) शूद्र कुळांत जन्मला नाहीं तर तो ब्राह्मण कुळांत जन्मला, तसेंच तो ब्राह्मण (कुळांत जन्मलेला) ब्राह्मण म्हणतां येणार नाहीं—

अत्ता हि अत्तनो नाथो अत्ता हि अत्तनो गति ।
तस्मा सञ्ञमयत्तानं अस्सं भद्रं व वाणिजो ॥
( धम्मपद-२५, २१ )

मनुष्य आपला स्वामी आपणच आहे. आपली गति आपणच आहे. म्हणून आपणांस संयमी बनवावें. कशा प्रमाणें ? जसा एखाद्या सुंदर घोड्याला व्यापारी ताब्यांत ठेवतो त्याप्रमाणें.

हाच अर्थ गीतेच्या खालील श्लोकांत आहे—
उद्धरेदात्मनात्मानं नात्मानमवसादयेत ।
आत्मैव ह्यात्मनो बन्धुरात्मैव रिपुरात्मनः ॥ ( गीता-६, ५ )

मनुष्यानें मनांत आणलें तर तो आपला उद्धार आपणच करूं शकेल. त्याप्रमाणें आपली अधोगति ही आपणच करील. कारण कीं प्रत्येक माणूस स्वतःचा बंधु किंवा शत्रू होय.

अहिंसका ये मुनयो निच्चं कायेन संवुता ।
ते यन्ति अच्चुतं ठानं यत्थ गत्वा न सोचरे । ( धम्मपद-१७, ५ )

जे मुनि अहिंसक त्याप्रमाणेंच शरीर ताब्यांत ठेवतात ते अच्युत स्थान ( निर्वाण जेथें गेल्यावर पुन्हां खालीं येणें शक्य नाहीं. ) प्राप्त करून घेतात तेथें गेल्यावर त्यांना शोक रहात नाहीं.

या अर्थाचा गीतेमधील खालील श्लोक पहा :
योन्तसुखोन्तरारामस्थातान्तर्ज्योतिरेव यः ।
स योगी ब्रह्मनिर्वाणं ब्रह्मभूतोधिगच्छति ॥ ( गीता-५, २४ )

जो अंतःकरणांत सुखी आहे, आपणांतच आराम पावतो व ज्यास अंतःप्रकाश मिळाला आहे; तो योगी ब्रह्मरूप होऊन जातो व त्याला ब्रह्मनिर्वाण ( ब्रह्माशीं एकरूप होऊन जाणें. ) मोक्ष प्राप्त झाला आहे.

अभिवादनसीलिस्स निच्चं वड्ढापचायिनो ।
चत्तारो धम्मा वड्ढन्ति आयु वण्णो सुखं बलं ॥

जो विनीत व अभिवादन शील असून वृद्धांना योग्य सन्मान देतो त्याचे बाबतींत धर्म, आयुष्य, वर्ण, सुख व बल वाढत जातात.

बरोबर हाच अर्थ संस्कृतांतील खालील श्लोकांत आढळून येतो.—
अभिवादनशीलस्य नित्यं वृद्धोपसेविनः ।
चत्वारि तस्य वर्धन्ते आयुर्विद्या यशो बलम् ।

भगवान बुद्धानें पंचशीलाची शिकवण खालील प्रकारानें दिली आहे—
१—पाणातिपाता वेरमणी सिक्खापदं समादियामि ।
२—अदिन्नादाना वेरमणी सिक्खापदं समादियामि ।
३—कामेसु मिच्छाचारा वेरमणी सिक्खापदं समादियामि ।
४—मुसावादा वेरमणी सिक्खापदं समादियामि ।
५—सुरा-मेरय-मज्ज-पमादट्ठाना वेरमणी सिक्खापदं समादियामि ।
१—मी प्राणहिंसा न करण्याचा नियम स्वीकारीत आहे.
२—मी चोरी न करण्याचा नियम स्वीकारीत आहे.
३—परस्त्रीगमनादि नीतिविरुद्ध दुराचार न करण्याचा नियम स्वीकारीत आहे.
४—खोटें न बोलण्याचा नियम मी स्वीकारीत आहे,
५—मी दारु व मादक द्रव्याचे सेवन न करणें; तथा प्रमादस्थानापासून दूर राहणें, याबद्दल नियम स्वीकारीत आहे.

बौद्धधर्मांतील पंचशीलें आणि पातंजल योगदर्शनांतील पांच यम (पांच नियम ) यांच्यात कोणताच भेद नाहीं. ही गोष्ट पातंजल योगसूत्रांत खालील दिलेल्या सूत्रांवरून स्पष्ट होत आहे.

अहिंसासत्यास्तेयब्रह्मचर्यापरिग्रहा यमाः ।

अर्थात अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य आणि अपरिग्रह हें पांच ( नियम ) आहेत. भगवान् बुद्धानें गाईंच्या रक्षणावरहि भर दिला आहे. तो ब्राह्मणधार्मिक सूत्रांतील खालील श्लोकावरून उघड होतो.

यथा माता पिता भाता अञ्ञे वापि च ञातका ।
गावो नो परमा मित्ता यासु जायन्ति ओसधा ॥
अन्नदा बलदा चेता वण्णदा सुखदा तथा ।
एतमत्थवसं ञत्वा नास्सु गावो हनिंसु ते ॥

त्याप्रमाणें माता, पिता, भाऊ, किंवा दुसरे नातलग त्याप्रमाणेंच गायही आम्हां सर्वांची परम मित्र आहे. तिच्यापासून आम्हांस औषधी प्राप्त होतात. गाय ही अन्न देणारी, बळ देणारी ओजस देणारी (ओजस्वी करणारी), सौंदर्य वाढविणारी त्याप्रमाणें सुख देणारी आहे. म्हणून हा फायदा समजून घेऊन त्यानीं गाईची हत्या केली नाहीं.

याप्रमाणें या अर्थाचें ऋग्वेदांत ( गोसूक्त ) खालील मन्त्र आहे :—
यूयं गावो मेदयथा कृशंचित् अश्रीरं चित् कृणुथा सुप्रतीकम्।
भद्रं गृहं कृणुथ भद्रवाची बृहद् वो वय उच्यते सभासु ॥
ऋग्वेद ( ६।२८।६ )

हें गाईनों तुम्ही निर्बलाला बलवान् करतां, कुरुप माणसाला सुरुप करितां, भद्रवाणी ज्याची आहे अशा गायानों ! तुम्ही आमचेंघर सुखाचें माहेरघर बनवितां व तुमच्या अन्नदानाला समाजांत फार मोठा मान दिला जातो.

बौद्धधर्म व हिंदू धर्म यांत केवढा समानभाव दृढ संबंध आहे ही गोष्ट दाखविण्यास हें दिग्दर्शन मात्र केलें आहे. अशा परिस्थितींत हिंदू व बौद्ध यांच्यामध्यें कटुता किंवा द्वेष फैलावल्यास कधींहि दोघांचें कसल्या ही रीतीनें हित होणार नाहीं. भगवान् बुद्धानें आपल्या उपदेशांतून प्रेम, मैत्री, करुणा, दया, अहिंसा यावर जोर दिला आहे, याचें विरुद्ध राग, द्वेष, कटुता वगैरे फैलावणें म्हणजे त्याच्या शिकवणीविरुद्ध आचरण करणें आहे. म्हणून नवदीक्षित बौद्धबांधवांना आम्हीं असें निवेदन करीत आहोंत, कीं बौद्धाच्या या शिकवणीचे पालन करा ! तेव्हांच तुमच्या पंचशीला युक्त दीक्षेची सार्थकता होईल.

- चन्द्रमणि भिक्षु,
  महास्थविर, कुशीनगर, देवरिया ।
- भिक्षु जगदीश काश्यप,
  नालन्दा ।
- धर्माधार महास्थविर,
  बौद्ध धर्मांकुर विहार, कलकत्ता ।
- भिक्षु तेंजो वातानावे,
  जपान सद्धर्म विहार,
  वर्ली नाका, मुंबई ।
- पिन चाओ, चीना मन्दिर, सारनाथ
- चू लामा, तिब्बती बौद्धविहार, सारनाथ
- ऊ० कित्तमा,
  बर्मी बौद्ध बिहार, सारनाथ ।
- चेन छाग, चीना मन्दिर, सारनाथ ।

# विविध संकलन

( अमेरिकन व रशियन जीवनविषयक वृत्त व समाचार यांवरून )

### (१.) चिनी लोकराज्यांतील विद्यार्थी.

चिनी लोक-प्रजासत्ताकांत गतवर्षी ५ लाखांहून अधिक कॉलेजें, लोक शिक्षण-संस्था, माध्यमिक व प्राथमिक शाळा होत्या व त्यांत सुमारे ७ कोटी विद्यार्थी शिकत होते. ही विद्यार्थीसंख्या १९४९ च्या मानानें साडेचार कोटींनीं अधिक आहे. या विद्यार्थ्यांपैकीं कामगार-शेतकऱ्यांचीं मुलें ६६ टक्के असून उच्चशिक्षण संस्थांत त्यांचें प्रमाण ३५ टक्के पडतें. राष्ट्रीय अल्पसंख्याकांच्या मुलांचीहि संख्या ३० लाख झाली आहे.

गेल्या सात वर्षांत ३ लाख तज्ञ शिकून तयार झाले, तर स्वातंत्र्य-प्राप्तीपूर्वी ३७ वर्षांतहि २ लाख १० हजारांहून अधिक तज्ञ तयार झाले नव्हते. प्रौढ कामगार–शेतकऱ्यांतील निरक्षरता नष्ट करण्यासाठीं खास शाळा स्थापन करण्यांत आलेल्या आहेत. त्यांत कामधंदा चालू ठेवून शिकतां येतें व आपला सांस्कृतिक दर्जा सुधारतां येतो. गेल्या आठ वर्षांत २ कोटी ३० लाख लोक लिहावाचावयाला शिकले. सध्यां सायंकालीन शाळांत व पत्रव्यवहारानें शिक्षण देणाऱ्या संस्थांमार्फत ६३ हजार लोक शिक्षण घेत आहेत.

यंदा उच्चशिक्षणसंस्थांतील विद्यार्थ्यांची संख्या ४ लाख ३७ हजारांवर गेली म्हणजे आजवरच्या सर्वोच्च संख्येच्याहि तिप्पट झालेली आहे. उच्चशिक्षण संस्थांतून गेल्या आठ वर्षांत ३ लाख ६९ हजार पदवीधर बाहेर पडले. ही संख्या जुन्या चीनमधील ५० वर्षांच्या काळांतील पदवीधरांच्या संख्येहूनहि दीड लाखांनीं अधिक आहे.

### (२) सोविएत युनियनमध्यें नव्यानें लागवडीखाली आलेली ९ कोटी एकर जमीन.

गेल्या तीन वर्षांच्या काळांत सोविएत युनियनमध्यें पूर्वेकडच्या प्रदेशांत ९ कोटी एकर जमीन नव्यानें लागवडीखाली आली. हें क्षेत्र इतकें मोठें आहे कीं फ्रान्स, इटली, प. जर्मनी, ऑस्ट्रिया, बेल्जम, डेन्मार्क, हॉलंड, स्पेन, व स्वीडन या देशांत एकंदर जेवढी जमीन लागवडीखाली आहे तेवढें तें भरतें. या नवीन जमिनीमुळें सोविएत युनियनच्या धान्यपिकांत सव्वा कोटी टन वाढ झाली. यंदा कझखस्तान व सैबेरियामधील सामुदायिक व सरकारी शेतांनीं ७५ लाख एकर जमीन लागवडीखाली आणली. येत्या दोनतीन वर्षांत सैबेरियांत, उरालमध्यें व पूर्वेकडे रशियांत आणखी ३ कोटी ते पावणेचार कोटी एकर नवीन जमीन लागवडीखाली आणण्यांत येईल आणि त्यामुळें पाऊण कोटी टन धान्य देशाला अधिक मिळूं लागेल. त्यांत मुख्यतः गहूं हें धान्य असेल. कझखस्तानांतहि नवीन जमिनीवर उत्तरेकडे गहूं व दक्षिणेकडे मका, बीट वगैरे पिकविला जातो.

### (३) सोविएत पदवीधरांची संख्या अमेरिकेहून तिप्पटीनें अधिक

सोविअेत युनियनमधील उच्चशिक्षणसंस्थांतून यंदा २६५००० तज्ञ अुत्तीर्ण झाले, त्यांपैकीं सुमारें ८०००० यंत्रशास्त्रज्ञ आहेत. सोविएत पदवीधरांची ही संख्या अमेरिकेच्या संस्थेच्या तिप्पटीहून अधिक आहे.

उच्च शिक्षण घेणाऱ्या सोविएत विद्यार्थ्यांच्या संस्थेंत १९१४ च्या मानानें गुदस्तां १६ पट वाढ झालेली होती. १९१८ ते १९५७ या चाळीस वर्षांच्या काळांत ३८ लाख तज्ञाचें शिक्षण पार पडलें. उद्योग-धंदे व शेतकी यांच्या विकासाबरोबर उच्च शिक्षणाचाहि प्रसार सोविएत युनियनच्या पूर्वभागांत विशेष झपाट्यानें होत आहे. गेल्या तीन वर्षांत देशांत उभारण्यांत आलेल्या ३६ उच्चशिक्षणसंस्थांपैकीं २३ पूर्वभागांत आहेत. युक्रेनमध्यें उच्चशिक्षणसंस्था १३४, उझ्बेकिस्तानांत ३२, कझखस्तानांत २५, अजरबैजानमध्यें १४ व बाल्टिक प्रजासत्ताकांत २८ आहेत. तज्ञांच्या शिक्षणांत पत्रव्यवहार-शिक्षण–संस्था व सायंकालिन शाळा यांचा मोठाच भाग आहे. आपल्या कामांत खंड न पाडतां ८०००० लोकांनीं उच्चशिक्षण घेतलें, ८ लाख लोक सायंकालिन शाळा व पत्रव्यवहार–शिक्षण संस्थांत उच्च शिक्षण घेत आहेत. उच्चशिक्षणाचा प्रसार अलिकडच्या काळांत विशेष झपाट्यानें झाला. असें शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या १९४० सालीं ८ लाख १२ हजार होती, तर १९५६ सालीं ती १९ लाख ७० हजारावर गेली.

### (४) सुरण, सर्पगन्धा वगैरे वनस्पतींपासून कॅन्सर, रक्तदाब, मधुमेहादि रोगांवर नवीं १५० औषधें.

सोविएत संशोधन-संस्थांनीं अलिकडच्या कांहीं महिन्यांत दीडशेंहून अधिक नवीन औषधें बनविलीं आहेत. मज्जातंतुविषयक जीं दुखणीं पूर्वीं असाध्य समजलीं जात त्यांवर उत्तम औषध म्हणून अमिनाझिन या औषधाचा सर्रास उपयोग आतां केला जातो. दुष्ट रक्तक्षयावर जीवनसत्व ब–१२ वें औषध रामबाण ठरलें आहे. एका औषधी वनस्पतीपासून बनविलेलें केलिन हें औषध दम्यावर गुणकारी आहे. सुरणापासून बनविलेलें ‘अल्कोलाइड कोलोहामिन’ हें औषध कातडीच्या कॅन्सरवर उपयोगी पडतें. मधुमेहावर रोस्तिनॉन हें औषध तशाचप्रकारचें परदेशांत वापरल्या जाणाऱ्या नादिझॉन या औषधाहून अधिक परिणामकारक ठरलें आहे. सर्पगन्धा वनस्पतीच्या मुळापासून बनविलेलें रेसेर्पिन हें औषध रक्तदाबाच्या रोगावर उपकारी आहे. विविध प्रकारचे हृद्रोग, शीतज्वर (इन्फ्युएन्झा) वगैरे रोगांवरहि निरनिराळीं औषधें तयार करण्यांत येत आहेत.

### (५) दर मिनिटाला एका मोटारगाडीची निर्मिती.

मोटारगाड्यांच्या सोविएत कारखान्यांतून दर मिनिटाला एक मोटार-गाडी तयार होऊन बाहेर पडते. गेल्या वर्षी या कारखान्यांतून ४६५००० मोटारगाड्या तयार झाल्या. त्यांत ३५८००० ट्रक ९८००० मोटारी व

…, जपान, रशिया, अमेरिका व संयुक्त राज्य, ऑस्ट्रेलिया, डेन्मार्क, …, जर्मनी, इसराएल व स्वित्झरलंड या देशांतून हे आलेले होते. या परिषदेमुळें एकमानवतेची भावना जागृत होऊन, शान्तीचें अधिष्ठान अहिंसा धर्मावर आहे ही, गोष्ट सिद्ध झाली. " वर्णावर्णभेद अमंगळ, " ही गोष्ट स्पष्ट झाली. पण यांतून निष्पन्न काय होणार ? सर्व धर्मीयांनीं हा संदेश आपल्या देशांत प्रसृत करण्याची जबाबदारी त्यांच्यावर आहे. …देशांतील विश्वधर्म परिषदेला आम्ही गेलो होतों व त्यानंतर जगांत शान्तीच्या ऐवजीं अशान्तीच वाढत आहे. माणसाचें मन बदलल्या-शिवाय व ती बदललेली स्थिति कायम स्वरूपाची झाल्याविना या परिषदांचा हेतु साध्य होण्याची शक्यता फारशी नाहीं, हेंच सत्य आज एक गोष्ट या परिषदेंतून उद्घोषित झाली. ती म्हणजे पुन्हां धर्माकडे वळल्याशिवाय मानवजातीस अन्य तरणोपाय नाहीं. ही कमाई सुद्धां थोडी नाहीं. आम्हीं ही परिषद घडवून आणणाऱ्या सद्गृहस्थाचें अभिनन्दन करतों व त्यांच्या नियोजित कार्यांत यश इच्छितों.

× × ×

पूज्य व पुण्यस्मृति श्रीशिवाजी महाराजांच्या प्रतापगडावरील अश्वा-रूढ पुतळ्याचें अनावरण पंडित जवाहरलाल नेहरू यांच्या हस्तें एक लाख लोकांसमोर झालें ही एक अत्यंत दूरगामी स्वरूपाची घटना आहे. पंडित नेहरू ३० नोवेंबरला अनावरण समारंभ करणार आहेत हें वृत्त प्रसिद्ध झाल्याबरोबर सर्व महाराष्ट्रांत–मराठी भाषिकांत एक आंदोलन सुरू झालें व वृत्तपत्रकारांनीं आपल्या पत्राचे रकानेच्या रकानें या गोष्टीची चर्चा करण्यांत खर्च केले. हजारों लोकांनीं निरनिराळ्या सभांतून लोका-ग्रणींची व इतर व्यक्तींची नरमगरम भाषणें ऐकलीं व टाळ्या दिल्या ! या परमपावन व पुण्यकारक प्रसंगासाठीं सर्वांनीं एक दिलानें, एकमतानें, एक भावनेनें व एक सहृदयतेनें कार्य करण्याचे ऐवजीं त्यात विसंवाद उत्पन्न झाला व अनावरणाचे कामीं प्रयत्न करणाऱ्यांची एक संघटना विरुद्ध या समारंभाचा संबंध द्वैभाषिक राज्याकडे जोडून ते घडवून आणणारांचे विरुद्ध निदर्शनें करावयाचीं असें म्हणणारा एक संघ असे निर्माण झाले. महाराष्ट्राचे श्रीशिवाजी महाराज त्यांच्याच महाराष्ट्रांत त्यांच्याच अश्वारूढ पुतळ्याच्या अनावरण समारंभाचे प्रसंगीं अशी अभिचारवृत्ति महाराष्ट्रांतील कांही स्त्री-पुरुषांनीं दाखवावी व त्या …ची तुलना जिद्दीच्या सामन्याशी करावी, हें चित्र पाहूनच श्रीछत्र-पती शिवाजी महाराजांना काय वाटलें असतें ? ज्या पंतप्रधानांनीं निःसं-दिग्धमार्गेत " शिवाजी महाराज हे केवळ महाराष्ट्राचेच सुपुत्र नव्हते; तर साऱ्या भारतवर्षाचे होते " अशी श्रद्धांजली व आत्मग्वाहि लाख लोका-समोर, उद्घोषित केली त्यांच्या प्रतापगडाच्या भेटीच्या मागें गैरलगामी …चें शेपूट जोडण्याचा अनाहूत व हास्यास्पद प्रयत्न केला जावा, ही दुर्दैवी …वाचून तर आम्हांस अत्यन्त दुःख झालें व महाराष्ट्रीय "विनायक" …च्या "हतभागिनी" ह्या कवितेची आठवण झाली ! उठल्याबसल्या द्वैभाषिक राज्याचें गाऱ्हाणें उगाळत बसणें व चळवळीचा वेग (Tempo) कायम ठेवणें हे राजकारणांतील एक अंग ठरेल. पण त्याचा अन्तर्भाव महाराष्ट्राच्या भावनात्मक व ऐतिहासिक परंपरेंत कसा होतो, हें आम्हांस कळत नाहीं. ज्या ठिकाणीं रियासतकार सरदेसाई यांनीं असलीं निदर्शनें …नयेत, असें आपलें मत प्रदर्शित केलें, त्या ठिकाणीं द्वैभाषिक चळ-वळीच्या नेत्यांनीं या निदर्शनाच्या बाबतींत जास्त व्यापक व खोल विचार करावयास हवा होता. आम्हांस वाटतें या घटनेंतून अत्यन्त अनिष्ट व अनभिमत अशी दुसरी उपघटना मात्र निर्माण झाली व ही ब्राह्मण ब्राह्मणेतर वावटळ उत्पन्न होऊन महाराष्ट्राची एकता मात्र भंग पावली. श्रीछत्रपती शिवाजी महाराजांच्या या पुतळ्याच्या दर्शनानें महाराष्ट्रीयांचीं मनें पुनीत होवोत व भारताच्या नूतनोदित स्वातंत्र्यास या महाभागाचें आशीर्वाद सदैव लाभोत, ही प्रार्थना आम्ही करीत आहोंत. द्वैभाषिक किंवा एक भाषिक असल्या प्रश्नाचा काथ्याकूट करून महाराष्ट्रीयांचीं मनें नेहमीं प्रक्षुब्ध व तंग वातावरणांत तरंगविण्याचा प्रयत्न करणें, हें **उत्तम राजकारण असेल पण ते हीन धर्मकारण आहे**, ही गोष्ट धुरीणांनीं सदैव वागविली पाहिजे. या बाबतींत उलट सुलट अशी निरनिराळीं मतें निरनिराळ्या व्यक्तींनीं व मनोवृत्तींच्या बंधुभगिनींनी व्यक्त केलीं आहेत. पण त्यापैकीं एकाचा उल्लेख आम्ही प्रामुख्यानें खालीं करीत आहोंत. 'सोलापूर समाचार' च्या ३ डिसेंबरच्या अंकांत प्रभाकर नूलकर यांनीं या प्रतापगड बाबतींत एक समीक्षणात्मक लेख लिहिला आहे समितीच्या कर्तबगार पुढाऱ्यांविषयीं मतप्रदर्शन करून समीक्षक म्हणतात " शिवशक्ति पेला-वयास समिति अपात्र ठरली आहे " समितीच्या सामुदायिक नेतृत्वावर जनतेचा संपूर्ण विश्वास होता. समिती कांहीं चुकीचें करूं शकेल असें तिला वाटतच नव्हतें. परंतु प्रतापगड प्रकरणांत जनतेच्या या विश्वासाला प्रचंड धक्का बसला आहे. " " इतिहास व मानसशास्त्र यांचें घोर अज्ञान समितीला महाराष्ट्रांतील " शिवशक्ति " पेलण्यांत निखालसपणें अपात्र ठरवीत आहे. " या घटनेचा अर्थ इतकाच संयुक्त महाराष्ट्रवादी जनता व संयुक्त महाराष्ट्र समिति यांचें आजपर्यंत जें अभिन्नत्व होतें, तें आतां नष्ट झालें आहे व हेंच आधुनिक महाराष्ट्राच्या इतिहासांतील क्रान्तिकारक स्थित्यन्तर होय. " तो सर्वच लेख वाचनीय आहे व मननीय आहे. समितीचे कार्यकर्ते यापासून जर योग्य तो बोध घेतील व आपल्या धोरणांत इष्ट तो फरक घडवून आणतील, तर संयुक्त महाराष्ट्राच्या दृष्टीनें महत्वाचें आहे. " मी चुकूंच शकत नाहीं " ही समजूत घातक आहे, हीच गोष्ट प्रामु-ख्यानें समजावून घ्यावयाची आहे. श्री. नूलकर यांचें समीक्षण विचारार्ह आहे, हेंच दाखविण्याचा आमचा उद्देश आहे. ● ● ●

## Sayings of Gandhiji

I am not a visionary. I claim to be a practical idealist. The religion of non-violence is not meant merely for the Rishis and Sants. It is meant for the common people as well. Non-violence is the law of our species as violence is the law of the brute. The spirit lies dormant in the brute and he knows no law but that of physical might. The dignity of man requires obedience to a higher law - to the strength of the spirit.

★

To see the universal and all-pervading spirit of Truth face to face one must be able to love the meanest of creation as oneself. And a man who aspires after that cannot afford to keep out of any field of life. That is why my devotion to Truth has drawn me into the field of politics; and I can say without the slightest hesitation, and yet in all humility, that those who say that religion has nothing to do with politics do not know what religion means.

# महात्मा गांधी

[ खालील श्रद्धांजली संयुक्त राज्यांतील भारताचे भूतपूर्व हायकमिशनर कै. श्री. बी. जी. खेर यांनीं "भारताचे मित्र" या संस्थेच्या विद्यमानें डंडी येथें दिनांक ७ ऑक्टोबर १९५३ रोजीं दिली. तिचें भाषांतर आम्ही देत आहोंत. मूळचें भाषण 'गांधी मार्ग' मधून घेतलें आहे व तें आम्हास दिल्याबद्दल त्याचे संपादक तसेंच खेर कुटुंब या उभयतांचे आम्ही ऋणी आहोंत.

सम्पादक ]

गांधीजींच्या जीवनाचा उद्देश काय होता? कोणत्या प्रकारच्या भारताचें चित्र ते मनांत रंगवीत होते? तें म्हणत, 'असा भारत देश मला निर्माण करावयाचा आहे कीं, जेथें गरीबांतल्या गरीबाला सुद्धां देशाबद्दल अभिमान आणि आपलेपणा वाटला पाहिजे. देशाच्या सर्व कारभारांत त्यांच्या मताला मान दिला जाईल, उच्च, नीच, गरीब, श्रीमंत हा भेदच संपूर्ण नाहींसा होऊन सर्व लोक एकदिलानें, आनंदानें वास्तव्य करतील. अस्पृश्यतेचें नांवही राहणार नाहीं, कीं उत्तेजक पेयें, आणि औषधें बनविलीं जाणार नाहींत. अशा तऱ्हेचे अत्यंत साधेपणानें राहाणाऱ्या भारताचें चित्र मी माझ्या अंतश्चक्षूसमोर आणीत असतों."

हिंदी संस्कृति ही फक्त हिंदी, किंवा इस्लामीय नाहीं, तर ती सर्व संस्कृतींचा मधुर संगम आहे. ते म्हणत, 'माझ्या घरांत सर्व देशांतील संस्कृतीच्या उत्तम गोष्टी आणलेल्या मला फार आवडतील; पण कोणत्याही एका संस्कृतीनें मी भारून जाणार नाहीं. मी दुसऱ्याच्या घरांत गुलाम म्हणून, भिकारी म्हणून किंवा जबरदस्ती करून कधींही राहणार नाहीं." सार्वजनिक कामामध्यें ते नेहमीं न्यायानें आणि शुचिर्भूत वृत्तीनें वागले आणि भारतामध्यें सार्वजनिक आयुष्याला त्यांनीं पवित्र वळण लावलें.

गांधीजींचें सर्व जीवन आणि तत्वज्ञान त्यांच्या परमेश्वरावरील श्रद्धेवर उभारलेलें आहे. अवर्णनीय अशी एक शक्ति सर्व विश्वांत भरलेली आहे. महात्माजी म्हणत, श्रद्धेशिवाय जीवनाला अर्थच नाहीं. मी अन्नपाणी हवा ह्याशिवाय जगूं शकेन, पण परमेश्वराशिवाय एक क्षणही जगूं शकणार नाहीं. दररोज दिवसाच्या प्रत्येक प्रहराला, तें परमेश्वराची एकचित्तानें प्रार्थना करीत आणि त्यांच्याशी प्रेमानें एकरूप होत. ह्या श्रद्धेतूनच त्यांनीं इतकी शक्ति, धैर्य, आणि शहाणपण मिळविलें होतें कीं, तें ते आपल्या अनुयायांना योग्य मार्गदर्शन आणि नैतिक बळ देऊन थोड्यांच वेळांत त्यांना 'पुढारी' बनवून सोडीत. म्हणूनच तीस वर्षांत सर्व देशांत ते उत्साह निर्माण करूं शकले, आणि लोकांना स्वार्थत्यागाला आणि शारीरिक कष्टाला उद्युक्त करून त्यांनीं देश स्वतंत्र केला. रक्तपाताशिवाय मिळवलेलें स्वातंत्र्य हें जगाच्या इतिहासांत अद्वितीयच मानलं पाहिजे.

मॅरीयल लेस्टर यांना ते एकदां म्हणाले, परमेश्वराच्या अस्तित्वाची खूण म्हणून अन्तर्आवाज किंवा दृश्य वगैरे कोणताही प्रत्यक्ष अनुभव मला आलेला नाहीं." कसलाही अद्भुत अनुभव त्यांना कधींही आला नाहीं. निर्मल बुद्धि व भक्ति ह्या दोन गोष्टींनीच त्यांना जन्मभर मार्गदर्शन केलें. परमेश्वरावर पूर्ण श्रद्धा ठेवून त्यांनीं वागणुकीचे कांहीं नियम ठरवून त्यांचें पालन पूर्ण कसोशीनें स्वतः केलें व आपल्या अनुयायांकडून तें करवून घेतलें; म्हणूनच ते सेवाकर्मांत अत्यंत यशस्वी झाले.

२००० वर्षां पूर्वी पतंजलीनें सत्यशोधकाकरितां कांहीं नियम घालून दिले आहेत. ते म्हणजे स्वतःच मन निर्द्वेष करणें, कोणत्याही परिस्थितींत सत्यमार्गानें वागणें, चौर्यकर्म न करणें, स्वतःच्या मनावर संपूर्ण ताबा ठेवणें व ऐहिक वस्तूंचा त्याग करणें. गांधीजींनीं हें सर्व नियम घेऊन त्यांत स्वतःचे असे कांहीं नियम घातले. ते म्हणत–शारीरीक कष्ट, निर्भय वृत्ति, सर्व धर्मांबद्दल सारखीच आदर भावना, आणि दलितांबद्दल प्रेम या गोष्टी पाळा, प्रार्थनेच्या वेळेला ते त्या नियमांचे पालन करण्याबद्दल आपल्या सर्व अनुयायांना सांगत. सूत काढून कपडे विणण्याबद्दल व शारीरीक मेहेनत करण्याबद्दल ते सगळयांना सांगत. असें सांगताना हजारों खेड्यांत राहणारे लाखों गरीब लोकांचें त्यांना स्मरण होतसे व त्यांच्या कल्याणाचा विचार तर सतत त्यांच्या अतःकरणांत चालू असे. सूत काढून आणि कपडे विणून गरीब खेड्यांतील जनता थोडेफार पैसे जरूर मिळवूं शकेल. चांगल्या परिस्थितींतल्या लोकांनीं शारीरीक कष्ट करण्याकरितां व गरीबांना सहानुभूति दाखविण्यासाठीं सूत काढावें. प्रचंड इच्छाशक्ति आणि अविश्रांत मेहेनत करून त्यांनीं ह्या नियमांचे कठोर रीतीनें पालन केलें; आणि दिवसेंदिवस आपली शक्ति इतकी वाढविली कीं, बलवान ब्रिटिश साम्राज्याला त्यांची 'भारत सोडून जा' ही मागणी मान्य करावी लागली, कारण त्या मागणीला पाठिंबा देण्यासाठीं कोट्यवधी लोक स्वयंस्फूर्तीनें पुढें आले; आणि भारत स्वतंत्र झाला. आणि शेवटहि **लढाई इतकाच अपूर्व झाला!**

श्री. महादेवभाई देसाई म्हणत–"बापूजींची एकच अत्यंतिक इच्छा होती, ती म्हणजे मनाचे आणि शरीराचे मोह जिंकून विजयी होणें." राग द्वेष आणि व्यक्तिविषयक महत्त्वाकांक्षा ह्यांच्या आहारी ते कधींही गेले नाहींत. मनावर त्यांचा पूर्ण ताबा होता. म्हणूनच सदैव त्यांच्या अंगांत उत्साह असे.

अत्यंत कठोर वृत्तीनें वागणारे महात्माजी इतर सर्वसाधारण माणसा इतकेच प्रेमळ होते. मित्र व तसेंच राजकारणांत त्यांच्या विरुद्ध असलेले लोक याच्याशी त्यांचे संबंध फार प्रेमाचे असत.

ते निवळ आशावादी नव्हते, तर शान्त आणि विनोदी होते. ज्या ज्या लोकांना त्यांच्याबरोबर काम करण्याचं सौभाग्य लाभलें त्यांना व मलाही त्यांच्या स्वभावाचा अनुभव आहे. सभा परिषदांमधून जेव्हां जेव्हां मतभेदाचे प्रश्न उत्पन्न झाले, भांडणाचे आणि रागाचे प्रसंग आले, तेव्हां तेव्हां त्यांचें अस्तित्व उन्हाळ्याच्या दिवसांत येणाऱ्या एखाद्या

..वाऱ्याच्या झुळुकी सारखें आल्हाददायक झालें. दंतविहीन मुखाचं हास्य इतकं मधुर आणि संसर्गजन्य असे कीं, त्यांचा पंचा व मौनव्रता इतकेंच तें प्रसिद्ध आहे. असं म्हणतात, चार्ली चॅपलीन व त्यांची भेट इंग्लंडला १९३१ साली झाली. तेव्हां दंतविहीन व सुंदर दांत असलेल्या मधुर हास्यांची चढाओढच लागली होती !

स्त्रियांच्याबद्दल त्यांना अत्यन्त आदर असे. स्त्री म्हणजे स्वार्थ-त्याग आणि कष्ट यांचं अगदीं प्रतीक आहे. त्यामुळें सार्वजनिक आयुष्यांत स्त्रियांचा प्रवेश झाल्यानंतर तें त्या शुद्ध करतील अशी त्यांची खात्री होती. त्यांचं नैतिक श्रेष्ठत्वच त्यांना जगांत शान्तता प्रस्थापित करायला शिकवील आणि पुरुषांच्या बरोबरीनें माता व मार्ग-दर्शिका म्हणून आपलं अभिमानाचं स्थान त्या मिळवतील.

रविन्द्रनाथ टागोर—ज्यांच गांधीजींच्यावर अत्यंत प्रेम होतं.—त्यांनीं महात्माजींबद्दल लिहिलंय्, “ माणसांच्या नैतिक प्रगतीला लैंगिक संबंधा-मुळें अडथळा येतो, असं त्यांचं मत होतं. व एकंदर लैंगिक संबंधाबद्दल त्यांना फार तिटकारा होता. ” परंतु सर्व मानवांना ह्या गोष्टीचा जो मोह होता त्याबद्दल त्यांना कधींच तिरस्कार वाटत नसे. स्त्रियांच्या बद्दल तर त्यांच्या मनांत मृदु भावना वसत असत. व त्यांच्या चळवळीला मदत करण्यासाठीं ज्या भगिनी पुढें आल्या त्यांची व बापूजींची अत्यंत मैत्री होती आणि म्हणूनच महात्माजींची हांक ऐकतांच हजारों भगिनी दारुबंदीसाठीं सत्याग्रह करायला आपल्या लहान मुलांसह बाहेर पडल्या व आनंदानें तुरुंगांत गेल्या ! एका इंग्रज माणसानें लिहिलें आहे कीं, गांधीजींच्या चळवळीला मदत करण्यासाठीं मोठ्या धैर्यानें हिंदी स्त्रियांनी शतकानुशतकांच्या रूढीच्या शृंखला तोडून दिल्या !

बापूजी मुलांचे फार भोक्त होते. मुलांशीं खेळण्यांत त्यांना अपरिमित आनंद होत असे. लहान सहान गमती ते मुलांना सांगून त्यांना खूप हंसवीत. मुलें दयाळू मनाचीं व उदार वृत्तीचीं असतात. त्यांनीं आपल्या पत्रांत आश्रमांतल्या मुलांबद्दल लिहिले होते. जेव्हां मुलें मोठीं होतात तेव्हांच त्यांच्या मनांत भेदभाव उत्पन्न होतात, वाईट विचार येतात.

जेव्हां तें किंगज्ली हॉलमध्यें कु. म्युरीयल लेस्टर यांचे पाहुणे म्हणून राहत होते तेव्हां त्यांच्या बरोबर सकाळीं फिरावयाला शेजारचीं मुलें जात व त्यांना प्रेमानें ‘ गांधीकाका ’ म्हणत.

परमेश्वराच्या खालोखाल गांधीजोचें दैवत म्हणजे मनुष्य-व्यक्ति. ते स्वतःला जन्मजात लोकशाहीवादी समजत.

गांधीजोच्या बुद्धीची ग्रहणशक्ति व लवचीकपणा म्हणजे त्यांच्या हिंदू मनाचें एक वैशिष्टयच होय. हिंदूमध्यें पुराणमतवादी लोक जरूर आहेत; पण ते कांहीं हिंदुधर्मांच वैशिष्टय नाहीं. हिंदूधर्मांमध्यें धार्मिक उत्साहाची जी अतितीव्र भावना आहे ती भावनाच हिंदुधर्मांच वैशिष्टय आहे; त्या भावनेचा विषय कोणता ही गौण बाब आहे.

सत्तेनें त्यांना सुख लाभलं नाहीं. विकृत मानस शास्त्र त्यांनी लोकांना शिकविलें नाहीं. ते निश्चित मानवी जीवन जगत होते. मोठेपणा, सर्व साक्षित्वाची, सर्वज्ञतेची, सर्व शक्तिमानतेची उच्च दर्जाची छाप पाडण्याचा बोजा त्यांनी कधीच आपल्या शिरावर घेतला नाहीं.

ते म्हणत, ‘ माझ्या संबंध आयुष्यांत लबाडीनें मी कधींच वागलों नाहीं.’ त्यांच मन व मनोविकार, त्यांच्या शरीरापेक्षांही जास्त दृष्टो-त्पत्तीस येत.

ते वृत्तीनें ध्येयवादी होते. पण आपल्या राष्ट्रीय जीवनाच्या व चळ-वळीच्या प्रश्नामध्यें ते व्यावहारिक दृष्टीनें भाग घेत. ते एकदां म्हणाले; स्वराज्य म्हणजे माझ्या दृष्टीनें देशाच्या भरभराटीसाठीं मी आंखलेल्या भरीव कार्यक्रमाची पूर्तता. त्या कार्यक्रमांत १९ बाबी होत्या. त्यांची नुसती नांवें सांगितलीं तरी तीं किती सर्वव्यापी होतीं ह्याची कल्पना येईल :—

(१) जातीय ऐक्य
(२) अस्पृश्यता निवारण
(३) दारूबंदी
(४) खादी व स्वयंपूर्तता
(५) ग्रामीण उद्योगधंदे
(६) खेड्यांची स्वच्छता
(७) मूलभूत शिक्षण पद्धति
(८) प्रौढ शिक्षण
(९) स्त्रियांची सेवा
(१०) आरोग्य शास्त्र प्रसार
(११) प्रादेशिक भाषांचा विकास
(१२) राष्ट्रभाषा-हिंदीचा-प्रचार
(१३) आर्थिक समता
(१४) शेतकरी संघटना
(१५) कामकरी लोकांची संघटना
(१६) आदिवासींची सेवा
(१७) महारोगी लोकांची सेवा
(१८) विद्यार्थी संघटना
(१९) परमेश्वराची दैनंदिन प्रार्थना

ह्या कार्यक्रमांची पूर्तता म्हणजेच त्यांच्या दृष्टीनें स्वराज्य होय. माणसांच्या उन्नतीची ती चळवळ होती व म्हणूनच भारतीयांच्या जीवन प्रवाहाला एक प्रकारचं नैतिक बल प्राप्त झालं होतं.

ते एक कुशल पत्रकार होते. त्यांच्या आयुष्यक्रमांत त्यांनीं तीन साप्ताहिकें—इंग्रजी, हिंदी, गुजराथी भाषेंत चालवून आपला आदेश सर्व भारताच्या कोनाकोपऱ्यांत पोहोंचविला. त्यांच्या साप्ताहिकांत एकही जाहिरात नसे व बाहेरच्या मदतीशिवाय त्यांनीं तीं साप्ताहिकें यशस्वी रीतीनें चालविलीं होतीं. त्यांचं लेखन अत्यंत साधं व निर्मळ असें. त्यांच्या इतका पवित्र, व हिरीरीनें आपलें कार्य जगभर पोहोंच-विण्याची खटपट करणारा दुसरा पत्रकार कधीं झाला कीं नाहीं याची शंका आहे.

गांधीजींनीं मानवांना शान्ततेचा आणि बंधुत्वाचा मार्ग दाखविला. आजकाल जगांत भीतीचें आणि संशयाचें वातावरण निर्माण झाल्यामुळें झगडे, आणि मतामतांचा गलबला फार झाला आहे. अशा तऱ्हेच्या भीतीच्या आणि संशयाच्या वातावरणाचं निराकरण गांधीजींच्या मार्गांनें होऊं शकेल. भारत आणि इंग्लंड ह्यांचे मधील संघर्ष कमी करण्यांत गांधीजींनीं प्रतिपक्षाबद्दल आदर आणि सद्भावना उत्पन्न केल्या. तीच कार्य-पद्धति जरा विशाल केली पाहिजे. आतां सर्वांना बहुतेक माहीत असेल कीं, दिल्लीला ह्या वर्षाच्या सुरवातीला एक परिषद ‘यूनोस्को’नें बोलाविली होती व त्या परिषदेमध्यें राष्ट्रांराष्ट्रांतलें संघर्ष-कमी करण्यासाठीं गांधीजींची कार्यपद्धति व विचारसरणी कितपत उपयोगी पडतील, ह्याबद्दल विचार विनिमय झाला. अनेक देशांतील विद्वान व राजकारणी लोक त्या परिषदेला हजर होते.

लॉर्ड बॉईड-ऑर ह्यांनीं परिषदेचा रिपोर्ट देतांना सांगितलें, देशां-

मधील संघर्ष कमी करण्याकरितां सत्ताधारी लोकांनीं अधिक सत्तेची लालसा धरूं नये, व दुसऱ्यांवर प्रभुत्वही गाजविण्याची तृष्णा सोडावी. आंतरराष्ट्रीय संघर्षांत राष्ट्रसंघच योग्य मार्गदर्शन करू शकेल. पण राष्ट्र-संघाचें सभासदत्व सर्वांना खुलें ठेवलें पाहिजे.

हल्लींच्या परिस्थितींत जरी अहिंसेच्या मार्गाचा अवलंब कोणत्याही राष्ट्राला करतां येणार नाहीं, तरी प्रत्येक राष्ट्रानें आपण युद्ध करणार नाहीं व हिंसेच्या मार्गानें उगीचच जाणार नाहीं, फक्त स्वसंरक्षणाकरितांच शस्त्राचा उपयोग करूं, असें सर्व जगाला सांगावें.

अणु बॉम्ब, हायड्रोजन बॉम्ब व कोबाल्ट बॉम्ब वगैरे भयंकर बॉम्बच्या संशोधनामुळें सर्व मानव जातीचा नाश होण्याची भीती निर्माण झाली आहे. ह्या भयंकर नाशापासून जर जगाला वांचवावयाचें असेल तर, सर्व राष्ट्रांच्या मनांत उत्पन्न झालेलें भीतीचें व संशयाचें वातावरण दूर केलें पाहिजे. आणि गांधीच्या तत्त्वांचा अंगी-कार करून सद्भावना व समजुतदारपणाची भावना राष्ट्रा-राष्ट्रांत निर्माण करावयाला पाहिजे.

गांधिजींनीं आपल्याला फार मोठा वारसा देऊन फार मोठी जबाबदारी आपणावर टाकली आहे. आपण ती जबाबदारी योग्य रीतीनें पार पाडीत आहोंत, अशी उगीचच आपल्या मनाची समजूत करून घेऊं नये. अजूनही आपल्या देशांत लांचलुचपत, काळाबाजार, व स्वतःचें महत्त्व, सत्ता, संपत्ति कशी वाढवावी, ह्यांचेकडे सत्ताधारी लोक लक्ष देत असतात. आपल्या सार्वजनिक आयुष्यामध्येंही अशा कांहीं गोष्टी आहेत कीं, गांधीजींच्या दृष्टीनें पाहातां अजून त्यांत पुष्कळच सुधारणा होणें आवश्यक आहे. पण अजूनहि जनतेंतून गांधीजींची वृत्ति गेली नाहीं. कारण गांधीजींचे प्रिय शिष्य पू. विनोबा भावे ह्यांच्या भू-दान चळवळीला मिळालेलें यश आणि सहकार्य आपल्या नजरेपुढें आहे. ही चळवळ म्हणजे त्यांच्या स्वतःच्या शब्दांत सांगायचें तर 'मानवाच्या नैतिक आणि अध्यात्मिक उत्कर्षाकरितां, व समाजाच्या आर्थिक व सामाजिक पुनर्घटनेकरितांच मुख्यतः निर्माण झाली आहे.' पू. विनोबा फक्त भूदान मागत नाहींत, तर देणाऱ्याच्या अंतःकरणांत गरीबाबद्दल सहानुभूति वाटली पाहिजे व त्यांना मदत देणें किती जरूरीचे आहे ह्याची खात्री वाटली पाहिजे. स्वेच्छेनें दिल्या जाणाऱ्या ह्या भू-दान व संपत्तीदानांतच महात्माजींच्या मनांत वसत असलेल्या 'सर्वोदय' समाजाचीं बीजें आहेत. ज्या सर्वोदयाच्या स्थापनेसाठीं अहिंसात्मक परिवर्तन समाजांत भू-दान व संपत्तिदानानें हळू हळू होईल. ह्या चळ-वळीचा उद्देश ५ कोटी एकर जमीन मिळविण्याचा आहे. आणि अजून पर्यंत २० लक्ष एकरच जमीन मिळाली आहे. सर्व प्रांतीय सरकारें जमीनीच्या वाटपाची व्यवस्था पहात आहेत.

विनोबांच्या चळवळीचा काय अर्थ आहे ? जनतेकडून इतक्या उत्सा-हानें त्यांचें स्वागत कां झालें ? सर्वसाधारण मनुष्य, स्त्रिया, मुलें, तरुण गरीब, श्रीमंत, वृद्ध सर्व लोक महात्माजींना अनुसरून आपलं सर्वस्व अर्पण करावयाला कां सिद्ध होतात ? स्वातंत्र्य, संपत्ति, स्थैर्य, आपलं आयुष्यही कां अर्पण करतात ? मला वाटतं मानवाच्या इतिहासांत केव्हांतरी अद्वितीय विभूति निर्माण होतात, व आपल्या उच्च जीवन क्रमानें बहुजन समाजाला उच्च अध्यात्मिक पातळीवर नेतात, व निस्वार्थ कार्याकडे उद्युक्त करतात. गौतमबुद्ध, सॉक्रेटीस, जीझस ख्राईस्ट हे अशा तऱ्हेचे लोकोत्तर पुरुष होते, व तसेच हिंदवी स्वराज्याचे प्रणेते म. गांधी हे एक आपल्या पिढींतच होऊन गेले. त्यांना जरी 'भारताचा पिता' म्हटलें जातें तरी त्यांचा संदेश हा फक्त भारत किंवा भारतवासीयांपुरता मर्यादित नाहीं, तर सर्व जगाला कल्याणप्रद होईल. जगांत झगडे, अशान्तता चालू आहेत. अशा वेळीं तर गांधीजींनीं पवित्र आणि उच्च जीवनाचा मार्ग दाखविला आहे. ते सत्याचे पुजारी होते, व त्यांच्या दृष्टीनें सत्य म्हणजे परमेश्वर. सत्याचा शोध करतां करतां त्यांना प्रेमाची कमाई झाली व सर्व मानव जात एक आहे, हें पटलें. म्हणूनच सर्व लोकांना समान वागणूक व समान हक्क देण्याबद्दल ते सांगत; आणि अस्पृश्यतानिवारणाची मोठी चळवळ त्यांनीं सुरू केली. 'निष्काम कर्मा'च्या गीतेच्या शिकवणीचें त्यांनीं पुनरुज्जीवन केलें व सर्वसाधारण मनुष्य निष्काम सेवा करून किती उच्च पदवीला पोहोंचू शकतो, हें दाखविलें. आधुनिक काळांत मोहाचे अनेक विषय व गोष्टी आहेत; परंतु आपल्या कठोर संयमी, उपवास, मनोनिग्रह आणि निस्वार्थी वृत्तीनें महात्माजींनीं अत्यंत पवित्र जीवनाचें प्रतीकच जनतेपुढें-किंब-हुना सर्व जगापुढें-उभें केलें. त्यांच्या मनांत जसे विचार येत तसे ते बोलत व उपदेश करीत व त्याप्रमाणें वागत. म्हणूनच त्यांना 'महात्मा' ही पदवी मिळाली.

महात्माजींनी आपल्याला स्वातंत्र्य मिळवून दिलें व फार मोठा वारसा ठेविला. त्यांचे वारस, श्री जवाहरलाल नेहरू यांच्या मार्गदर्शनाखालीं आपल्या देशाची प्रगति उत्तम तऱ्हेनें होत आहे, व त्यांच्या परराष्ट्रीय राजकारणामुळें तर भारताचा मान सर्व जगांत वाढत आहे. परंतु आपल्या देशांतील अनेक कठीण समस्या यशस्वीपणें सोडवावयाच्या आहेत. प्रौढ मतदानामुळें जरी राजकीय हक्क सर्वांस मिळाला आहे, तरी आपल्या घटनेप्रमाणें सामाजिक आणि आर्थिक समानता अजून देशांत प्रस्थापित झाली नाहीं. बेकारीचा प्रश्न सोडवून राहाणीचें जीवनमान उच्च करणें आवश्यक आहे. जातीयवाद, प्रांतीयवाद, भाषिकवाद, वगैरे जे अनेक वाद हल्लीं देशांत निर्माण झाले आहेत व त्यामुळें सार्वजनिक जीवन मलिन झालें आहे; त्यांचा पूर्ण मोड केला पाहिजे.

सामर्थ्यवान, भरभराटीस आलेला भारत देशच दुसऱ्या देशांतील दुःखी कष्टी मानवाना मदत देऊं शकेल. आज त्यांच्या वाढदिवशीं आपल्या देशांतील सर्व कष्टतर समस्या यशस्वी रीतीनें सोडविण्याची आपण तयारी करूं या. त्यांनीं ज्या उत्सुकतेनें व ज्या एकनिष्ठेनें आपल्या देशाच्या स्वातंत्र्याचा लढा चालविला त्याच एकनिष्ठेनें आपण आपल्या देशाची सेवा करूं या. त्यांचा आत्मा आपल्याला मार्गदर्शन आणि शक्ति देवो, हीच प्रार्थना !

(भाषांतर) **सौ. रतन दिवे, एम्. ए.**

# भगवान् बुद्ध*

## हिन्दु धर्म आणि बौद्ध धर्म

भगवान् बुद्ध वर्तमान ऐतिहासिक युगाचे अत्यन्त श्रेष्ठ दर्जाचे महान् हिन्दू होते. त्याग, तपस्या, विद्या, दान, चारित्रिक उच्चता, जनहित, प्राणिमात्राची सेवा, धर्म-प्रचार व लोक-कल्याण ह्या सर्व दृष्टीनीं पाहिलें असतां गेल्या अडीच हजार वर्षांत त्यांच्या तोडीचा नरश्रेष्ठ भारतांतच काय, पण सर्व जगांत झाला नाहीं. भगवान् बुद्धांनीं एका हिन्दू परिवारांत जन्म घेतला होता आणि हिन्दू वातावरणांतच त्यांचें लालन पालन झालें. ज्या इक्ष्वाकु वंशांत श्रीरामचन्द्रानीं जन्म घेतला त्याच वंशांत ते जन्मले होते. त्या कालांतील जे ब्राह्मण पंडित व प्रकांड विद्वान होते त्या सर्वांचा सहवास त्यानां लाभला होता. तसेंच त्यांच्यापासून घेण्यालायक होतें, तें सर्व भगवान् बुद्धांनी संग्रहित केलें होतें. त्या कालांत हिन्दू धर्मांत आणि हिन्दू समाजांत पसरलेले, अनाचार, अनिष्ट चालीरीति, तसेंच गतानुगतिक रूढी ह्यांचा नायनाट करून त्यांनीं हिन्दू-धर्माचा पुनरुद्धार केला. हिन्दू जातीवर त्यांनीं अगणित उपकार केले आहेत. तसेंच त्यांवर त्यांची अमिट छाप आहे. म्हणूनच हिन्दू धर्मांतील श्री विष्णूंच्या अवतारांत त्यांची गणना झालेली आहे. त्याचमुळें प्राचीन किंवा आधुनिक मंदिरांत जिथें जिथें दशावताराच्या मूर्ति आहेत तिथें बुद्धाच्या मूर्ति अवश्य आहेत. आतांच थोड्या दिवसांपूर्वीं भगवान् बुद्धाचा जो २५०० वा जयन्त्युत्सव साऱ्या भारतांत साजरा करण्यांत आला तो मुख्यतः हिंदूंच्याच कडून करण्यांत आला होता. जर हिन्दूंनी बुद्धाला श्रद्धेच्या दृष्टीनें पाहिलें नसतें तर असा समारंभ कधींच साजरा झाला नसता. श्रीमान् बिरलासारख्या असंख्य भक्त आणि उदार जनांनीं कित्येक बौद्धविहार आणि धर्मशाळा, सारनाथ, कुशीनगर, आणि बोध गया येथें तसेंच दुसऱ्या तीर्थस्थानीं बांधले आहेत.

हिन्दू धर्मीयांचें कुठलेंही धार्मिक कृत्य ' जम्बूद्वीपे भरतखण्डे आर्य्यावर्तैकदेशे कलियुगे कलिप्रथमचरणे बुद्धावतारे ' असा संकल्प केल्याशिवाय पूर्ण होत नाहीं. सनातन धर्मी आणि हिन्दू धर्माचे प्रकाण्ड विद्वान् श्री आदि-शंकराचार्यांनीं बुद्धाची स्तुति खालील श्लोकांत केली आहेः—

> धराबद्ध पद्मासनस्थांघ्रियष्टिः
> नियम्यानिलं न्यस्तनासाग्रदृष्टिः ।
> य आस्ते कलौ योगिनां चक्रवर्ती,
> स बुद्धः प्रबुद्धोऽस्तु मच्चित्तवर्ती ॥

अर्थात् पृथ्वीवर पद्मासन घालून, संयमपूर्वक नासिकाग्रीं दृष्टि ठेवून योगाभ्यास केला आणि जो कलियुगांत योग्यांमध्यें चक्रवर्ती प्रमाणें होता, तो महाज्ञानी बुद्ध सदा माझ्या हृदयांत वसो.

पुराणांत बुद्धाची स्तुति प्रकट केली गेली आहे-तो श्लोक असा :—

> नमो वेदरहस्याय नमस्ते वेदयोनये ।
> नमो बुद्धाय शुद्धाय, नमस्ते ज्ञानरूपिणे ॥

अर्थात् जो वेदांतील ज्ञानाचा रहस्यमय रूप आहे, जो वेदाच्या उत्पत्तीचा स्थान रूप आहे, जो साक्षात् शुद्ध ज्ञान रूप आहे, त्या भगवान् बुद्धाला नमस्कार असो ।

महाकवि जयदेवानें सुद्धां आपल्या गीत-गोविन्द नामक काव्यांत बुद्धाला भगवान् विष्णूच्या अवतारांतील एक मानून त्यांचें आदरपूर्वक स्मरण केलें आहे.

> निन्दसि यज्ञविधेरहह श्रुतिजातम् ।
> सदय-हृदय-दर्शित-पशु-घातम् ॥
> केशव धृत-बुद्धशरीर जय जगदीश हरे ॥

वरील प्राचीन ग्रंथांतून दिलेल्या उताऱ्यावरून हिंदू-लोक बुद्धाचा किती आदर करतात नी त्याला किती श्रद्धेच्या दृष्टीनें पहातात हें सहज कळून येईल.

## बुद्धासंबंधी महात्मा गांधींचे विचार

उदार सनातनी आणि युगपुरुष गांधीजींनीं बुद्धाबद्दल काय म्हटलें आहे तें पहा :—

" माझें ठाम मत आहे कीं, भगवान् बुद्धाच्या उपदेशाचें मूल तत्व हिंदू धर्माचें एक प्रमुख नि प्रधान अंग बनून गेलें आहे. भगवान् बुद्धांनीं हिन्दू धर्मांत जें महान् परिवर्तन केलें तें नाकारतां येण्यासारखें नाहीं. त्यांचें असीम बलिदान, महान् आत्म-त्याग, उदात्त चरित्र, आणि निष्कलंक पावित्र्याची त्यांनीं टाकलेली अमिट छाप, हिन्दू धर्मावरून पुसली जाऊं शकत नाहीं. त्या महान् शिक्षकाचा आणि महापुरुषाचा हिन्दू धर्म सदा ऋणी राहील. भगवान् बुद्धाचें जीवन हिन्दू धर्मांतील उत्तमोत्तम भावनांनीं ओतप्रोत बनलें होतें. त्यांनीं हिन्दू धर्मांतील बुरसटलेल्या उपदेशाना नवजीवन प्रदान केलें. त्यांच्या महान् हिन्दू आत्म्यानें वेदांत लपलेल्या विशुद्ध सत्य सुवर्णाचें उद्‌घाटन करून त्याला निरर्थक शाब्दिकजालाच्या अवडंबरांतून मुक्त केलें, आणि सर्व जनतेला खुलें केलें. बुद्धांनीं जेव्हां सत्याचा उपदेश दिला तेव्हां हिन्दूंनींच त्यांचें अनुकरण केलें. ज्यानीं ज्यानीं त्यांच्या ज्ञानानें आणि उपदेशानें प्रभावीत होऊन त्यांचें अनुयायित्व स्वीकार केलें ते सर्व अहिन्दू नसून हिन्दूच होते. परंतु बुद्धा प्रमाणेंच त्यांचें शिक्षण महान् आणि हृदय महान् होतें. ह्याचमुळें ते आज शरीरानें ह्या जगांत नसले तरी उपदेशाच्या रुपानें साऱ्या दुनियेंत विद्यमान आहेत. बुद्ध धर्माची ही महान् सफलता म्हणजे पर्यायानें हिन्दूधर्माचीच सफलता होय असें मी समजतों. बुद्धानें हिन्दू धर्माला कधींही तिरस्कृत किंवा अस्वीकृत केलें नाहीं. प्रत्युत त्याला विस्तृत आणि व्यापक व्याख्येंत परिवर्तित करून त्यांत नवा प्राण

* अखिल भारतीय आर्य ( हिंदू ) धर्मसेवा संघ याचे द्वारा प्रकाशित (पुनर्मुद्रण)

फुंकला. गौतम बुद्ध हिन्दू धर्मांच्या धार्मिक भावनेनें परिपूर्ण असलेले एक हिन्दू होते. अर्थात् नवीन काम त्यांनी एवढेंच केलें कीं, त्याकाळीं एका निर्जीव पदार्थाप्रमाणें जड झालेल्या हिन्दू धर्मांत नूतन सुधारणा करून त्यांत नवजीवन ओतलें."

## वस्तुतः बौद्ध धर्म आणि हिन्दू-धर्म एकच

वस्तुतः बौद्ध धर्म आणि हिन्दू-धर्म एकच असून ते दोन्हीं धर्म एकमेकांना परस्पर-विरोधी नाहींत; पण पूरकच आहेत. एका महा-वृक्षाच्या दोन महान् शाखांप्रमाणें ते एकमेकांना आहेत. हिन्दू धर्म, जैन धर्म, आणि शीख धर्माप्रमाणेंच बौद्धधर्म अनादि-कालापासून चालत आलेल्या आर्य-सनातन धर्माचें तें एक प्रमुख अंग आहे. मुळांत बौद्ध आणि हिन्दू धर्मांचे सिद्धान्त एकच आहेत. निर्वाण आणि मोक्ष, तसेंच कर्म आणि पुनर्जन्माचे सिद्धान्त प्रायः दोघांत सारखेच आहेत. स्वतः भगवान् बुद्धांनीं आपल्या उपदेशांत "मीं सद्धर्म आणि सनातन धर्माचाच उपदेश करीत आहे" असें कबूल केलें आहे. भगवान् बुद्धाचा उपदेश, उपनिषद, गीता आणि दुसऱ्या प्राचीन धर्म ग्रंथाच्या आणि सन्त महात्म्यांच्या उपदेशाहून भिन्न नाहीं.

## निर्वाण किंवा मोक्ष

आतां निर्वाणाबद्दलच पाहिलें असतां बौद्ध धर्मांत जें निर्वाण म्हटलें आहे तें हिन्दू धर्मांत मोक्ष, ब्रह्म-सायुज्य किंवा ब्रह्मनिर्वाण या नांवानें ओळखलें जातें. भेद केवळ नांवाचा असून वास्तविक दोन्हीं एकच आहेत. बौद्ध धर्मांत निर्वाणालाच 'परमसुख' म्हणून संबोधिलें आहे, अर्थात् निर्वाण म्हणजे परमसुख पदाची प्राप्ति हेंच खालील श्लोकांत वर्णिलें आहे :—

आरोग्यं परमा लाभा सन्तुट्ठी परमं धनं।
विस्सास परमा ञाती निब्बानं परमं सुखं॥

अर्थात् नीरोगी असणं परम लाभप्रद आहे. सन्तोष परमधन आहे. विश्वास सर्वांत मोठा साह्यकर्ता किंवा बन्धु असून निर्वाण सुख आहे.

भगवान् बुद्धांनीं निर्वाणाची परिभाषा एके ठिकाणीं अशा रीतीनें केली आहे :—

'रागक्खयो, दोसक्खयो, मोहक्खयो इदं वुच्चति निब्बानं' अर्थात् राग, द्वेष, आणि मोहाच्या क्षयालाच निर्वाण असें म्हणतात.

निर्वाणाचें जें वर्णन बौद्ध धर्मांत केलें आहे तसेंच वर्णन मोक्षाला पण तंतोतंत लागूं होतें. अनादि, अनंत, अपरिमेय, अनिर्वचनीय, परमानन्द-स्वरूप, परब्रह्म, परमात्म्याच्या प्राप्तीलाच मोक्ष म्हटलें आहे. त्याच्या प्राप्ती करितां राग, द्वेष, मोह आणि तृष्णा रहित होणें हाच उपाय गीतेंतील निम्नलिखित श्लोकांतून प्रकट होतो :—

युञ्जन्नेवं सदात्मानं योगी नियतमानसः।
शान्तिं निर्वाणपरमां मत्संस्थामधिगच्छति॥

अर्थात् ह्याप्रमाणें योगाभ्यास करून मनाला वश करून घेतल्यानें कर्मयोग्याला माझ्यांत असणारी आणि शेवटीं निर्वाण लाभ करून देणारी शान्ति प्राप्त होते.

कामक्रोधवियुक्तानां यतीनां यतचेतसाम्।
अभितो ब्रह्मनिर्वाणं वर्तते विदितात्मनाम्॥

जो काम आणि क्रोधापासून अलिप्त आहे, जो आत्म-संयमी आहे—आणि जो आत्मज्ञान-संपन्न आहे त्याला जवळच ठेवलेल्या वस्तूप्रमाणें ब्रह्मनिर्वाण रूपी मोक्ष प्राप्त होतो.

## कर्म आणि पुनर्जन्म

मनुष्य ज्याप्रमाणें पेरील त्याचप्रमाणें पीक उत्पन्न होईल. ज्या-प्रमाणें करेल त्याचप्रमाणें त्याचा परिणाम भोगेल. ह्या जन्मांत जें कांहीं करील त्यानुसार त्याचे संस्कार होतील आणि त्याचप्रमाणें त्याला जन्म प्राप्त होईल. जोंपर्यंत मनुष्य आपल्या ज्ञानाकरवीं तृष्णेचा क्षय करून उन्नति करीत निर्वाण किंवा मोक्ष प्राप्त करून घेत नाहीं, तोंपर्यंत जन्म मृत्यूच्या चक्रांत पडून रहातो. जन्म आणि पुनर्जन्माचा हा सिद्धान्त दोन्हीं धर्मांत एकसारखाच आहे.

## गुण-कर्मानें वर्ण-विभाग

बुद्ध भगवानांनीं गुण कर्मालाच प्रधान मानलें आहे. परंतु ते वर्ण-व्यवस्थेचे विरोधी नव्हते. त्यांनीं फक्त जन्म-मूलक वर्ण व्यवस्थेचें खंडन केलें आहे, किंबहुना गुणकर्मानुसार ब्राह्मणादि चातुर्वर्ण्याचें त्यांनीं स्पष्ट प्रतिपादन केलें आहे. जागजागीं त्यांनीं खऱ्या ब्राह्मणाची प्रशंसा पण केली आहे; ती निम्नलिखित श्लोकांत दिसून येतेः—

न जच्चा वसलो होति न जच्चा होति ब्राह्मणो।
कम्मना वसलो होति कम्मना होति ब्राह्मणो॥

अर्थात् जन्मापासून कधींच कुणी ब्राह्मण किंवा शूद्र नसतो. केवळ कर्मानेंच ब्राह्मण किंवा नीच होतो.

न जटाहि न गोत्तेहि न जच्चा होति ब्राह्मणो।
यम्हि सच्चं च धम्मो च सो सुचि सो च ब्राह्मणो॥

अर्थात् जटा, गोत्र किंवा जन्मापासून कुणी ब्राह्मण असत नाहीं. ज्याच्याजवळ सत्य आहे आणि जो धर्मिष्ठ आहे तोच ब्राह्मण आहे.

न ब्राह्मणस्स पहरेय्यं नास्स मुंचेथ ब्राह्मणो।
धि ब्राह्मणस्स हन्तारं ततोधि यस्स मुंचति॥

अर्थात् ब्राह्मणास मारूं नये किंवा त्याच्यावर प्रहार करूं नये. तथापि ब्राह्मणानेंही त्या प्रहार करणाऱ्याविषयीं दुर्भावना न ठेवली पाहिजे. जो ब्राह्मणाला मारतो तो धिक्कारास पात्र होय.

प्राचीन आर्य हिंदू धर्मांत वर्णव्यवस्था गुणकर्मावरच आधारलेली मानली गेली आहे. जर जन्म आणि कर्म दोहोंत समान धर्मीयता आढळली तर तें उत्तमच होय.

भगवद् गीता हिंदू-धर्मावरील एक प्रामाणिक एवं सर्वमान्य ग्रंथ आहे. त्यांत प्रत्यक्ष भगवान् श्रीकृष्णानीं आपल्या श्रीमुखानें वर्णांची व्यवस्था गुणकर्मानुसार केली आहे. तो श्लोक येणेंप्रमाणें आहे.

"चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः"।

महाभारताच्या शान्ति आणि वन-पर्वांत गुणकर्मांप्रमाणेंच वर्णव्यवस्था सांगितली आहे. यथा :—

सत्यं दानमथाद्रोह आनृशंस्यं त्रपा घृणा ।
तपश्च दृश्यते यत्र स ब्राह्मण इति स्मृतः ॥
शूद्रे चैतद् भवेल्लक्ष्म द्विजे तच्च न विद्यते ।
न वै शूद्रो भवेच्छूद्रो ब्राह्मणो न च ब्राह्मणः ॥

अर्थात् सत्य, दान, अद्रोह, अक्रूरता अनीतीची चाड दया आणि तप इत्यादि गुण ज्यांत असतील तोच ब्रह्मरूप होय. जर शूद्रांत हे गुण असतील आणि ब्राह्मणांत नसतील तर तो शूद्र नाहीं आणि तो ब्राह्मण नाहीं.

हिंदूंत वर्णांचा आधारस्तंभ गुणकर्मालाच मानलें आहे, आणि ह्याच-करितां आर्य समाजानें प्रचार केला आहे. चारही वर्ण एका समाजाची चार २ अंगें आहेत आणि त्यांत उच्च नीच ह्या भावनेला स्थान नाहीं.

## पंचशील

भगवान बुद्धानें पंचशीलाचा उपदेश केला आहे. त्यांत न करण्यासंबंधीं खालील पांच तत्वें आहेत. प्राणिमात्राची हिंसा, चोरी, परस्त्री-गमन, असत्य-भाषण आणि मद्यादि मादक पदार्थांचें सेवन, जैन धर्मांत ह्याच पांचांला महाव्रत मानलें जातें. हिंदू-धर्मांत ह्यानांच पांच यम-नियम म्हणून संबोधिलें आहे. पातंजल योग-सूत्रांत हे पांच नियम ह्याप्रमाणें सांगितले आहेत.

" अहिंसासत्यमस्तेयब्रह्मचर्यापरिग्रहाः "

अर्थात् अहिंसा, सत्य भाषण, अस्तेय ( चोरी न करणें ) अपरिग्रह (त्याग) हेंच पांच नियम आहेत आणि ह्यालाच पंचशील असें नांव दिलें आहे.

वरील लिखाणावरून प्रकट होईल कीं बौद्ध धर्म आणि हिंदू-धर्म दोन्ही एकच आहेत आणि एखाद्या सख्या भावाप्रमाणें ते एकमेकांचे पूरक आणि सहायक आहेत.

---



# साभार स्वीकार :—

## ( १ ) मराठी विभाग :

( १ ) **संजीवन** ( जीवनाच्या सर्वांगीण विकसनार्थ त्रैमासिक ) वर्ष ९. अंक २ रा. २४ नोव्हेंबर. संजीवन कार्यालय, श्री. अरविंद आश्रम, पाँडीचेरी.

हें त्रैमासिक श्री अरविंदांची शिकवण मानवास शिकविण्यास जन्मास आलें आहे. या अंकातील लेख नुसते वाचून दूर करण्यासारखे नाहींत. त्यावर विचार करून मननानंतर त्यांचें जीवनांत रूपान्तर केलें पाहिजे. " मृत्यूचें भय आणि तें " " निसर्गाची तीन पावलें, " " फुलांचें आध्यात्मिक अर्थ, " " भारताचें भवितव्य " वगैरे लेखन सुंदर विचा-रांनीं सुवासिक झालें आहे. " वाचकांचे प्रश्न " उद्बोधक आहेत. श्री माताजींच्या प्रवचनांतील खालील उतारा **आजहि मार्गदर्शक ठरणार आहे**—" शंकराचार्य व त्यांच्या बरोबर इतरहि तत्त्वज्ञ सांगत कीं, **आजचें जग रहाण्याजोगें ठिकाण नाहीं.** एक भ्रम या दृष्टीनें जगाकडे पाहणें श्रेयस्कर. शक्य तितक्या लवकर या भ्रमाचा त्याग करा, कारण त्या बाबतींत तुम्हांस कांहींच करणें शक्य नाहीं. पण या उलट मी तुम्हांस सांगतें कीं, हें जग इतकें वाईट, इतकें अंधकारमय, इतकें कुरुप, अचेतन अजागृत आहे, कष्ट, यातना यांनीं भरलेलें आहे, म्हणून तर **त्याचें रूपान्तर होऊन** सर्वश्रेष्ठ सौंदर्य, सर्वोत्तम प्रकाश, सर्वोच्च चेतना आणि परमानंद यांचें रूप धारण करण्याचीहि त्यामध्यें शक्यता निर्माण झालीं आहे ! "

( २ ) **सद्भक्तिप्रकाश** ( संयुक्तांक १-३ ऑक्टोबर-डिसेंबर १९५७ ) यांत "श्री भाईच्या शतसांवत्सरिक जयंतीचा मंगलमहोत्सव " कसा साजरा झाला यांची माहिती दिली आहे. यांतील बहुतेक भाग ' लघुबोधा ' नें व्यापलेला आहे. लघुबोधाचें तात्पर्य वामन पंडितांनीं एका ओवींत आणलें आहे तें असें—

" निर्गुण ज्ञान सगुणभक्ती । आणि परमपुरुषार्थ सगुणमुक्ति ।
ऐसी गीता भगवदुक्ती । सार सकळा वेदांचें " ॥

मुमुक्षूंना हा भाग फारच उपयोगी पडणारा आहे.

( ३ ) **महात्मा**—नोव्हेंबर १९५७. संपादक—दा. ना. शिखरे, पुणें ( २ )—यांत " रशियन चष्म्यांतून म. गांधी व लो. टिळक, " " भूदान म्हणजे सर्वांगीण क्रान्तीचीं नांदी ! " " रामराज्याच्या वाटेवर असलेलें एक खेडें " हें लेख वाचनीय आहेत. गांधीजींच्या विचार-सरणीची माहिती होण्यास या मासिकाचा फार उपयोग होईल.

• • •

# धम्मपद—[ बालबोधिनीसह ]

सर्वतंत्र स्वतंत्र विद्यामार्तण्ड. **प्रो. माधवाचार्य्य.**

## ३. चित्तवर्ग

स्पन्दनं चपलं चित्तं दूरक्ष्यं दुर्निवार्य्यम् ।
ऋजुं करोति मेधावी, इषुकार इव तेजनम् ॥ १ ॥

चित्त, इधरसे उधर कूदनेवाला अतीव चंचल, कठिनता से रखा और रोके जानेवाला होता है तो भी धारणाशीला बुद्धि के महापुरुष इसे सीधा कर लेते हैं जैसे कि तीरों का निर्माता टेढे तीर को सुधारकर सीधा बना लेता है ।

यद्यपि साख्यने अन्तःकरण के-बुद्धि अहंकार और मन ये तीन भेद किये हैं । वेदान्तने भी मन बुद्धि चित्त और अहंकार ये चार भेद कर डाले हैं। फिर भी यहां मन चित्त और बुद्धि ये तीनों पर्य्याय वाचक शब्द प्रतीत होते हैं । यही कारण है कि-बुद्धदर्शन में चित्त और चैत्त ये दो विभाग हो जाते हैं ।

मन के कल्पित धर्म चैत्त कहे जाते हैं ।

सभी दार्शनिकोंने मन को परम चंचल माना है । भगवान कृष्णने गीता में कहा है कि—

'असंशयं महाबाहो । मनो दुर्निग्रहं चलम् ।
अभ्यासेन तु कौन्तेय । वैराग्येण च गृह्यते ॥ ३५ । ६०

हे महावीर अर्जुन ! जो आप कहते हैं कि-' मन परम चंचल प्रमाथी बलवान, दृढ और दुर्निग्राह्य है । यह सत्य है तो भी मन को रोकने के लिये योगाभ्यास करने और विषय वैराग्य हो जाने पर यह वश में भी आ जाता है ।

यह कृष्ण का कथन भी-' अभ्यास वैराग्याभ्यां तन्निरोधः १२-१ योग सूत्र का श्लोकानुवाद है । इस सूत्र के द्वारा महर्षि पतंजलि कहते हैं कि-' योगाभ्यास और वैराग्य से मन का निरोध हो जाता है ।' यही कारण है कि-प्रत्येक धर्म ने मन को रोकने के लिये अभ्यास और वैराग्य की शरण ली है । रही महाकवि श्री रवीन्द्रनाथ टैगोर की बात । ये अपने को भगवान् की शरण करके, स्वयं अपने को भगवान पर छोड़ चुके थे, तभी इन्होंने ये भाव व्यक्त किये थे कि—

Deliverance is not for me in renunciation. I feel the embrace of freedom in a thousand bonds of delight. Thou ever poured for me the fresh drought of thy wine of various colours and fragrance, filling this earthen vessel to the brim.

मेरे लिये निर्वाण, वैराग्य में नहीं है मैं तो आनन्द के सैकड़ों बन्धनों में मुक्ति का आलिंगन करता हूँ ।

क्योंकि-आप मेरे इस मिट्टी के बर्तन को आकण्ठ, तरह तरह के रंगों की तरह तरह की माध्वी से सदा भरे रहते हैं ।

सूरदास के भी एक स्थल पर येही अक्षर निकले हैं कि--जैसे राखौ तेसेहि रहौं,

कवहुक तुरंग और चढौं महागज
कवहुक भार वहौं ।

आप की इच्छा है जैसा आप रख रहे हैं वैसा ही रह रहा हूँ । कभी आप मुझे घोड़ा हाथियों पर चढाते हैं तो घोड़ा हाथियों पर चढ जाता हूँ । कभी आप बोझ ढोने में लगालेते हैं तो कुली के समान भार लिये चलता हूँ ।

यह क्या कम त्याग है जो कि--अपना कर्तृत्व भोक्तृत्व मिटाकर अपने आप को भगवान के भरोसे पर छोड़ दिया है । मैंने त्याग कर दिया है यह भावना भी किसी बड़े राग से कम नहीं है । अतः--अदृष्ट या भगवान के भरोसे पर छोड़कर इस भावना का भी त्याग कर देना चाहिये । रवीन्द्र का भी यही तात्पर्य है । और गीता में भी यह है ॥१॥

वारिज इव स्थले क्षितः ओकादुदकादुद्धृतः ।
परिस्पन्दति इदं चित्तं मारधेयं प्रहातुम् ॥ २ ॥

किसी भी जलजीव को उसके गृह पानी से निकाल लो तो वह बड़ा ही खिन्न होता है । इसी प्रकार यह चित्त भी काम के राज्य से दूर होने के लिये खूब ही उछल फांद करता है ।

लोग दृष्टांत दिया करते हैं कि-' पानी से मीन को निकाल लेनेपर जैसे वह तडफ तडफ कर प्राण दे देता है इसी प्रकार वह तडफ तडफ कर मर रहा है । '

यही हाल चित्त का है । यह भी चाहता है कि—अमुक कामको मैं अभी पूरा कर डालूं इस झंझर से निकल जाऊं । फिर भी मार्गदर्शन के विना, जितना यह काम के राज्य से बाहिर निकलने की चेष्टा करता है उतना ही अधिक फसता जाता है । ॥ २ ॥

दुर्निग्रहं लघु यत्रकामनिपाति,
चित्तस्य दमनं साधु चित्तं दान्तं सुखावहम् ॥ ३ ॥

चित्त का निग्रह होना बड़ाही कठिन है क्यों कि-यह बड़ाही सूक्ष्म है । जहां इच्छा जाती है वहा उसी समय चला जाता है । इसे दूर करो कोई व्यवधान नहीं होता । इस कारण हे संतलोगों, चित्त को अवश्य शांत और दांत बनाओ क्यों कि—इसे शांत कर दिया तो सब ओर सुखही सुख है ॥ ३ ॥

सुदुर्दशं सुनिपुणं यत्रकामनिपाति
चित्तं रक्षेत्, मेधावी, चित्तं गुप्तं सुखावहम् ॥ ४ ॥

[चि]त्त को कोई देख नहीं सकता, यह अपने काम में अत्यंत चतुर [य]ह भला बुरा कुछ नहीं देखता जहां इच्छा आती है जा गिरता [इस] कारण धारणाशील व्यक्ति को चाहिये कि—चित्त को अशुभ [वृत्ति]यों से बचाये क्यों कि बुरे कामों से चित्र को बचाने पर चित्त [को] आनन्द देता है । ४ ।

दूरङ्गमम् एकचरम् अशरीरं गुहाशयम्,
ये चित्तं संयमेस्यन्ते मोक्ष्यन्ते मारबन्धनात् ॥ ५ ॥

[चि]त्त दूरंगम–दूर जानेवाला है, एकाकी विचरता है। यह शरीर [र]हित है। यह रहता भी ऐसे स्थान में है कि जहाँ से पकडा नहीं [जा स]कता।

[जो] वैराग्ययुक्त अभ्यासी चित्त को संयत कर लेते हैं वे काम और [तृष्]णा दोनों के बन्धनोंसे छूट जाते हैं ।

विशेष—शुक्लयजुर्वेद की चौतीसवी अध्याय में प्रथम मंत्र से लेकर [छः मं]त्र मन के वर्णन के आते हैं । इनमें पहिलेही मंत्र में ' दूरंगमम् ' यह [पद] आया है। इसका अर्थ--महाराजा भोज के समकालीन पंडित [उव]ट ने किया है कि—' भूत भविष्य और वर्तमान तथा दूर और [व्यव]हित पदार्थ का भी ग्रहण करनेवाला '।

[गु]हा का अर्थ भी हृदयरूपी गुहा लेना चाहिये क्योंकि--शु. य. [३४]-३४ में चित्त को हृत्प्रतिष्ठम्--हृदय में विराजनेवाला कहा है। [बु]द्ध इसे सारी इन्द्रियों का प्रकाशक मानता है । ५ ।

अनवस्थितचित्तस्य सद्धर्ममविजानतः
परिप्लवप्रसादस्य प्रज्ञा न परिपूर्य्यते ॥ ६ ॥

जिसका चित्त स्थिर न हो, जिसे कि सद्धर्म का कोई पता न हो [जि]सकी कि प्रसन्नता उड गई हो ऐसा प्राणी कभी परिपक्व बुद्धिका [न]हीं होता।

[चि]त्त व्यवस्थित होनां ही चाहिये तभी सर्व प्रथम किसी भी काम के [कर]ने के समय मन को शान्त करते हैं। वेद में भी मन के गुण गाकर [शिवसंकल्प]न होने की प्रार्थना की है ।

[नी]ति ने तो अव्यवस्थित चित्तवाले पुरुषों की प्रसन्नता को भी भयंकर [कहा] है। किसी उर्दू के कविने कहा है कि--बडे मूजी को मारा न फसे अव्वारह को गर मारा । नहंगो अज दहाओ शेरे नर मारा तो क्या मारा ॥ ६ ॥



कैसे मनुष्य निर्भय होते हैं इस पर कहते हैं कि—

अनवस्रुतचित्तस्य अनन्वाहतचेतसः ।
पुण्यपापविहीनस्य नास्ति जागरतो भयम् ॥ ७ ॥

जिसका चित्त कहीं नहीं गिरता न कभी अपहृत होता है न जिसे पुण्य और पाप के करने की ही कामना रह गई है। ऐसे सावधान व्यक्ति के पास भय कभी नहीं भटकता।

चित्त के वश करने पर फिर इसकी गति समाप्त हो जाती है यह साधक की इच्छा के विरुद्ध कहीं भी नहीं जाता । न वासनाएँ हीं चित्त को अभिभूत कर पाती हैं इस कारण फिर इससे न पाप बनते हैं और न फिर पुण्य । यह संयम में सदा सावधान रहता है तो फिर इसे भय भी कहाँ से हो सकता है ।

पुण्य पापों से रहित होना बड़ा कठिन कार्य है । क्यों कि-संचित और क्रियमाण कर्मों के नाश हो जाने पर केवल प्रारब्ध शेष रह जाते हैं । ये ही शरीर को चलाते रहते हैं। इस दशा में भी साधक सदा सावधान ही रहता है । ॥ ७ ॥

कुम्भोपमं कायमिमं विदित्वा,
नगरोपमं चित्तमिदं स्थापयित्वा ।
युध्येत मारं प्रज्ञायुधेन,
जितं च रक्षेद् अनिसेवी स्यात् ॥ ८ ॥

इस शरीर को मिट्टी के घडे के समान समझना चाहिये । चित्त को नगर की किल्लेबन्दी का परकोटा जानना चाहिये । चित्त की दृढता से शरीर की रक्षा करते हुए कामदेव से युद्ध करान चाहिये । यदि कामवासना पर विजय मिल जाय तो इसे टिकाऊ रखना चाहिये । मन तभी पराजित रह सकता है जब कि फिर किसी दशा में काम का सेवन न किया जाय । कृष्णजीने गीता में कहा है कि-'न जातु कामः ' कामानामुपभोगेन शाम्यति । कामभोग से काम शान्त नहीं होता, यह विवेक से शान्त होता है । ॥ ८ ॥

अचिरं बत अयं कायः पृथिवीमधिशेते ।
क्षुद्रोऽपेतविज्ञानः, निरर्थं इव कलिङ्गरः ॥ ९ ॥

मरुस्थल में कलींदे ( कलिंगर ) बड़े बड़े होते हैं । इनकी एक बात यंह होती हैं वह बहुत बड़ी होती है । उसे भीतर से खा पी कर योंही पटक देते हैं । इसी को दृष्टान्त में लेकर भगवान बुद्ध देव उपदेश देते हैं कि—यह मृत शरीर भी बहुत समय तक संज्ञाहीन पड़ा रहता है । फिर इसे कोई वैर से भी नहीं ठुकराता । जब तक देह में कर्ता भोक्ता है यह अच्छा दीखता है, जब तक देह में प्राण हैं तभी तक दुनियां हैं नहीं तो फिर कुछ नहीं है । उपनिषदों ने तो विज्ञान रहित को क्षुद्र न छूने योग्य बता दिया है। स्मृतियों ने छूने के नाम के भी सूतक पातक माने हैं ॥ ९ ॥

द्विशो द्विषं यं तत् कुर्य्यात्, वैरी वा तु वैरिणम् ।
मिथ्या प्रणिहितं चित्तं पापीयान् न ततः कुर्य्यां ॥ १० ॥

किसी ने किसी रिपु को किसी भी एक रस्ते से जो हानि पहुंचाई हो तो दूसरा भी जिन रास्तों से बन सके सामने वाले को जितनी हानि पहुँचा सकता हो पहुँचा देता है।

पर इच्छानुसारी चंचल झूठा एकाग्र चित्त जो हानि पहुँचाता है वैसी तो पापी से पापी वैरी भी नहीं पहुँचापाता। अतः साधक का सबसे बड़ा वैरी उसका मिथ्या एकाग्र चंचल मन है ॥ १० ॥

न तं माता न पिता कुर्यात्, अन्ये वापि ज्ञातकाः,
सम्यक् प्रणिहितं चित्तं श्रेयसो न ततः कुर्यात् ॥ ११ ॥

सम्यग ठीक प्रणिहित एकाग्र चित्त जैसा कल्याण कर सकता है वैसा मा बाप और सगे संबंधी कोई भी नहीं कर सकते।

प्रणिहित–यह शब्द यौगिक है। इसका अर्थ परम एकाग्रता है। परम एकाग्र चित्र जितना हित कर सकता है उतना कोई नहीं कर सकता ॥ ११ ॥

विशेष—

चित्तकी—क्षित, मूढ, विक्षित, एकाग्र और निरुद्ध ये पांच दशाएं हैं। सदा विषयों में भ्रमणशील अत्यन्त अस्थिर चित्त, क्षित कहाता है। विषयों की तृष्णा में अत्यन्त विवेक विहीन चित्त, मूढ या मूर्ख कहाता है। इस अवस्था में मोह की अत्यंत प्रबलता हो जाती है।

कुछ कुछ टिकनेवाला चित्र विक्षित कहाता है। इसमें कभी कभी समाधान तो होता है पर यौगिक नहीं होता। इस कारण योग भाष्यकार भगवान व्यास देव इन तीनों दशाओं को साधना के योग्य नहीं मानते।

यही कारण है कि–भगवान् बुद्ध भी इनका निषेध करते हैं। इन्हें चाहिये सम्यक् प्रणिहित चित्त, यह एकाग्रता में ही मिल सकता है। अतः इसे शून्य समाधि की ओर अग्रसर किया जा सकता है।

वेदान्त शांकर भाष्यने १ नित्य और अनित्य वस्तु का विवेक, २ दिव्य और अदिव्य भोगों से विरक्ति ३ शम, दम, आदिक साधन सम्पत्ति ४ निर्वाण की इच्छा इन चार वस्तुओं का होना साधक के लिये आवश्यक माना है।

शंकरने 'आदि' शब्द से–उपरति, तितिक्षा, श्रद्धा और समाधान ये चार वस्तुएं और ग्रहण कर ली हैं। इस बातका, उनकी विवेक चूडा-मणि से पता चलता है।

मनके शान्त होने का नाम शम है ज्ञान और कर्मेन्द्रियों का, विषयों से रुक जाना दम कहाता है। वैराग्य का नाम उपरति है। सारे दुःखों को सानन्द सह लेने का नाम तितिक्षा है। महापुरुषों के वाक्यों पर विश्वास रखनेका नाम श्रद्धा है।

साधक में ये वस्तुएं चाहिये। भगवान बुद्धदेवने चित्तवर्ग में इन्हीं वस्तुओंका प्रतिपादन किया है।

गीता में भी कह दिया है कि—

'अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं परिग्रहम्।
विमुच्य निर्ममः शांतो ब्रह्मभूयाय कल्पते ॥

अहंकार बल हर्ष क्रोध व संग्रह को छोड, निर्मोही एवम् शांत होनेपर स्वरूप स्थित हो जाता है।

# समीक्षण

## अणुव्रत निर्माण अंक

प्रो० शिवसहाय पाठक 'शिव' एम० ए०, सा० रत्न

(अणुव्रत—निर्माणं अंक, सम्पादक श्री सत्यनारायण मिश्र, मूल्य इस अंक का एक रुपया, वार्षिक छः रुपये, प्रकाशक—अणुव्रत [कार्या]लय कलकत्ता. पृष्ठ संख्या २९३. छपाई और सफाई उत्तम, सेट [...] अति आकर्षक रंगीन और अभिनव निर्माण का प्रतीक।)

आज का युग मानवता के लिए एक संक्रमण का युग है। इस संक्रमण काल के चौराहे से हम देखते हैं तो पाते हैं कि [अण]ुओंका विस्फोट हो रहा है, घोरतर युद्धों की भूमिकाएँ बन रही [हैं,] एक से एक महा संहारक अस्त्र-शस्त्र बनाये जा रहे हैं, ऐटम, [हाइ]ड्रोजन, उदजन--हिंसा का स्पष्ट नग्न तांडव है। नागासाकी और [हि]रोशिमा तथा अन्य परीक्षण स्थानों पर ही नहीं, वरन् यत्र-तत्र-[सर्व]त्र आज मानव की छाती छलनी हो चुकी है, धरती का हृदय [...] हो उठा है, मानव-निर्मित मयंक परभी शंकाएँ की जाने [लग]ी हैं कि यह शायद यह भी निष्कलंक न रह पाए! दूसरी ओर गांधी [...] प्रभृति मानवता के सजग प्रहरी विश्वशांति और अहिंसा की [...] करते हैं। एक ओर दिनभर की मजदूरों के काम, भट्ठी में तपकर [...] दिन गुजारने, फाके मारकर भी संतोष करने व दाने, दाने को ललाते [...]ते बच्चों के साथ रहने वाले हैं तो दूसरी ओर नितांत 'निठल्ले [...] भी भोग विलास, ऐश्वर्यपूर्ण रंगरेलियाँ मनानेवाले, शोषण और [...]तामय स्थिति पैदा करनेवाले' मुहमें राम बगल में छुरी रखने[वाले], अहिंसक, विश्वशांति के नाम को बदनाम करनेवाले, अणुओं के [...] द्वारा जीवित मानवता की समाधि बनानेवाले लोग हैं। इस [...] वैषम्य को देखकर धरती का कण-कण असीम वेदनासे कराह रहा [...] समाज अन्धविश्वास, बेरोजगारी, चरित्रहीनता, अनैतिकता और [...] के धूमिल और धँवासे वातावरण में साँस ले रहा है। युग ने [...] के अनुचित उपयोगने और विवेकहीनताने मानव को [...] है--चुनौती ही है। विश्वकी विश्रृंखलताओं से [...]लित, जीवन से थका, हमारा, संघर्ष से परेशान, अतृप्त [...]ओं का शिकार मानव अपने अभिनव निर्माण की दिशामें [...] नए मूल्यों की स्थापना की अपेक्षा कर रहा है। आज मानव को [...] की वेदीपर अपना सर्वस्व अर्पण करके भावी समाज और पीढी का [...] करना है। सबसे पहले आता है अपना निर्माण—इसी निर्माण [की] आधार शिला पर होगा, तत्र-निर्माण भविष्यका।

श्री सत्यनारायण मिश्र जैसे सुयोग्य संपादक द्वारा संपादित 'अणुव्रत' [का प्र]स्तुत 'निर्माण अंक' अभिनव समाज के नवमानव और नए [मूल्यों] की स्थापना का एक सुन्दर स्तुत्य एवं श्लाघ्य प्रयत्न है।

'अणुव्रत' के इस विशेषांक में लगभग बाईस कविताएँ प्रशंसनीय हैं। सबके अन्तर में नवनिर्माण की प्रोज्ज्वल तरल धारा तरंगित है। रामेश्वर शुक्ल 'अंचल' ने नवयुग के स्वर में स्वर मिलाकर एक 'नये' प्रकार की कविता लिखी है जो 'नई कविता' के निकट है।

"बादल के घेरे में भी तो जयघोष न मारुत का थमता, यदि विश्वासोंपर बढ न सको साँसो के मुरदे मत ढोओ, यदि फूल नहीं बो सकते तो काँटे कमसे कम मत बोओ।"

मुनिश्री बुद्धमलजी की कविता में आस्था का स्वर प्रबल है—

"बलिदानों का यह इतिहास लिखा धरती पर

स्वयं सत्य भी इसे अन्यथा कर न सकेगा......

अरे! अनंत उदय कों कोई तर न सकेगा

जीवन का इतिहास मौत से मर न सकेगा।

सर्व श्री महेंद्र भवनाकर, दिवाकर, परमेश्वर द्विरेफ, नर्मदा प्रसाद त्रिपाठी, हरि शंकर शर्मा, जयदेवशर्मा 'कमल' श्रीमती विद्यावती मिश्र, श्री उदयभानु हंस, प्रणवशास्त्री 'राही' 'सुवेश' शांतिस्वरूप 'कुसुम' शेरजंग गर्ग, प्रकाश दीक्षित, आदि सभी कवियों की कविताओं का स्वर प्रायः नवनिर्माण की महत्तम भावना से अनुप्रणित है। इन कवियों ने जिस अभिनव प्रगतिशील स्वर का उद्घोष किया है उनकी कविताओं में से कुछ उद्धरण न देना उनके प्रति अन्याय है

"मैं करता हूँ प्यार सदा इंसान से" 'परमेश्वर द्विरेफ'

"साथी जागो आज नया निर्माण बुलाता तुमको" श्रीनर्मदा प्रसाद "मांग रही है आज मनुजता रहो और रहने दो! विद्यावती मिश्र

"धरा के फूल कुम्हलाएँ न चलने दो हवा गम की, न बिखरे तम उगी हैं कोपलें अभिनव की बढने दो महकने दो जरा उपवन।'

"कि ये ऐटम विषैली गैस इनको मत इजाजत दो पनपनेकी" नहीं विध्वंस को लाओ यहाँ परत तुम अभी निर्माण होते हैं।

बिना चूमे वसंती को पड़ी है बहुत सी धरती बहुतसे बन। शान्ति स्वरूप 'कुसुम'

निर्माण अंक में प्रायः सभी कविताएँ पठनीय बन पड़ी हैं। कुछ कविताएँ तो अत्यंत सुन्दर हैं। ऐटम आदिसे त्रस्त कवि का मन एक विद्रोह कर रहा है—इस विद्रोह का स्वर यहाँ प्रबल रूपमें विद्यमान है।

इस अंक में कई कहानियाँ भी छपीं। 'कल और आज' खलील जिब्रान की एक सुन्दर कहानी है अनुवादक श्री. सोहनलाल कोचर ने मूल कहानी का भाव बनाए रखने का प्रशंसनीय प्रयत्न किया है श्री वृन्दाबनलाल वर्मा की कहानी 'बलिदान को चाट लिया' जमी नहीं। श्याम, राम और वैद्यजी की सेवा— (वैद्यजी की लूट) चुनांव प्रोपेगैंडा और अन्तमें प्रखेद ऐसी बातें रहीं जो यथार्थ वादी पुट होने के बावजूद जमी नहीं। श्री यादवेन्द्र शर्मा 'चन्द्र' की कहानी 'काला घोड़ाः काला एवम्' सामन्ती तथा ज़मींदारी जीवन के खोखले पत्र और उनके द्वारा किए जाने वाले घृणित कार्यों के निदर्शन की एक कल्पना प्रधान कहानी है। 'टूटते बन्धन' (श्री गिरिजाशंकर शर्मा) एक पुराणपंथी–ढोंगी पंडित के जीवन के सुधार की कथा है। सारा परिवार पंडितजीके ढोंग का शिकार हो जाता है बच्ची और पत्नी भी। बच्चा पत्नी के लिए तरसकर मर जाता है, किन्तु पंडितजी भला धीवरों के तालाब से क्यों पत्नी मंगाने लगे। विश्वदेव शर्मा कृत 'याद की लाज' एक सुन्दर कहानी इस अंक में संग्रहीत है। इस कहानी के मूल में है 'राखी'। समस्त एक शराबी है। 'सिनकी' अपने पति फिकवा से त्यक्त होकर सड़क पर रो रही थी। समरू उसे घर ले आता है। एक ही घर में दोनों रहते हैं–भाई-बहन की तरह। सारा समाज उंगली उठाता है, किन्तु वह राखी के बंधन में बँध जाता है। 'फिकवा' जब उसे चाकू मारने आता है तो उनके (भाई–बहेन के) पवित्र प्रेम को देखकर समरू के पैरों पर गिर पड़ता है। श्री बाबूलाल तिवारी 'नयन' की लघुकथा 'लो भाई यह प्रजातंत्र' काफ़ी सुन्दर है। उनकी 'कुदाली और कलम' आए दिन प्रकाशित होनेवाली सैकड़ों लघुकथाओं में से एक है।

'निर्माण का देवता' और 'फ्लू' शीर्षक एकांकी साधारण रूप से अच्छे हैं।

'प्रकाश को मुक्त करें' पं. रामसिंह शर्मा कमलेश का एक अच्छा लेख है। डा. वासुदेव शरण अग्रवालका 'एक देवताका निर्माण' बारह पंक्तियों का होकर भी अपने ढंगका सर्वोत्तम लेख है। 'निर्माण अंक' में निबंध, लेख, भावचित्र आदि अधिकारी विद्वानों की लेखनी से प्रसूत हैं। रामानंद तिवारी, शास्त्री रामनाथ सुमन, डा. सीताराम 'गिरीश',

'गोलवलकर' 'मल्लिक', डा. रामचरण डा. वासुदेवशरण अग्रवाल, डा. रामरतन भरतानी, पं. कन्हैयालाल मिश्र 'प्रभाकर,' डा. राजेश्वर प्रसाद चतुर्वेदी, प्रो॰ दयाशंकर, पं. किशोरीलाल वाजपेयी, मन्मथनाथ-गुप्त, बल्देव उपाध्याय, भगवानदास केला, गुलाबराम, मुनितनराज, 'रिषभदास प्रभृति हिंदी के वर्तमान युगके सशक्त लेखकों की निर्माण संबंधी सुन्दर रचानाएँ इस अंकका गौरव संवर्द्धित कर रही हैं।

इसके अतिरिक्त, अनेक सुभाषितों, बडेबडे मनीषियों, चिंतकों, दार्शनिकों और विद्वानों के निर्माण–संबंधी सुन्दर वाक्यों का संकलन इस पत्रिका का कलेवर सुन्दर और आकर्षक बनाने में सहायक हुआ है। कहीं–कहीं इस प्रकार के कुछ सुभाषित वाक्य पत्रिकापर बोझ-से लगते हैं।

अंतमें कुल मिलाकर कहा जा सकता है कि अणुव्रत के निर्माण अंकमें जो लगभग नब्बे रचनाएँ प्रकाशित की गई हैं वे उच्चकोटिकी हैं, अभिनव निर्माण के स्वर से सभी रचनाएँ अनुप्राणित हैं, सभी रचनाएँ मानवता के विकास, उन्नति और प्रगति में आस्था और विश्वास देनेवाली हैं।

अंत में मैं श्री पं. सत्यनाराण जी मिश्र को अनुव्रत 'निर्माण अंक' जैसा सफल अंक निकालने के अवसर पर अपनी हार्दिक बधाई देता हूँ। उनका यह प्रयत्न उनके आदर्शों के अनुरूप है। हम इसे सफल और स्तुत्य प्रयास कहने में जरा भी नहीं हिचकते!

इस प्रकार स्पष्ट है कि यह अंक पठनीय है, संग्रहणीय है, प्रशंसनीय है और है स्वागत योग्य!

कर्तृत्वाचीं नवीं क्षेत्रें पुरविलीं. भारतीयांचें जीवन त्या योगाने एकदां संपन्न व समृद्ध झालें होतें याबद्दल दुमत होणार नाहीं.

परंतु त्या धर्माचें पुनरुज्जीवन, त्याविषयीचा तांत्रिक अभिमान व्यर्थ आहे. मात्र बुद्धाच्या चरित्राचें स्मरण योग्य रीतीने बाळगणें अवश्य आहे. प्रत्येक थोर पुरुष आपल्या काळाच्या मर्यादेमध्यें कर्तृत्व गाजवितो. आजची आपल्या देशाची भौगोलिक स्थिति आणि पंचवीसशे वर्षांपूर्वीची स्थिति यांची तुलना केल्यास कालाच्या मर्यादा म्हणजे काय हें गळीं उतरेल. भौगोलिक स्थितीप्रमाणेच माणसाच्या बुद्धींत, भावनेंतदेखील आज विलक्षण अंतर पडलें आहे. मनुष्य तेवढा आपल्या मूलभूत गुणदोषांच्या दृष्टीनें जसाच्या तसा कायम आहे! स्वार्थाचा दुराराध्य लोभ हा एकच दोष विचारांत घेतल्यास वरील विधानाची यथार्थता पटेल.

जगांतले सगळे धर्मसंस्थापक ज्या गुणांच्या संवर्धनासाठीं व ज्या दोषांच्या निर्मूलनासाटीं झटले, त्या गुणांची जोपासना व त्या दोषांचा परिहार करण्यासाठी जर बुद्धाचा गौरव गायिला, तर बुद्धाची स्मृति साजरी केल्याचें समाधान लाभेल. नाहीतर लोकांच्या उत्सवप्रियतेला प्रसन्न करण्यासाठीं बुद्धाच्या कीर्तीचा व्यापार केला असें म्हणावें लागेल.

—**किर्लोस्कर**, मे १९५६

* * *

## नमो भगवते बुद्धाय !

भगवान बुद्धाच्या महापरिवाणानंतर बौद्धधर्मांत आणि संघांत ही जीं भयानक वैगुण्यें उत्पन्न झाली, त्यांबद्दल बुद्धाला जबाबदार धरणें किंवा दोष देणेंहि अर्थातच योग्य होणार नाहीं. तो स्वतः, श्रीशंकराचार्यांनी म्हटल्याप्रमाणें, परमकारुणिक आणि परिणतप्रज्ञ असा 'योगिनां चक्रवर्ति' होता, हें निस्संशय! किंबहुना प्रो. डॉ. ऱ्हीस डेव्हिडस् यांनी म्हटल्याप्रमाणें तत्कालीन सर्व हिंदु समाजांत तो अतिशय व्यवहारचतुर असल्यामुळेंच खरोखरी, ईश्वर आणि आत्मा यांचें अस्तित्व नाकारणाऱ्या आपल्या लोकविलक्षण धर्माचा प्रभाव त्या काळच्या राजामहाराजांवर पाडून, त्यांच्या आश्रयाने त्याने विराट भिक्षुसंघटना निर्माण केली, व तिच्या जोरावर संपूर्ण पूर्व आशिया भारतीय संस्कृतीच्या छत्राखाली आणला, इतकेंच नव्हे, तर त्याच्या तत्वज्ञानाचा प्रसार हिंदी महासागरापासून भूमध्यसमुद्रापर्यंत झाल्यामुळें त्यांतील तत्त्वें आत्मसात् करून घेऊन ख्रिस्ताने आपल्या नवीन धर्माचें प्रवर्तन केलें ही ऐतिहासिक घटना आतां सर्वमान्य झालेली आहे. येशू ख्रिस्ताने ईश्वर आणि आत्मा यांना जरी आपल्या धर्मात परमोच्चस्थान दिलेलें असलें, तरी त्यांतील समता, बंधुता, सेवाशीलता, क्षमावृत्ति, कारुणिकता इत्यादि तत्त्वें हीं बौद्ध धर्मातून घेतलेलीं आहेत, याबद्दल आतां शंका उरलेली नाही. त्या दृष्टीनें, बुद्ध हा आशियांतील धार्मिक क्रांतीचा प्रवर्तक आणि मानवतेच्या सेवेची दीक्षा जगाला देणारा अद्वितीय धर्मपुरुष ठरतो, हें स्पष्ट आहे. स्वतःच्या तत्त्वांच्या प्रसाराची आवश्यकता वैदिक धर्माला कधीहि वाटली नाही. त्याचा जो काय प्रसार यदृच्छेनें झाला असेल, तेवढाच! पण, बुद्धाने आपल्या धर्मपंथाच्या प्रचारासाठीं प्रचंड संघटना उत्पन्न केली; आपल्या शिष्यांना धर्मदीप हाती घेऊन जगभर जाण्याचा आदेश दिला; व त्या त्या देशांत त्या त्या वेळीं प्रचलित असेल या धर्मकल्पनांना मुरड घालून आणि पचनीं पाडून आपल्या धर्माचा प्रसार हिंदी महासागरापासून भूमध्यसमुद्रापर्यंत सर्वत्र केला. येशू ख्रिस्ताचें चरित्र वाचलें, म्हणजे असें वाटते की, बुद्धाच्या पावलावर पाऊल ठेऊनच जणू ख्रिस्ताने आपल्या धर्माचे प्रवर्तन आणि प्रसार यांचें तंत्र निश्चित केलें असावें! भगवान् बुद्ध हा अनीश्वरवादी आणि आनत्मवादी असेल; वेदविरोधी असा युक्तिवादहि त्यानें कांही वेळा केलेला असेल; पण वैदिक धर्मातील ईश्वर आणि आत्मा त्यांच्या व्यतिरिक्त सर्व उत्कृष्ट तत्वांचे संकलन करणारा, पंचशील आणि पंचमहायज्ञ याचा पुरस्कार करणारा व ब्राह्मण, श्रमणक आणि श्रावक यांना सारख्याच सन्मानबुद्धीने वागविण्याचा दंडक आपल्या वर्तनाने घालून देणारा, भारतीय संस्कृतीचा इतका महान् प्रवर्तक आणि प्रसारक गेल्या अडीच हजार वर्षांत दुसरा झालेला नाही, हें निर्विवाद सत्य आहे. म्हणून भरतभूमीचा आणि भारतीय संस्कृतीचा श्रेष्ठ पुत्र आणि प्रवर्तक म्हणून आज वैशाखी पौर्णिमेला भारतीय जनतेने अत्यंत आदराने आणि कृतज्ञतेने त्या योगियांच्या चक्रवर्तीपुढें आपलें मस्तक नम्र केलें पाहिजे.

—**तरुण भारत**, नागपूर (१९५६)

* * *

## बोधिवृक्षाच्या छायेंत

त्यावर बुद्ध म्हणाले, 'शहाणा मनुष्य सत्कृत्य पायरीपायरीनेंच पुरें करतो. पुण्याचा संचय एका दिवसांत होतो काय? हळुं हळुं, थोडी थोडी भर पडूनच पुण्य सांठत जातें.'

प्रत्येकजण आपापल्या श्रद्धेप्रमाणें, आपापल्या कुवतीप्रमाणें दान

करीत असतो. म्हणून त्यांत हें वाईट आणि तें चांगले असें ठरविणें चुकीचें आहे. दान केव्हांही पवित्रच असतें. त्याला जो नांवें ठेवतो त्यांत त्याची क्षुद्रताच उघड होते आणि त्याच्या क्षुद्रतेनें त्याचेंच हंसू होतें. त्याबद्दल तुम्ही वृथा चिंता का करतां ?'

२९--एप्रिल—१९५६

गौतम बुद्धांनीं त्याला त्याची हकीकत विचारली व ते म्हणाले, 'साधूचें जीवन जगणें ही कांहीं सोपी गोष्ट नाहीं. फार कठीण आहे तें. कारण त्यांत सुख, मौज अशी कांहींच नाहीं. पण बाळा, संसारांत तरी सुख आहे काय ? संसार तरी सोपा आहे काय ? संसारामध्येंही घोर; आपत्ती, अडचणी आणि संकटें भरलेलींच आहेत. साधुपुरुषाला सुख नाहीं पण संसारी माणसा मागचे दुःखही चुकत नाहीं. संसाराचा अशा दृष्टीनें विचार करून पहा. जीं माणसें आपला द्वेष करतात, आपल्याला तुच्छ लेखतात, आपल्याला समान वागणुक देत नाहींत त्यांच्यासह दिवस कंठायचे ह्याचेंच नांव संसार. मग ह्यापेक्षां साधुत्व कठीण आहे काय ?'

—नवयुग (१ एप्रिल १९५६)

* * *

## बुद्धं शरणं गच्छामि

अडीच हजार वर्षांपूर्वीच्या बुद्धकालीन जगांत बुद्धासारख्या ऐश्वर्यसंपन्न राजपुत्राच्या अंतःकरणाला यातना देणाऱ्या ज्या अमानुष गोष्टी अस्तित्वांत असतील त्यापेक्षा निदान शंभरपटीने तरी आजच्या जगांतील अमानुषता अधिक आहे असें अगदीं विनदिक्कतपणें बोलावयास हरकत नाहीं. परंतु आजच्यापेक्षां शंभरपटीने कमी अमानुषता पाहून अडीच हजार वर्षांपूर्वी मानवतेला ग्रहणमुक्त करून शांततेच्या प्रस्थापनेसाठीं घोर तपश्चर्या करणारा भगवान बुद्ध निर्माण झाला तसा एकहि आज निर्माण होत नाहीं, हीच काय ती दुःखाची आणि खेदाची बाब होय. आज शेंकडों बुद्धांची गरज असून एकहि बुद्ध नाहीं, हेंच या शांततेसाठीं हपापलेल्या जगाच्या अंतर्यामी सलणारें शल्य होय. ज्या उपनिषद् प्रणीत वैदिक धर्मांतून बुद्धांनी आपल्या नवधर्मासाठी तत्व शोधन केले आणि बुद्धधर्माचा जगभर प्रचार आणि प्रसार केला त्या वैदिक धर्मांच्या धर्ममार्तंड अनुयायांनी आणि धर्म व संस्कृतीच्या निष्फळ वल्गना करणाऱ्या सत्यधर्म शत्रूंनी बुद्धधर्मासारख्या विशाल आणि व्यापक विश्वकल्याणकारी धर्मांची गळचेपी करून त्याचा नाश करण्यासाटी पराकाष्ठेचे प्रयत्न करण्याचे पातक तर केलेंच; परंतु त्याच बरोबर बुद्धांच्या महान कार्यांने जागृत होऊन वैदिक धर्मांतील विश्वमांगल्यसाधक उदात्त तत्त्वांचा उपयोग करण्याचें थोडेबहुत पुण्यहि स्वतःच्या पदरीं बांधून घेतलें नाहीं, हें भारताचें केवढें दुर्दैव म्हणावयाचें !

विश्वव्यापक शांति या जगाच्या पाठीवर केव्हां नांदेल आणि जगांतील राष्ट्रें परस्पर प्रेम आणि सहकार्यानें स्परस्परांशी व्यवहार करून विनाशाच्या मार्गाने चालत असलेल्या जगाचें

नंदनवन बनविण्यासाठीं कामाला कधीं लागतील तेव्हां लागोत; परंतु आज विश्वव्यापी अशा अनेक कार्यांना प्रारंभ झाला, आहे आणि त्या कार्यामधूनच विश्वबंधुत्वाच्या भावनेचा विकास घडून येण्याची शक्यता दिसत आहे. अशावेळी भगवान बुद्धांनीं प्रस्थापित केलेल्या धर्मांतील तत्त्वाचें आचरण हें जितक्या अधिक कसोशीनें केले जाईल तितक्याच प्रमाणांत विश्वमांगल्याचें ध्येय साध्य होईल. परंतु त्यासाठीं विशुद्ध बुद्धीने कार्य करणारे लोक आवश्यक आहेत. ध्येयाशीं तादात्म्य पावून आचार विचार आणि कृतीत सत्य-अहिंसा आणि शांति या तत्वाचें तंतोतंत पालन झालें तरच बुद्धांची २५०० वी जयंति साजरी केल्याचें सार्थक होईल. नाहीं तर 'बुद्धं शरणं गच्छामि !' असें म्हणून स्वस्थ बसण्यात काय अर्थ आहे ?

—मातृभूमि (२१ मे १९५६)

* * *

## डॉ. वि. भा. गोवंडे—

भगवान बुद्धाच्या कार्याचें मूल्यमापन अगदी थोडक्यांत केल्यास पुढील गोष्टी ठळक दिसून येतात:

१. जगांतील अत्यंत जुलुमी आणि प्रबळ अशा भिक्षुकशाहीचें उच्चाटन करून निदान एक हजार वर्षेपर्यंत बौद्ध धर्मानें हिंदुस्थानांत श्रेष्ठत्व प्राप्त करून घेतलें.

२. जातिभेदावर आघात करून त्याचीं बंधनें शिथिल केलीं.

३. गुलामगिरी नष्ट केली.

४. स्त्रियांचा सामाजिक दर्जा वाढविला. अनेक स्त्रिया करण्याची चाल धर्मविचारांशीं विसंगत आहे हें लोकांस पटवून एकपत्नीव्रताकडे लोकांना वळविलें. स्त्रियांना पुरुषांप्रमाणेंच धार्मिक बाबतींत स्वातंत्र्य आहे. त्यांना अध्यत्मिक उन्नति करण्याचा मार्ग खुला झाला.

५. पशुहत्या बंद पडली. राजानें देखील तरवारीचा उपयोग करूं नये असा विचार प्रसृत झाला. (फाशीची शिक्षा इंग्लंडाने १९५६ साली रद्द केली.)

६. सामुदायिक धर्माचारापेक्षां व्यक्तीचाच आचार अधिक महत्वाचा आहे हें मानवांच्या इतिहासांत प्रथमच दाखविण्यांत आलें. यज्ञयाग यापेक्षां न्यायानें आणि सदाचरणानें वागण्यानेंच मोक्षप्राप्ति होते अशी लोकांची खात्री झाली.

७. धर्मप्रचार करणें हें आपले कर्तव्य आहे ही गोष्ट बुद्धापूर्वी कोणी सुचविली नाहीं. हिंदुस्थान, जपान, चीन देश, ब्रह्मदेश, सयाम, सिलोन, पर्शीया, इजिप्त या देशांत बौद्ध धर्म प्रचारक गेले आणि तेथील लोकांना बुद्धाचे अनुयायी केले. बौद्ध धर्माचा प्रचार मुसलमानी धर्माप्रमाणें तरवारीच्या जोरावर किंवा ख्रिस्ती लोकांप्रमाणें पैशाच्या मदतीनें करण्यांत आला नाहीं ही अत्यंत महत्वाची गोष्ट आहे. बौद्ध भिक्षु अक्षरशः भिक्षा मागून रहात. धर्मप्रचार करण्यासाठीं तें एकटे जात. स्वतःचे त्यागी जीवन लोकांपुढें ठेवूनच ते लोकांची मनें वळवीत.

प्रभात पुणें (१६ एप्रिल १९५६)

* * *

## अनुचित विसंवाद
## श्रेष्ठ निष्ठा

भारत सरकार बुद्ध परिनिर्वाण दिन महोत्सवाच्या तयारींत असतांना त्या महोत्सवाशीं विसंवादी असा एक सूर महाराष्ट्रांतून निघाला आहे. बौद्धांच्या अतिरेकी अहिंसचा अधिक्षेप करण्याचा आणि राष्ट्राला सामर्थ्याची गरज असते हें उघड सत्य प्रतिपादन करण्याचा हव्यास या विसंवादी सुरांत आहे. सामर्थ्याची उपेक्षा राष्ट्रानें करावी असें कोणी म्हणणार नाहीं आणि दौर्बल्यांचा आदर्श पुढें ठेवावा असाहि कोणाचा अट्टाहास नाहीं. गांधीजींच्या अहिंसेवर अतिरेकीपणाचा शिक्का ठोकण्याच्या संवयींतूनच बुद्धविरोधी टीका निर्माण झालेली आहे. पण आदर्श आणि व्यवहार यांत नेहमींच अंतर रहातें. आदर्शाबरहुकूम व्यवहार साधला नाहीं म्हणून आदर्श टाकाऊ ठरत नाहीं आणि व्यवहारिक त्याज्य ठरते. 'सत्यमेवजयते नानृतम्' हा संदेश कांहीं बुद्धानें दिलेला नाहीं. आणि हिंदूनीं तो दिला म्हणून व्यवहारांत त्याचा पदोपदीं प्रयत्न येतो असेंहि नव्हे. राष्ट्राच्या कांहीं निष्ठा असतात. 'सत्यमेव जयते' ही जशी एक निष्ठा आहे, तशीच अहिंसा ही सुद्धां एक श्रेष्ठनिष्ठा आहे. या निष्ठांनीं व्यवहारांतील अपरिहार्य असे आपद्धर्म कांहीं चुकत नाहींत. अहिंसेचे सांस्कृतिक मूल्य मानणारे पं. नेहरू व्यवहारांत अपरिहार्य ती हिंसा राजधर्मानुरूप करीत आहेत. पण म्हणून हिंसा हें ध्येय होऊं शकत नाहीं, ती निष्ठाहि होऊं शकत नाहीं. बुद्धपरिनिर्वाण महोत्सवाबद्दल विसंवादी सूर काढण्याचा अनुचितपणा करतांना एवढा तरी विचार केला जाणें आवश्यक होतें, असें आम्हांला वाटतें.

## विशाल अनुबंध

पाकिस्तानी संकटाच्या संदर्भांत बुद्धाऐवजीं शिवाजीचा आदर्श राष्ट्रापुढें असला पाहिजे असें मत स्वा. सावरकरांनीं व्यक्त केलें आहे. शिवछत्रपतींबद्दल आम्हांला दिगंत अभिमान आहे. पण बुद्ध हा राष्ट्रासमोर राजकीय आदेश आहे असें कोणी म्हणत असल्याचें आमच्या ऐकिवांत नाहीं. पण स्वतंत्र भारताच्या उत्सव-महोत्सवांना कांहीं आंतरराष्ट्रीय अनुबंध लक्षांत न येण्याइतकी दृष्टि आकुंचित व्हावी—ही दुर्दैवाची गोष्ट होय. पॅन–इस्लामीझमच्या कारवायांना उत्तर देण्यासाठीं केलेल्या स्वा. सावरकरांच्याच भाषणांतील एका वाक्याचें आम्हाला या ठिकाणीं स्मरण होतें. पॅन–इस्लामीझमचीं स्वप्नें पहाणाऱ्यांना उद्देशून 'जम्मूपासून जपानपर्यंत हिंदु-बौद्ध एकजूट होईल' असें एक वाक्य पंधरा वर्षांपूर्वी सावरकर एकदां बोलून गेले होते. तशा तऱ्हेची राजकीय एकजूट आज थोड्या वेगळ्या स्वरूपांत अवतरत असतां ती ओळखण्याची दृष्टि मात्र त्यांनीं दाखवूं नये हें मोठें दुर्दैव होय. बौद्धधर्म भारतांतून नामशेष झाला तरी त्या धर्माची खोल छाप तदुत्तरकालीन वैदिक धर्माच्या पुनरुज्जीवनावरहि पडलेली आहे. बौद्धधर्म भारतांत नामशेष झाला असला तरी भारतीय संस्कृतींत तो चिरंजीव होऊन राहिला आहे. पूर्वी जेथें जेथें वैदिक धर्मानें दिग्विजय केले तेथें तेथें मागाहून बौद्धधर्मानेंहि दिग्विजय केले आणि ब्रह्मदेश, सिलोन, सयाम, कंबोडिया, व्हिएतनाम, जपान, चीन, तिबेट या देशांशीं भारताचें जें सांस्कृ-

तिक नातें कायम राहिलें आहे तें टिकविण्याचें श्रेय बौद्ध धर्मालाच आहे. हे देश आज कमी अधिक प्रमाणांत बौद्ध आहेत. आणि भारतानें बुद्ध महोत्सव केल्यामुळें हे संबंध अधिक दृढतर होणार आहेत. बौद्धधर्माचें भारतीय संस्कृतीवरील ऋण आणि त्याचा हा विशाल अनुबंध लक्षांत घेतां बुद्ध परिनिर्वाणदिन महोत्सवाचें महत्त्व सहज लक्षांत येईल.

**नवशक्ति** (१७-५-५६)

* * *

## बुद्धपरिनिर्वाण

### ले. र. मु. जोशी, हैद्राबाद

आदर्श व्यक्ति ही अतिशय उन्नत श्रेणीची असली, तिचा त्याग, तपश्चर्या विद्वत्ता, ग्रंथकर्तृत्व अत्यंत असाधारण असलीं म्हणजे संसारांतील सामान्य जनांना त्यांचा दरारा वाटतो, प्रेम व आपुलकी वाटत नाहीं. श्रीमदाद्यशंकराचार्य, संतरत्न ज्ञानेश्वर महाराज अथवा समर्थ रामदास यांच्या चरित्रानें आपण दिपतो, पण तुकोबाराय अथवा नाथ यांच्याबद्दल आपणाला आपुलकी वाटते. कडकडीत ब्रह्मचर्य हें एकच तपश्चर्येचें असें अंग आहे कीं संसारी माणूस गांगरून जातो. पण तुकोबारायाचें पहा. सांसारिक प्रतिकूलतेच्या मुशीत त्यांच्या जीवनाचें शंभर नंबरी सुवर्ण बनलें. अभंगाच्या ओळीओळींत ज्ञानाचें अमृत भरलें.

गौतम बुद्धाच्या चरित्राचा तोच प्रकार. गौतम सुखाचा भोक्ता होता. स्वतः अत्यंत सुखांत, ऐश्वर्यात आणि विलासांत असतां, त्याच्यांत मानवता जागृत झाली. आपणांस सर्व कांहीं आहे म्हणून आपण आनंदांत आहों. पण ज्या इंद्रियांच्या साहाय्यानें आपण सुख भोगतों ती तरी निर्बळ व उपभोगास निरुपयोगी ठरतीलचना? आपणांसहि जरा, व्याधि, मृत्यू येणारचना? म्हणजे परिणामीं दुःख झाल्याशिवाय राहणार नाहीं. बहुजन समाज तर दुःखांतच आहे. व असतो हेंहि त्याला पटलें. अत्यंत दुःखनाश ज्याच्या योगानें होईल असा मार्ग शोधून काढल्याशिवाय त्याला चैन पडेना. त्याची तहान भूक हरपली. तो अस्वस्थ झाला. ज्या पौर्णिमेच्या रात्रीं त्यानें आपल्या विलास मंदिराचा त्याग केला, त्या वेळचें Light of Asia या पुस्तकांतलें वर्णन वाचलें म्हणजे बुद्धाच्या चरित्रांतली हृदयंगमता मनाला वेड लावते.

**मराठवाडा** पुरवणी (२४ मे १९५६)

* * *

## "क्ष" किरणें

सध्या ऑल इंडिया रेडिओच्या बोकांडीं बुद्ध बसला आहे, याचा उल्लेख मागें केलाच होता. त्यासंबंधांत जीं अनेक भाषणें झाली आणि होत आहेत त्यांत गौतमबुद्धास यज्ञयागांत होणारी पशुहिंसा पाहवत नव्हती म्हणून; त्याचे हृदय दयेने कळवळलें अशीं विधानें कित्येकांनी केलीं आहेत. बुद्धकाळीं सर्व हिंदुस्थानांत यज्ञप्रसंगाने रोज किती पशुहत्या होत असे याचे आकडे कोठेहि उपलब्ध नाहीत. शिवाय अनेक पशु मेले तर दया यावी व एखादाच मेला तर दया येऊं नये असें कांही नाहीं. तेव्हां गौतम बुद्धाच्या दयाबुद्धीस द्रव येण्यासाठी अनेक पशुहिंसेचीच गरज होती असें नाहीं. आज गौतमबुद्धाच्या अनुयायांचें पीक आपल्या देशांत जरा विशेष वहरून आलें आहे; त्याबद्दल असें अनुमान करावें लागेल कीं, या नव्या बुद्धानुयायांनी पशुहिंसा व मांसभक्षण साफदी वर्ज्य केलें असावें! पण वस्तुस्थिति अगदी उलट आहे. बुद्धकालीं जितकी यज्ञांत पशुहिंसा धर्मकार्यार्थ होत असेल त्यापेक्षां अनंत पटींनी अधिक पशुहिंसा जिव्हालौल्यास्तव, बुद्धाचे गोडवे गाणाऱ्या आजच्या हिंदुस्थान सरकारच्या देखरेखीखाली चालत असलेल्या कत्तलखान्यांतून होत असते हें स्पष्ट आहे! या सरकारी पशुहननांतून गाई देखील सुटल्या नाहीत! अशा अवस्थेंत यज्ञयाग करणारावर आजच्या बौद्धपाखंड्यांनी स्वतः मांस भक्षण करीत करीत हिंसा, अहिंसा या बाबत टीका करावी हें शुद्ध ढोंग आहे!

**राष्ट्रशक्ति** (२५ मे १९५६)

* * *

## गौतमबुद्धाचें तत्वज्ञान

### धर्म ही जागतिक संपत्ति

वैदिक धर्म हा विश्व-व्यापक धर्म आहे. पौराणिक धर्म मात्र तसा नाहीं. भगवान बुद्धानें उपनिषदांतील धर्माच्या पायावर आपला धर्म उभारला व तो साऱ्या जगांत प्रसारित केला. मॅक्समुल्लरनें असें म्हटलें आहे कीं यहुदी, ग्रीक, रोमन किंवा ब्राह्मण लोकांनीहि धर्मप्रसाराचें कार्य केलें नाहीं. कारण धर्म ही राष्ट्रीय संपत्ति आहे अशी त्यांची समजूत होती. धर्म हा जन्मसिद्ध असतो अशीच त्यांची भावना होती. परंतु जगाच्या इतिहासांत बुद्धानेंच प्रथमतः धर्मप्रसाराचा उपक्रम साऱ्या जगांत केला आणि धर्म ही जागतिक संपत्ति आहे या तत्त्वाचें प्रतिपादन केलें. सम्राट अशोकाच्या

शिलालेखांत एके ठिकाणीं 'त्यानें बुद्ध धर्मप्रचारक सीरिया, अँटियोक, अलेक्झांड्रिया इत्यादि ठिकाणीं पाठविले आहेत' असें नमूद केलेलें आहे. या आणि इतर अशाच पुराव्यांवरून हॅवेलनें, या बौद्ध भिक्षूंनीं ख्रिस्ती व महंमदी धर्मांची भूमिका तयार केली असा निर्णय दिला आहे. बॉक्वेट नांवाच्या एका विद्वानानेंहि हीच विचारसरणी उचलून धरली आहे. तो म्हणतो 'ज्या प्रकारें यहुदी धर्मांचा संबंध ख्रिस्ती धर्मांशी आहे त्याच प्रकारें ब्राह्मण धर्मांचा संबंध बौद्ध धर्मांशी आहे. मात्र बौद्ध धर्म हा जगद्वंद्य झाला पण ब्राह्मण धर्म मात्र संकुचितच राहिला.' बॉक्वेटचें हें म्हणणें खरें आहे. हिंदू धर्मांचे मुख्य अवतार राम कृष्ण आणि बुद्ध हे आहेत. पैकी राम आणि कृष्ण हे राष्ट्रीय आणि बुद्ध मात्र जगद्वंद्य झाला आहे.

यावरून असें स्पष्ट होतें कीं, जगांतील प्रचलित बहुसंख्य धर्मांचा उगम भगवान बुद्धाच्या शिकवणींत आहे. ही शिकवण काय होती हें पहाण्यापूर्वीं ज्या वैदिक धर्मांतील तत्त्वांवर बुद्धानें आपल्या धर्मांची उभारणी केली त्याबद्दल आणखी थोडेसें विवेचन अस्थानीं होणार नाहीं.

### तत्त्वज्ञान

सारांश, उपनिषदांतील धर्मच बुद्धाचा धर्म आहे. यांत नवीन असें कांहींच नाहीं. ज्यावेळीं लोक केवळ कर्मकांडी बनत चालले होते, त्यावेळीं कर्मकलापांचा निषेध करून, नीति तत्वानुसार सदाचार करणें धर्मांचें खरें अधिष्ठान आहे, असें प्रतिपादन करण्यासाठीं बुद्ध पुढें आले आणि त्यांनीं आचारधर्मांची महति गायिली. हेंच त्यांच्या तत्वज्ञानाचें रहस्य आहे, आणि बुद्ध धर्मांचे अत्यंत महत्वाचें मर्म म्हणजे त्यांनी जगाच्या इतिहासांत पहिल्यांदाच धर्म प्रसारासाठीं सारी पृथ्वी पायाखालीं घालण्याचा महामंत्र हिंदुसमाजाला दिला हें होय.

बुद्धाच्या अडीच हजाराव्या परिनिर्वाण जयंतीच्याप्रसंगीं बौद्ध धर्मांचें हे रहस्य आणि त्यांतील हें मर्म लक्षांत घेतल्यास आपली फसगत व्हायची नाहीं.

रवीवरचा **गांवकरी** (२०-५-५६

* * *

## भारताचा दैदिप्यमान सुपुत्र भगवान बुद्ध

भगवान बुद्धानें "प्रत्येक व्यक्तीनें आपले ते सत्य हुडकले" पाहिजे असा उपदेश केला असला तरी "इतरांना आपल्यामधें पाहा इतरामध्यें आपण आहोत" हे ध्यानांत ध्या, असा समयोचित इशारा दिला आहे. बुद्धांनी स्वच्छ बुद्धिवाद पुढे मांडला. एखादा महाज्ञानी असता म्हणजे तो बोलेल ते खरे असे धरून चालू नका असे ते सांगत. प्रत्येक नव्या युगांत व बदलल्या परिस्थितीत सत्याला पडताळून घेतले पाहिजे. आणि प्रत्यक्षांत त्यास तसे जोपासले पाहिजे असे ते बोलत. स्वनिष्ठा व स्वतःची वैयक्तिक जबाबदारी हे दोन गुण प्रमुख मानल्यामुळें बुद्धांचे तत्वज्ञान अजूनहि ताजेतवाने राहिलेले आहे.

भारताच्या या तेजस्वी सुपुत्रानें बुद्धधर्मांचा प्रसार केला म्हणूनच केवळ त्यांचे नाव अजारमर झाले असे नव्हे तर त्यांनी सहिष्णुता, प्रेम व सदिच्छा या अमर गुणत्रयीवर आपल्या तत्वज्ञानाची उभारणी केली हे प्रमुख होय. अशा योगीराजाचा जन्म भारतात झाला आहे. याचा कोणत्या भारतीयाला आनंद होणार नाही ! परिनिर्वाण उत्सव हा सहा महिनेपर्यंत चालणार आहे. अशावेळी या 'हैड्रोजन बॉम्बच्या काळात' भगवान बुद्धांनी प्रसारलेली तत्वें राष्ट्राच्या व जगाच्या जीवनात कशी आचरली जातील, याचा अवश्य तो विचार व्हावयास पाहिजे. विशेषतः आपले भारत राष्ट्र तर साऱ्या धर्मांचे आगर आहे. पंचशिलेचा पुरस्कार करण्याबाबत ते आजहि अग्रभागी आहे. अशावेळी बुद्धांच्या तत्वांचे व प्रात्यक्षिकांचे अनुकरण करून ते आचरणांत उतरविण्याचे प्रत्येकाचे कर्तव्यच आहे. मग तो धर्मांने बुद्ध असो अगर इतर कोण्या धर्मांचा असो.

महाराष्ट्रातील डॉ. बाबासाहेब आंबेडकरांसारख्या एक बुद्धिवान व्यक्तीनें तर हिंदुधर्म सोडून बुद्धधर्मांचा स्वीकार करण्याचें आवाहन केलेलें आहे. त्यावरून बुद्धंधर्मांचा पगडा २५०० वर्षांनंतरहि किती प्रभावी आहे; याचें प्रत्यंतर आल्या शिवाय रहत नाही.

—रविवारची **मातृभूमि** (२७ मे १९५६)

* * *

## चिमूर येथील भव्य समारंभ : बुद्धनगरांतील सोहळा (२३।५।५६)

### श्री. बी. एन्. दातार यांच्या भाषणांवरून

६॥ वा. बुद्धनगरांत श्रीसंत तुकडोजींनी आयोजित केलेला संमे-

लनाचा समारंभ पार पडला. प्रास्ताविक भाषणांत संत तुकडोजींनी आपली समयदानाची कल्पना विशद केली. त्यानंतर श्री. रणदिवे यांनीं ता. २७-११-५४ पासून महाराजांनी श्रमदानाचा श्रीगणेशा केल्यापासून १०० खेड्यांत झालेल्या श्रमकार्यांचा व जागृतीचा आढावा घेतला. स्वागताध्यक्ष श्री. कामडी यांनी ज्या योजनेमागें धार्मिकतेचा स्पर्श असतो ती सहज शक्य होते असें विवेकानंदांनी म्हटले त्याचा उल्लेख करून तुकडोजीच्या पांच वर्षांत ३ हजार कोटी श्रमदान संकल्पाला यश येईल असें सांगितले.

## बुद्ध आणि गांधी

त्यानंतर श्री. दातार यांचें प्रमुख भाषण झाले, त्यांनी २५०० वर्षांपूर्वी जन्मलेल्या भगवान् बुद्धाच्या कार्यावर प्रकाश टाकला. ते म्हणाले, "कारुण्य, मानवता आणि अहिंसा या प्रमुख गोष्टी बुद्धाच्या ठायीं दिसत. आजच्या काळांत म. गांधीनीहि बुद्धाचेंच कार्य केले असे म्हणता येईल. त्यानी सामाजिक व राजकीय क्षेत्रांत नवी दृष्टी दिली. नैतिक शुद्धाचरणाचे वळण दिले." हिंदु धर्मांत आणि बौद्धधर्मानें एकापरीने हिंदुधर्माला नवे वळण मिळेल असें त्यांनी सांगितले. श्री. संत तुकडोजींनी समारोप केला व बुद्धाचा आदर्श आपणापुढे असल्याचे सांगितले.

समारंभास १५–२० हजार लोक होते. त्यांत प्रो. भन्साली आणि १४० वर्षांचे स्वामी सीताराम हे प्रमुख होते.

ता. २२ च्या तरुण भारतांत आलेले श्री. ढेबरभाईंना खुले पत्र आज ढेबर येथे येतांच त्यांना दाखविण्यांत आले या कामीं राजवैद्य श्री. अनवाणि यांनी पुढाकार घेतला व त्यांनी स्वतःचेहि सहमत असल्याचे पत्र त्यांना सादर केले ते आतां श्री ढेबर यांच्या उत्तराची वाट पहात आहेत, राष्ट्रपतींना ते पायीं जाऊन तक्रार सांगणार आहेत.

* * *

## "बुद्ध कां हवा ?"

पण भारताला बुद्ध हवा आहे. विसाव्या शतकांतील आधुनिक भारताला बुद्ध हवा आहे. पंचवार्षिक योजना आंखून बुद्धाच्या काळीं अस्तित्वांत नसलेलीं अवजारें, यंत्रें निर्माण करणाऱ्या या भारताला बुद्ध हवा आहे. ज्या गंगायमुना नद्यांना धरणें बांधलेलीं बुद्धानें कधींहि पाहिलीं नसतींल त्या नद्यांना धरणें बांधून त्यांना आपल्या उपयोगासाठीं राबविणाऱ्या भारताला बुद्ध हवा आहे. कारण आधुनिक भारत साधनसंपन्न होऊं पहात आहे, कर्तृत्व त्याच्या ठायीं निर्माण होत आहे. बुद्धाला माहीत नसलेली विद्वत्ताहि त्याच्यापाशीं आहे. पण इतकें सारें असूनहि भारताला बुद्ध हवा आहे : कारण भारतीय समाजाचें वैचारिक पुनरुज्जीवन करणारा शेवटचा पुरुष भगवान बुद्ध होता. बुध्द एकाकी निर्माण झालेला नाहीं. त्याचा धर्म अचानक पसरलेला नाहीं. तो जन्मासा येण्यापूर्वी भारतांत कित्येक शतकें वैचारिक संघर्ष चालू होता. वेदप्रामाण्यवादी, अस्तिक व नास्तिक, प्रवृत्ति व निवृत्ति, ब्राह्मण व श्रमण यांच्यामध्यें तुंबळ वैचारिक युध्द चालू होतें. या दोन पक्षांमध्यें समाजाच्या प्रगतीला पायबंद घालणाऱ्या संकुचित, परलोकवादी विचारस्वातंत्र्याला मारक अशा कर्मकाण्डवादी ब्राह्मणांचा पराजय होऊन विचारस्वातंत्र्याला पोषक अशा श्रमणांचा जय झाला ही भारतीय इतिहासांतील फार मोठी क्रांतिकारक घटना समजली पाहिजे. मनुष्य जन्मल्यापासून मरेपर्यंत त्याच्या जीवनाला नानाविध धर्मकर्मांच्या बंधनांनीं जखडून त्याला प्रज्ञाहत करून टाकणाऱ्या पुरोहितांच्या विचारांचा बुद्धानें पराभव केला, ही सर्वांत महत्त्वाची घटना होय. बुद्ध हवा तो या अर्थानें. तो बुद्धिक बंडखोर होता. ज्योतिष्ठोम यज्ञ केला कीं स्वर्ग मिळतो असला अदृश्य व असिद्ध कार्यकारणभाव समाजाच्या माथी मारून समाजांतील शक्ति, बुद्धि व कर्तृत्व यांचा नाश करणाऱ्या वैचारिक दास्याच्या शृंखला बुद्धानें तोडल्या आणि तो स्वतः बुद्ध झाला व समाज त्यानें मुक्त केला यासाठीं भारताला बुद्ध हवा आहे.

—लोकसत्ता (१८–५–५६)

* * *

## बुद्धधर्माचें सार

आज वैशाख शु. ॥ १५ (पौर्णिमा). अडीच हजार वर्षांपूर्वी भगवान गौतम बुद्ध, ह्याच दिवशीं निर्वाणास गेले. त्यांचा जन्महि ह्याच दिवशीचा आहे. भगवान बुद्धांची शिकवण उपनिषदाच्या अभ्यासाच्या प्रेरणेंतून झाली. वयाच्या पस्तीसाव्या वर्षीं त्यांच्यात चैतन्य निर्माण होऊन त्याचा आविष्कार झाला. बुद्धगयेस तपस्व्याप्रमाणें कडक धारणेनें, त्यांनी चिंतन केलें. त्यावेळचा अध्यात्मवाद, योग आणि यज्ञकर्म, पशुहत्त्या, तांत्रिक मांत्रिकपणा, कळसास पोंचला

होता. ह्या सर्वांनी बुद्धांच्या प्रकृतीस समाधान मिळेना. राजपुत्रांचें सुखी जीवनहि त्यांना आकर्षित करूं शकलें नाहीं आणि जीवनांत चिरशांति मिळावी म्हणून त्यांनी ऐहिक सुखांचा त्याग केला. चित्तशुद्धि, आचारशुद्धि व अनासक्ति, ह्यांची तपस्या करून, प्रभावी धारणा संपादन केली. जी गोष्ट प्रत्यक्ष पाहिली नाहीं, अनुभवली नाही आणि जिचें ज्ञान नाही, अशाबद्दल, त्यांनी मौन धरलें आणि केवळ वास्तवतेची दखल घेऊन आपले विचार जगापुढे मांडले. ईश्वर, ब्रह्म, अध्यात्म, वगैरे शुष्क वादांत भगवान बुद्ध कधींच पडले नाहीत. त्यांची शिकवण एका त्रिकोणांत बसते. बुद्ध-धर्माचें सार म्हणजे, ह्या त्रिकोणाची तीन टोकें.

**मातृभूमि** (२४मे१९५६)

* * *

## नमो बुद्धाय !

मनुष्यजातीच्या नानारंगी इतिहासांत भगवान बुद्धाचें स्थान अमर आहे. आजपासून २५०० वर्षांपूर्वी भारतांत एक महापुरुष निर्माण झाला. या महापुरुषाने मानवजातीच्या दुःखविमोचनावर आपलें रामबाण औषध शोधलें याच महापुरुषाने व्यक्तिगत जीवनांतील आत्मोन्नति समाजाभिमुख केली आणि मानव्याच्या हिताची गाथा प्रथम उद्घोषिली. प्रागैतिहासिक काळाचा पडदा उघडतांच ज्या नयनमनोहर मूर्तीकडे इतिहास अभिवादन करून उभा राहतो ती मूर्ति म्हणजे भगवान बुद्धाची. भगवान बुद्धाच्या आदेशाने सारी वाराणसीच नव्हे तर संपूर्ण भारतवर्ष खडबडून उठलें. नवीन आदेश देणारा एक द्रष्टा गौतमबुद्धांच्या रूपाने जनतेपुढे उभा राहिला. गौतमबुद्धानंतर सुमारे २५० वर्षांचे आंतच बुद्धपंथावरच्या फांद्या नि पारब्या भारतांत खोल रुजल्या असें इतिहास सांगत आहे.

आपल्या सिद्धांतांचा प्रचार करीत बुद्धाने जीवनाच्या अंतिम क्षणापर्यंत अविश्रांत श्रम केले. एका स्थानाहून दुसऱ्या स्थानीं त्यांचा प्रवास सारखा चालूं होता, वादविवाद आणि धर्मसभांतून त्याचा धर्मप्रचार अखंड चालूं होता. गया, राजगिर पाटलीपुत्र, नालंदा या शहरांतून राहणाऱ्या विद्यार्थ्यांत कौसांबी, वैशाली या नगरांतील धनाढ्य जनतेंत बुद्धाने आपल्या मतांचा हिरीरीने प्रचार केला. वयाच्या ८० व्या वर्षी जगांतील मानवाचा हा थोर द्रष्टा अंतर्धान पावला !

काल वैशाख शुद्ध पौर्णिमेला बुद्धाच्या परिनिर्वाणाला २५०० वर्षें झालीं आहेत. बुद्धाची २५०० जयंति काल देशभर विविध रूपांनी साजरी झालेली आहे. अशावेळी मानवाच्या समतेचा श्रेष्ठ उद्गाता आणि अमरशांतीचा संदेशवाह अशा भातवर्षाच्या ह्या श्रेष्ठ पुत्राचा आपण जयजयकार करूं या आणि अशी अपेक्षा करूं या की बुद्धाचा दिव्य संदेश या आजच्या स्वार्थी नी विजिगिषु महत्त्वाकांक्षेने आपलें आयुध बनविलेल्या विसाव्या शतकास पुन्हां खऱ्या शांतीचा दिव्य मार्ग दाखवील.—**राष्ट्रशक्ति** (२५मे१९५६)

* * *

## कसिया–भगवान बुद्धका निर्वाणस्थान

### भगवतशरण उपाध्याय

कसिया... आज का यह तुच्छ गांव सदा से उपेक्षित नहीं रहा। हमारा उस धरा पर जिसके बराबर पवित्र चरण नहीं उतरे, पैतालीस वर्ष तक जो निरंतर जीवों के कल्याण के लिये जतन करता रहा था, गांव-गांव फिर कर उनके जन्म–जरा–मरण के भय से दूर करता रहा था, उस महायात्री बुद्ध ने उसी अकिंचन गांव में अपनी काया विसर्जित की। उसके बाद वह अमर यात्री फिर नहीं चला। वहीं की हवा में उसने अंतिम सांसली। उसके निर्वाण से ही कसिया की मिट्टी पवित्र हुई। आज भी वह मिट्टी उस महा-मानव को रज से गमक रही है।

**धर्मयुग** (नागपूर) १-४-५६

* * *

## भगवान गौतमबुद्ध

आज जगाला गरज आहे ती बुद्ध धर्मानें प्रस्थापित केलेल्या परंपरांची नाहीं किंवा अशोकानें प्रारंभी रक्ताचे पाट वाहवून वाढविलेल्या साम्राज्याची नाहीं तर ज्या अपार करुणेनें द्रवून मानवाचीं दुःखें नष्ट करणारा उपाय शोधून काढण्यासाठीं कपिलवस्तूच्या तरुण राजकुमार सिद्धार्थानें राज्य–गृह–दारा–सुत या साऱ्या माया मोहांचा त्याग करून तपस्येसाठीं अरण्याची वाट धरली त्या करुणेची आहे, बुद्धानें मानवांना जो सत्य–अहिंसा–प्रेमाचा मार्ग दाखविला त्या महान तत्वांची आहे. सम्राट अशोकानें साऱ्या मानवाच्या कल्याणाच्या ज्या दिव्यबुद्धीनें प्रेरित होऊन पूर्व समुद्रांतील बेटांत व लंकेत आपले प्रचारक पाठविले तिची आहे. युद्धाची शक्यता नष्ट करून जगांतील सर्व राष्ट्रांत भ्रातृभावना, समानतेची भावना व सहकार्याची इच्छा निर्माण करण्याची आज गरज आहे. व ती भागविण्याचें सामर्थ्य बुद्धाच्या संदेशांत आहे. म्हणून आज २॥ हजार वर्षांनंतर बुद्धाच्या स्मृतीला पुन्हां उजाळा आहे. येवढ्या प्रदीर्घ काळानंतर ज्याच्या संदेशाची जरूरी जगाला वाटते त्याच्या थोरपणाबद्दल संदेह कसा उरूं शकणार !

बुद्धानें नवा धर्म प्रस्थापित केला असें त्याच्या तत्वज्ञानावरून दिसत नाहीं. जुन्या वैदिक धर्मातील कांहीं तत्त्वांनाच त्यानें उजळा दिला. त्यांचा अधिक इर्ष्येनें प्रचार केला. यज्ञांतील पशुहत्या, व भेद व उत्तम लोकप्राप्तीसाठीं आचरावयाचें कर्मकांड याचा त्यानें निषेध केला. केवळ मागून चालत आले म्हणून त्याचे आचरण करणें विहित न मानतां स्वतःच्या बुद्धीनें योग्यायोग्य निवड करून व तेंच सत्य मानून आचरण करा अशी शिकवण त्यानें दिली. अशा प्रकारें जुनेंच धावून पुसून व लोकांना स्वयंप्रज्ञेनें आचरण करण्याचा आदेश देऊन त्यानें सर्वसामान्य जनांना मुक्तीचा सुलभ भाग दाखविण्याचा प्रयत्न केला. म्हणूनच बुद्धधर्माचा भारतांतून ऱ्हास झाला तरी बुद्धाला हिंदूंनी देवपदीं चढविलें.

—**महाराष्ट्र** (२४ मे १९५६)

* * *

## बुद्धोत्सव आणि सरकारचें कर्तव्य लो. टिळकांच्या "वैदिकधर्माचें साम्राज्य" (१९०३) या भाषणांतील उतारा :

"सांप्रत युरोपियन राष्ट्रें आमच्यावर राज्यें करोत. परंतु सर्वांना श्रेष्ठ प्रकारचे धर्मविचार व तत्त्वज्ञान शिकविण्याचा आशिया खंडाला व विशेषतः हिंदुस्थानाला उपजत अधिकार आहे. ही गोष्ट कोणालाहि नाकबूल करता यावयाची नाहीं. शाक्य मुनीने (बुद्धाने) उत्तर हिंदुस्थानांत एके काळी दोन हजार भिक्षु तयार केले होते; व त्यांनीं भारतीय-तत्वज्ञानाचे सर्वत्र पुनरुज्जीवन आणि प्रसार केला. जपानांत आजमितीलाहि गणपतिसारख्याच 'शोडन' (ग्रुडिन) देवतेचें पूजन होत असते. हा वैदिक धर्माच्याच प्रसाराचा परिणाम होय. बुद्धाचे अनुयायी हे अपलेच धर्मबंधु आहेत; व धर्माच्या कामीं तरी त्यांचे व आपले एकमत होण्यास कोणतीच अडचण नाही. अशा विचाराने जर समजूत करून आपण कांही काम करूं, तर निदान आशिया खंडांतील शंभर कोट लोक तरी भारतीय संस्कृतीच्या छत्राखाली आपल्याला आणता येतील."

—तरुण भारत (९-५-५६)

* * *

## बौद्धांच्या आततायी अहिंसेचा शिरच्छेद ! श्री. वि. दा. सावरकर

डोक्यांतील उवा वांचाव्यात म्हणून डोकेंच उडवावयाचें! माशाचा जीव वांचावा म्हणून माणसाचा जीव घ्यायचा! ही म्हणे अहिंसा! बुद्धांच्या या आततायी अहिंसेची हिंसा अखेरीस कोणी केली? आणि बुद्धधर्माची नि स्वतः बुद्धदेवांची भारतांत अंतीं काय गति झाली?

सध्यां आपल्या हिंदु जगताला शिवाजीच हवा आहे. बुद्ध नको. येथें तुलनेचा प्रश्नच नाहीं...!"

स्वातंत्र्यवीर वि. दा. सावरकर यांनी वरील आशयाचा संदेश येथील प्रकाश मित्र मंडळाला शिवजयंति महोत्सवाच्या निमित्तानें धाडला आहे.

वरील मंडळाच्या वतीनें शनिवार वाड्यासमोर उद्यां हा महोत्सव साजरा केला जाणार आहे. व्यक्तिशः ते उपस्थित राहूं शकत नसल्यामुळें त्यांनीं हा संदेश धाडला.

### जसा रोग तसें औषध

वीर सावरकर आपल्या संदेशांत पुढें म्हणतात : "ज्या रोगावर जें रामबाण, तेंच औषध त्याच्यावर योजलें पाहिजे. मशक दंशाचे औषध मशक दंशावर, पण सर्पदंशावर, सर्पदंशाचेच औषध हवें."

"हिंदुस्थानावर आज पुन्हां जें संकट कोसळूं पहात आहे, त्याच्यावर रामबाण औषध म्हणजे शिवाजीचा आदर्श, शिवाजीची राजनीति!...

...बुद्धाची नव्हे!

——केसरी (६ मे १९५६)

* * *

## डॉ. ना. भा. खरे यांचें पत्रक बुद्धाच्या अहिंसेनेंच देश निर्बल बनविला होता बुद्धजयंतीच साजरी कां करितां ?

त्या पत्रकांत डॉ. खरे म्हणतात, "भारतसरकारच्या वतीने सध्या भारतांत २५०० वी बुद्धजयंती सर्वत्र फार थाटामाटाने साजरी केली जात आहे. या जयंतीच्या कार्यक्रमासाठीं गरीब जनतेच्या लाखो रुपयांचा चुराडा सरकार करीत आहे. बुद्धाच्या व्यक्तिमत्वाविषयीं योग्य तो आदर दर्शवूनहि मी असें म्हणेन कीं, भारत सरकारने अंगिकारलेल्या निधर्मी राज्याच्या तत्त्वाच्या कक्षेत ही गोष्ट मुळीच बसत नाही. सर्व धार्मिक पंथांना समान लेखणें हे तर निधर्मी राज्याचें मूलभूत तत्व आहे. भारतांत हिंदु, मुस्लिम, ख्रिश्चन, पारशी, बुद्ध, जैन, शीख, आर्यसमाज, लिंगायत, महानुभाव इत्यादि विविध धर्म नि पंथ नांदतात आणि त्या प्रत्येक धर्माला वा पंथाला आपापला प्रेषित आहे. तेव्हा भारतसरकार जर बुद्धजयंती साजरी करीत असेल तर या प्रत्येक धर्माच्या प्रेषितांची जयंती सरकारला साजरी करावी लागेल; आणि भारतसरकार जर ती साजरी करणार नसेल तर भारतसरकारवर पक्षपाताचा आरोप करावा लागेल. भारत-सरकार हें केवळ बौद्धधर्मानुकूल आहे असें म्हणावें लागेल. ही गोष्ट घटकाभर बाजूला ठेवली तरी बुद्धाच्या अहिंसा तत्त्वानें आपला देश निर्बल बनविला आणि त्यामुळे आपल्या देशावर परचक्रें आलीं हें ऐतिहासिक सत्य आपण दृष्टीआड करतां कामा नये.

अशोकाने बुद्ध धर्म हा राजधर्म बनविला, त्या धर्माला त्याने नसते महत्त्व प्राप्त करून दिलें. परंतु अशोकानंतर आपला हिंदुस्थान देश ऱ्हास पावत चालला. कॉंग्रेस सरकारनें हा धडा तरी विसरू नये."

—**केसरी** (८ मे १९५६)

* * *

## बुद्ध परिनिर्वाण उत्सव कशासाठीं ?"

जगांतील बुद्ध धर्माच्या सर्व प्रतिनिधींना बोलावून हा परिनिर्वाण दिनाचा उत्सव भारतांत साजरा केला जात असतांना कांहीं लोकांनीं 'भारताला आज बुद्धाच्या नव्हे, शिवाजीच्या शिकवणीची नितांत आवश्यकता आहे" असें प्रतिपादन करून 'विसंवादी सूर' प्रकट केल्याबद्दल आमच्या कांहीं समव्यवसायिक बंधूंना कमालीचें दुःख झालें आहे. त्याच्या दुःखाचा वांटा आम्हास उचलतां येत नाहीं याबद्दल खेद वाटतो. भारत सरकारनें तत्त्वशून्य बनून कसाहि आणि कोणताहि व्यवहार करावा, भारतीय जनतेला त्याचे भीषण परिणाम भोगावे लागावेत आणि तरीहि त्या व्यवहारावर टीका करूं नये, असें कुणाचें मत असेल तर त्याच्याशीं आमचा मतभेद आहे. अशोकाची परंपरा कुणी येथें स्थापन करूं पाहील तर त्याला विरोध करणें—शक्य त्या सर्व उपायांनीं—यातच देशहित आहे अशी आमची पक्की धारणा आहे. या उत्सवांतून एक वेगळ्या प्रकारे भारत जम्पूपासून जपानपर्यंत एकजूट घडवून आणीत आहे अशा कल्पनेत वावरणाऱ्यांना आजच्या राजकीय समस्यांचें आणि या तथाकथित एकजुटीचें फारच अल्प ज्ञान असलें पाहिजे. सिलोन, सयाम, कंबोडीया, व्हिएटनाम, चीन, तिबेट आणि ब्रह्मदेश या देशांशीं भारताचें जें सांस्कृतिक नातें बुद्धधर्मामुळें टिकून राहिल्याचें एका वृत्तपत्रकारानें आग्रहानें प्रतिपादिलें आहे त्यानें या राज्यांचा आज भारताशीं असलेला व्यवहार सोईस्करपणें नजरेआड केला आहे; एवढेंच नव्हे तर आज त्या त्या देशांचे जे जे प्रतिनिधि (चीन आणि तिबेटनें प्रतिनिधि पाठविलेले नाहींत.) या उत्सवासाठीं येथें आले आहेत त्यांचा तेथील राज्यकर्त्यांशीं फारच अल्प संबंध आहे हेंहि विसरण्याचें कौशल्य दाखविलें आहे! अर्थातच अशा बादरायण संबंधामुळें भारताचें कांहीं हित होणार आहे ही कल्पना धादांत खोटी आहे हें निराळें लिहावयास नको आणि म्हणूनच भारताला आज शिवाजीच्या शिकवणीची आवश्यकता आहे. बुद्धाच्या नव्हे असेंच आमचें स्पष्ट मत आहे.

—**विवेक** (२० मे १९५६)

* * *

## स्पष्ट बोलतों; माफ करा
## परिनिर्वाण दिनाचा बौद्धीक माज

मुंबई राज्यांत दारुबंदी असतांना ही म्हण मला कां व कशी आठवली याचा वाचकांना अचंबा वाटेल. उगाच गोंधळ न घालतां किंवा लांबण न लावतां मी सांगून टाकतों त्याचं कारण. भारतांत परवां जो बुद्ध परिनिर्वाणदिन थाटामाटानें साजरा करण्यांत आला आणि त्या निमित्तानें कॉंग्रेसवाल्यांपासून आंबेडकरवाल्यांपर्यंत आंबेडकरांसह—जीं भाषणें ठोकण्यांत आलीं; तीं वाचल्यांपासून या म्हणीनें माझ्या मनाचा पूर्ण ताबा मिळविला. कांहीं काळानंतर याच धर्तीवर आणखी एका म्हणीनें माझ्या मनांत जन्म घेतला! "दमडीची श्रद्धा आणि लाखाचा माज" ही ती म्हण होय. अगदीं थेट श्रेष्ठ उपराष्ट्राध्यक्षांपासून फडतूस मोरारजींपर्यंत प्रत्येकानें बुद्ध जयंतीबाबत श्रोत्यांच्या कानावर अत्याचार केले! वास्तविक रोजच्यारोज गोळीबार करून जनतेच्या रक्ताचा सडा रस्त्यावर घालणाऱ्या मुख्य मंत्र्याला भगवान् बुद्धाच्या शिकवणुकीबद्दल कुणाला उपदेश करण्याचा काय अधिकार? पण त्याचा कुणी विचार केला नाहीं. मनांत आलें साजरा करावा परिनिर्वाण दिन; आणि तो साजरा झाला. हा सर्वच प्रकार इतका हास्यास्पद आहे कीं या सोहळ्याच्या गंमती जमती एकत्र करून वाचकांना सादर केल्या खेरीज मला रहावेना. आणि म्हणून मित्र हो; गेल्या दोन महिन्यांचे मौन सोडून मी पुन्हां तुमच्या भेटीला सादर झालों आहे. ऐका आतां २५०० वा बुद्ध परिनिर्वाण दिन सोहळ्याच्या सुरस रम्य कथा!!

—**विवेक** (वैशाख व. ९–१८७८)

* * *

## गौतम बुद्ध हा तत्त्वज्ञानी नव्हता!
## बाळशास्त्री हरदास म्हणतात—पुणें येथें

गौतमबुद्ध अहिंसक नव्हता. तो यज्ञीय हिंसेच्या विरुद्ध होता. दया, अन्न वा पशुहिंसेविषयीं तिटकारा ही त्याच्या मनाची प्रेरणा कधींच नव्हती. एरवीं बुद्ध सांप्रदायांत पुत्तलमांस म्हणजे दुसऱ्यानें पशूंना मारून शिजवलेलें मांस खाण्याची प्रथा राहिली नसती. जैन ग्रंथकारांनी याबद्दल बौद्धांची भरपूर थट्टा केलेली असून त्यांना ढोंगी म्हटलें आहे. स्वतः गौतम बुद्धसुद्धां कोवळ्या डुकराचें मांस खाऊन अजीर्ण झाल्यामुळें निर्वाण पदास पोहोंचलेला आहे. या सर्व गोष्टींचा विचार केला म्हणजे बुद्ध संप्रदाय हा केवळ भारतीय राष्ट्राच्या स्थिर समाज रचनेला धुळीस मिळविण्यासाठीं उत्पन्न केलेला कट होता असें म्हणणें भाग पडतें. तत्वज्ञान असें बुद्धानें निर्माणच केलेलें नाहीं. मग त्याच्या तत्त्वज्ञानाचें खंडन हें श्री शंकराचार्यांचें प्रधान कार्य कसें म्हणतां येईल?" असे उद्गार साहित्याचार्य श्री. बाळशास्त्री हरदास यांनी "श्री शंकराचार्य व्यक्ति व कार्य" या विषयावर श्री शंकराचार्यांच्या जन्म दिनानिमित्त वक्तृत्व विकास मंडळाच्यावतीनें दि. १५ रोजीं भाषण करतांना काढले. पुणें येथील नूतन मराठी विद्यालयाच्या आवारांत सभेचें आयोजन केलेलें होतें.

श्रीशंकराचार्यांचें कार्य म्हणजे खंडन होय असें प्रतिपादन करण्यांत येते. अलीकडे पाश्चात्य प्रचारक आणि भारत सरकार यांनी बुद्धाचा जो जयघोष चालविलेला आहे त्यामुळें बुद्ध व बुद्धसंप्रदाय यांच्याविषयीं अवास्तव कल्पना उत्पन्न होऊन एवढ्या मोठ्या प्रतिपक्षाचा पराभव हे आचार्यांचें जीवितकार्य ठरविण्यांत आचार्यांचा आपण फार मोठा गौरव करीत आहोंत, अशी प्रामाणिक आचार्यभक्तांचीहि समजूत असते. पण वस्तुस्थिति तशी नाहीं. आचार्यांना प्रतिपक्षी मानून त्याचें खंडन हें स्वतःचें जीवितकार्य मानावें अशा योग्यतेचा बुद्ध हा तत्त्वज्ञानी होता असें इतिहासावरून निश्चितपणें दिसून येत नाहीं. बुद्धाविषयींच्या साऱ्या कल्पना आपण इतिहासाच्या निकषावर घासून घेण्याची आवश्यकता आजतरी उत्पन्न झालेली

आहे. गौतमबुद्ध हा तत्त्वज्ञानी नव्हता. जीव, जगत् व नियामक शक्ति यांच्या संबंधांत कोणताहि मूलगामी विचार त्यानें प्रतिपादन केलेला नाहीं. राजसत्तेच्या भयानें वा प्रलोभनानें बौद्ध संप्रदाय स्वीकारलेल्या कांहीं ब्राह्मण पंडितांनी त्याच्या वेगवेगळ्या वाक्यांवरून आपल्या बुद्धिमत्तेच्या बळावर जे वेगवेगळे बाह्यार्थवाद, शून्यवाद व विज्ञानवाद इत्यादि संप्रदाय उत्पन्न केले त्यांनाच बौद्ध तत्वज्ञान असें म्हणतात व हे संप्रदाय इतके परस्पर विरोधी आहेत कीं इतक्या परस्पर विरोधी प्रणाली सांगणाऱ्या व्यक्तीला तत्त्वज्ञानी ठरविणें कठिण आहे. ज्याला जी प्रणाली बरी वाटली तिचा साज त्यानें बुद्धाच्या मूर्तीवर चढविला एवढाच याचा अर्थ आहे. गौतम बुद्ध जसा तत्वज्ञानी नव्हता तसाच तो अहिंसकहि नव्हता. वैदिक विचारप्रणालींवर आघात करण्याचें एक प्रभावी साधन म्हणून त्यानें यज्ञीय पशुहिंसेविरुद्ध हांकाटी केलेली आहे.

—**विवेक** (२० मे १९५६)

* * *

## गौतमबुद्ध व हिंदुधर्म

आद्य शंकराचार्यांनीं बुद्ध धर्माचा पाडाव केला असे आमचे काहीं हिंदुधर्माभिमानी मित्र जेव्हां सांगतात तेव्हां त्याचा अर्थ किती किळसवाणा असतो हें येथें कळून येतें. गुणकर्मांवरून ठरणाऱ्या चातुर्वण्याचें रूपांतर जन्मावरून ठरणाऱ्या शेकडो अडाणी जातिज-मातींत होणें हें काल सकाळीं ताजीं व मधुर असलेलीं फळें आज सडून जाऊं लागण्यासारखेंच आहे. शंकराचार्यांना समाजाचा हा कुजटपणा कधींच उमगला नाहीं आणि बौद्ध, जैन, लिगायत वगैरे नवीन धर्मांनीं नवी समाजव्यवस्था दिली नाहीं यामुळें शंकराचार्यांचा सडत चाललेला समाज त्याच अवस्थेंत 'शाबूत' राहिला आणि बुद्धादि सत्पुरुषाची शिकवण विसरला. म्हणजे शंकराचार्यांचा सडत चाललेला समाज 'शाबूत' राहिला हा शंकराचार्यांचा 'विजय' होय. बुद्धधर्महि त्या त्या देशांतील जनताजीवनांत नांवापलीकडे कांहींच फरक करूं शकला नाहीं. बुद्धाच्या शिकवणीचें पुनरुज्जीवन करण्याची कामगिरी महाराष्ट्रांत व महाराष्ट्राबाहेर गेल्या आठशें वर्षांपूर्वीपासून पुढें आलेल्या भक्तिमार्गी संतांनीं केली. दया, प्रेम, कारुण्य, आनंद ही मानवी जीवनांतील मुख्य तत्वें मुळची आर्यधर्मांत होतींच. त्यांचा पूर्ण लोप झाल्यावर बुद्धानें त्याचा स्वतंत्र प्रसार केला. ज्ञानेश्वरादि संतांनीं हीं तत्वें नवी अथवा बुद्धाचीं असें न सांगता मूळच्या आर्यधर्मांतलींच हीं तत्वें आहेत व तीं धार्मिक जीवनाचा मूलाधार आहेत हें तत्व मांडलें आणि भगवत्-गीतेंतील भक्तिमार्गाचा पुरस्कार करून सर्वसामान्य जनता धर्म व ईश्वर यांपासून दूर नाहीं असा प्रत्यय जनतेस आणून दिला. यामुळें हिंदु समाजांत एक प्रकारच्या ऐक्याची जाणीव त्यांनीं निर्माण केली. जुनी जीर्ण समाजव्यवस्था कोणासहि बदलतां आली नाहीं. पण ज्यांनीं हिंदुधर्म सोडला त्यांना हिंदुधर्मीयांना उपदेश करण्याचा अधिकार उरला नाहीं. ज्ञानेश्वर तुकारामांनीं हिंदुधर्म न सोडल्यामुळें भक्तिमार्गाचा उपदेश ते आपुलकीच्या अधिकारानें करूं शकले आणि त्यांना समाजव्यवस्था बदलता आली नाहीं तरी समाजांत प्रेम, सुहृद्भाव, सहानुभूति, ऐक्यभाव या गोष्टीत ते निर्मू शकले.

—**लोकमान्य** (२४ मे १९५६)

* * *

# साधू कोणास म्हणावें ?

[हा उतारा "**मोक्ष-मार्ग-प्रदीप**" पुस्तकांतून घेतला आहे. भारतांतील साधूंची संघटना होत आहे. व "साधुसमाज" ही संस्था भारतीयांच्या त्रिविध कल्याणासाठीं झटणार आहे, ही अत्यन्त स्पृहणीय अशी घटना या स्वतंत्र भारतांत घडून आली आहे. या संस्थेचे पंचप्राण श्री राष्ट्रसंत तुकडोजी महाराज आहेत. अशा वेळीं साधूंचीं खालीं उद्धृत केलेलीं लक्षणें सर्वांनाच उद्बोधक होतील. उद्धवाला श्रीकृष्णांनीं साधूचीं लक्षणें सांगितलीं आहेत. **संपादक**]—

"उद्धवा, मला मान्य अशा साधूंचीं लक्षणें कोणतीं म्हणून तूं विचारतोस; तर तीं सांगतों ऐक :—

'तो साधुपुरुष फार दयाळू असतो, तो कोणाशीही द्वेष करीत नाहीं; त्याचें चित्त नित्य प्रसन्न असतें; तो सत्यापासून कधींहि ढळत नाहीं; कधीं कोणाच्याहि निंदा स्तुति करण्याच्या भानगडींत पडत नाहीं; सुख किंवा दुःख कसलाही प्रसंग आला, तरी त्याची चित्त-वृत्ति सारखी (हर्षविषादरहित) असते, तो सर्वांवर यथाशक्ति उपकार करीत असतो; तो आसक्तरहित असल्यामुळें विषयादिकां-पासून त्याच्या चित्ताला क्षोभ होत नाहीं; तो अगदीं जितेंद्रिय असतो; तो सदाचारसंपन्न असतो म्हणून त्याचें चित्त दीनांचें दुःख पाहून कळवळतें; तो धनादि सुखोत्पादक पदार्थांचा स्वीकार करीत नाहीं; तो ऐहिक भोगसाधनांविषयीं लुब्ध नसतो; तो देहनिर्वाहापुरताच अल्प आहार करतो; तो अत्यन्त विरक्त असतो; म्हणून त्याची बुद्धि धर्माच्या ठिकाणीं स्थिर राहते; तो सर्वथैव माझ्या ध्यानमननांत तत्पर असतो; तो सदैव ब्रह्मचिन्तनांत निमग्न राहतो; अगदीं हयगय करीत नाहीं, म्हणून त्याचें चित्त गंभीर असतें; कधीं संकटाचा प्रसंग आला तरी तो धैर्य धरून असतो, अर्थात् त्याच्या ठिकाणीं उत्तम विवेक असतो. क्षुधा, तृषा, शोक, मोह, जरा, मृत्यु या साही विकारांना जिंकलेला असतो; तो स्वतः मानाची अपेक्षा धरीत नाहीं, पण दुसऱ्याला मान देण्यांत तत्पर असतो; तो इतरांना ज्ञानोपदेश करण्यांत दक्ष असतो; तो कोणालाही फसविण्याची हांव बाळगीत नाहीं; परंतु करुणेनेंच एखादें परोपकाराचें काम करण्यास प्रवृत्त होतो, व त्याला सकल गोष्टींचें सम्यग् ज्ञान असतें. उद्धवा, वेद हें माझेंच स्वरूप होय; त्या रूपानें मीच धर्म सांगून ठेविलें आहेत. हे वेदप्रणीत धर्म आचरल्यानें चित्त शुद्ध व ज्ञान प्राप्त होते; आणि न आचरिल्यानें चित्तभ्रंश व नरक प्राप्त होतो, हें जरी खरें आहे, तरी पण हे धर्म भगवद्ध्यानांत विक्षेप करूं लागल्यास त्यांना तो सोडूनहि देतो, आणि ईश्वरभक्तीनेंच सकल धर्म साध्य होतात, अशा निश्चयानें माझ्या भक्तीमध्यें सदा निमग्न असतो ! उद्धवा, साधूच्या अंगीं मुख्य हें असावें कीं, त्यानें अनन्यभावानें माझी भक्ति करावी; मग त्यास माझ्या सच्चिदानंद स्वरूपाचें ज्ञान होवो किंवा न होवो, पण तो माझ्या मतें अत्यंत श्रेष्ठ साधू होय."

# परिश्रमालय, खेरवाडी—खार (मुंबई).

लेखक : श्री. नरहरी वामन रत्नपारखे

१५ आगष्टचा दिवस—म्हणजे भारताचे इतिहासांत अत्यंत महत्त्वाचा दिवस आहे. सन १९४७ चे दिनांक १५ आगष्ट रोजीं भारताला औपनिवेशिक (Dominion) स्वातंत्र्य व स्वराज्य प्राप्त झालें. उपनिवेशांत साम्राज्यत्वाची कल्पना अंतर्गत आहे. कारण उपनिवेश म्हणजे एका मोठया साम्राज्यांतील एक नियोजित देश. हें स्वातंत्र्य खरें असें म्हटलें तर फार मोठीशी हरकत नाहीं. परंतु त्यांत पूर्ण स्वातंत्र्य नव्हतें. ही गोष्ट स्वातंत्र्य-प्राप्त भारताला सहन होणें शक्य नव्हतें आणि म्हणूनच औपनिवेशिक स्वातंत्र्यांत जें ब्रिटिशांचें साम्राज्यत्व होतें तें हळूंहळूं—धोरणानें परंतु नेटानें व भांडून झगडून नव्हे तर गोडीगुलाबीनें-प्रेमानें-परस्पर सहकार भावनेच्या तत्त्वाला अनुसरून आम्हीं पूर्ण स्वातंत्र्य मिळविलें तो दिन. १५ आगष्ट सारखाच सन १९५० चा २६ जानेवारी हा दिन. या दिवशीं भारत पूर्णपणें स्वतंत्र होऊन—ब्रिटिशांचें साम्राज्य दूर लोटून भारताच्या जनतेचें स्वराज्य निर्माण करता झाला. या दिनांची महत्ता आपल्या दसरा-दिवाळी-रामनवमी-कृष्णनवमी—दासनवमी-शिवजयंति किंवा गांधीजयंति या दिनांच्या एवढीच आहे—किंबहुना—कांकणभर जास्त म्हटलें तरी चालेल. आणि म्हणूनच या दिवशीं भारताचे आबालवृद्ध जनतेंत पूर्ण आनंद अपूर्व उत्साह व नवचैतन्य उसळलें पाहिजे. पारतंत्र्याच्या शृंखलेमुळें आम्हीं तंद्रित व लुळे झालों होतों ते आतां जागृत, पुरोगामी व प्रगतिशील झालों आहोंत. हीच परंपरा उत्तरोत्तर वृद्धिंगत करणें हें आज आपलें आद्यकर्तव्य होय. या सर्व गोष्टींची पूर्ण जाणीव मनांत बाळगून आतां आपणास वागलें पाहिजे.

राष्ट्रपिता महात्मा गांधींनीं सत्य व अहिंसा या दोन तत्त्वांवर पूर्ण भर देऊन व नीतिमत्तेच्या बळावर स्वातंत्र्य मिळवून भारतास उद्योग-दीर्घोद्योग करावयासही सांगून ठेविलें आहे. यालाच **सर्वोदय** ही संज्ञा दिली गेली आहे. परंतु केवळ सत्य व अहिंसेची कास धरून जागच्या जागीं बसून हा सर्वोदय साध्य होणें शक्य नाहीं. सर्वोदयाकरतां परिश्रमाची आवश्यकता आहे आणि आजच्य जगांत परिश्रम म्हणजे "देव", परिश्रम म्हणजेच 'प्रगति' व परिश्रम म्हणजेच "सर्वोदय" हें तत्त्व कायम झालें आहे. कविसम्राट श्री रवींद्रनाथ टागोर यांनी आपल्या एका कवितेंत भक्ताला उद्देशून असें विधान करून ठेवलें आहे कीं-बाबारे, आज तुला देवदर्शन घ्यावयाचें असेल तर मंदिरांत तें घडणार नाहीं. त्याचें दर्शन आतां तुला शेतांत काबाडकष्ट करून अन्नोत्पादन करणाऱ्याच्या सान्निध्यांत, किंवा सडकेवर खडी फोडून मोल-मजुरी करणारांच्या अथवा कारखान्यांत सतत श्रम करणारांच्या सान्निध्यांत घडेल. तात्पर्य हें कीं, परिश्रमाची महति देवाइतकीच आहे.

पाश्चात्य देशांनीं अविरत परिश्रम करूनच स्वतःला प्रगतीच्या शिखरावर चढविलें आहे. केवळ त्यांचें अंधानुकरण करून आपणांस प्रगतीचें—फक्त भौतिक—प्रगतीचें शिखर गांठावयाचें नाहीं, तर आपणास आपल्या भारताची आध्यात्मिक—नैतिक व सामाजिक परंपरा कायम ठेवावयाची आहे, हें विसरतां कामां नये. आध्यात्मिकत्व—सत्य—अहिंसा व प्राणिमात्राकरतां जागृत भूतदया हीं सर्व भारतीय संस्कृतीचीं मूलतत्वें आहेत. केवळ भौतिक प्रगति करून हीं तत्वें वगळलीं तर जगांत कोठेंच खरी शांति व समाधान नांदणें शक्य नाहीं. याचें मूर्तिमंत प्रतीक म्हणून पाश्चात्य देशांचें उदाहरण देतां येईल. भारताला खरा सर्वोदय करावयाचा आहे व तोहि सर्व श्रेष्ठ तत्वें—नीतिमत्ता—मानवता व आपली थोर परंपरा कायम ठेवूनच करावयाचा आहे. परमेश्वर कृपेनें या मानवकल्याणाचे कार्यात आम्हांस पूर्ण यश प्राप्त होवो, ही त्या प्रभूला प्रार्थना आहे.

उपर्युक्त ध्येयानेंच आज भारतांत सर्व ठिकाणीं समाजाचें सर्वांगीण कल्याण साधण्याकरतां—'सामाजिक कल्याण केन्द्रें' स्थापण्यांत आलीं आहेत व त्यांपासून सर्वसाधारण व्यक्तीस लाभ होत आहे. अशाच एका कल्याण केंद्राचें नांव "परिश्रमालय" आहे. हें केंद्र खार (मुंबई) स्टेशनजवळ—रेल्वेलाइनीच्या पलीकडे पूर्व दिशेला आहे. मूळचें खार सुबक घरादारांनीं संपन्न तर हें पूर्वेकडचें खार दारिद्र्याचें माहेरघर होतें. या ठिकाणाला सर्वसंपन्न करावयाच्या हेतूनेंच परिश्रमालयाची स्थापना झाली आहे. त्याचा इतिहास कुतूहलपूर्ण आहे, हें कदाचित् सर्वांना अवगत नसेल. या ठिकाणाचें नांव चांभारवाडी असें होतें. तेथील सामान्य जनतेची गणना हीनदीनांच्या श्रेणींत होत असे. आतां त्या ठिकाणाला "खेरवाडी" हें नांव प्राप्त झालें आहे. या खेरवाडींत आजच्या सुखसोयी, प्रगतिपर संस्था व सामाजिक कल्याणाच्या योजना परमपूज्य प्रथितयश भारतपुत्र श्री. बाळासाहेब खेर यांच्याच अविरत परिश्रमामुळें, हार्दिक कळकळीमुळें व लोकहित साधण्याच्या भावनेमुळेंच मूर्त स्वरूपाला आल्या आहेत.

ज्या मुलांमुलींच्या शाळेंत आज पांचशेंचेवर विद्यार्थी व विद्यार्थिनी आहेत ती शाळा १९३५ मध्यें केवळ १२ विद्यार्थी घेऊन सुरू झाली. तसेंच "लेदर इन्स्टिट्यूट" स्कूल कायम झालें व नंतर १९३८मध्यें तें सरकारस्वाधीन करण्यांत आलें. सन १९३३ सालीं जो छोटेखानी दवाखाना शाळेंतच होता तो १९३८ सालीं स्वतःचे इमारतींत चालू झाला, व २४ वर्षें लोकसेवा केल्यानंतर-सन १९५५ मध्यें तो मुंबई-म्युनिसिपल कार्पोरेशनचे स्वाधीन करण्यांत आला असून लोकसेवा करीत आहे. नवीन सडकांची निर्मिति झाली. पोस्ट आलें वगैरे वगैरे. यानंतर १९५५ मध्यें परिश्रमालयाची स्थापना झाली. आणि जणूं काय हजारों दीनदुबळ्यांच्या पोटापाण्याची तरतूद कायम झाली. आज परिश्रमालय प्रगतिपथावर अग्रेसर होऊन लोककल्याण करतां कळकळीनें झटत आहे.

लेखकाला त्याच्या एका व्यापारी मित्रानें नुकतेंच एकदां विचारलें कीं कल्याण-केंद्र-म्हणजे आहे तरी काय? तेथें सामाजिक कल्याण

करण्याच्या हेतूनें सर्वांना फुकट जेवणखाण–कपडालत्ता–पैसाअडका पुरविण्याची व्यवस्था आहे कीं काय ? याचें उत्तर 'होय' म्हणूनच दिलें गेलें व त्याला "अट" एकच हेंही सांगितलें गेलें. ती अशी कीं या सर्व वस्तूंची तरतूद ऐदीपणानें किंवा स्वस्थ बसून लावून घेतां येत नाहीं. त्याचें असें कीं, आपल्यासारखे व्यापारी व इतर व्यवसायकर्ते आमच्या खिशांतील पैपैका काढून घेतात तर सामाजिक कल्याण केंद्रें कार्यकर्त्यांचे खिशांत लोकोपकारी व उपयुक्तवस्तूंची— त्याचेचकडून निर्मिति करून घेऊन त्यांचे खिशांत पैसे घालतात. या मोबदल्याचें जास्त कमी प्रमाण--ज्याच्या त्याच्या कर्तबगारीवर अवलंबून असतें एवढेंच.

या ध्येयाला धरून "परिश्रमालय" विविध कार्यें करून लोकांचे सुखासमाधानाकडे लक्ष पुरवीत आहे. लोकरीचें व सुताचें विणकाम-- साबू तयार करणें–बुकबाइंडिंग--फाइल्स व इतर उपयुक्त जिन्नस परिश्रमालयांतच तयार करवून त्यांचा मोबदला कार्यकर्त्यांस देण्यांत येतो. यामुळे हळूंहळूं बेकारीचा प्रश्न सोडविण्यास कशी व किती मदत होत आहे याची कल्पना वाचकांस करतां येईल.

दिनांक १२ एप्रिल १९५६ रोजीं परिश्रमालयाचे आवारांत "उर्णागृहाचें"—म्हणजे लोकरीच्या सूत व विणकामाचें केंद्राचे उद्घाटन माननीय डॉक्टर जॉन मथाई—उपकुलगुरु, मुंबई विश्व-विद्यालय, यांचे हस्तें झालें. या ऊर्णागृहांत हातमाग ठेविले असून त्यावर लोकरीचें सूत काढणारीं व विणकाम करणारीं मुलें–मुलीं शिष्य-वृत्या घेऊन काम करीत आहेत. या शाळेकरतां सरकारतर्फे एक शिक्षक आहे. शिवाय मूलोद्योगशाखेचे सरकारी सुपरवायजर—वेळोवेळीं शाळेंत येऊन निरीक्षग व मार्गदर्शन करीत असतात.

जुलै १९५६ च्या पहिल्या आठवड्यांत 'अंबरचरखा' शिक्षण वर्ग कायम करण्यांत आला असून त्यावर सूत काढण्याचें काम शिकविलें जात आहे. अंबर चरखा हातमागाचे व्यवसायांत क्रांति घडवून आणील ही अपेक्षा बाळगण्यास कांहींच अडचण नाहीं.

केवळ आर्थिकदृष्टयाच व्यवसायांची सोय परिश्रमालयांत केलेली आहे असें म्हणणें वास्तविकतेला धरून होणार नाहीं. कारण नैतिक प्रगतीकडे देखील लक्ष पुरविलें जात आहे.

दर रविवारीं सकाळीं ८॥ ते १२–१२॥ पर्यंत नैतिक उन्नति व विकास करण्याच्या हेतूनें तेथें सामूहिक प्रार्थना होते. तदनंतर ख्यातनाम वक्ते भारतांतील व इतर देशांतील संतांच्या जीवनाचा व कार्यांचा परिचय करून देऊन प्रथितयश व लोककल्याणाकरतां ज्यांनीं आपलें जीवन अर्पण केलें अशा थोर व्यक्तींच्या जीवनकार्यांचेंहि विवेचन करतात व त्यांचा संदेश सांगितला जातो. या योगानें जनसमुदायाचे मनांत सात्विक व लोककल्याणकारी भावांचा उदय होऊन क्रमानें तो सद्भाव वाढीस लागतो व हृदय सत्यप्रिय–व्यव-सायशील व अहिंसात्मक भावनापूर्ण बनत जातें. हें कार्य कांही साधारण नव्हे. जसा समाज हा देशाचा घटक तसेंच व्यक्ति ही समाजाची घटक आहे. व्यक्तीच्या प्रगतींत शुद्ध आणि उच्च लोक–कल्याणकारी भावनांचे उत्पादन व त्यांच्या परिपोषणांत खरें कल्याण असून त्यानेंच सर्वोदय साधतां येईल. अशा संस्थांची उत्तरोत्तर वृद्धि व प्रगति होवो व जास्तींत लोकांचे जीवन हर प्रकारें उच्च व उन्नत होवो ही प्रार्थना !

## "धर्मचक्रा" च्या "बुद्धजयन्ती विशेषांका"वरील कांहीं मतप्रदर्शन

**१ : नवभारत टाइम्स–मुंबई,** १७ जून १९५६.

"इस विशेषांक में हिन्दी, अंग्रेजी तथा मराठी मे महात्माबुद्ध तथा बौद्धधर्मके सम्बन्ध मे कुछ लेख प्रकाशित किये गये है। लेखोंका चुनाव बौद्धधर्म तथा दर्शन के व्यावहारिक पहलुओं को दृष्टिगत रखते हुए किया गया है। एक जापानी बौद्ध भिक्षुके लेख मे जापान मे बौद्धधर्म के प्रभावका विवरण सुंदर ढंग से दिया गया है"।

**२ : सकाळ–पुणें,** १७ जून १९५६

"'धर्मचक्र' मासिकानें २५०० व्या बुद्धजयन्ती निमित्त हा विशे-षांक काढला असून, त्याच्या इंग्रजी विभागांत प्रो. सी. व्ही. जोशी यांचा बुद्धाच्या शिकवणीसंबंधी लेख, मराठी विभागांत 'सुविख्यात बौद्ध रमणी' आणि हिंदी विभागांत 'बुद्ध से शान्त स्वरोकी पश्चिम मे प्रतिध्वनि' व 'क्या महात्मा बुद्ध नास्तिक थे ?' इत्यादि लेख वाचनीय आहेत."

**३ : गर्जना—कोल्हापूर,** २२–६–१९५६

भगवान बुद्धाची शिकवण व महात्माजींचें जीवनविषयक तत्व-ज्ञान यांचा प्रचार करून धर्मकार्य करणाऱ्या या मासिकाचा हा सर्वांगसुंदर मोठा ८० पानी विशेषांक पाहून सर्व सात्विक वृत्तीच्या वाचकाना अतिशय आनंद होईल. जागतिक युध्द उत्पन्न होण्याची भीति हळूहळू नष्ट होत चालली असून बुध्दाच्या शांतिप्रधान संदे-शाचा प्रचार आंतरराष्ट्रीय राजकारणांत आपल्या पंतप्रधान नेहरूजींनी पुष्कळच यशस्वीपणे चालविला आहे. मात्र त्यामानाने पंडितजीना खुद्द घरातील, भारतीय संघराज्यातील भांडणे नि अत्याचार थांब-विण्यात अद्याप अपेशच आलेले दिसते ! अशावेळी २५०० व्या बुद्धजयंतीचा महोत्सव सरकारी उत्तेजनाने सर्व देशभर साजरा कर-ण्यात आला व बुद्धाची शिकवण मोठ्या भक्तिभावाने इंग्रजी, मराठी व हिंदी भाषेत घरोघरीं पोचविण्याचे धर्मकार्य धर्मचक्र मासिकाने या विशेषांकाचे द्वारे केले आहे ही मोठी समाधानाची गोष्ट आहे. अंकातील सर्वच लेख वाचनीय व उद्बोधक असून अंक खरोख-रीच संग्राह्य झाला आहे. मौज मुद्रणालयाची सुबक छपाई व दलाल चित्राची सजावट यानी या विशेषांकाची आकर्षकता वाढविली आहे.

**४ : प्रतिष्ठान : मराठवाडा—जुलै १९५६ :**

"महात्मा गौतमबुद्धाच्या २५०० व्या जयन्तीनिमित्त धर्मचक्राचा प्रस्तुतचा अंक इंग्रजी, मराठी आणि हिन्दी अशा तीन भाषांतून प्रस्तुतच्या अंकाचें संपादन करण्यांत आलेलें आहे. मुखपृष्ठावर चिनी (?) पद्धतीचें गौतमबुद्धाचें रंगीत चित्र सुंदर आहे. बुद्धाचें तत्वज्ञान—आणि जीवन चरित्र यावर प्रकाश टाकणारे अनेक विद्वानांचे माहितीपूर्ण लेख यांत आलेले आहेत. जगाला शांतीचा संदेश देणाऱ्यांत गौतबुद्धाचें नांव अमर झालेलें आहे. भारतीय परंपरेची ही महान् स्मृति अन्तःकरणाला जागी ठेवूनच बुद्धाचें विविधांगी दर्शन घडविण्याचा यांत केवढा प्रयत्न स्तुत्य आहे. संपादक या दीर्घ परिश्रमाबद्दल धन्यवादास पात्र आहेत."

(हिमांशु)

the conscience of an individual is genuinely involved. It is a right to be invoked only under the strongest moral compulsion and only by persons qualified to do so. The exercise of this contingent right to disobey cannot be regarded as an every day occurrence or as a general licence for the common man for the flouting of the law of the land on flimsy pretexts. It is also subject to certain conditions and limitations. No one has written and spoken more about the ethics, method, justification and limitations of the duty or right to disobey the laws of a State, in modern times than Mahatma Gandhi. Such disobedience can either be individual or by the mass. In either case, the first condition the Mahatma insisted upon was the purity of both end and means. Now we all know that Gandhiji described truth as his God and non-violence as inseparable from it. In a manifesto issued on the 10th March 1920, he described non-violent non-cooperation which is a prior stage to actual civil disobedience:

"Now a word as to what may be done if the demands are not granted. The barbarous method is warfare, open or secret. This must be ruled out, if only because it is impracticable. If I could but persuade every one that it is always bad, we should gain all lawful ends much quicker. The power that an individual or a nation for swearing violence can generate is a power that is irresistible. But my argument today against violence is based upon pure expediency, its utter futility. Non-cooperation is, therefore, the only remedy left open to us. It is the clearest remedy, as it is the most effective, when it is absolutely free from all violence. It becomes a duty when co-operation means degradation or humiliation, or an injury to one's cherished religious sentiment."

Referring to his methods of opposing the will of Government, he said in April 1920 "I believe that it is possible to introduce uncompromising truth and honesty in the political life of the country. ......I would strain every nerve to make truth and non-violence accepted in all our national activities. Then we shall cease to fear or distrust Government and their measures." He coined the word **Satyagraha** for his method. On 10th September 1935 he wrote "The statement that I had derived my idea of Civil Disobedience from the writings of Thoreau is wrong. The resistance to authority in South Africa was well advanced before I got the essay of Thoreau on Civil Disobedience. But the movement was then known as passive resistance. As it was incomplete I had coined the word Satyagraha for the Gujarati readers. When I saw the title on Thoreau's great essay, I began to use his phrase to explain our struggle to the English readers. But I found that even 'Civil Disobedience' failed to convey the full meaning of the struggle. I therefore adopted the phrase "Civil Resistance." So we see that in highly morally evolved persons—their number is, alas! very small—who have got rid of their own selfishness and maliciousness (both common and even inherent in humanity) by imposing rules of conduct upon themselves a feeling of obligation or duty is created to choose between several possible acts. It is this moral sense which made Socrates choose the duty to drink the hemlock.

**(To be Continued)**

Regd. No. B. 5434

World Religion Supplement

धर्मचक्र

वर्ष ९ वें] [अंक : ५ वा
१५ डिसेंबर १९५६

THE WHEEL OF THE MORAL LAW

(Vol. IX—5)
15th December 1956

## Gotama the Buddha
## गौतम बुद्ध—



[ विमल रॉय–प्रॉडक्शनच्या सौजन्यानें ]

**Pandit Nehru on the Buddha**

"The message of Lord Buddha gave me light in the midst of the present darkness and gloom". "My mind gets a little relief and confidence not from what is happening in the world, but from the message of the Buddha. I am convinced that the world can not find a new path for itself by war and violence, but by following the old path shown by the greatest path-finder of the world—Gautama Buddha."

(24th November 1956)

"या आजच्या काळोखांत व औदासिन्यांत भगवान् बुद्धाच्या संदेशानें मला प्रकाश दाखविला."

"आज जगांत जें कांहीं घडत आहे त्या **योगाने नव्हे** तर भगवान् बुद्धाच्या संदेशानें माझ्या मनाला जरा विसावा आणि आत्म-विश्वास मिळत आहे. माझी अशी खात्री आहे कीं, युद्ध व हिंसा यांच्या योगानें नवीन मार्ग सांपडणें शक्य नाहीं; पण जगांतील सर्वांत मोठे मार्गसंशोधक—गौतम बुद्ध—यांनीं दाखवून दिलेल्या मार्गानेंच गेल्यावर तो सांपडेल. "—पंडित जवाहरलाल नेहरू

(बुद्ध जयंति महोत्सवाचें वेळीं")

# धर्मचक्र

(The Wheel of the Moral Law)

[ बौद्ध शिकवण, जीवन व कला यांच्या विश्वसनीय दर्शनानें महात्माजींची मूलभूत शिक्षा सिद्ध करून दाखविणारें मराठींतील पहिलेंच मराठी–हिंदी सांस्कृतिक मासिक ]

दर महिन्याच्या १५ तारखेस प्रसिद्ध होतें.

मुख्य संपादक (मराठा व इंग्रजी विभाग), मुद्रक व प्रकाशक :

प्रा. ना. के. भागवत, एम्. ए., (मुंबई विश्वविद्यालय, पाली ग्रंथ प्रकाशन––सन्मान्य संपादक)
प्रो. शिवसहाय पाठक, एम्. ए., साहित्य रत्न, के. सी. कॉलेज : संपादक हिंदी विभाग

संपादक सल्लागार समिति :

श्री. मि. का. भोरटके, श्री. पु. ह. ऊर्फ काकासाहेब गद्रे, श्री. के. र. काशीकर

सन्मान्य कार्यकारी व्यवस्थापक :

श्री. नरहरि वामन रत्नपारखे, एम्. ए., एलएल्. बी.

वर्ष ९ वें ] १५ डिसेंबर, १९५६ [ अंक ५ वा

## अनुक्रमणिका

### मराठी विभाग



### हिंदी विभाग



**वर्गणीचे दर :**

१ : भारतांत पोस्टेजसह रु. ५-०-०
२ : महाभारतांत पोस्टेजसह रु. ७-०-०
३ : किरकोळ अंकास रु. ०-१२-०
बुद्धजयन्ती विशेषांक रु. १-१२-० (२४ मे १९५६चा)

**जाहिरातीचे दर :** (एकवेळचे)

अत्यन्त सवलतीचे आहेत.
कृपा करून पत्र पाठवून तपास करा.

**वर्गणीदारांस विज्ञप्ति :** (वर्गणींत वाढ)

**वि. सूचना :** धर्मचक्राचा आकार, पृष्ठसंख्या व अन्तर्बाह्य सुधारणा यासंबंधी हा अंक पाहूनच आमच्या वर्गणीदारांची खात्री पटेल. ह्या वाढत्या खर्चामुळें १५ ऑगस्ट १९५६ पासून वार्षिक वर्गणी रु. पांच केली आहे हें येथें कळवीत आहोंत. अर्थात् १५ ऑगस्ट १९५६ च्या पूर्वी झालेल्या वर्गणीदारांना ही वाढ १५ जुलै १९५७ पर्यंत लागू नाहीं, हें सांगणें नकोच ! धर्मचक्रावरील लोभ पूर्वीप्रमाणेंच आमच्या वाचकांनीं कायम ठेवावा, ही सविनय प्रार्थना !

—ना. के. भागवत

प्रकाशन स्थळ : धर्मचक्र कार्यालय, सुगतनिधान, १५ वा रस्ता, प्लॉट नं. ४६३, खार, मुंबई २१
मुद्रण-स्थळ : मौज प्रिंटिंग ब्यूरो, खटाववाडी, गिरगांव, मुंबई ४

World Religion Supplement

# धर्मचक्र

THE WHEEL OF THE MORAL LAW

वर्ष ९ वें ] १५ डिसेंबर १९५६ [ अंक ५ वा



बुद्धस्वर्गवासी डॉ.: बाबासाहेब आंबेडकर

अनिच्चानत संखारा !
सर्व संस्कृतगोष्टी अनित्य आहेत !

## भारतांतील एका महापुरुषाचें शोचनीय निर्याण !

लक्षावधि अस्पृश्य बंधुभगिनींना स्वतःबरोबरच बुद्धधर्मांत समाविष्ट करून अखिल भारतवर्ष बुद्धमय करण्याच्या प्रतिज्ञेनें **सर्वस्वावर लाथ मारून** आपल्या भीमगदेनें पाखंडावर प्रहार करणारा हा वज्रपुरुष गेल्याच महिन्यांत सर्व जगास आश्चर्याचे धक्के देत आहे, तोंच नियतीच्या क्रूर लीलेनें डॉ. साहेबांसारखा तेजस्वी तारा तुटून पडल्याची दुःखद वार्ता कळविण्याचें दुर्दैव आमच्या वाट्याला आलें आहे ! बौद्धजयंतीच्या सुमुहूर्तावर नागपूर येथें बौद्धधर्माचा आपल्या हजारों अनुयायांसह स्वीकार करून डॉ. साहेबांनीं सुरू केलेल्या क्रांतिवर्षाचें अभिनंदन करणारा "**धर्मचक्रानें काढलेला ऑक्टोबर अंक**" वाचकांचें अंतःकरण भारून नि भरून टाकीत आहे, तोंच हा वज्राघात व्हावाना ? डॉ. साहेबाचें चरित्र व त्यांच्या कार्याचें मूल्यमापन करणारा लेख पुढील अंकीं देणार आहोंत. आज "धर्मपदा"तील हा श्लोक उद्धृत केल्याविना राहवत नाहीं !

यथा सङ्कारठानस्मिं उज्झितस्मिं महापथे
पदुमं तत्थ जायेथ सुचिगन्धं मनोरमं।
एवं सङ्कारभूतेसु अन्धीभूते पुथुज्जने
अतिरोचति पञ्ञाय सम्मासम्बुद्धसावको ॥

**ज्याप्रमाणें** एखाद्या मोठ्या रहदारीच्या रस्त्याच्या बाजूला सांठविलेला उकिरडा असावा; पण पवित्र सुवास पसरणारें व अत्यन्त मनोहर असें पद्म (कमळ) तेथें उत्पन्न व्हावें; त्याप्रमाणें या संस्कारमय व अंधळ्या झालेल्या बहुजनसमाजांत सम्यक-संबुद्धाचा श्रावक (शिष्य) आपल्या प्रज्ञेनें तळपत राहिला आहे !

# संपादकीय

रेल्वेवरील अपघात मोठ्या प्रमाणावर असे पूर्वीं झाल्याचें ऐकिवांत नाहीं. पण अरियालूर रेल्वेअपघात हा अलीकडील तिसरा भीषण अपघात होय. मद्रास–तुतिकोरिन एक्सप्रेस ही गुरुवार तारीख २२ नोव्हेंबर रोजीं मद्रास येथून रात्रौं निघाली व मद्रासहून १७० मैलावर शुक्रवारीं पहाटे ५–२० वाजतां पुलावर पुरावरील अपघातांत सांपडून खालीं नदींत पडली! त्या भागांत भयंकर पाऊस दोन दिवस पडल्यामुळें या नदीस महापूर आला व पुलाच्या कमानीवरून गाडी घसरली व एंजिन व त्यामागील ७ डबे खालीं कोसळले! या अपघातांत १४७ उतारू मरण पावले व ६९ जखमी होऊन त्रिचनापल्ली रुग्णालयांत आहेत. दोन वर्षांपूर्वीं हैद्राबाद राज्यांतील वासंती नदींत एक गाडी पडली तर याच वर्षीं मेहेबूबनगर येथेंहि अशीच भीषण घटना घडून १२१ जण प्राणास मुकले. अशा रीतीनें उतारूंचे जीव जर धोक्यांत येऊन त्यांना प्राणास मुकावें लागले, तर रेल्वेचा प्रवास लोकांना सुखदायक होऊन त्यांना सुरक्षितता कशी वाटावी! रेल्वेरस्ता सुरक्षित आहे कीं नाहीं हें पहाण्याकरितां रस्ता पाहणारे अधिकारी नेमले असून रस्ता सुरक्षित आहे कीं नाहीं, हें पाहणें त्यांचें काम होतें. मुख्यतः पाऊस पडल्यावर सामान्य ओढ्यांना सुद्धां पाणी येते तर मोठ्या नद्यांची गोष्ट काय सांगावी? अशावेळीं पुलाची पाहणी करून पुलावर गाडी जाऊं देणें सुरक्षित आहे कीं नाहीं हें पाहण्याचें काम एंजिनिअरिंग खात्याचे आहे. रेल्वेबोर्ड व केन्द्रिय सरकारचे मंत्री श्री लालबहादुर शास्त्री यांचेवर जरी शेवटची जबाबदारी पडत असली तरी मुख्य जबाबदारी स्थानिक अधिकाऱ्यांवरच पडली पाहिजे. त्यांची चौकशी होऊन त्यांना योग्य तें शासन झालें पाहिजे. बोर्डांतील लोकांना फुकट रेल्वेचा पास मिळतो. त्याचा उपयोग त्यांनीं निरनिराळ्या ठिकाणीं जाऊन अधिकाऱ्याच्या कामावर हेरेगिरी केली पाहिजे. मुख्यतः, महेबूबनगरजवळील अपघात झाल्यानंतर तर या बोर्डाच्या सभासदांनीं जास्त जागरूक असावयास पाहिजे होते. या बोर्डांत तरुण कार्यकर्त्यांचा व लोकशाहीवृत्तीचे सभासद असल्याविना त्यांच्या हातून कांहींच भरीव कामाची अपेक्षा करूं नये, असें वाटण्याची वेळ आली आहे. श्री. लालबहादूर शास्त्री यांना जी अन्तःकरणाची टोचणी लागली त्याचें पर्यवसान त्यांच्या राजीनाम्यांत व्हावें, यावरून त्यांना नैतिक मूल्यांची जाणीव तीव्रतेनें आहे, असें वाटतें. म्हणूनच त्यांचें आम्ही अभिनंदन करतों. मन्त्री हा जनतेला जबाबदार असतो. जनतेच्या अनहिताची गोष्ट झाली तर त्याला असा मन्त्री पर्यायानें जबाबदार ठरतो. ही पद्धत लोकशाही राज्यांत सर्वत्र आढळते. ते दुर्दैवी प्रवासी व त्यांचे मागें राहिलेले नातलग व मित्रमंडळी यांच्याबद्दल सर्वांना हळहळ वाटल्याशिवाय राहणार नाहीं. आतां तरी रेल्वेचे अधिकारी जास्त जबाबदारीची जाणीव दाखवितील व बेफिकिरी किंवा अहंगंडाची जाणीव दूर करून पुन्हा अशा अपघातांची पुनरावृत्ति होणार नाहीं अशाबद्दल काळजी घेतील, अशी आशा आहे. दुःखितांवर कोसळलेल्या अनर्थांत आम्ही सहभागी आहोंत!

♡ ♡ ♡

मागील महिन्याच्या १४ नोवेंबर रोजीं पन्तप्रधान पंडित जवाहरलाल नेहरू यांनीं ६८ व्या वर्षांत पदार्पण केलें, याबद्दल आम्हीं त्यांचें सादर अभिनंदन करतो! या वयांत पदार्पण केलेली व्यक्ति पंडितजी सारखें कार्य क्वचितच करूं शकते! 'आपला वाढदिवस साजरा करूं नका; कारण आंतरराष्ट्रीय परिस्थिति फार गंभीर व आणीबाणीची आहे' असा आदेश देऊनसुद्धां भारतांत सर्वत्र लोकांनीं तो साजरा केला; एवढेंच नव्हे, तर जगांतील संख्यातीत लोकांनी त्यांना अभिवादन केलें व दीर्घायुष्य चिंतिलें. आज भारतास जगांत जर कांहीं किंमत असेल तर पंडितजींच्या आंतरराष्ट्रीय राजकीय धोरणामुळेंच आहे. जगांत युद्ध सुरू होऊं नये, शांतता नांदावी व पंचशील व सहजीवन या तत्त्वांवर जगताचा राजकीय व्यवहार चालावा, यासंबंधीं त्यांची अविरत धडपड सुरू आहे. त्यांची योग्यता प्रथम 'भारतीय स्वातंत्र्ययुद्धांतील एक निर्भय वीर' म्हणून तर आहेच, पण त्याशिवाय त्यांचें तत्त्वज्ञान, जगाशीं झालेली त्याची मैत्री मुत्सद्देगिरी, लोकप्रियता, लहानमुलांविषयींची आवड व भारताविषयीं त्यांनीं भविष्यकाळचें ठरविलेलें ध्येय या योगांनीं त्यांनीं भारताला आपलेसें केलें आहे. त्यांचे राजकारणांतील वैरीसुद्धां त्यांच्यावर प्रेम करतात. त्यांचा स्वार्थत्याग फार मोठा आहे पाश्चात्य राष्ट्रांनीं त्यांच्याविषयीं जी पूज्यबुद्धि दाखविली आहे, त्याला कारण त्यांची निरपेक्षता व ध्येयप्रियता! इंग्लंड, फ्रान्स, रशिया, अमेरिकासारखीं वारांगनेसारखीं अनेक रूपें दाखवून राजनीति खेळण्यांत पटाईत झालेल्या राष्ट्रांनीसुद्धां प्रथम त्यांची चेष्टा केली. 'अव्यवहारी राजकारणी पुरुष' म्हणून पंडितजींनीं त्यांचेवर टीका केली. पण लोकांच्या, रागाची किंवा भीडमुरवतीची तमा न बाळगतां, आपलें परराष्ट्रीय धोरण कायम ठेवलें; व त्यासाठीं जगांतील सर्व देशभर त्यांनीं मोठमोठे दौरे काढले. फार काय, मुसलमान राजांचा लोभ व विश्वास संपादन करून जगांतील श्री. नेहरू हे शान्तिदूत आहेत अशी प्रशंसा त्यांचेकडून मिळविली. जगाला व भारताला ते एक नवीन प्रकारची शिकवण देत आहेत. शांतता, समता, बंधुभाव सर्वत्र नांदत असावा कारण एका देशानें दुसऱ्यावर राज्य करावें किंवा एका लोकांनीं दुसऱ्या लोकांवर राज्य करून उच्च नीच भाव उत्पन्न करावा, ही गोष्ट सर्वस्वी त्याज्य आहे, असें त्यांचें मत आहे. आपल्या भारताचें तर पंडित नेहरू हें नाक आहे. भाषिक दंगलीच्या वेळींहि आपलें डोकें शांत ठेऊन त्यांनीं त्यांतून मार्ग काढून भाषावार प्रान्तरचनेनुसार राज्यें निर्माण करून त्यांना सुरुवातहि केली, हा त्यांचा फार मोठा विजय आहे. तरुणपिढीनें त्यांना सन्मान दाखवून त्यांच्या मार्गानें आक्रमण केल्यास खात्रीनें भारताचें भविष्य उज्ज्वल झाल्याविना राहणार नाहीं. तरुण विद्यार्थी संकुचित ध्येयानें प्रेरित होऊन राष्ट्राची फसगत कशी करूं शकतात, त्याचें उत्तम उदाहरण अहमदाबाद व गुजराथ येथें दिसून आले आहेच! पंचवार्षिक योजना उत्तमरीतीनें जारी करून त्यांनीं परदेशस्थ राजकारणी व अर्थशास्त्रज्ञ पुढाऱ्यांचेहि धन्यवाद मिळविले आहेत. भगवान् बुद्धाचें तत्त्वज्ञान त्यांना फार आवडतें व आजच्या जगांत, जेव्हां राष्ट्रें एकमेकांवर आक्रमण करून हिंसेच्या मार्गानें जाण्याच्या तयारींत आहेत, तेव्हां अशा वेळीं—बुद्धाचा म्हणजे

महात्माजींचाहि—सत्य व अहिंसेचा मार्ग हाच एक जगाला ध्रुव-तारा होय, अशी त्यांची निष्ठा व श्रद्धा आहे. नुकनेच भारतांत प्रवास करून गेलेले एथियोपियाचे सम्राट किंवा भारतांत प्रवास करीत असलेले चिनी पन्त प्रधान चौ-एन-लाई यांनींहि पचशीलाशीं आपलें सहमत व्यक्त केलें आहे. अर्थात् पंडितजींची राजकारणांतील निष्ठा भारतीय संस्कृतीच्या मूळच्या उद्देशानुरूप असल्यामुळें, भारतच आज जगास राजकारणांतील धडे देत आहे, असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं व या कामीं महात्माजींचा हा सच्चा शिष्य जगाला गांधीजींची शिकवण देऊन आजच्या राजकीय अंधकारांतून गोंधळांतून व अनवस्थितपणांतून त्यास प्रकाशांत घेऊन जाईल, असा रंग दिसतो. भारताच्या या सुपुत्राचें पुढील आयुष्य सुख, आरोग्य व कीर्ति यांच्या प्राप्तींत जाऊन त्यांची योग्यता सर्वांना पटून अहिंसेचा हा भारतीय पुजारी जगताच्या मंदिरांत 'शान्तीची प्रतिष्ठापना करणारा ध्येयप्रधान व एकनिष्ठ पुजारी' असें त्यांचें नांव होवो, असें आम्ही इच्छितों! पंडितजी शतायु होवोंत हीच आमची प्रार्थना!

♡ ♡ ♡

पंडित सातवळेकर यांचा भारतीय संस्कृतीचा अभिमान, त्यांची शब्दाचे अर्थ लावण्याची पद्धति, धर्माचें तत्त्व, 'जें गुहेंत दडून बसलेले आहे,' त्यास बाहेर काढून जगापुढें ठेवण्याची त्याची अविरत खटपट, याबद्दल दुमत होण्याचें कारण नाहीं. भारत आज स्वतंत्र झाला असल्यामुळें, भारतीय नावें सर्वत्र सुरू करून, परकीय नांवें काढून टाकून त्याऐवजीं भारताचें स्वामित्व दाखविणारीं नांवें आता अवश्य दिलीं पाहिजेत. भारताचा गतेतिहास जसजसा हळूहळू उजेडांत येत आहे व भारताच्या गतकालीन जीवनावर जसजसा उज्ज्वल प्रकाश पडत आहे, तसतशी भारतीय जीवनाची सर्वांगपरिपूर्णता जगाच्या प्रत्ययास येत चालली आहे. अशावेळीं 'जुने तेंच कायम ठेवा' असा अट्टाहास करण्यांत काय हंशील आहे? पंडितजींचें एकच म्हणणें येथें उद्धृत करितों. ते म्हणतात "भारताच्या पूर्व, पश्चिम आणि दक्षिण दिशांना समुद्र आहे व तो जवळ जवळ अडीच हजार मैल पसरला आहे, बंगालच्या समुद्राला 'बंगालचा उपसागर' असें नांव आहे. पण पश्चिम समुद्राला '**अरबी समुद्र**' म्हणण्यांत येते. वस्तुतः तो "अरबी समुद्र" नसून "भारतीय समुद्र" असल्यानें त्याचें नांव "भारतीय समुद्र" असलें पाहिजे." ह्या ठिकाणीं जी विचारसरणी पुढें करण्यांत आलेली आहे, ती सर्वथैव उचित आहे. आपल्या तरुण पिढीस किंवा शाळांतील विद्यार्थी–विद्यार्थिनींच्यापुढें आपला गौरव व मोठेपणा हा आणलाच पाहिजे. त्यांत कोणालाहि कमी लेखण्याचा किंवा कोणाचा पाणउतारा करण्याचा प्रश्नच उरत नाहीं. स्वातंत्र्य प्राप्तीनंतर असल्या गोष्टी प्रवाहपतितच होत. आमचा 'धर्म' "**हिंदू धर्म**" म्हणून जो ज्ञात आहे तो सार्थ नाहीं. 'हिंदूधर्म' हें नांवहि आमच्या वेदांत, ब्राह्मण ग्रंथांत, उपनिषदांत धर्मसूत्रांत, महाभारत व रामायण इत्यादि इतिहास ग्रंथांत नसतांना, आमच्या गत राज्यकर्त्यांनीं आम्हास 'हिंदू' म्हणून निंदावाचक नांव दिलें व आमचा धर्म, विस्तृत, व्यापक व सर्वसंग्राहक असतांना, त्याला 'हिंदूधर्म' असे एक भौगोलिक नांव देऊन आपल्या विस्तृत व व्यापक धर्माची जी कुचंबणा चालविली आहे, ती नाहींशी करून "हिंदूधर्म—हें नांव जें आम्हास आमच्या राज्यकर्त्यांनीं दिलें आहे"—तें बदलण्याची आता वेळ आली आहे. ज्या आमच्या संस्कृतींतून बुद्ध व महावीर यांच्यासारखे धर्मगुरु निर्माण होऊन विश्वांत त्यानीं संचार केला त्यास 'हिंदू' म्हणणे म्हणजे महासमुद्र मातीच्या बोळक्यांत सामावण्याचा अट्टाहास करण्यासारखें आहे! "नावांत काय आहे" हें खोटें आहे! नांवांत सर्व आहे. नावांत माणुसकी भरली आहे. नांवांत अखिल विश्वाचें जीवन सामावलेलें आहे. म्हणून पंडितजींच्यावरील सूचनेस मान्यता देतांना त्यांनीं याहि सूचनेचा विचार करून "हिंदूधर्म" हें नांव बदलून सर्वव्यापक व मूळ संस्कृतीच्या गाभ्यास उपकारक असें नांव शोधून काढलें. सर्वांनीं तो आपला धर्म म्हणुन उद्घोषित करावा! धर्मश्रेष्ठ या सूचनेचा विचार करतील काय? पंडितजींच्या सूचनेस आमचा पूर्ण पाठिंबा आहे.

♡ ♡ ♡

आपल्या भारतांत चीनचे पन्तप्रधान चौ-एन-लाइ यांचें दिल्ली येथें आगमन ही या महिन्यातील महत्वाची घटना होय. तें २८ नोव्हेंबरला दिल्ली येथे विमानतळावर उतरले तेव्हां लोकांनीं त्याचें प्रचंड स्वागत केले! हजारो प्रेक्षकांनीं त्यांचेवर फुलें उधळलीं! चौ-एन्-लॉई हे इ. स. १९५४ मध्यें आलें होतें; पण त्यानंतर भारत व चीन यांचें संबंध घनिष्ठच झालें! निरनिराळीं शिष्टमंडळें भारतांतून चिनांत व चिनांतून भारतांत येऊन सांस्कृतिक व शैक्षणिक देवाण घेवाण बरीच झाली. त्यामुळें या खेपेस चिनी पंतप्रधान आम्हांला परकी वाटले नाहींत किंवा त्यांनाहि भारतांत परकेपणा वाटला नाहीं. त्यांच्या स्वागताकरिता उभारलेल्या हवाई अड्डयावरील मंडपांत भाषण करतांना ते म्हणाले कीं, 'पंचशीलावरील माझी श्रद्धा मी पुन्हां मान्य करतों व भारत व चीन या देशांच्या संघटित प्रयत्नानें आशियाखंड व जग यामधील शान्तीचें ध्येय प्राप्त होण्यासाठीं सहप्रयत्न करण्यास आपण तयार आहों.' नंतर त्यांनीं पत्रकारांस मुलाखत दिली. नतर मेजवान्या, सरकार भेटी, पार्लमेंटला भेट वगैरे कार्यक्रम आखलेले होतेच. पण त्या सर्वांनहि दोन्ही पंतप्रधानांचीं बोलणीं करण्यास वेळ राखून ठेवला होताच! त्यांचें हसतमुख, विशाल भालप्रदेश, जाड भुवया, सर्वांच्या मनांत आदर उत्पन्न करण्याइतकें व्यक्तिमत्व यामुळें ते सर्वांनाच हवेहवेसे वाटतात. त्यांच्या लहानपणीच्या आधुनिक पद्धतीच्या शिक्षणानें त्यांच्या जीवनाचा विकास होण्यास मदत झाली. त्यांचें सारें शिक्षण शिष्यवृत्ती वरच झालें. त्यांच्या आंगीं अभिनयकलाहि पूर्णपणें वास करीत आहे. त्यांची प्रवृत्ति प्रथमपासूनच साम्यवादाकडे झुकलेली होती व त्यांना त्यासाठीं निरनिराळ्या दिव्यांतून जावे लागले. त्यांचा यूरोपचा प्रवास, मास्कोच्या भेटी, "अवेकन क्लब"ची स्थापना व त्यांतील कार्य, असामान्य संघटना चातुर्य वगैरे गोष्टी त्यांचें जीवनाच्या अभ्यासावरून स्पष्ट होतात. चाऊ व माऊ यांचें मीलन चीनच्या सर्वांगीण हिताला व उन्नतीला कारणीभूत झालें. पंडितजींच्या मनांत चीनबद्दल पहिल्यापासून च आदर आहे. या सर्व पार्श्वभूमीवर त्यांची भारताला यावेळची भेट अपूर्व नवलाईची गोष्ट म्हणून वाटली. दिल्लीहून त्यांनीं पुण्याला भेट दिली. १ डिसेंबरला तें पुण्यास लोहगावच्या तळावर उतरले. पुणें नगरपालिकेमार्फत त्यांचा सत्कार आणि नॅशनल डिफेन्स ॲकॅडमीमध्ये पासिंगपरेड हे मुख्य कार्यक्रम त्यांच्या सन्मानार्थ

आखलेले होते. त्यांत कॉर्पोरेशनच्या सत्काराला उत्तर देतांना त्यांनीं म्हटलें :—

"भारत आणि चीन यांच्या दरम्यान आन्तरराष्ट्रीय प्रश्नावर सहकार्याची भूमिका राहिली पाहिजे आणि या दोन्ही देशांनीं पंचशील तत्वांचा जास्तीत जास्त देशांत प्रसार करावा". पासिंग परेडचे वेळी भाषण संपवितांना "भारतीय सेना चिरायू होवो!" "भारत व चीनचें सहकार्य चिरायू लाभो" "हिंदी चिनी भाई भाई" अशा त्यांनीं घोषणा केल्या. पिंपरी येथील पेनिसिलीनच्या कारखान्यास त्यांनीं भेट दिली. ते रविवारीं ता. २ डिसेंबर रोजीं पुण्याहून मुंबईस आले. मुंबईनें त्यांचा भव्य सत्कार केला व त्यांना निरनिराळ्या संस्थांमार्फत मानपत्र देण्यांत येऊन त्यांचा बहुमान करण्यांत आला. त्यांनीं येथील चिनी रहिवाशांना मातृभाषा शिकविण्याचा सल्ला दिला व भारतीयांनींहि चिनी भाषा शिकावी असा उपदेश केला. त्यांचें भारतांतील दहा दिवसांचें वास्तव्य भारत व चीन यांच्या अन्तिम हिताच्या दृष्टीनें अत्यंत सूचक ठरणार आहे. भारत व चीन एशियांतील जुन्यांतले जुने देश व त्यांची संस्कृतीहि पुराणी. दोन्हीहि देशांतील भाऊबंदकीमुळें व देशांतील गटागटाच्या लढायामुळें व कारवायामुळे रजीस आले होते. शेवटीं सन्यत्सेन यानीं राष्ट्रीयवादाचा पुरस्कार करून नवीन घटना निर्माण करून चीनला नवीन चैतन्य दिलें. मग चीन व मार्शल चँग काय शेक यांचेमध्यें वितुष्ट येऊन दोन तुकडे पडले. त्यामुळें चीनमध्यें साम्यवादी राजवट सुरूं होऊन त्या मार्गानें चीनचा आज कायाकल्प झाला आहे. भारताचीहि तशीच स्थिति झाली. लोकमान्य टिळक व महात्मा गांधी यांनीं भारताचा कायाकल्प केला. त्यामुळें भारताचा विशेष बोलबाला झाला व दुसऱ्या महायुद्धानंतर भारताला स्वातंत्र्यप्राप्ति झाली. त्यामुळें चीन व भारत हे देश समान दर्जावर आले व एशियांतील सर्व राष्ट्रांच्या एकीकरणाचे कामीं व सर्व राष्ट्रांची संघटना करून एशियांतील लोकामध्यें एक प्रबळशक्ति निर्माण करण्याचे कामीं भारत व चीन यांचा हिस्सा कमी नाहीं. भारतानें चीनकरितां यूनोमध्यें वकिली केली व यूनोचा चीन हा सभासद झाला पाहिजे असा हट्ट धरला! याबद्दल चीन हा नेहमीं भारताशी कृतज्ञ राहील! शिवाय यूएनसँग, फाहीयान वगैरे चिनी प्रवाशांनीं भारत व चीन यांचे सांस्कृतिक संबंध दृढ केलेच आहेत. भगवान् बुद्धानें चीनला नवीन धर्म दिला व त्यांचीं भव्य दृश्यें आज चीनमध्यें पहावयास मिळत आहेत. एवंच भारत व चीन यांची मैत्री कायम राहील अशी आशा करण्यास सबळ कारणें आहेत. चिनीपंतप्रधान यांचा दौरा यशस्वी होवो व त्यायोगानें भारत चीन यांचे सांस्कृतिक व राजनैतिक संबंध बळावून ते जागतिक शान्तीस परिपोषक होवोत, असें आम्ही मनापासून इच्छितों!

♡ ♡ ♡

मागील महिन्यांत शेवटच्या आठवड्यांत दिल्ली येथें चार दिवसांचा "बुद्ध व बुद्ध शिकवण" यांवर मतसंकलनाचा कार्यक्रम (symposium) आखण्यांत आलेला होता. या काळांत भगवान् बुद्धाच्या २५०० व्या परिनिर्वाणाच्या निमित्तानें निरनिराळ्या बुद्ध देशांतील विद्वान भिक्षु व सामान्य जनता (यात्रेकरू) जमली होती व त्यासाठीं दलाई लामा, पांचेन लामा, सिक्कीमचे महाराज, थकिन नू, कांबोडिया व थाइलँडचे प्रमुख व्हिएटनाम वगैरे देशांतील विद्वानांची मंडळें आलीं जमून त्यांनीं बौद्धधर्मानें जागतिक शक्ति, विचार साहित्य व कला यांना काय मदत केली हा प्रश्न विचारास घेतला होता. पाश्चात्य देशांतील बहुतेक सर्व देशांचे विद्वान् पंडितहि या कार्यासाठीं जमा झाले होते. आजच्या जगांतील तंग स्थिति व त्यामुळें ॲाम्बच्या युद्धाची भीति यावर एकच तोडगा म्हणजे भगवान् बुद्धाचा प्रेम व अहिंसा यांचा संदेश हा होय. वक्त्यांच्या भाषणांत हा विचार प्रामुख्यानें दिसत होता. डॉ. राजेन्द्र प्रसाद म्हणाले, विज्ञानानें मानवाच्या हातांत/अशीं भयंकर अस्त्रें दिलीं आहेत कीं, त्यायोगानें जगांतील मानवजातीचें अस्तित्वच धोक्यांत आलें आहे. भगवान् बुद्धाचा संदेश समजून घेऊन त्यांचे आचरणांत रूपांतर करण्यास दुसरी संधि कोणती असणार? आध्यात्मिक दृष्टिकोणाची मानवी मनांत परिणति झाल्याविना—म्हणजेच सत्य प्रेम व अहिंसा इत्यादि मानवी सद्गुण आंगीं आणल्याविना—मानवाला वैभव आणि सुख लाभणार नाहीं. या काळ्याकुट्ट ढगांतहि लहान रुपेरी रेघ चमकत आहे व ती म्हणजे भगवान् बुद्धाच्या संदेशावर आधारलेल्या पंचशीलाचा स्वीकार कांहीं राष्ट्रांनीं केला आहे. पंतप्रधान नेहरू म्हणाले—**हा विद्यमान काळोख व निराशा या वातावरणांत भगवान् बुद्धाच्या संदेशानें मला प्रकाश दाखविला!** युद्धाची तयारी व युद्धाची धमकी यांच्या योगानें मानव जातीवर काळी छाया पडली आहे. भगवान् बुद्ध हे खरोखरच मोठें क्रान्तीकारी होते. त्यांची शिकवण त्यांच्या परिनिर्वाणानंतर दोन हजार पाचशे वर्षांनीहि आजहि मानवास चलन देत आहे. त्यानीं मानवाचें मन आणि हृदय यांना हलवून सोडलें आहे व हाच क्रान्तिवाद्यांचा मानदण्ड होय. डॉ. राधाकृष्णन् म्हणाले—आमचे जवळ गनटी माणमाची असहिष्णुता आहे. जर तुम्हास शान्ति हवी तर मानवी स्वभाव आमूलाग्र बदलला पाहिजे. राक्षवण्य ने आणि अन्यायानें शान्तीचा पाया कधींच घालतां येणार नाहीं. जर आपण स्वातंत्र्य व न्यायप्रियता याच्याशी एकनिष्ठ राहिलों तर शान्ति स्थापण्यासाठीं आटापिटा करण्याचें कारण नाहीं. ब्रम्हदेशचे माजी पन्तप्रधान थकिन् नू म्हणाले—जर जगांतील राष्ट्रें भगवान् बुद्धानें घालून दिलेला आर्य अष्टांगिक मार्ग स्वीकारतील तर वैयक्तिक, राष्ट्रीय, आन्तरराष्ट्रीय व जागतिक समस्या आपोआप सुटतील. २६ नोव्हेंबर रोजीं भरलेल्या अधिवेशनास, दलाईलामा, पंचेनलामा व सिकमचे महाराज उपस्थित होते. बुद्धजयंति महोत्सवाचे अध्यक्ष डॉ. राधाकृष्णन् आपल्या पत्नीच्या अत्यन्त शोचनीय निधनामुळें मद्रासेस गेल्यामुळें त्यांच्या अनुपस्थितींत पंतप्रधान पंडित जवाहरलाल नेहरू हे अध्यक्ष होते. ते आपल्या भाषणांत म्हणाले—भारत सरकार हे निधर्मी असल्यामुळें त्यास धार्मिक विधी ठाऊक नाहींत. धार्मिक संस्थांनीं धार्मिक कार्यक्रम आंखले तर त्यांचें स्वागत करणें या सरकारला माहित आहे. भारत सरकारनें बुद्धजयंति महोत्सव साजरा करण्याचें ठरविलें त्याचें कारण त्या सरकारास या मोठ्या महोत्सवाच्या बुडाशीं जीं विशेष वैशिष्ट्यें आहेत त्यावर विशेष जोर द्यावयाचा होता. ह्या संकलनास एक विशिष्ट सांस्कृतिक स्वरूप आहे आणि शिवाय तें संकलन म्हणजे धार्मिक म्हणून

…ळींच म्हणतां येणार नाहीं. म्हणून आम्ही दुसऱ्या देशांतील …द्वान् पंडितांना बोलावलें आहे. त्या देशांत बौद्धधर्माची भर… झाली व तेथील लोकांच्या जीवनावर बुद्धधर्मानें परिणाम केला. …प्रमाणेंच आम्ही अन्यधर्मीय पण असल्यामुळें बुद्धप्रेमी अन्य देशीय …डितांनाहि बोलावणें केलें आहे. कारण ते जरी स्वतः बुद्धधर्मीय …सले तरी सांस्कृतिक वैशिष्ट्याकडे त्यांचें जास्त लक्ष आहे. म्हणून ही …रिषद् धार्मिक नसून सांस्कृतिक आहे. फार पुरातन काळीं बुद्धाच्या …स्तित्वानें विभूषित झालेल्या व मांगल्य पावलेल्या या देशांत …माला येण्याचा हक्क आम्हांस प्राप्त झाला आहे. २५०० वर्षांचा …ठा अवधि जरी लोटला असला तरी त्यांचीं पाउलें अद्यापिहि …नमानस किनाऱ्यावर उमटलेलीं असून त्यांच्या हृदयांचा त्यांनीं ठाव …तला आहे. या प्रसंगीं ती स्मृती जास्त बलवती व चित्रोपम होते. …ाच्या या कालखंडात आज अशी वेळ प्राप्त झाली आहे कीं …म्यक् सम्बुद्धाचा संदेश आपण चित्तांत गिरविला पाहिजे; कारण एवढा …लखण्ड लोटला तरी त्यांचा सौगंध आजहि दरवळून राहिला आहे. आम्ही बौद्धधर्मीय असो कीं नसो त्याच्या संदेशानें आमच्या …नावर जबरदस्त परिणाम केला आहे; व मी आशा करितों कीं …माक्रमानें तो जास्त जास्त जगावरहि परिणाम केल्याशिवाय …हणार नाही. या शिवाय मोठमोठ्या विद्वानांनीं बौद्धवाङ्मयानें अन्य वाङ्मयावर कसा परिणाम केला हें दाखविलें त्याप्रमाणें तत्त्वज्ञान व बौद्धकला यानीं जागतिक तत्त्वज्ञानांत व कलेंत कशी व केवढी भर घातली, हें दाखविलें. एवंच या मतसंकलन कार्यक्रमानें सर्वांचीं हृदयें एकाच विचारानें संवादित होऊन मानवजातीची अविभाज्यता सर्वांच्या प्रत्ययास आली हा कांहीं कमी फायदा झाला नाहीं. नेपाळांत खाटमांडू येथें जी बौद्धधर्मीयांचीं परिषद् भरली होती, तीहि वैशिष्ट्यपूर्ण होती. एकूण हे २५०० वें वर्ष बुध्द व त्याची शिकवण याच्या प्रसारासाठीं, व उन्नतीसाठीं गाजणार यांत शंका वाटत नाहीं. भगवान् बुद्धाचा हा जयजयकार होण्यास २५०० वर्षें लोटावीं लागलीं. पण "सत्यमेव जयते" ह्याची सत्यता यानें पटली!

• • •

# सुखी संसार !

## ( सामान्य माणसाचें ध्येय )

भगवान् बुद्धाच्या शिकवणीचा जर सर्व बाजूंनीं विचार केला व त्यांचें ध्येय कोणतें हें पाहिलें तर त्यांत पुष्कळ गोष्टी आजच्या जगतांत घेण्यासारख्या आहेत. बुद्धधर्मांत दुःखाचाच विचार प्रामुख्यानें केल्यामुळें 'भगवान् बुद्धाला दुःखाशिवाय दुसरें कांहींच दिसत नव्हतें' असें म्हणणारे टीकाकार आज सांपडतात. बुद्ध हा नैराश्यवादी होता. जाति, जरा, व्याधि, मरण यांनीं गांजलेल्या या जगांत सुख कोठून असणार ? पण 'सुख पाहतां जवापाडें, दुःख पर्वता एवढें' असें म्हणणारे संत व भगवान् बुद्ध यांच्यांत काय फरक आहे ? पण एवढा दूरवर विचार करतो कोण ? भगवान् बुद्धांनीं जसें सर्वत्र दुःख भरलेलें आहे, असें सांगितलें, तसेंच दुःखांतून मुक्त होण्याचा मार्गहि सांगितला–अंधकारावर जसा जोर दिला, तसाच त्यांत दिव्याचा शोधहि करून प्रकाश पाडून दाखविला. सर्व गोष्टींचा त्याग करा, असें ज्याप्रमाणें सांगितलें, तसेंच कुटुंबसंस्था बलवत्तर करा व कुटुंबांतील निरनिराळ्या घटकांचें पालनपोषण करून त्यांचा सर्वांगीण विकास व्हावा, म्हणून जें वातावरण निर्माण करावयास हवें, तें निर्माण करण्याची जबाबदारीहि त्यानीं माणसावर टाकली. शीलवान् माणूस हाच धार्मिक माणूस, असा समन्वय केला व संसारी माणसानें आपलें शील संभाळून आपलें विहित कर्म केलें म्हणजे त्याचें जीवन सुखाचें होईल, अशी त्यांची शिकवण होती. यज्ञमार्ग किंवा निरर्थक कर्मकांड यांच्यामागें लागूं नका. मानव मानवांतील संबंध व त्याचे एकमेकाशीं जोडावयाचे संबंध, यावर जोर देऊन मानवी धर्माचा त्यांनीं प्रसार केला. मानवाच्या सेवेंत देवपूजा सांठविली आहे. मानवाचा विकास करा व खरी देवपूजा त्यांतच आहे. राजाचें कर्तव्य सांगतांनाहि भगवान् बुद्धांनीं राजानें प्रजेचें रक्षण करतांना त्यांच्या उद्योगधंद्यांना प्रोत्साहन देण्याचें पहिलें कर्तव्य केलें पाहिजे. राज्य म्हणजे आपली खाजगी मालमत्ता नसून राजानें आपल्या द्रव्याचा उपयोग मोठमोठे यज्ञयाग करून न करतां प्रजेच्या नैसर्गिक प्रवृत्तींची पाहणी करून तिच्या कुशल प्रवृत्ति जेणें करून वर्धित होतील व त्यांच्या योगानें मानवाची बुद्धि व कर्तबगारी वाढत जाऊन सर्वगामी होईल अशा सर्व गोष्टी राजानें प्रथम केल्या पाहिजेत. राज्यांत वाढत्या प्रमाणावर गुन्हे झाल्यास त्यांचा बीमोड करण्याचा जो मार्ग भगवान् बुद्धानें शिकवला आहे, त्याचें दिग्दर्शन येथें करण्याचें योजिलें आहे. त्यावरून सुखाचा संसार हा मानवाच्या धर्म-अर्थ काम आणि मोक्ष या चतुर्विध पुरुषार्थांना कसा उपकारक होतो, हें दाखवून त्याला सुखांत कसें राहतां येईल, हें सहज दिसून येईल.

कूटदन्त हें सूत्र पालीवाङ्मयांत असून त्यांत हिंसात्मक यज्ञांची वैय्यर्थता,दाखविण्याचा उद्देश आहे. मगध देशांत खाणुमत नावाचें ब्राह्मणग्राम असून तेथें कूटदन्त नांवाचा ब्राह्मण एका महायज्ञाची तयारी करीत होता. सातशे बैल, सातशे गोऱ्हे, सातशे कालवडी व सातशें मेंढे यज्ञाकरितां खांबांशीं बांधून ठेवले होते. अशावेळी भगवान् बुद्ध तेथें गेले असतांना कूटदन्तानें त्यांची गांठ घेतली व आपण एक महायज्ञ करणार असल्याचें त्यांना निवेदन केलें. भगवन्तांनीं त्याला साक्षात् उत्तर न देतां महाविजित नांवाच्या राजाची गोष्ट सांगितली. तो राजा सुंदर, उत्तम कुलांत जन्मास आलेला, अतिशय संपन्न व महान् दाता म्हणून प्रख्यात होता. सर्व विद्येंत तो पारंगत होता व विद्वान्, तीक्ष्ण बुद्धीचा व त्रिकालज्ञ अशी त्याची ख्याति होती. पण आपण एक बडा यज्ञ करावा अशी त्याला इच्छा उत्पन्न झाली. तेव्हां त्यानें आपल्या पुरोहित ब्राह्मणाला बोलावून याबद्दल विचारलें. राजा म्हणाला—मी पुष्कळ मनुष्यभोग्य सुखांचा उपभोग घेतला आहे व ही मोठी पृथ्वी सर्व जिंकून राहिलों आहें; तर आतां **महायज्ञ** करावा म्हणजे चिरकाळ तें माझ्या हितास व सुखास कारण होईल.

यावर पुरोहित म्हणाला—महाराजांच्या राज्यांत अद्याप चोऱ्यामाऱ्या व उपद्रव आहेत. गांवावर, नगरावर व रस्त्यांवर अद्याप दरवडे पडतात. अशा तऱ्हेचा उपद्रव असतांना महाराज जर कर बसवतील तर महाराजांनीं त्यांचें अहित केल्यासारखें होईल. कदाचित् महाराजांच्या मनांत येईल कीं, वध, बंधन, हानी, निंदा, हकालपट्टी वगैरे उपायांनीं त्या चोरांचा उपद्रव बंद करतां यईल. परंतु अशारीतीनें या उपद्रवाचा बंदोबस्त व्हावयाचा नाहीं. ह्या शिक्षेतून जे सुटतील ते नंतर महाराजांच्या प्रजेस त्रास देतील. हा उपद्रव बंद करण्याचा खरा उपाय म्हटला म्हणजे महाराजांच्या राज्यांत शेती व गोरक्षा करणारे जे लोक आहेत त्यांना महाराजांनीं बीं व अन्न पुरवावें; जे व्यापार करूं इच्छितील त्यांस भांडवल द्यावें; जे महाराजांची नोकरी करूं इच्छितील त्यांस अन्न व वेतन द्यावें; म्हणजे ते ते लोक आपलीं कर्में करीत राहून राजास त्रास देणार नाहींत. महाराजांचा वसूलहि पुष्कळ वाढेल. राज्यांत शांतता होऊन चोऱ्यामाऱ्या इत्यादींचा त्रास नाहींसा होईल, व **सर्व लोक आनंदांत राहून छातीवर मुलें खेळवींत दरवाजे (निर्भयपणें) उघडे टाकून कालक्रमणा करतील !"** (कूटदन्त सुत्त १०-११) वर जो उतारा आम्ही उद्धृत केला आहे, त्यावरून ब्राह्मण पुरोहिताचा उपदेश म्हणजे भगवान् बुद्धांचाच सल्ला होय. प्रथम यज्ञांत पशुहिंसा हा एक आवश्यक भाग होता. ब्राह्मणांच्या सहकार्याशिवाय यज्ञ करणें अशक्य होतें. प्रथम प्रथम ही संस्था जरी लोकप्रिय झाली तरी लोकाचे विचार जसे प्रगत होत चालले तसे यज्ञाच्या ध्येयाबद्दल व कार्यसाधकत्वाविषयीं लोकांची श्रद्धा कमी होऊं लागली. स्वर्गाप्रत जाऊन पोहोंचावयाचे असेल, तर यज्ञावांचून दुसरें साधन नाहीं, हा जो ब्राह्मणाचा दावा तो बहुजन प्रजेला मान्य होईनासा झाला. यज्ञास खर्च करावयाचा म्हणजे लोकांवर नवीन नवीन कर बसवावे लागत. यज्ञविधीमध्यें अनेक तंटे बखेडे होत व राष्ट्राच्या उत्पादन कार्यांत व्यत्यय येई. राजेलोकांना प्रजेचें हित कसें साधतां येईल, याविषयीं विचार पडला. यज्ञयोग हें बाह्यशुद्धीचें एक साधन होतें, **अन्तःकरणाची शुद्धता हाच श्रेष्ठ यज्ञ होय,** अशी लोकांची खात्री पटत चालली होती. राजाला स्वर्गसुखाची प्राप्ति मिळण्याकरितां राष्ट्राचे हजारों रुपये खर्च करणें, जंगलें तोडून यज्ञाला इंधन पुरविणें, पशुहिंसा करून

राष्ट्राच्या संपत्तीचा अनुत्पादक गोष्टीकडे व्यय करणें, ह्या गोष्टी राजे-लोकांनाहि पटेनाशा झाल्या. पुरोहितवर्गास सुद्धा राष्ट्रांत आबादानी हवी होती. राज्य म्हणजे प्रजा व प्रजा म्हणजे त्यांतील कुटुंबें. कुटुंब सुखी तर समाज सुखी, तर राज्य सुखी. त्यासाठीं राष्ट्रांत शांति नांदली पाहिजे. त्यांतील लोकांचें आर्थिक जीवन सुधारलें कीं त्यांची कार्यक्षमता सुधारेल. कार्यांत गर्क होणारा प्रत्येक प्रजाजन राष्ट्राच्या संपत्तीच्या उत्पादनांत भर घालणारा होय. राजाचें कर्तव्य म्हणजे तलवारीच्या जोरावर राज्य करणें नसून लोकांचीं मनें आकर्षित करून घेऊन त्यांना आपल्या पुत्राप्रमाणें वागविणें, त्यांचा परमार्श घेणें, जेणेंकरून विकास होईल अशा गोष्टी करणें व लोकांची वाईट प्रवृत्तीवर जेणें करून केंद्रित होणार .नाहीं, उलट चांगल्या प्रवृत्तीची वाढ होऊन घरांत व दारांत सुख समाधान वाढेल, असें वातावरण निर्माण करणें, हें होय. हाच खरा यज्ञ होय व हेंच यज्ञाचें खरें फळ होय. म्हणून बौद्ध धर्माच्या शिकवणीनें कुटुंबसंस्था नामशेष होणार नसून भरभक्कम पायावर कशी उभारतां येईल, या प्रश्नास चालना मिळून तो कसा सोडवितां येईल याचें मार्गदर्शन होतें. कुटुंबांतला मुख्य मनुष्य घरीं आला म्हणजे बायका, मुलेंबाळें, आनंदानें त्यांचे स्वागत करतात. तो दिवसाचा शीण घालवून मुलाबाळांच्या सुखांत व आनंदात असतो व लहान मुलांना खांद्यावर घेऊन आनंदानें नाचतो बागडतो! अशी सर्व कुटुंबें आनंदांत सुखांत व आबादानींत राहूं लागलीं म्हणजेच रामराज्य व हाच सुखाचा संसार करावयास माणसास शिकवणें हा भगवान बुद्धाच्या शिकवणीचा दावा होता. 'दुःख दुःख' म्हणून नैराश्यवाद उत्पन्न करण्याचा नसून राष्ट्र कार्यप्रवण करण्याकडे तो होता. ही गोष्ट वाचकाचे मनावर ठसावी म्हणून हा लेख लिहिला आहे. बुद्धाच्या शिकवणीचें खरें व पूर्वग्रहविवर्जित असें मूल्यमापन करा, हीच प्रार्थना!

# वेदोनारायणांचीं बुद्ध व बुद्धधर्म या विषयींचीं विचाररत्नें

● ● ● मागील महिन्यांत [ऑक्टोबरमध्यें] पुणें येथें अग्निहोत्र मंदिरांतील 'शारदीय ज्ञानसत्रां'त निरनिराळ्या विद्वानांनीं 'भगवान् बुद्ध व बुद्धधर्म' यावर व्याख्यानें देऊन आपली मतें प्रदर्शित केलीं. पुणें हें वेदविद्येचें आगर आहे. त्यामुळें सर्व जग भगवान् बुद्धांना मानवंदना करीत असतांना हे विद्वान् त्यांच्याविषयीं काय म्हणतात, हें पाहणें बोधप्रद आहे. म्हणून खालील कांहीं उतारे दिले आहेत :

## १. श्री. गोपीनाथपंत तळवळकर

"दुधाचें दहीं झालें म्हणजे ज्याप्रमाणें दूध नष्ट झालें, असें आपण मानीत नाहीं, त्याचप्रमाणें बुद्धधर्म हा भारतीय संस्कृतीशीं समरस झाला म्हणजे तें तत्त्वज्ञान नष्ट झालें, असें समजावयाचें कारण नाहीं. किंबहुना भारतीय संस्कृति उज्ज्वल करूनच तो तींत विलीन झाला. श्रीमान् शंकराचार्यांनींहि बौद्धविचारांतील उत्तम तत्त्वांचा अंगीकार करून त्याला हिंदूधर्मांत स्थान दिलें."

## २. उपनिषत्तीर्थ द. वा. जोग

"सत्य अहिंसादि जीं पांच तत्त्वें बुद्धाचीं म्हणून सांगितलीं जातात तीं बुद्धानें नव्यानें प्रतिपादलीं असें नव्हें. तीं तत्त्वें वेदांतही होतीं. बुद्धपूर्वकालांत ही सत्याची चाड होती. बुद्धाचें 'सत्य' विचारांत घेतां तो अनात्मवादी होता हें लक्षांत ठेवलें पाहिजे. त्याचप्रमाणें अहिंसेचेंही महत्व वेदांत सांगितलें आहे. बुद्धापूर्वीही अहिंसेचें महत्त्व ओळखून तिला व्यवहारांत स्थान देण्यांत आलें होतें. बुद्ध मांसाशन मान्य करतात. फक्त तो पशु स्वतःसाठीं मारलेला नसावा, असें सांगतात. स्वतः बुद्ध मांसाशन करीत असत. डुकराचें मांस अतिरिक्त खाल्ल्यानेंच त्यांना मृत्यु आला ही इतिहासप्रसिद्ध गोष्ट आहे! दम, दान व दया हीं उरलेलीं तीन तत्त्वेंही बुद्धपूर्वकाळांत अस्तित्वांत होतीं. 'सत्यात् संजायते ज्ञानम्' इ. उल्लेख प्रसिद्ध आहेत. परंतु दयेलाही मर्यादा असाव्यात. त्या शांतिपर्वांत सांगितल्या आहेत. अपात्री दानही चांगलें समजणें, ही बुद्धपद्धति आहे; पण या दयातत्त्वाचें अव्यवहार्य पालन केल्यामुळेंच आपला ऱ्हास झाला, हें ऐतिहासिक सत्य आहे. सारांश, हीं पांचही तत्त्वें बुद्धापेक्षांही प्राचीन होतीं. या तत्त्वाचें समर्थन करणाऱ्या जातककथा म्हणजे निव्वळ भाकड कथा आहेत. त्यांत वर्णन केलेल्या ब्राह्मणांसारखे मूर्ख लोकच फक्त बुद्ध झाले.

"ज्ञानविविधता ही वासनावैचित्र्यामुळें आहे, असें बुद्ध मानतात. परंतु वासना मान्य केली म्हणजे बाह्य पदार्थांचें अस्तित्व मान्य करावें लागतें व वैज्ञानिक तत्त्वज्ञान कोसळून पडतें! तसेंच पांच स्कंध मरणापर्यंत राहतात, असें कोसंबी म्हणतात. बौद्ध बाह्य पदार्थांचें अस्तित्व मान्य करीत नाहीत. परंतु या स्कंधांच्या लटांबराचें अस्तित्व मात्र मरणापर्यंत मानतात. निर्वाण पक्षाचा साक्षात्कार होतो, असें बौद्ध मानतात; पण बाह्य पदार्थांचा अभाव मानल्यावर साक्षात्कार कसला व्हावयाचा ? यावरून बौद्ध तत्त्वज्ञान हें तत्त्वज्ञानच ठरत नाहीं व त्यांनीं जें प्रतिपादन केलें तें अनादरणीय आहे."

## ३. श्री. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव

"बुद्ध खंडणमंडणाच्या भानगडींत पडत नाहीं. तो म्हणतो, मोक्ष वगैरेच्या खटपटींत कशाला पडतां ? मी सांगतों ह्या मार्गानें चला. चर्वाक फटकळ होता. पण बुद्ध प्रभावी वक्ता होता. पंचशीलाचा त्यानें प्रभावी प्रचार केला. सामाजिक स्वास्थ्य निर्माण करणारा तो महान् पुरुष होता.

"वैदिक लोक समाजस्वास्थ्याचा विचार करण्याऐवजीं स्वर्गावरच लक्ष रोखून होते. पण बुद्धानें लोकांना पृथ्वीवरच लक्ष ठेवावयास सांगितलें व तेंच बहुजनसमाजाला पटलें.

"आपला वैदिक धर्म उत्कृष्ट आहे, पण त्याच्या प्रचाराच्या बाबतींत आपण बुद्धांपेक्षां कमी ठरलों—नव्हे पराभूत झालों. अद्यापही दोन लक्ष लोक एकदम बौद्ध धर्म स्वीकारतात यावरून आपल्या धार्मिक वागणुकीचा अधिक विचार करावयास हवा. वास्तविक बुद्धपंथ हा आमचाच आहे. शील व नीतितत्त्वें हेच आपले खरे आधार आहेत. त्या दृष्टीनें आपण सारेच बौद्ध म्हणवून घेण्यास हरकत नाहीं. हिंदुधर्माचीं सर्व तत्त्वें उत्तम आहेत. पण त्याचा प्रभावी प्रचार होत नाहीं, हें मान्य करणें भागच आहे."

"पुराणामध्यें बुद्धाची फार निंदा केलेली आहे. बुद्ध हा दुराचार, अनीति याचा प्रसार करणारा माणूस असें वर्णन केलेलें आढळतें. पण हें पुराणांच्या पहिल्या संस्करणांत आढळतें. पुढें भक्तीमार्गाचा फैलाव होऊन अवतार कल्पना समाजांत रूढ झाल्यावर बुद्ध हा विष्णूचा अवतार होय अशी एक कल्पना घुसडून देण्यांत आली. इतकेंच नव्हे, तर बुद्धाची गया ती विष्णूचीच गया असें प्रतिपादिण्यापर्यंत मजल गेली. हा फरक कां पडला? तर बुद्धधर्माचा प्रभावी प्रचार हेंच कारण होय.

"वैदिक धर्माचे पुरस्कर्ते म्हणून बुद्धाचें मुख्य भांडण ब्राह्मण पंडितांशीं होतें. त्यांनीं बहुजनसमाजाला समजेल असा धर्म सांगितला. ते चातुर्वर्ण्यहि मानीत नाहीं. बुद्ध वेदप्रामाण्य मानीत नाहीं. नास्तिक मताचा मुख्य आचार्य चार्वाक् त्याचप्रमाणें बुद्ध व जैन हेही नास्तिकच समजले जातात."

## ४. वैद्य शं. गं. वर्तक

"हल्लीं बुद्धाच्या नांवांत जादू निर्माण झाली आहे. अत्रेय महर्षींचा एक शिष्य 'जीवक' हा बुद्धाचा उपासक होता. अत्रेय महर्षींचें नांव आणखी एका पद्धतीनें बुद्धाशीं निगडित झालें आहे. कारण चरक संहितेंत सर्वज्ञान अत्रेय महर्षींनीं सांगितलें, अशी प्रतिज्ञाच एका अध्यायाच्या प्रारंभीं आहे. बुद्धभिक्षूंनीं हिंदु वैद्यक विद्या आत्मसात् केली व तिचा मध्य आशिया, चीन व सिलोन देशांत प्रसार केला. रुग्णालयाची कल्पना चरक व सुश्रुतांतही आहे. बौद्धकालीं आयुर्वेदाची वाढच झाली." बौद्धधर्माचा हिंदु वैद्यकावर विपरीत असा परिणाम झाला नाहीं, असें मत वैद्यराज श्री. शं. गं. वर्तक यांनीं शारदीय ज्ञानसत्रांत 'बौद्ध कालीन वैद्यक' या विषयावर व्याख्यान देतांना व्यक्त केलें.

"बुद्धानें यज्ञीय पशुहत्या बंद केल्यामुळें शवविच्छेदनास आळा बसला व शास्त्रीय प्रगति खुंटली. तसेंच बौद्ध राजांनीं शल्यशास्त्रास बंदी केल्यामुळें आयुर्वेदाचा ऱ्हास झाला असे जे आक्षेप घेतले जातात त्यांचा उल्लेख करून श्री. वर्तक यांनीं प्रारंभीच्याच मताचा पुन्हां इवाला दिला व बौद्ध कालांत आयुर्वेदाची प्रगतीच झाली असें प्रतिपादन करून आपले भाषण संपविलें."

### ५. प्रा. डी. एस्. हतवळणे

"वैदिक धर्म हा व्यक्तिप्रधान असून बौद्ध धर्म हा संघप्रधान आहे. व्यक्तिप्रधान धर्माला राजाश्रयाची जरूरी नसते, पण संघप्रधान धर्माला त्याची फारच जरूरी असते व हा राजाश्रय मिळविण्यासाठीं बौद्धांनीं अनेक लटपटी केल्या. बौद्धांना अशोक, मिलिंद, कनिष्क, हर्षवर्धन आदि राजांकडून आश्रय मिळाला. पण हे राजे प्रथम श्रेणीचे नव्हते. इतकेंच नव्हे, तर ते वैगुण्ययुक्त होते. बौद्धधर्मास राजाश्रय मिळाल्यानें त्यांत भोंदुगिरीही शिरली. बुद्ध भिक्षूंना मिळालेल्या देणग्यामुळें दुराचारही वाढला. बौद्ध धर्मोला खरा धक्का वेदान्त्यांनीं दिला नसून तो मुसलमानांनीं दिला. त्यांनीं त्यांचीं ग्रंथालयें जाळलीं, विद्यापीठें नष्ट केलीं.

"बौद्धवाङ्मय लोकाभिमुख आहे. त्यांची संघपद्धति लोकशाही स्वरूपाची होती व ते गुप्तमतदान पद्धति पाळीत असत. पण राष्ट्रकारणाच्या क्षेत्रांतील त्यांचें कार्य मात्र फारसें उत्तेजनक नाहीं."

### ६ श्री. ज. स. करंदीकर

"सकृद्दर्शनी बुद्धानें नवीन धर्म स्थापन केला असें दिसतें. पण बुद्धाच्या शिकवणुकींत तत्त्वज्ञान असें फारच थोडें आहे. त्यामुळें बुद्ध विचारास 'धर्म' म्हणणें योग्य होणार नाहीं. दशावतारांतील बुद्धाची गणना ही एक विसंगतीच आहे.

"दैवीशक्ति नित्य आहे. परन्तु कांहीं विशेष कामासाठीं ती सगुण स्वरूपांत प्रकट होते. अवताराचे प्रकार तीन आहेत: मत्स्य, कूर्म, वराह व नारसिंह हे अवतार कांहीं विशिष्ट कार्याकरितां तात्पुरते झाले. त्यापुढील अवतार अधिक काळ टिकणारे आहेत. श्रीकृष्ण हे पूर्णावतार होते हे बरोबर नाहीं. तोही या तेजोमय ब्रह्माचा एक अंशच होता. महाभारतांत बुद्धाऐवजी हंस हा अवतार मानतात, पण त्याची विशेष माहिती मिळत नाहीं. दशावतारांखेरीज इतरही अवतार आहेत; पण ते महत्त्वाचे नाहींत.

"पुराणांत बुद्धाचा अवतार भविष्यकालीन म्हणून जरी सांगितलेला असला तरी पुराणें हीं बुद्धानंतर लिहिलीं गेलीं. पुराणांत त्याचें कार्य दुष्टांना वेदधर्मापासून परावृत्त करून त्यास नाशाप्रत नेणें असें सांगितलें आहे. परन्तु हें वर्णन सयुक्तिक नाहीं. दुःखनाश हेंच बौद्ध धर्माचें सार होतें. इंद्रियनिग्रह केला म्हणजे सुखाची अभिलाषा नाहींशीं झाली असें नव्हे. त्यासाठीं परमात्म्याच्या दर्शनाची गरज आहे.

"विषयसुखापेक्षां अधिक चांगलें व शाश्वत सुख आहे हें दाखविल्याखेरीज विषयसुखाचा त्याग करा असें सांगणें मूर्खपणाचें आहे. बुद्धानें हीच चूक केली. दुःख क्षणिक मानावयाचे व त्याच्या नाशाकरितां आटापिटा करावयाचा हें निरर्थक आहे."

## ७ डॉ. म. त्र्यं. सहस्रबुद्धे

"बुद्धानें धर्मचक्रप्रवर्तन केलें असें म्हणतात; पण आमच्या वैदिक धर्माप्रमाणें धर्म ही सिद्ध वस्तू आहे. त्याचा अनुभव ऋषींनीं घ्यावयाचा व तो ग्रंथांत ग्रथित करावयाचा, अशी वैदिक परंपरा आहे. पण बुद्धानें अशा परंपरेवर विश्वास न ठेवतां 'माझ्यावर विश्वास ठेवा' असें प्रतिपादून व्यक्तिनिष्ठ धर्म निर्माण केला. परंपरेचा आधार नसला तर निदान तत्त्वज्ञानाचा तरी आधार हवा होता. परंतु बुद्धधर्म तत्त्वज्ञानाच्या अभावानेंच तळपला. त्याचें मुख्य भांडवल म्हणजे वैदिक धर्माची निंदा; पण दुसऱ्याच्या निंदेवर आपला मोठेपणा मिरवूं पहाणारा धर्म हा निष्कृष्टच होय.

**बुद्धधर्माचें 'अहिंसा' प्राणभूत तत्त्व नव्हे!**

"अहिंसेसंबंधीं बोलतांना ते म्हणाले, 'मज्झिमनिकाय' ग्रंथ प्रमाणभूत मानल्यास त्यांत बुद्धानें मांसाहारास परवानगी दिली आहे. दृष्ट, शंकित, श्रुत अशाच मांसाचा फक्त स्वीकार करूं नये? बाकीच्या मांसाचा स्वीकार करण्यास हरकत नाहीं असें त्यांत प्रतिपादन आहे. त्यावरून 'अहिंसा' हें बुद्धधर्माचें प्राणभूत तत्त्व नव्हे. वैदिक संस्कृतींत अद्याप तरी २-३ जाति मांसाशन न करणाऱ्या आहेत

**आचरण एकाचें तर उदोउदो भलत्याचाच!**

"बुद्धाच्या मृत्यूनंतर जी तंत्रपद्धति बौद्धधर्मांत आली. त्यांत सर्व प्रकारची हिंसा आहे. अहिंसेचें खरें पालन जैनांनीं केलें. पण अहिंसक म्हणून बुद्धाचा उदोउदो झाला व होत आहे. बुद्धाची जातिच्छेदाची कल्पना व 'वृजन' वालींची तात्त्विकनिष्ठा याविषयीं माहिती देऊन त्यांनीं आरंभीं दिलेलें मत व्यक्त करून आपलें भाषण संपविलें."

## ८ गो. म. जोशी ( समारोपाचें भाषण )

"यंदाच्या २४ व्या शारदीय ज्ञानसत्रांत भगवान् बुद्ध व त्याचें तत्त्वज्ञान व त्याचा प्रसार या विषयावर अनेक प्रथितयश वक्त्यांनीं व विद्वानांनीं भाषणें केलीं आहेत. आतां समारोप करतांना त्या सर्व भाषणांचें समीक्षण करणें प्राप्त आहे. तें करण्यापूर्वीं निरनिराळ्या मनोवृत्तींचा विचारही करावयास पाहिजे व ज्ञानसत्राच्या विषयावर बोलण्यापूर्वीं दृष्टिकोन कोणता हेही निश्चित केले पाहिजे.

"भगवान बुद्ध ही वर्तमानकालांतील विभूति आहे तेव्हां त्याच्या कार्याचें व तत्त्वज्ञानाचें परीक्षण करतांना ऐतिहासिक दृष्टिकोन पत्करून गृहीत कृत्यें पडताळून पाहिलीं पाहिजेत. ऐतिहासिक मंडळी वस्तुनिष्ठ असतात. विचारवंतांत वस्तुनिष्ठ, विचारनिष्ठ व तर्कनिष्ठ ( रीलेशन्स ) असे तीन भाग आहेत. यांतील एका निष्ठेचा चष्मा लावला तर इतर कोणाची अनुभूति कशी येणार?

"बौद्धांच्या 'प्रसन्नतारा' या देवतेच्या मूर्तींत ब्रह्मदेवाला पायदळीं तुडविण्यांत आले आहे. बौद्धांनीं विष्णु, शिव, गणपति आदि वैदिक देवतांचीहि अवहेलना केलेली आहे. या धार्मिक असहिष्णुवृत्तीचा उगम इतिहासांत गौतम बुद्धानें प्रतिपादिलेल्या बौद्ध धर्मांतच प्रथम पाहावयास मिळतो. हीच बौद्धांची असहिष्णु वृत्ति खिस्ती व मुस्लिम धर्मीयांनीं उचलली व तेथूनच धार्मिक युद्धास प्रारंभ झाला. वैदिक वृत्ति मात्र बौद्धांच्या बाबतींतही सहिष्णुपणाची होती, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे"

# भगवान बुद्ध : जीवनावर बसविलेला बोलपट

## विमल रॉय फिल्म प्रायव्हेट लि. मार्फत

हें २५०० वें वर्ष भगवान् बुद्धाच्या परिनिर्वाणाचें वर्ष सर्व जगभर गाजलें असून पावसाळ्यानतरच्या दुसऱ्या सहामाहींत दिल्ली येथें प्रदर्शन, मत संकलन, बोलपट-दिग्दर्शन वगैरे कार्यक्रमांनीं त्या उत्सवास सुरुवात झाली. या कामीं भारत सरकारनें पुढाकार घेऊन भगवान् बुद्धाचें जीवन व त्याचें कार्य यावर जनतेस माहिती करून देण्याच्या उद्देशानें निरनिराळे कार्यक्रम सर्व देशभर साजरे केले. पहिल्या सहामाहींत मुंबई शहर व राज्यांत एक एक ठळक समारंभ घडून आला व मुंबईत एक आठवडाभर सर्व शहर व उपनगर येथें निरनिराळ्या ठिकाणीं तो साजरा करण्यांत आला. भगवान् बुद्धांचा शांति व अहिंसा याचा संदेश आजच्या कालांत मार्गदर्शक ठरल्याविना राहणार नाहीं. भगवान् बुद्ध हे भारतीय संस्कृतीचें अत्यन्त प्रभावी व गोड असें फळ होय. त्या फळाला आपण कांहीं शतकें पारखे झालों होतों; पण भारताच्या स्वातंत्र्यप्राप्तीबरोबरच तें फळ आम्हांस परत लाभलें आहे. आमच्या या दैदीप्यमान हिऱ्याला आम्ही पुन्हां भारतांत आणून त्यास मानवंदना देत आहोत. त्यापैकींच भगवान् बुद्धाचा बोलपट ही एक डोळ्यांत भरणारी घटना होय. भारत सरकारच्या बोलपट विभाग खात्यामार्फत हा बोलपट बाहेर पडत आहे व तो पडद्यावर आणण्याचें बिकट कार्य श्री. बिमलरॉय व श्री. राजबंस खन्ना व त्यांचे कर्तबगार कलावन्त व सहकारी यांनीं यशस्वी रीतीनें पार पाडलें असून मागील महिन्याच्या २९ तारखेपासून मेट्रो सिनेमागृहांत तो रोज चार वेळां दाखविला जात आहे. सामान्य जनता, शाळा व कॉलेजें यांतील विद्यार्थी यांना हा बोलपट तर शैक्षणिक दृष्ट्या फारच बहुमोल ठरणार आहे. या लहानशा लेखांत त्याची उत्पत्ति, विकास व त्याचीं वैशिष्ट्यें ही थोडक्यांत सांगण्याचा प्रयत्न केला आहे. एका वाक्यांत सांगावयाचे म्हणजे या बोलपटानें चलच्चित्रपटाच्या प्रान्तांत अपूर्व क्रांति घडून आणली आहे.

२५०० वर्षांचें योग्य स्मारक म्हणजे भगवान् बुद्धाच्या जीवनाचा चलच्चित्रपट करणें हें होय. पण बुद्धधर्मीयांच्या समजुतीप्रमाणें कोणताहि मानव बुद्धाची भूमिका करणार नाहीं म्हणून मुंबईत कांहीं वर्षांपूर्वी एक्सलसियर थिएटरमध्यें जो " बालेडान्स " गौतमाच्या जीवनावर आधारलेला होता त्यांत गौतमाच्या बुद्धप्राप्तीनंतर जेथें जेथें बुद्ध दाखविण्याचा प्रसंग येई तेथें तेथें त्याची छाया दाखविण्यांत आली होती. तो लोकांना फार आवडला. म्हणून बुद्धाच्या बोलपटासाठीं बुद्धकलेचीं निरनिराळीं प्रतीकें, दगडावरील चित्रें, रंगीत चित्रें, खोदकामाचे नमुने, निसर्गाचीं वर्णनें व मनोरम व रोमांचकारी प्रसंग निर्माण करून हा बोलपट जनतेस दाखविण्यांत विमल रॉय व त्यांचे सहकारी यांनीं अपूर्व कौशल्य व चातुर्य प्रकट केलें आहे. ह्यांत कलागायन व भाष्य (Commentary) याचा बेमालूम संगम झाल्यामुळें तर तें चित्र शाश्वतानंद देण्याचें साधन झालें आहे. जरी या चित्रपटांत जिवन्त माणसें काम करीत नसलीं तरी कथानकांतील निरनिराळे प्रसंग एकामागून एक अशा अनुक्रमानें असें दाखविले जातात कीं त्यांत खण्ड असा दिसतच नाहीं. व आपण खोदकामाचीं चित्रें पहात आहोत, असें वाटतसुद्धां नाहीं. जिवंत गौतमासच आपण पडद्यावर पाहतों! कथानक सांगण्याची भाष्यकाराची पद्धति फारच मनोवेधक व हृदयास गुंगविणारी आहे "खरोखरच याच्यामागें कांहीं तरी हेतु असला पाहिजे" अशा ध्रुपदानें तर भावना व मनोविकार यांना चांगलेंच आवाहन केलें जातें. गौतमाचें चित्र सारनाथच्या बुद्धाचें आहे. अजंटाच्या चित्रांतून गौतम यशोधरा व राहुल यांचीं चित्रें दाखविलीं आहेत. बाप आपल्या मुलाला भिक्षापात्र देतांना पाहून प्रेक्षकांच्या मनांत किती मनोविकार थैमान घालत असतील, हें ज्यानें तो बोलपट पाहिला तोच जाणें. रात्रौ त्यानें घर सोडलें. छन्न हा सारथी व कथक हा घोडा बरोबर होता. मानवजातीला नवीन मार्ग दाखविण्याच्या हेतूनें सर्वस्वाचा त्याग करून हा ध्येयवादी तरुण कोणत्या मनःस्थितींत बाहेर पडला त्याचें दगडावरील चित्र नागार्जुनी कोंडाच्या शिल्पकलेंत सांठवलें आहे. तें वापरलें आहे. गौतमाच्या जन्मानंतर राजपुत्र सिद्धार्थाचें भवितव्य वर्तविणारे ब्राह्मण दाखविलेलें चित्र तर रमणीय व अत्यन्त आकर्षक आहे. मायादेवीनें लुंबिनीवनांत भगवंतांना जन्म दिला तें चित्र नागार्जुनी कोंडांतील अवशेषांपैकीं आहे. विश्वन्तरजातक सांचीवरून घेतलें आहे. महापरिनिर्वाणाचें चित्र गांधाराकडून मिळविले आहे. या अवशेषांचें छायाचित्र घेऊन तें पडद्यावर आणण्याचें अवघड काम श्री दिलीप गुप्ता यांनीं अत्यंत यशस्वी केलें. श्रीराजबंस खन्ना यांनीं सुंदर गोष्ट तयार करून ती वदविली. अमरावती, सांची, मथुरा, गांधार येथील छायाचित्रें घेऊन तीं योग्य रीतीनें व कलात्मक पद्धतीनें मांडणें व जुळविणें व त्यापासून अखण्डता (Continuity) निर्माण करणें हें किती अवघड काम आहे! पार्श्वसंगीत श्री सलील चौधरी यांनीं संभाळलें. छायाचित्रकार श्री दिलीप गुप्ता, संपादक ऋषिकेष मुखर्जी अशा रीतीनें निरनिराळे निष्णात कलावंत येऊन त्यांनीं आपल्या कर्तबगारीची परिसीमा गाठून हें उत्तम चित्र योग्य अशावेळीं जनतेपुढें मांडून भगवान बुद्धाचें नांव सर्वांच्या तोंडीं केलें; त्याबद्दल त्याचें आभार मानलें पाहिजेत. कलावंतांनीं हें स्वप्न सत्यसृष्टींत उतरविलें. भारतीय संस्कृतीच्या या अध्वर्यूच्या शिकवणीचे पडसाद त्याच्या परिनिर्वाणानंतर परदेशांत व आपल्या देशांतील संतांच्या जीवनांत व जीवनकार्यांत कसें उतरले हें दाखवून महात्मा गांधीपर्यंत हें लोण आणल्याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहोंत. बुद्धधर्म हिंदुस्थानांतून नाहींसा झाला नसून सर्वत्र तो पसरला व सर्वांच्या जीवनांत उतरला, हें ऐतिहासिक कार्य सर्वांना पटविण्याचें काम या बोलपटानें केलें आहे हें त्रिवार सत्य!

# धर्म-संस्थेचें स्थान

## आजच्या व उद्यांच्या सामाजिक जीवनांत

लेखक :—कुंदर दिवाण

" स्वराज आलें. आतां रविवारीं सुट्टी कशाला ? मी म्हणतों, कीं जगभर रविवारींच सुट्टी असते. तर भारतांतहि रविवारींच असली तर काय बिघडतें ! लोक उत्तर देतात कीं, हें आमच्या संस्कृतीशीं विसंगत आहे. अशा रीतीनें एका देशानें रविवारीं, दुसऱ्यानें सोमवारीं व तिसऱ्यानें शनिवारी अशा सुट्ट्या ठेवल्या तर परस्पर संबंध कमी नाहीं का होणार ? साऱ्या जगाचें एक कुटुंब व्हावें, या आमच्या प्रयत्नांत आजचे धर्म जर आडवे येत असतील तर ते नष्ट केले पाहिजेत. आतां ते "आउट ऑफ डेट" झाले आहेत. जुनेपुराणे झाले आहेत. त्यामुळें झगडे वाढत आहेत. एका जमान्यांत त्यांची आवश्यकता होती, आतां नाहीं. म्हणून आदरपूर्वक त्यांचा दाहसंस्कार करावयाला हवा; तिरस्कारपूर्वक त्यांची होळी नाहीं करायची. वडील मरण पावले, तर त्यांच्या प्रेताला आपण आदरानें दाहसंस्कार करतों. वडिलांचे प्रेत म्हणून कांहीं तें घरांत जतन करुन ठेवीत नाहीं. त्या प्रेताचा अनादरहि आपण करीत नाहीं. कारण तें आपल्याच वडिलांचें प्रेत असतें. आदरपूर्वक त्याचा दाहसंस्कार आपण करतों. त्याचप्रमाणें या जुन्या धर्मांना आपण आदरपूर्वक प्रणाम करूं, त्यांना सांगूं, कीं आपण महान् कार्य केलें आहे. पण आतां आदरपूर्वक आपणांला आम्ही निरोप देत आहों. मग त्यांच्या स्थानीं कोणाला बसवणार ? आत्मज्ञानाला."

**पू० विनोबा**

धर्म ही मानवाची अंतरंतर प्रेरणा आहे. त्यामुळें जोंवर मानव आहे, तर त्याच्या जीवनांत धर्माला अनपहार्य असें स्थान आहे. मानवाच्याच रीतीनें बोलायचें, तर धर्म हा मानवाइतकाच प्राचीन आणि मानवाइतकाच चिरंतन आहे. असा कोणताहि काळ नव्हता, कीं जेव्हां मानव धर्मरहित होता, किंवा असाहि कोणता काळ येणें संभवनीय नाहीं, कीं जेव्हां मानव धर्म-रहित होऊं शकेल. तसें कल्पिणें म्हणजे धर्म हा स्वभावच नव्हे असें म्हणण्यासारखें होईल.

> " चंद्र तेथें चंद्रिका । शंभु तेथें अंबिका ।
> संत तेथें विवेका । असणें कीं जी ।"

त्याप्रमाणें जिथें मानव, तिथें धर्म हा असलाच पाहिजे. धर्म म्हणजे स्वभाव-धर्म असल्यामुळें, तो केव्हांहि कोणाला टाकतां येत नाहीं, आणि जो टाकतां घेतां येतो तो मुळीं धर्मच नाहीं. सूर्याला प्रकाश, अग्नीला औष्ण्य कधींतरी टाकणें वा घेणें शक्य आहे का ? प्रकाश, औष्ण्य हें तर त्यांचें निजरूप आहे. त्याचप्रमाणें धर्महि माणसाचें निजरूप आहे. ऋग्वेदाच्या पहिल्याच सूक्तांत म्हटलें आहे,

" अग्निः पूर्वेभिर् ऋषिभिर् ईड्यो, नूतनैर् उत ". अग्नि हा पूर्वीच्या ज्ञान्यांना तसाच तो आजच्याहि ज्ञान्यांना, पूजनीय आहे. तसेंच धर्मांच्याहि बाबतींत म्हणतां येईल, कीं तो प्राचीनतम मानवाला, तसाच तो अद्यतन मानवालाहि, अनुसरणीय आहे; आणि पुढेंहि निरंतर तो तसाच राहील. हाच आशय

> " सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वा पुरोवाच प्रजापतिः ।
> अनेन प्रसविष्यध्वं एष वो स्त्विष्टकामधुक् ॥ "

या भगवदुक्तींत भरला आहे.

हा जो सहजात धर्म आहे, तो हिंदु, मुसलमान, ख्रिस्ती इत्यादि सांप्रदायिक धर्म नव्हे. तो धर्म म्हणजे आत्मधर्म होय. सत्योपासना, ज्ञानोपासना, हें त्याचें स्वरूप होय. मानवाला अनुभवानें कळलें, कीं विषानें मृत्यु ओढवतो. तेव्हां विष आणि विषारी पदार्थ न खाणें, आणि न खाऊं घालणें, हा धर्म झाला. मृतमांस रोगावह आहे असें अनुभवास आलें, तेव्हां मृतमांस न खाणें हाहि धर्म झाला. सर्वच प्राण्यांचें मांस खाद्य नाहीं. त्यापासून अनेक अपाय होतात. तेव्हां मांसाहारांत खाद्याखाद्य विचार आला. पुढें अनुभवानें लक्षांत आलें, कीं मांस खाणें हेंच मानवाला शोभिवंत नाहीं. त्यादृष्टीनें अधिक विचार आणि प्रयोग करतां अनुभवाला आलें, कीं, मांसाहार नुसता प्रशस्त नाहीं इतकेंच नव्हे, तर तो आरोग्यदृष्ट्या आणि आर्थिक लाभाच्या दृष्टीनें, इष्ट नाहीं. तेव्हां सर्व दृष्टींनीं दूरवरचा विचार करून समाजांतील कांहीं विचारवंतांनीं तो वर्ज्यच केला. तेव्हां मांसाहार करण्यापासून तो अजीबात वर्ज्य करण्यापर्यन्त सर्व प्रकार हे धर्म्यच होत. सत्यानुसरण वा ज्ञानानुसरण हा अेक धर्म त्या सर्वांत अनुस्यूत आहे.

> " यज्ञेन यज्ञं अयजन्त देवाः । तानि धर्माणि प्रथमानि आसन् "

असें एक वेद-वचन आहे. देवांनीं यज्ञाच्या योगें यज्ञाचें यजन केलें. तीं सगळीं आरंभींचीं धर्में होतीं-असा त्याचा अर्थ आहे. इथें धर्म शब्द कर्म शब्दासारखा नपुंसकलिंगी आला आहे. आज आपण तो पुल्लिंगीच वापरतों आणि एकवचनी वापरतों. म्हणजे धर्मकर्में अनेकानेक असलीं, तरी धर्म एकच आहे हा शोध आणि बोध आपल्याला लाभला आहे.

पूर्वीं पशुबलीनें यज्ञ करीत. पण तीं यज्ञकर्में म्हणजेच " धर्माणि ", धर्मकर्में, हीं " प्रथमानि " म्हणजे प्रारंभींच्या काळचीं, जेव्हां आम्हांला आजच्यासारखें ज्ञान झालें नव्हतें तेव्हांचीं, होत. तीं कांहीं आज अनुकरणीय नव्हेत. आज तर आमच्या अद्यतन ज्ञानानुसारच आम्हांला त्या " यज्ञा "चें म्हणजे यजनीय सत्याचें यजन केलें पाहिजे.

(अपूर्ण)

# बाग आणि बगीचा

( मान्यवर – श्री. बाळासाहेब खेर )

[ ‘ आकाशवाणी ’ मुंबईच्या सौजन्यानें ]

[ मागील अंकावरून समाप्त ]

आजकाल कोण झाडाच्या रवलीचा किंवा पुष्पफळादिकांच्या सौंदर्याचा विचार करतो ? कुणाला फुरसत आहे ? म्हणूनच आपलीं उपवनें वाळून कोळून जात आहेत, तोडलीं जात आहेत आणि जाळलीं जात आहेत—

पुंसां सर्वसुखैकसाधनफलाः सौंदर्यगर्वोद्धुरः
क्रीडालोलविलासिनीजनमनः स्फीतप्रमोदावहाः ।
गुञ्जद्–भृंग–विनिंद्र–पङ्कज भरस्फारोल्लसद्दीर्घिका–
युक्ताः सन्ति गृहेषु यस्य विपुलारामाः स पृथ्वीपतिः ॥

असे आरामाचें वर्णन करणारे लोक याच देशांत होते, यावर कोणाचा विश्वास बसेल ?

उद्यानरचनेची कला पूर्वीच्याकाळीं आपल्याकडे चांगली अभ्यासिली जात होती. कोणचीं झाडें कोठें लावावयाची, बागेमध्यें आराम करावयाची जागा अथवा लतामण्डप कोठें उभारावयाचे, जलोद्गारयन्त्रें कुठें असावींत, यांची कांहीशी कल्पना तत्कालीन ग्रंथ वाचणारांना करतां येईल. ‘ वृक्षायुर्वेद ’ नांवाच्या ग्रंथांतील पादपविवक्षा, बीजारोपणविधि, निषेचनविधि, द्रुमरक्षा, उपवनक्रिया, विहिरी खोदण्यासाठीं भूमिपरीक्षा, वनस्पतिपोषणविधि, तरुचिकित्सा, फळें व धान्य यांच्या किंमती काढण्याच्या रीती या सर्वांचा उल्लेख या शास्त्राच्या प्रगतीचा द्योतक आहे. वनें, उपवनें, आराम व उद्यानें या विषयांवरील माहिती ऋग्वेद, अथर्ववेद पासून ते महायान व हीनयान बौद्ध ग्रंथापर्यंत अप्रतिहत सांपडते, असें सांगितलें कीं त्यांत सर्व आलें.

पण इतक्या प्राचीन गोष्टी सोडून देऊं. या नजीकच्या इतिहासाकडे पाहिलें तरी मोगल राज्यांत बागबगिच्यांची व्यवस्थित मांडणी व सुधारणा अनेक ठिकाणीं झालेली दिसते. उत्तर हिंदुस्थानांतील तसेंच काश्मीरमधील शालिमार, निशातबाग, वगैरे बागा ‘ पृथ्वीवरील स्वर्ग ’ म्हणून जगांत सर्वविश्रुत आहेत.

अगर—

फरछेझ बरुऐ झमीनस्त
हमीनस्त हमीनस्त हमीनस्त ।

“ पृथ्वीच्या पाठीवर जर कुठें स्वर्ग असला तर तो इथेंच आहे, इथेंच आहे, इथेंच आहे— ” असें या बागा पाहून प्रत्येकास वाटेल.

पेशवाईतील बागबगीचे देखील प्रसिद्ध होते. शनवारवाड्यांतील मोंगल बगीच्याच्या धर्तीवर तयार केल्या असलेल्या बगीचांचे अवशेष अद्याप आपणास दिसतात. या बगीच्यांचें वर्णन अनेक परदेशी लोकांनीं केलें आहे ‘ हजारी कारंज्यां ’चें वर्णन प्रसिद्धच आहे. एका षोडशपत्री कमळपुष्पाकृति हौदाचे मध्यभागीं सोळा पाकळ्यांच्या कमळाच्या आकाराचे १८१ फवारे लावलेलें असें हें सहस्रधार कारंजें होतें. त्याचा परीघच ८० फूट होता. अलम् दुनियेंत याच्या एवढें मोठें कारंजें नसावें असें म्हणतात.

१७९५ सालीं ‘ विल्यम प्राइस ’ यानें पर्वतीच्या पायथ्याशी असलेल्या पेशव्यांच्या शिकारखान्याबद्दल आपल्या रोजनिशींत लिहिलें आहे कीं, “ या बागेंत शंभरावर जनावरें आहेत. असा शिकारखाना सबंध दख्खनमध्यें कोठेंहि नाहीं. ” नाना फडणीसानें त्याच्या देखरेखीसाठीं एक स्वतंत्र खातें उघडलें होतें. इथें सिंह, गेंडे, यासारखीं वन्य जनावरें ठेवण्यांत आलीं होतीं. त्यांची योग्य निगा ठेवण्यांत येत असे. सांबर, हरीण, काळविटें, माकड, ससे हे प्राणी भरपूर होते. या बागेंत कोठेंहि कुंपण घातलेलें नव्हतें, असें म्हणतात.

या शिवाय एकट्या पुण्यांत तेरा ठिकाणीं सुंदर बगीचे होते. हिराबाग तुळसीबाग, विश्रामबाग या खरोखरीच्या बागा होत्या. हिराबाग ही फार प्रसिद्ध आणि पेशव्यांची आवडती बाग होती. बागेंत त्यावेळच्या युरोपियन लोकांना मेजवान्या दिल्या जात. याशिवाय नाना फडणीस, मोरोबादादा, हरिपंत फडके वगैरे तत्कालीन पुढाऱ्यांचे खाजगी बगीचेहि होते. या बगीच्यामुळें पुणें त्यावेळीं “ दख्खनची बाग ” म्हणून ओळखलें जाई.

अव्वल इंग्रजी अमदानींत पुरातन वैभवाबरोबरच पुरातन बागाहि नष्टप्राय झाल्या. नाहीं म्हणायला कांहीं देशी संस्थानिकांनीं हौस म्हणून व कांहीं थंड हवेच्या ठिकाणीं युरोपियनांनीं स्वतःच्या उपयोगासाठीं म्हणून बनविलेलीं उद्यानें अद्याप दिसतात. पण त्यांत सामान्य जनांनीं त्याचा उपयोग करावा हा हेतु नव्हता. स्वातंत्र्याच्या चळवळीबरोबरच जनतेंत जी स्वाभिमानाची लाट उसळली तींत इतर गोष्टीं-बरोबर इकडेहि लोकांचें लक्ष वळलें, आणि बागा आणि उद्यानें, हीं सार्वजनिक असलीं पाहिजेत, ही जाणीव निर्माण झाली. राष्ट्रीय उद्यानांचा विचार यांतूनच जन्म पावला आहे.

राष्ट्रीय उद्यानें ( Nationl Parks ) हा एक उद्यानांचा आधुनिक प्रकार आहे. जसजशी निरनिराळ्या देशांतील लोकसंख्या वाढत गेली आणि आधुनिक भौतिक शास्त्रांचा उपयोग जीवनांत अधिकाअधिक होऊं लागला तसतशी लोकांची प्रवृत्ति नैसर्गिक आणि मानवरचित वनराजीचा नाश करण्याकडे होऊं लागली. परिणामीं सुंदर वृक्ष, वेलीं, फुलें, पशु व पक्षी इतिहासाच्या पुस्तकांत जमा होण्याचा प्रसंग ओढावला. तेव्हां इंग्लंड, अमेरिका, फ्रान्स, जर्मनी वगैरे स्वतंत्र देशांतील लोकांनीं चळचळ करून देशांतील ठराविक स्थळांना राष्ट्रीयसंरक्षण देवविलें, म्हणजे तेथें या वस्तूंचा मानवकृत नाश थांबविला आणि पशुपक्षी व वनस्पति यांना स्वच्छंद विहारास व विकासास मोकळीक करून दिली. या जागा राष्ट्रीय उद्यानें ( Nationl Parks ) बनल्या. अमेरिकेंतील राष्ट्रीय पार्क प्रसिद्धच

…हेत. आफ्रिकेतील " क्रूगर–पार्क " चार हजार चौरस मैल पसरला …हे.

आपल्याकडेहि अशीं राष्ट्रसंरक्षित उद्यानें निर्माण करण्याची वेळ …लेलीं आहे, व सुरुवात झाली आहे. आपला देश गरीब. एवढीं मोठीं …ानें बनविणें कदाचित् शक्य नाहीं. परंतु प्रारंभ म्हणून आणि पुढील …तीस अवकाश रहावा म्हणून मुंबई प्रान्तांत अशा उपवनांची सुरुवात …ण्यांत आलेली आहे. कर्नाटकच्या उत्तर भागांत दांडेलीजवळ. पशुपक्षी झाडेंझुडपें यासाठीं प्रसिद्ध असणारा ८० चौरसमैलाचा भाग सृष्टीं…च्या अपल्यांच्या स्वैरसंचारासाठीं राखून ठेवण्यांत आला आहे. या …ांतील नैसर्गिक संपत्तींचें व वैभवाचें रक्षण करण्यासाठीं सर्व तजवीज …ण्यांत आली आहे. हें सौंदर्य पाहण्यासाठीं येणाऱ्या प्रेक्षकांचीहि …ं व्यवस्था करण्यांत येत आहे. याशिवाय आणखी कोणत्या इतर …काणीं उपवनें बनविणें शक्य होईल याची माहिती सरकार गोळा करीत …हे. मुंबई, गुजरात, कोंकण, खानदेश व कर्नाटक या निरनिराळया …ागांत अशी उपवनें तयार केलीं जातील. मुंबईजवळचें बोरीवलीचें कृष्णगिरी उपवन, " तुमच्यांपैकीं पुष्कळांनी पाहिलेंहि असेल. …यांत पर्वतीजवळ सिंहगडापाशीं आणि इतरहि योग्य अशा ठिकाणीं …शा प्रकारचीं लहानमोठीं उपवनें हळूहळू तयार होतील.

आतां पर्यंत उपवनांकडे सौंदर्य दृष्टीनें पाहून विचार केला. उपयुक्ततेची …ष्टि कलाकृतींना नेहमींच मानवते असें नसलें तरी उपवनांना उपयुक्तते…ही एक बाजू आहे, हें उघड आहे. नारिंग जेवढें मधुर तेवढेंच त्याचें झाड …लें सुवासिक असतात. जाईची वेल फुलासाठींच नव्हे, तर भिंती …आच्छादण्यासाठीं वापरतां येते. मेथीचे आणि कोथिंबिरीचे वाटवे व पोपई, …ांबे, पेरू, जांभूळ, अंजिरें, केळींहि हीं फळांचीं झाडें शोभा आणि …प्रयोग या दोन्हीसाठीं सारखींच उपयुक्त आहेत. हल्लींच्या अन्नटंचाईच्या …दिवसांत याला किती महत्त्व आहे, हें सांगणें नकोच. ' बागबगीचे श्रीमंता…ठीं, आपणां गरिबांना त्याचें काय ? ' ही कल्पना आपण विसरली …हिजे. शेंकडों सार्वजनिक उद्यानें व उपवनें तयार केलीं पाहिजेत.

बागबगीचे यासंबंधी बरीच माहिती सांगून झाली. आतां याबाबतींत …ागरिकांच्या कर्तव्यासंबंधीं दोन शब्द सांगितले तर तें वावगें होणार नाहीं. इतर कलांप्रमाणें या कलेसंबंधी देखील आपण फार उदासीन आहोंत. …आपणांपैकीं थोडेच जण मुद्दाम बागा पाहाण्यासाठीं परगांवीं किंवा गांवा…ळ दहापांच मैलहि जातात. अनेकवर्षें, मुंबईत असून ' राणीचा बाग ' ' हँगिंग गार्डन्स् ' व पुण्यांत राहून ' बंड गार्डन ' व ' एम्प्रेसगार्डन ' न …हिलेले पुष्कळ लोक आपणास आढळतील. मग बाग बनविण्याची गोष्ट …च राहिली. जपानांतील बागा ज्यांनीं पाहिल्या आहेत ते लोक सांगतात …, बागेसाठीं जागा नाहीं असें म्हणणें हास्यास्पद आहे. तेथें गरीबश्रीमंत …क मनुष्य स्वतःची बाग लावीत असतो, व आपल्या गांवांतील …देशांतील बागांचा अभिमान बाळगितो. फूलदाणीत फुलें नीट लावणें, …मित्रांना फळांच्या भेटी देणें या गोष्टी कलाकृति म्हणून प्रत्येक जपानी …मुला शिकविण्यांत येतात. जपान हा देश अत्यन्त दाट लोकवस्तीचा …व्यापिक समजला जातो. आपल्या सुवर्ण भूमीला जपानी लोकांपासून …ीं शिकण्यासारखें नाहीं काय ? आपलें जीवन आनंदी करण्याचा हा …प्रयत्न आपण करावयास नको काय ? …माझी खात्री आहे आपण करालच !

---

## प्रभो, हात दे मज

हे प्रभो, हात दे मज
बळकट दणकट
दुबळ्यांना सांवरण्या
पतितांना उचलाया !

हे प्रभो, हात दे मज
कारुण्यपूर्ण प्रेमळ
पुसण्याला दुःखीतांचे
डोळ्यांतील अश्रु-जळ !

हे प्रभो, हात दे मज
झिजण्या दुज्यांकरितां
…सुगंधावें जीवन हें
चंदनासम झीजतां !

हे प्रभो, हात दे मज
तडफडणारें सदा
तळमळणारे आणि
पाहूनि कुणाच्या व्यथा !

—अनन्त कदम

---

## कालाय तस्मै नमः !

काळा राज्य तुझें जगावर असे तूं सर्वसत्ताधर ।
नेसी खेचुनिया जिवांस सगळ्या, स्वर्गस्थ इंद्रासही ॥
कोणी ना सुटला करांतुनि तुझ्या, तूं क्रूरही निर्दय ।
पर्वा ना तुजला, क्षणांत करिसी तूं नाश; वाटे भय ॥
भेदाभेद वसे न अंतरिं तुझ्या, हो संत वा दुर्जन ।
राजारंक समान सर्वहि तुला, ब्रह्मांड कालोदरीं ॥
लीला घोर तुझी अगाध करणी, तूं दुःख देसी जगा ॥
सत्ता गाजविसी विनाशक तुझें वर्चस्व विश्वावर ॥
कीर्ती वैभव गर्व नष्ट करिसी लावण्य तारुण्यही ।
गेले लोळत रावणादिक किती मातींत सत्तांध ते ॥
जाती सोडुनि पुत्र बंधु प्रिय ते सन्मित्र तूझ्यामुळें ।
अंतःकाळिं हताश मानव बने, जाळी निराशा मना ॥
वाटे शाश्वत तूं अशाश्वत जगीं सर्वज्ञ, सर्वेश्वर ।
काळाचा न कुणास अंत कळला, कालाय तस्मै नमः ॥

—राम-जनक

# आनंदाचा कंद हरि हा !

लेखकः श्री. मोरेश्वर वासुदेव लिमये, बी.ए. ऊर्फ श्रीअवधूतस्वामी

धर्मचक्रांतील—लेखांक ५ वा



माझें मी करितां गेले हे दिवस । न धरीच विश्वास रामनामीं ॥
अंतीं तुज उद्धरती राम-कृष्ण-हरी । राम पंचाक्षरी मंत्रसार ॥
कां करिशी सांठा प्रपंच विस्तार । न तुटे येरझार नामेंवीण ॥
नामा म्हणे ऐसें रामनामीं पिसें । तो उद्धरेल आपैसें इहलोकीं ॥ ६६ ॥

संसारांत नानातऱ्हेचे प्रयत्न करूनसुद्धां सुख लाभलें नाहीं. शिक्षण मिळव, बायको मिळव, पैसा मिळव, इस्टेट मिळव, जे जे मनांत येईल ते सर्व मिळविलें; परंतु समाधान जरा सुद्धां लाभलें नाहीं. कारण खरें सुख-समाधान कशांत आहे हें कधींच समजलें नाहीं. संसाराची कटकट संपण्याचें कांहीं चिन्हच दिसेना. रोज कांहीं तरी नवीन भानगड आहेच. शेवटीं असें वाटलें कीं, परमेश्वराची भक्ति करून तरी या संसारांतील संकटें कमीं होतील. म्हणून कोणाला तरी विचारून कांहींतरी पूजा अर्चा जपजाप्य सुरूं केलें; पण त्याचाही कांहीं उपयोग झाला नाहीं. बरोबरच आहे. परमेश्वरावर विश्वासच नाहीं तर तो प्रसन्न तरी कसा होणार ? व संसारांतील दुःखें नाहींशी कशी होणार ? सर्वच खेळखंडोबा. शेवटीं या संसाराचा वीट आला. परमेश्वराशिवाय आधार नाहीं असें पूर्णपणें वाटलें. संतांच्या वचनावर श्रद्धा बसली. मनुष्यजन्माला येऊन परमेश्वर-प्राप्ती करून घेणें, हेंच खरें कर्तव्य आहे हें कळलें; व सद्गुरुला शरण जाऊन भक्तिमार्गाची व गुरुमंत्राची प्राप्ती झाली. पण तेव्हां समजलें कीं हा भक्तिमार्ग जेवढा वाटला तेवढा सोपा नाहीं. कारण त्यानंतर खऱ्या कसोटीला सुरुवात झाली. संसारावर मोठमोठे आघात होऊं लागले, पैशाच्या अडचणी, कुटुंबियांचें व स्वतःचें आजारपण, आप्तेष्टांचे विरोध, एक ना दोन अशीं संकटें निर्माण होऊं लागलीं व अनन्वित दुःख झालें. त्यामुळें गुरूवरचा, प्राप्त झालेल्या भक्तिमार्गावरचा व गुरुमंत्रावरचा विश्वास उडाला ! हें सर्व खरें आहे किंवा नाहीं याबद्दल नाना तऱ्हेचे संशय निर्माण झाले. याला खरें कारण हेंच होतें कीं, संसारांतील विषय-सुखाबद्दल खरें तीव्र वैराग्य प्राप्त झालें नव्हतें. परमेश्वरावर शुद्ध प्रेम व एकनिष्ठ श्रद्धा नव्हती. सर्व दोष आपल्याकडेच होता. परमेश्वरानेंच जर हा संसार मायावी व भ्रममूलक म्हणून निर्माण केला आहे तर त्या संसारापासून सुख-समाधान परमेश्वरभक्तीनें तरी कसें प्राप्त होणार ? खरें सुख-समाधान परमेश्वराच्या दृढ प्रेमांतच आहे. अशा प्रेमानेंच जेव्हां सद्गुरुला शरण जाऊन भक्तिमार्गाचें अवलंबन केलें जातें, तेव्हां साहजिकच सद्गुरुनें दिलेल्या मंत्रावर विश्वास बसून त्याच्या जपामुळें संसाराबद्दल तीव्र वैराग्य उत्पन्न होतें व सर्व संकटें व आघात सहन करण्याचें मनोधैर्य प्राप्त होतें. तेव्हांच भक्तिमार्गाचा आनंद प्राप्त होतो.

या संसाराचा शेवट मृत्यूनें होतो असें वाटतें. तो भ्रम आहे. जोंपर्यंत मनांतील वासनांचा मळ साफ धुवून गेला नाहीं तोंपर्यंत संसारांतील जन्म मृत्यूचा फेरा चुकत नाहीं व जीवात्म्याचा उद्धार होत नाहीं. जीवात्म्याचा त्याच्या परमात्मस्वरूपाशीं योग होणें हाच त्याचा उद्धार. परमेश्वरावरील दृढ विश्वासानें सद्गुरुची कृपा प्राप्त होते; तेव्हां गुरुमंत्रानें जीवात्म्यावर योग्य ते संस्कार घडून त्याच्या ठिकाणचें सर्व अज्ञान नष्ट होतें व तो पायरीपायरीनें राम व कृष्ण या स्वरूपांचें ज्ञान प्राप्त होऊन शेवटीं श्रीहरिरुपी परमात्म्याशीं ऐक्य पावतो सर्व जग पंचमहाभूतात्मक आहे. त्यामुळें जीवात्म्याला जेव्हां मनुष्य देह प्राप्त होतो तेव्हां तो पृथ्वी, आप, तेज, वायु व आकाश ह्या पंचमहाभूतांनीं पछाडलेला असतो व त्यांच्या मायावी शक्तीनें संसारांत नेहमीं भ्रमण पावून केव्हां हंसतो, केव्हां रडतो, केव्हां सुखांत असतो, केव्हां दुःखी होतो. केव्हां स्वस्थ झोंप घेऊन घोरत असतो, केव्हां कर्मांच्या व्यापांत गुंतलेला असतो, केव्हां निश्चिंत असतो, केव्हां अत्यंत काळजींत असतो. अशी वेड्यासारखी त्याची अवस्था होते. संसाराचा हा सर्व पसारा या पंचमहाभूतांनींच चालविला आहे. त्यांचीच सर्व सत्ता आहे. त्यामुळें या जगांत महाभूतबाधेपासून सोडविण्यास कोणीच समर्थ नाहीं व कोणतेंच साधन उपलब्ध नाहीं. पण या पंचमहाभूतांनाही उत्पन्न करून त्यांना लीलेनें खेळविणारा व त्यांचा नाश करणारा पंचाक्षरी परमेश्वर आहे. त्याला जर अनन्यभावानें शरण गेले तर तो या पंचमहाभूतांच्या पोटांतच श्रीसद्गुरुरूपानें प्रगट होतो व आपल्या मंत्रसामर्थ्यानें जीवात्म्याला महाभूतबाधेपासून सोडवून त्याला आपल्या परमात्मस्वरूपांत लीन करून घेतो.

या जगांत मनुष्य देहानें वावरणारा जो जो जीव आहे त्याच्यामागें कर्माचा व्याप सारखा लागलेला आहे. कर्माचें वर्म कळत नाहीं म्हणून व्याप सुटत नाहीं. अज्ञानानें सर्वजण आपल्यावर अनेक कर्तव्यकर्माची बंधनें लावून घेतात. कित्येक गोष्टी केवळ पूर्वापार जगांत चालू आहेत म्हणूनच केल्या जात आहेत. विशिष्ट आहार, विशिष्ट कपडे, कुटुंबामध्यें व जगामध्यें विशेष वागण्याच्या पद्धती, धर्मशास्त्रांच्या नांवाखालीं चालत आलेल्या रूढी–अशा अनेक गोष्टी कां करायच्या याचा विचार न करतां केल्या जात आहेत व तेंच आपलें खरें कर्तव्य मानून त्यांतच मोठेपणाची हांव निर्माण झाली आहे. पुष्कळ पैसा मिळविणें, बायकामुलें असणें, घरांत पुष्कळ माणसें असणें, पुष्कळ घरें, जमीनजुमला असणें, अनेक उपभोगाचीं साधनें व वस्तू प्राप्त असणें यालाच

जगांत मोठेपणाची किंमत आहे व हा मोठेपणा मिळविण्यासाठींच सर्व धडपड चालू आहे. पण या मोठेपणाबरोबर केवढा व्याप व संताप जीवाला होत असतो ! केवढीं अनन्वित दुःखें त्याला भोगावीं लागतात. या सर्व मोठेपणावर त्याचें मन गुंतलेलें असतें. त्यांत थोडी हानि झाली तरी त्याला सहन होत नाहीं. पण सर्वांलाच कालांतरानें नाश आहे व तो चुकत नाहीं. हा नाश होतो तेव्हां माणसाची केविलवाणी स्थिति होते. शेवटीं तो स्वतः मृत्यूच्या स्वाधीन होतो व जातांना आपला सर्व व्याप आप्तेष्टांच्या स्वाधीन करून जातो. असें हें अनेक जन्म चाललें आहे व या चक्राला कधी शेवटच नाहीं. परमेश्वराच्या या जगरूपी खेळांत आपण केवळ निमित्त आहों. या खेळांतलें आपण एक सोंग आहों. आपलें कांहीं नाहीं. सर्व परमेश्वराचें आहे. प्राप्त झालेलें कर्तव्यकर्म करून सुखदुःखाची क्षिति न धरतां आलेले प्रारब्ध भोग स्वस्थ चित्तानें भोगणें व परमेश्वराचा हा खेळ गंमत म्हणून पाहणें, हेंच आपल्या जीवनाचें सर्व सार आहे. हें पूर्णपणें पटून अनुभवाला आलें म्हणजे संसाराचा सर्व व्याप संपला. यासाठींच परमेश्वरावर पूर्ण श्रद्धा व प्रेम पाहिजे व परमेश्वराचा हा अद्भूत खेळ समजावून घेण्यासाठीं सद्गुरुला शरण गेलें पाहिजे.

दोन तरवारी एका म्यानांत राहूं शकत नाहींत. संसार व परमार्थ दोनही गोष्टी मनाच्या ठिकाणीं एकाच वेळीं नांदूं शकणार नाहींत. जोंपर्यंत संसाराची गोडी व विषयांची आसक्ती आहे, तोंपर्यंत परमेश्वरावर प्रेम नाहीं हें नक्की समजावें. जेव्हां संसाराचा कायमचा वीट येऊन अंतःकरणांत तीव्र वैराग्य प्राप्त होईल, परमेश्वराशिवाय या संसाराला आधार नाहीं असा बुद्धीचा निश्चय होईल तेव्हांच परमेश्वरावरचें प्रेम निर्माण झालें असें समजावें. आणि मग परमेश्वराशिवाय दुसरा ध्यास नसल्यामुळें त्याच्या नामाचें कायमचें वेड लागेल–' मी गातों नाचतो आनंदें । वेडा झालों मीं तव छंदें ॥ ' अशीच अवस्था होईल. असें परमेश्वराचें वेड लागलें म्हणजे जीवात्म्याचा उद्धार होऊन या संसारांतून सुटून परमात्म्याशीं एकरूप होण्याचा अमृत योग प्राप्त झाला असें समजावें.

जसा जीवाला जन्म घेण्याला संसार निमित्त आहे तसा जन्ममुक्त होण्यालाही संसारच निमित्त आहे. अनेक जन्म घ्यायला लावणारी वासना या संसारांतच आहे. जन्माला आल्याबरोबरच जो वासनेचा मळ लागतो तो जातां जात नाहीं. शरीर गेलें तरी मनाच्या वासना नष्ट होत नाहींत. दुसऱ्या जन्मीं शरीराच्या ठिकाणीं त्या पुनः निर्माण होतात. जसें वासनेचें तसेंच परमेश्वराच्या प्रेमाचें आहे. एका जन्मांत एकदां तें निर्माण झालें कीं तसेंच जन्मोजन्मीं वाढत जातें. मग एक जन्म असा येतो कीं संसार, वासना व परमेश्वर भक्ति यांच्या युद्धाचा रम्य प्रसंग निर्माण होतो. हा जन्म वीराचा, शौर्याचा व धैर्याचा असतो. यांत कितीतरी गंमती अनुभवाला येतात. या युद्धांत विजय मिळविण्यासाठीं जीवात्मा सर्व योग्य संस्कार झाल्यामुळें, युद्धाची सर्व साधनें प्राप्त करून घेतो. तो परमेश्वराला नवविधा भक्तीनें आळवितो. त्यामुळें परमेश्वर प्रसन्न होऊन त्याला वैराग्याचें कवच देतो. संतसंगतीमुळें त्याला मनोधैर्य व उत्साह प्राप्त होतो, व श्रीसद्गुरुला शरण गेल्यामुळें श्रीसद्गुरु त्याला नाममंत्राचें खड्ग त्याच्या हातीं देतात. व त्याबरोबर आत्मबोधरूपी युद्धाचें शिक्षण त्याला मिळतें. हीं सर्व योग्य व आवश्यक साधनें प्राप्त झाल्यामुळें तो आपल्या षड्रिपूंना युद्धांत जिंकून संसारांतील अज्ञानाचा त्याची वासनारूपी भार्या व विषयरूपी सर्व कुळांसह नाश करतो. मग तो विजयी वीर परमेश्वराच्या व सद्गुरुच्या कृतज्ञतेनें अंतःकरण भरून गेल्यामुळें आनंदानें बेहोष होतो. त्याला आपल्या परमात्मस्वरूपाचें स्वतःच्याच ठिकाणीं दर्शन घडतें व तो धन्य होतो.

> नको नको माया सांडीं लवलाह्या । पुढील उपाया झोंबें कां रे ॥
> रामनाम म्हणे तुटेल बंधन । भवबंधमोचन एक्या नामें ॥
> स्मरतां पतित उद्धरले यथार्थ । नाम हाचि स्वार्थ तया झाला ॥
> नामा म्हणे हा जप करीं तूं अमूप । रामें चुके खेप इथें जनीं ॥ ६७ ॥

परमेश्वरानें निर्माण केलेलें हें अफाट विश्व इतकें सूत्रमय चाललें आहे कीं बुद्धिमतांचीसुद्धां मति गुंग व्हावी. एखाद्या अफाट राज्यांतील राजाप्रमाणें परमेश्वर म्हणून जर कोणी व्यक्तिरूपानें प्रगट असता तर त्याच्याकडे बोट दाखवून सांगतां आलें असतें कीं, याच्या सत्तेमुळें हें सर्व विश्व चाललें आहे. या विश्वांतच असें कांहीं निरनिराळे घटक निर्माण झाले आहेत व त्यांचे संबंध एकमेकांशीं असे निगडित आहेत कीं, त्यामुळें सर्वांचे व्यवहार सुरळींत चालले आहेत. आपल्या या जगाचाच विचार केला तर आपण असें पाहतों कीं, सूर्य आपला प्रकाश देण्याचें कार्य सदैव करीत आहे. पृथ्वी त्याच्याभोंवती फिरत आहे व स्वतःभोंवतीही गिरक्या घेत आहे. त्यामुळें पृथ्वीवर निरनिराळे ऋतुमान व दिवस रात्र आपोआप घडत आहेत. समुद्राच्या पाण्याचे मेघ बनून पृथ्वीवर ठराविक काळीं वृष्टी होत आहे. चंद्र पृथ्वीभोंवतीं फिरत आहे. व आपल्या किरणांनीं पृथ्वीवरील वनस्पतींचें पोषण करीत आहे. ब्रह्मदेवाच्या संकल्पाप्रमाणें मानव व इतर पशु पक्षी वगैरे प्राणी वारंवार उत्पन्न होत आहेत व मृत्यू पावत आहेत. जन्माला आल्यापासून प्रत्येक प्राणी आपापल्या पूर्वप्रारब्धाप्रमाणें व या जन्मीच्या संस्काराप्रमाणें विशिष्ट भूमिकेंत वावरत आहे. स्त्री व पुरुष भेदामुळें विवाह होत आहेत, नवीन प्रजा निर्माण होत आहे. पूर्व संस्कारामुळें पति-पत्नी, आई-बाप, बंधु-भगिनी, पिता-पुत्र, मालक-नोकर, राजा-प्रजा इत्यादि असंख्य संबंध निर्माण होऊन सर्व माणसें त्याप्रमाणें व्यवहार करीत आहेत. पूर्व प्रारब्धामुळें कोणी श्रीमंत–कोणी गरीब, कोणी धट्टाकट्टा, कोणी पंगू, कोणी सुस्वरूप, कोणी कुरूप, कोणी ब्राह्मण, कोणी शूद्र–अशा नाना तऱ्हेच्या अवस्थेंत जन्माला आल्यामुळें त्याप्रमाणें अहंकार बाळगून आपापलीं कर्में करीत आहेत. त्यांत चांगल्या अगर वाईट वासनेप्रमाणें कोणी सज्जन कोणी दुर्जन, कोणी सच्चा कोणी लुच्चा, कोणी उद्योगी कोणी आळशी–अशा भेदानें निर्माण झाल्यामुळें एकमेकाला सुखदुःखें देत आहेत. प्रत्येकाच्या बुद्धीप्रमाणें मनुष्य नाना तऱ्हेचे उद्योगधंदे मोठ्या अभिमानानें करत आहेत. कोणी नोकऱ्या करीत आहेत, कोणी व्यापारी आहेत, कोणी शेती करीत

आहेत, कोणी वकील, कोणी डॉक्टर, कोणी काय, असे नाना तऱ्हेचे धंदे करीत आहेत व जगांतले निरनिराळे व्यवहार सारखे अव्याहत चालले आहेत. त्याला कधीं स्तब्धताच नाहीं. बरें, हें सर्व चाललें तें इतकें बिनत्रोभाट व आपसूक कीं तें कसें चाललें आहे हेंच समजत नाहीं. या सर्वांच्या बुडाशीं कोणाची तरी प्रेरणा आहे, हें निश्चित व हीच त्या भगवंताची माया. माया म्हणजेच खोटेपणा. माया म्हणजेच मोह. सर्व प्राणिमात्रांना या मायेंत निर्माण करून त्यांना एकमेकांच्या मोहांत अडकविल्यामुळें घाण्याचा बैल जसा डोळे बांधल्यामुळें घाण्याभोंवती फिरत राहतो त्याप्रमाणें राजापासून रंकापर्यंत सर्व मनुष्यें व इतर प्राणी मायेनें डोळे बांधल्यामुळें या संसारांत फिरत आहेत. परमेश्वर मात्र बाजूला राहून त्या सर्वांची गंमत पहात आहे. त्याला कोणाचे ना सुख ना दुःख. कोणी जन्माला आला काय मेला काय, कोणी हंसला काय, कोणी रडला काय, कोणी सुखी झाला काय किंवा दुःखी झाला काय, परमेश्वराला त्याचें कांहींच नाहीं. आपल्या मायेची गंमत पहात तो स्वस्थ आहे.

परंतु या मायेंत एक भगवंताचें कौतुक असें आहे कीं, मायेंत निर्माण होणाऱ्या मानवी शरीरांत तो भगवान आत्म्याच्या रूपानें प्रत्यक्ष वास करतो आणि म्हणूनच मनुष्याला मायेच्या पलीकडे असलेल्या परमेश्वराबद्दल प्रेम निर्माण होऊन त्याची कृपा संपादन करतां येते व योग्य प्रयत्नानें त्या मायेची सर्व बंधनें तोडून त्या परमेश्वराशीं एकरूप होतां येतें. मायेंत गुरफटून गेल्यामुळें अनन्वित दुःखें भोगणाऱ्या मानवाला हा केवढा आधार आहे! हाच आधार सर्व संतांनीं स्वतः प्राप्त करून घेतला व इतर दुःखी जीवांना दाखवून दिला. त्यांच्या उपदेशावर ज्यांची श्रद्धा बसली ते सद्गुरुला शरण गेले व मायेला आपल्या सत्तेंत चालविणाऱ्या त्या महामायेश्वराचा नाममंत्र त्यांना मिळाल्यामुळें ते या जन्मींच मायेंतून मुक्त झाले. जगांत संत सत्पुरुष नेहमींच जन्माला येतात. त्यांच्या तपश्चर्येनें जगांत धर्माचें व भक्तिमार्गाचें रक्षण होत असतें. मायेंत गुरफटलेल्या जीवांना मायेंतून सुटून परमेश्वरप्राप्तीचा मार्ग दाखविणें हेंच त्यांचें कार्य जगांत असतें. हें परमेश्वराचेंच कार्य आहे; म्हणून तें सत्यस्वरूप आहे. त्यावर श्रद्धा ठेवून सर्व माणसें परमेश्वर प्राप्तीचा हा सत्यमार्ग कां बरें स्वीकारीत नाहींत? कारण त्यांना विवेक नाहीं. आपल्या ह्या जगांतील जीवनाचा ते कधीं विचार करीत नाहींत. आपण या मायेनें किती तऱ्हेनें मोहपाशांत अडकून बांधले गेले आहोंत हें त्यांना समजत नाहीं. पण असा विचार करतां करतां त्यांना जेव्हां संतसंगति प्राप्त होते तेव्हां त्यांना कळून येतें कीं या संसाररूपी परमेश्वरी मायेची प्रत्येक गोष्ट खोटी आहे. सर्व गोष्टी खऱ्या आहेत हें अज्ञानानें वाटतें. या अज्ञानामुळें सर्व दुःखें निर्माण होतात. ही सर्व माया खोटी आहे व परमेश्वरच एक सत्य आहे हें कळून येणें, यालाच विवेक म्हणतात. सद्गुरुकृपेनें हा विवेक प्राप्त होतो. विवेक नष्ट झाला कीं दुःखपरंपरा कोसळतात. विवेक सदैव जागृत असणें हेंच माणसाच्या जीवनाचें खरें कर्तृत्व आहे व या कर्तृत्वाची कीर्तीच अजरामर राहते. ज्या थोर महापुरुषांनीं हा विवेक धारण केला त्यांनीं मायेला टक्कर देऊन तिचे वाभाडे काढले व परमेश्वर स्वरूप प्रगट केलें. तेंच जगाच्या उपयोगाला आलें व दुसऱ्या जीवांना कल्याणकारक ठरलें.

हा मुक्तीचा मार्ग सगळ्यांनाच सारखाच उपलब्ध आहे. पातक्यांतला पातकी असला तरीसुद्धां त्याला या मार्गानें सर्व पातकांतून मुक्तता होऊन परमेश्वर प्राप्ति होऊं शकते. वाल्याकोळयाला पूर्व कर्मांचा पश्चात्ताप होऊन नारदमुनींच्या उपदेशावर त्याची श्रद्धा बसली. त्यांनीं दिलेल्या 'राममंत्रा'चा त्यानें सारखा जप सुरू केला. तसतसे त्याचे सर्व मायापाश तुटत चालले व त्या राममंत्रानें तो स्वतः रामस्वरूप बनला व वाल्मिकी ऋषी या पुण्य पदाला पोहोंचून त्यानें स्वानुभवाचें रामायण लिहिलें. त्यामुळें सर्व जगाला आनंद निर्माण होऊन श्रीराममहात्म्य जगांत प्रगट झालें व तें अजरामर राहिलें आहे. संसारांत मनुष्याचा स्वार्थ मायेमुळेंच निर्माण होतो. अनेकांच्या स्वार्थांचा पगडा एकाच काळीं निर्माण झाल्यामुळें झगडा सुरू होतो व त्यामुळें कलह, वैमनस्य वगैरे निर्माण होतात. विवेक वैराग्यानें जीवाचा संसारिक स्वार्थ नष्ट झाला कीं फक्त परमेश्वराचा स्वार्थ शिल्लक राहतो. तोच परमार्थ. या स्वार्थानेंच परमेश्वरावर व सद्गुरुवर श्रद्धा दृढ होते व नाममंत्राचें साधन एकनिष्ठपणानें केलें जातें. मग जशी संसाराची काळजी नाहीं तशी परमार्थाची काळजी नाहीं. संसाराप्रमाणेंच परमार्थाचे जे काय अनुभव यावयाचे ते सद्गुरुकृपेनें आपोआप येतात व योग्य काळ प्राप्त झाला असतां संसारांतून कायमची मुक्तता होते. पण तोंपर्यंत पूर्ण श्रद्धेनें नाममंत्राचें साधन हळूं हळूं करीत राहिलें पाहिजे. त्याला मोज माप नाहीं, काळाचीही मर्यादा नाहीं. अधीरतेनें लवकर कांहीं घडेल अशी अपेक्षा करूं नये. जें जें काय घडेल त्याचा आनंद मानून परमेश्वर आपल्याकडून काय काय करवून घेतो व आपल्याला मोक्षस्थानाकडे हळूं हळूं कसा घेऊन जातो, याचा अनुभव घ्यावा. हा मार्ग सत्य आहे. सत्याच्या साधनाचा आनंद साधकाला मिळाल्याशिवाय रहात नाहीं. पूर्वीचे साधुसंत व अवतारी पुरुष या मार्गानें गेले व त्यांनीं आपलें अनुभव कांहींतरी निमित्त करून जगांत ग्रंथरूपानें प्रगट करून ठेविले. प्रत्येक साधकाचे अनुभवही तितकेच महत्त्वाचे आहेत व त्याचा स्वानंद त्याला मिळाल्यावांचून रहात नाहीं.

> स्मरण करितां रामनामध्वनी। ऐकतांचि कर्णीं पळती यम ॥
> नामपाठ करा रामकृष्णहरी। होतील कामारी ऋद्धिसिद्धि ॥
> साध्य तेंचि साधीं न करीं उपाधी। जन्मांतरींच्या व्याधी हरती नामें ॥
> नामा म्हणे सर्व राम हाचि भाव। नाहीं आणिक देव रामेंविण ॥६८॥

सद्गुरुमार्गानें प्राप्त होणारा व जीवात्म्याला मोक्षफळ देऊन परमात्मस्वरूप करणारा 'नाममंत्र' हा ध्वनिरुप आहे. त्यामंत्रानें परमेश्वराचें, सर्व अहंकाराचा नाश करुन सत्यानें तळपणारें रामस्वरूप, कलिरूपी कंसाचा नाश करून स्वानंद निर्माण करणारें कृष्णस्वरूप, आणि सर्वव्यापी व सर्वज्ञ असें हरिस्वरूप अशा तीनही स्वरूपानें परमात्मा प्रगट होतो. त्या नाममंत्राच्या प्रत्येक ध्वनीबरोबर परमेश्वराच्या या तीनही स्वरूपाचें स्मरण होऊन जीवात्म्यावर सत्याचे, आनंदाचे व आत्मबोधाचे संस्कार घडतात. ज्याच्या मुखांतून हा ध्वनि सारखा चालू आहे, त्याच्या कडे वक्रदृष्टीनें पाहण्याची पण कोणाची छाती नाहीं. यमाचे दूत किंवा प्रत्यक्ष यम जरी ब्रह्मदेवाच्या नियतीप्रमाणें अशा जिवात्म्यावर काळाचा फांस घालण्यास आला तरी नाममंत्राचा ध्वनि ऐकतांच तो दूर पळून जाईल. म्हणून साधकानें प्राप्त झालेला नाममंत्र आपल्या ठिकाणीं घट्ट पकडून ठेवला पाहिजे. मार्कंडेयानें शिवलिंगाला घट्ट मिठी मारून 'ॐ नमःशिवाय' या मंत्राचा जप सतत चालू ठेवला. त्यामुळें प्रत्यक्ष यमही त्याच्यावर काळाचा फांस टाकूं शकला नाहीं. इतकेंच नव्हे, त्याच्या एकनिष्ठ श्रद्धेनें भगवान शंकराला त्याच्यापुढें साक्षात् प्रगट व्हावें लागून त्याला पूर्ण अभय

वें लागलें. त्याचप्रमाणें सद्गुरुनें दिलेल्या नाममंत्राच्या ठिकाणीं असा कनिष्ठ भाव राहून त्याचा नित्यनेम जप घडेल तर जगरूपानें परमेश्वरच हमीं प्रगट राहील व लाडक्या भक्तावर त्याचा अभय व मंगल असा हस्त नेहमीं राहील. परमेश्वर त्या भक्ताचे भक्तिमार्गाचे सर्व लाड पुरवील आणि कांहीं विघ्नें अथवा संकटें निर्माण झालीं तर त्या भक्ताचें सदैव रक्षण करण्यासाठीं परमेश्वर आपलें सुदर्शनचक्र घेऊन उभा राहील.

अशा रीतीनें परमेश्वर आपल्या भक्तांवर एकदां पूर्ण प्रसन्न झाला मग त्याचेवाही कांहीं इलाज चालत नाहीं. भगवंताचीच ती अर्धांगी असल्यामुळें ही आपले स्वतःचे खेळ आवरुन घेते आणि परमेश्वराला प्रसन्न करण्याकरतां त्याच्या भक्ताला त्याच्या मार्गामध्यें पूर्णपणें साहाय्य करते. भक्तिमार्गांत भक्ताची जशी जशी प्रगति होते तशा तशा ऋद्धि सिद्धि त्याला प्राप्त होतात. व त्याला त्याच्या मार्गामध्यें सर्व बाजूंनें सहाय्य करतात. साधकाला नुसत्या तपश्चर्येनेंहि ऋद्धि सिद्धि प्राप्त होतात. परंतु सद्गुरुचें मार्गदर्शन नसेल व सांसारिक वासना नष्ट झाल्या नसतील तर त्यास ऋद्धि सिद्धि अपायकारक ठरतात व साधकाचा नाश होऊन तो अधोगतीला जातो. ऋद्धिसिद्धींच्यामुळें पैसा मिळतो, माणसें वश होतात, ऐश्वर्याचीं साधनें मिळतात, लौकिक मिळतो; पण त्यामुळें वासना अधिक अधिक बळावून साधकाचा व त्याच्याबरोबर त्याच्यावर श्रद्धा ठेवणाऱ्यांचाही अधर्म वाढल्यामुळें नाश होतो. परंतु सद्गुरुला शरण जाऊन अखंड नाममंत्राचें साधन करणाऱ्या भक्ताला मात्र त्याच ऋद्धिसिद्धि जगांत परमेश्वराचें 'परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम्' हें कार्य करण्याला उपयोगी पडतात. त्यामुळें धर्मरक्षण व जगकल्याण घडल्यामुळें तो भक्त परमेश्वराला अत्यंत प्रिय होतो व त्याची धर्मकीर्ति त्रैलोक्यांत प्रकाशित होते.

म्हणून एकदां भक्तिमार्गाचें अवलंबन केलें कीं, परमेश्वर हेंच साधन. दुसऱ्या कोणत्याही गोष्टीला वाव नाहीं. दुसऱ्या गोष्टीचा जो जो अवलंब केला जाईल तो तो घातकच ठरेल. काळाचा व तनमनधनाचा भक्तिमार्गाला उपाय न होता अपायच होईल. कारण हें समजलें पाहिजे कीं, आपलं जन्म हा अनेक जन्मींच्या पापपुण्य कर्माचें लेणें आहे. व काळ कलियुगाचा आहे. झालें झालें म्हणतांना केव्हां पूर्वप्रारब्ध अचानक प्रगट होईल किंवा कलीचा तडाखा बसेल हें सांगतां येणार नाहीं. म्हणून हा मार्ग अत्यंत सावधगिरीनेंच आक्रमण केला पाहिजे. मार्ग वांकडा असला किंवा त्यांत खाचखळगे असले तरी आपण सावधगिरीनें व सरळ चाललें पाहिजे. आणि असें सरळ चालणें घडावे म्हणून सद्गुरुच्या सतत मार्गदर्शनाची जरूरी आहे. सद्गुरुला शरण जाण्याची तळमळ प्राप्त होणें व योग्य ती सद्गुरु-सेवा घडून नाममंत्राची प्राप्ती होणें, या शिवाय मनुष्य जन्माला येऊन दुसरें महाभाग्यच नाहीं. श्रीहरिमंत्र हाच एक जीवात्म्याला उद्धारक व तारक आहे. व तो प्राप्त झाल्यावर त्याच्याच ठिकाणीं दृढनिष्ठा ठेवल्याशिवाय दुसरी गतीच नाहीं.

उपासना करणाऱ्या सामान्य जनांना उपासनेसाठीं राम, कृष्ण, शंकर, विष्णु, गणपति इत्यादि विविध उपास्य देवता आहेत. उपासनेची विविध साधनें आहेत. त्याचप्रमाणें रामायण, भागवतादि व इतर संतांचे विविध ग्रंथ आहेत. या विविधतेमुळें साधकाच्या ठिकाणीं श्रेष्ठ कनिष्ठ भाव निर्माण होऊन उपासनामार्गात सत्य काय हें बरोबर न समजल्यामुळें नाना तऱ्हेचे संशय निर्माण होतात व त्याची भ्रमिष्टासारखी स्थिति होते. परंतु गुरुमार्गाचें अवलंबन केल्यानें, ज्याप्रमाणें सर्व नद्या एकाच समुद्राच्या ठिकाणीं मिळतात, त्याप्रमाणें सर्व उपास्य देवतांची ऐक्यता श्री सद्गुरुच्या ठिकाणीं होते. सर्व साधनें श्रीसद्गुरुनें दिलेल्या नाममंत्राच्या ठिकाणीं एकरूप होतात, व सर्व ग्रंथांचें ज्ञान श्रीसद्गुरुबोधाच्या ठिकाणींच होतें. अशा तऱ्हेनें जीवाचें शरीर, मन व बुद्धि हीं तीनही एकाच ठिकाणीं केंद्रित झाल्यामुळें देहांत वास करणाऱ्या आत्मबीजावर चांगले योग्य ते संस्कार घडून त्याला चांगले अंकुर फुटतात व त्या वृक्षाचें श्रीसद्गुरुकडून उत्तम तऱ्हेनें रक्षण व पोषण केलें गेल्यामुळें त्याचा विस्तार होऊन तो चांगल्या फुलाफळांनीं समृद्ध होतो व संसारांत गांजलेल्या व दुःखी झालेल्या दुसऱ्या अनेक जीवांना उपकृत करतो.

---

# ॥ भारतीय विविध भाषाओंका ज्ञान ॥

लेखक-सर्व-तंत्र-स्वतंत्र विद्यामार्तण्ड प्रो. **माधवाचार्य**

विभिन्न भाषाओं की विभक्तियों के ज्ञान पर आश्रित है। क्यों कि-भारत की सभी भाषाएं संस्कृत के विकृत और शुद्ध शब्दों की समाहार मात्र हैं। विभिन्न प्रकार की विभक्तियोंने ही उन्हें एक दूसरी से भिन्न बना रखा है।

द्रव्य, गुण, क्रिया या संज्ञावाचक एकही शब्द को विभिन्न कारकों में विभक्त कर देने की शाब्दिक युक्ति का नाम विभक्ति है।

सभी विभक्तियां वक्ता की आवश्यकता के अनुसार एक ही शब्द को, कर्ता कर्म, करण, संप्रदान, अपादान, सम्बन्ध और अधिकरण के रूप में उपस्थित कर देती हैं। ये ही एक शब्द को विभिन्न भाषाओं का भी बना देती हैं इसी कारण ये विभक्ति कह लाती हैं।

कर्ता, कर्म, आदि कारक कहाते हैं। इनकी संख्या सात है इस कारण इनकी विभक्तियों को यथाक्रम प्रथमा, द्वितीया, तृतीया, चतुर्थी, पंचमी, षष्ठी, और सप्तमी कहते हैं।

यह बात नहीं है कि-ये भारतीय भाषाओं में ही हों। सारे विश्व की भाषाएं इन्हीं के आधार पर व्यवहार संपादन करती हैं। अतः इनका अस्तित्व संसार की सभी भाषाओं में हैं।

यहां अन्तर है तो इतना ही है कि-भारतीय भाषाएं तथा अन्य विदेशी भाषाएं द्विवचन नहीं रखतीं एवम् संस्कृत द्विवचन भी व्यवहार में लाती है। पर संस्कृत की शब्द राशि के समान संस्कृत की विभक्तियां ही सब की जड़ में हैं इसीकारण सभी भारतीय भाषाओं के व्याकरण लेखकोंने संस्कृत की विभक्तियोंको लेकर उन्हीं के आधार पर अपना विभक्ति प्रयोग दिखाया है। इस कारण हम भी संस्कृत की विभक्तियां और उनके उपयोग को प्रथम दिखाकर फिर अन्य भाषाओं की विभक्तियों को दिखाने चले हैं।

कौन कर्ता तथा कौनसा कर्म है? इस प्रश्न का निर्णय स्वयम् ही कर्ता कर्म की परिभाषा कर देती है इनके लिये अनेकों सूत्रों की आवश्यकता नहीं है फिर भी कारणों एवम् संयोगोंमें सहज कारकों की विभक्तियों के स्थान में अन्य विभक्तियों की स्थापना करने के लिये विशेष सूत्रों का उपयोग हुआ है।

प्राकृत भी इससे अछूता नहीं रहा है। कात्यायन प्राकृत में चतुर्थी के स्थान में षष्ठी का प्रयोग करते हैं किंतु हेमचन्द्रजी प्राकृत में तादर्थ्य में होनेवाली चतुर्थी मानते हैं। पर लेते ये इसका एकही वचन हैं।

कभी कभी किन्ही विरले स्थलों में प्राकृत में षष्ठी विभक्ति का प्रयोग-द्विती[illegible] तृतीया पंचमी और सप्तमी के स्थान में होता है।

सप्तमी विभक्ति भी यहां द्वितीया और तृतीया के बदले आ जाती है। पंचमी के स्थान में तृतीया व सप्तमी आ जाती है। द्वितीया विभक्ति-सप्तमी का स्थान लेलेती है। तीर्थंकरों की भाषा में तृतीया विभक्ति-सप्तमी के स्थान में आ जाती है।

संस्कृत में हम सम्बन्ध मात्र की विवक्षा में सभी कारकों के बदले षष्ठी देखते हैं।

प्रथमा विभक्ति—कर्ता की तथा क्रिया से सीधा सम्बन्ध रखनेवाली कर्ता की विभक्ति होती है। जब यह होती है तो माना जाता है कि-क्रिया के प्रत्यय कर्ता को कह रहे हैं।

जहां कर्ता अन्य क्रिया नहीं करता वहां वह अपने अस्तित्व का ही कर्ता बना रहता है।

अंग्रेजी भाषा में कर्ता को ( Nominative case ) नॉमिनेटिव केस कहा करते हैं।

संस्कृत भाषा सर्व प्रथम है। दूसरी भाषाएं तथा उनके व्याकरण संस्कृत के आधार पर चले हैं इस कारण प्रथम संस्कृत का कारक लेकर उसीके साथ अन्य भाषाओं के कारक दिखाते हैं। इसके साथ साथ उनके पारस्परिक सम्बन्ध दिखाने की भी चेष्टा करते हैं।

संस्कृत में-सु-या-सि-एकवचन तथा-अस्-बहुवचन है। पुल्लिंग में सु-या सि का सभी स्वरान्त शब्दों के आगे विसर्ग के रूपमें श्रवण होता है। संस्कृत के किसी भी शब्द के आगे केवल विसर्ग का आजाना उसके कर्तृत्व का परिचय देता है।

अकारान्त शब्द से जसका श्रवण, दीर्घ आसे परे विसर्ग के रूप में होता है। अर्थात्-ह्रस्व अकारान्त शब्द का विसर्गयुक्त दीर्घ आ प्रथमाके बहुवचन का परिचय देता है। यही बात इसकी दीर्घ आकारान्त शब्द से भी होती है।

इकारान्त शब्द से जस के आजाने पर-अयः व उकारान्त शब्दसें जस के आजाने पर-अवः होता है। इस में दोनों प्रकार के शब्दों के-इ-उ-गतार्थ रहते हैं। शब्द के व्यंजन, अयः, अवः, के-अ-में मिल जाते हैं। दीर्घ-ई-और ऊ को य् और व् हो जाते हैं। यहीं दशा जसके आने पर ईकारान्त और ऊकारान्त शब्दों की स्त्री लिंगमें होती हैं।

नपुंसक लिंग में-अकारान्त के आगे-सु-या-सि का-म्-हो जाता है। इकारान्त और उकारान्त से परे सु-या-सि-का लोप हो जाता है।

यहां जस् को नि तथा पूर्व को दीर्घ होता है। यदि शब्द में र या ष हों तो नि के स्थान में णि हो जाता है।

स्त्री लिंग में आकारान्त शब्द से परे सु या सि का लोप हो जाता है। पुरुषवाचक शब्द से स्त्रीत्व के सम्बन्ध से आया ई रखनेवाले शब्दों से भी यह लोप होता है। इकारान्त और उकारान्त शब्द से सि या सु आनेपर विसर्ग हो जाता है।

आ से जस् में भी विसर्ग सुने जाते हैं। इकारान्त और उकारान्तों की पुल्लिंग जैसी व्यवस्था होती है।

प्राकृत भाषामें—अकारान्त पुल्लिंग शब्द से-सु-और शब्द के-अ-दोनों के स्थान में-ओ-हो जाता है। इकारान्त और उकारान्त से परे-सु-का लोप और पूर्व को दीर्घ होता है।

अकारान्त से जस आने पर जस् का लोप और पूर्व को दीर्घ होता है। इकारान्त और उकारान्त से जस् आने पर जस को ओ तथा-इ-और-उ-को-अ-हो जाता है।

यहां हेमचन्द जी-इ-उ-और जस् के स्थान में-अउ-और-अवा-करते हैं। उ और जस को विकल्प से-अवो-कर देते हैं।

जब मैं इस पर गहरी दृष्टि डालता हूं तो मैं-अउ-को-अवः-का स्थानीय तथा-अवा-और-अवो-को-अवः-का स्थानीय समझता हूं। तुल है लाक्षणिक प्राकृत मूल प्राकृत से भिन्न हो गयी है। अच्छा हो भविष्य के विद्वान सहज प्राकृत और लाक्षणिक प्राकृत को एक दूसरे से भिन्न कर दें।

नपुंसकलिंग में स्वर मात्र से सु-को म् तथा जस को इ और इं तथा पूर्व को दीर्घ होता है।

स्त्रीलिंग में आकारान्त से परे-सु-या-सि-का लोप होता है। ईकारान्त शब्द से-सि-को आ होता है विकल्प से।

जस् के स्थान में-उ-और ओ होते हैं जहां जस् स्त्री लिंग में किसी भी शब्द से आये। तथा पूर्व में जो दीर्घ न हो उसे दीर्घ भी हो जाता है। ईकारान्त शब्द से जस को आ होता है। विकल्प से।

अपभ्रंश भाषा में-सु-का लोप और अन्त के अ-को-उ-हो जाता है। पक्ष में प्राकृतके समान ही रहता है। यहां-जस्-का लोप हो जाता है।

उदाहरण—यहां हमने—धर्म अग्नि वायु-कुल-वधू, मधु, वारि, मति, माला, बुद्धि, धेनु, ये लिये हैं। सभी भारतीय नूतन प्राचीन भाषाओं में इनका समान या एक ही अर्थ है। यह बात नहीं है कि-ये संस्कृत के शब्द अन्य भाषाओं में जाकर अपना अर्थ छोड़ कुछ के कुछ हो गये हों।

संस्कृत में इनका सु में रूप—धर्मः, अग्निः, वायुः, कुलम्, वारि मधु, माला, मतिः, बुद्धिः, और धेनुः, है। हिन्दी में इनका विना विभक्ति जो अर्थ है वही यहां विसर्ग के साथ भी है।

प्राकृत में—ये ही शब्द—इस विभक्ति में—धम्मो अग्गी वाऊ, बहुं महुं, वारिं, माला, मती, बुद्धी, धेणू, अग्गी, वाऊ, मालाआ, मतीआ, बुद्धीआ, आदि हैं। पर अर्थ पूर्व के समान ही रहता है।

अपभ्रंश में-स्वर के ह्रस्व दीर्घ का नियम नहीं रहता ह्रस्व को दीर्घ और दीर्घ को ह्रस्व कर लेते हैं।

उदाहरण—धम्म धम्मो, अग्नि, वाउ, अग्गी, वाऊ, बुद्धी, धेणू-ये हैं। अर्थ में-कोई अन्तर नहीं है।

जस् के संस्कृत में-धर्माः, अग्नयः, वायवः, कुलानि, वारीणि, मधूनि कुलानि, मालाः बुद्धयः, मतयः धेनवः, आदि है। अर्थ, धर्म आदि के समान ही है।

प्राकृतमें—धम्मा, अग्गउ, अग्गओ, अग्गिणो, वायउ, वाउओ, वायुणो, वाउणो, माला-मालाउ, मालाओ, बुद्धीउ, बुद्धीओ, धेणूउ, धेणू, धेणूओ, वहूउ, बहुओ, वहू, ये-हैं।

अपभ्रंश में जस् का लोप हो जाता है। लोप होनेपर पूर्व को दीर्घ होता है। धम्मा, घोडा अग्गी, वाऊ, माला, मालाउ मालाओ, ये होते हैं।

महाराष्ट्री में एक वचन के लिये कोई विभक्ति नहीं किन्तु बहुवचनमें ओ का प्रयोग करती हैं। हिन्दी में यहां कोई विभक्ति नहीं है। सर्वत्र एकसा अर्थ है। द्वितीया विभक्ति-कर्म की होती है। कर्ता का क्रिया के संपादन करने में जो पदार्थ इष्टतम होता है उसे कर्म कहा करते हैं।

हिन्दी में इसका चिन्ह-को है। महाराष्ट्री में इसे दिखाने के लिये-एकवचन में-स-ला-ते तथा बहुवचन में ये तीनों और ना होता है तथा पूर्वको दोनों में दीर्घ होता है। पर बहुवचन में सानुस्वार दीर्घ होता है। गुजराती में ए और ओ से इसे व्यक्त करते हैं।

इस से आप समझ गये होंगे कि-अन्य भाषाओं की द्वितीया विभक्तियों का भी हिन्दी में-को-अर्थ होता है। महाराष्ट्री में उनका अर्थ, स-या-ला लगाकर दिखाते हैं।

अंग्रेजीमें इसे ( Objective Case ) ऑब्जेक्टीव्ह केस कहते हैं। अंग्रेजी इसे सामान्यतः क्रियाके पश्चात् रखा करती है। यही इसके यहां कर्म की पहिचान होती है। कुछ शब्द भी हैं जो इसे स्वतंत्र रूपसे व्यक्त करते हैं। अब हम कर्म कारक में भी धर्म अग्नि वाण वधू बुद्धि धेनु गौरी माला और कुछ शब्द ले रहे हैं। इनका सभी भाषाओं की द्वितीया विभक्ति में धर्मको धर्मोको धर्मास धर्मांस ऐसेही अर्थ होंगे। अर्थ में अन्तर नहीं होगा।

संस्कृत में कर्म में एकवचन में-अम्-तथा बहुवचन में-शस्-आती है। पुल्लिंग और स्त्री लिंग में इसका परिदृश्यमान रूप प्रायः अन्तमें-म्-ही रहता है। नपुंसक में अकारान्त से-म्-के रूप में दीखती है। इकारान्त और उकारान्त में इसका अभाव श्रवण होता है।

शस्-का अकारान्त इकारान्त और उकारान्त से-पूर्व को दीर्घ और-न्-के रूपमें श्रवण होता है। नपुंसक में पूर्व को दीर्घ और शस् का-नि-एवम् इ. व उ, र. ष. मिश्रित हो तो-णि-के रूप में श्रवण होता है। स्त्री लिंग में आकारान्त से परे विसर्ग के रूपमें एवम् इकारान्त और उकारान्त से परे. पूर्व को दीर्घ और विसर्ग के रूपमें यह सुनी जाती है। दीर्घ ऊकार से परे एकवचन म् के रूपमें तथा बहुवचन विसर्ग के रूप में सुनाई पडता है। दीर्घ ईकार में भी यही व्यवस्था रहती है। कहीं पाक्षिक यही प्रकार घटता है। क्यों कि-धातुसाधित इस प्रकार के शब्द पक्षमें इय् और उव् भी ले आते हैं।

प्राकृत में-सभी स्वरान्त शब्दों के आगे-एवम सभी [illegible]

का–म् ही रहता है। इकारान्त–उकारान्त और अकारान्त शब्द से परे शस का लोप और पूर्व को दीर्घ होता है। पक्ष में इकारान्त और उकारान्त शब्दोंसे परे शस को णो भी हो जाता है। अकारान्त को ए होता है। सर्वत्र नपुंसक लिंग में शस को ईं या ई और पूर्व को दीर्घ होता है।

सर्वत्र स्त्री लिंग में शस के स्थान में उ और ओ तथा पूर्व को दीर्घ होता है। पक्ष में लोप और पूर्व को दीर्घ होता है। जो दीर्घ होते हैं उनसे भी यही प्रकार घटता है। पक्ष में ईकारान्त से शस को–आ–भी होता है। उदाहरण–धम्मं, धम्मा, धम्मे, वाउ, वाऊं, वाऊउ, वाऊओ, वाउणो, अग्गिं, अग्गी अग्गीउ, अग्गीओ, अग्गीणो, नपुंसक–कुलं, कुलाइं, कुलाइं। महुं, महूइं, महूइँ, दहि, दहीइं, दहीइँ।

स्त्रीलिंग—मालं मालाऊ मालाओ, बुद्धिं बुद्धिउ बुद्धी बुद्धीओ, धेणुं धेणूउ धेणूओ धेणू, वहूं वहू, वहूउ वहूओ, गोरीं गोरी गोरीआ गोरीउ गोरीओ ये होते हैं।

अपभ्रंश में—अम् और शस् का लोप होता है। अम् आने पर अकारान्त के अन्तिम अ को उ हो जाता है। स्त्री लिंग में शस् को उ या ओ होता है। क्लीब में इं. हो जाता है।

यदि इन सबों के अर्थ पर विचार करूं तो मैं धर्मको और धर्मों को यहीं अर्थ समझ रहा हूं। इसी प्रकार माला को और मालाओं को भी अर्थ हो जाता है। इसी प्रकार हिन्दीवालों के यहां सर्वत्र की द्वितीया का–को–इस अर्थ में पर्यवसान होता है।

तृतीया विभक्ति—मुख्य रूप से करण की विभक्ति है। अनुक्त कर्ता में भी यह प्रयुक्त होती है। अनुक्त कर्ता की दशाको अंग्रेजी में Passive voice पॉसिव वॉइस् कहते हैं। संस्कृत में यही कर्मणि प्रयोग है। इसके करण के अतिरिक्त अन्य अर्थ भी व्याकरण में बताये हैं उन में भी यह विभक्ति प्रयुक्त होती है।

हिन्दी में करण अर्थ के तृतीया कारकका–के द्वारा तथा अनुक्त कर्ता में आनेवाला तृतीयाका अर्थ–ने–होता है। सभी तृतीया ऑ के हिन्दी में ये ही अर्थ होते हैं।

अंग्रेजी में करणार्थक with विथ् तथा अनुक्त कर्ता की तृतीया By बाइ से कही जाती है। महाराष्ट्री में एकवचन में नें एं और णं तथा बहुवचन में नीं हीं ईं और णं लगाकर पूर्व को दीर्घ कर देते हैं। बहुवचन में दीर्घ कर उस पर अनुस्वार और रख देते हैं।

संस्कृतमें टा–एकवचन और भिस्–बहुवचन होता है। अकारान्त शब्द से टा को–न–तथा अ को ए हो जाता है। उकारान्त शब्द से ना होता है यदि शब्दमें र या ष हो तो न या ना का ण या णा होता है। नपुंसक लिंग में भी इसकी यही दशा रहती है।

भिस्—अकारान्त से ऐः होकर अ और भिस् दोनों के स्थान में आ जाता है। इ–ई–उ–ऊ–अन्तवाले शब्दों से परे भिः–के ही रूप में इसका श्रवण होता है। अन्य स्वरों से भी यह इसी प्रकार सुनाई पड़ता है। लिंग व्यवस्था इसके कार्य में बाधक नहीं होती।

प्राकृतमें—पुलिंग और नपुंसक लिंग में अकारान्त से पर टा को ण होता है। ण ले पूर्व के अ को ऐ हो जाता है। इकारान्त और उकारान्त से पर–टा को णा होता है। स्त्रीलिंग में टा को अ–आ–इ–और ऐ होते हैं परंतु आकारान्त से पर टा को आ नहीं होता बाकी के तीनों होते हैं।

भिस् के स्थान में कात्यायन प्राकृत में केवल–हि–का प्रयोग और पूर्व के–अ–को ऐ कर देता है। यही बात दर्शन विजयजी की भी है। पर हेमचन्द्र हिं और हिं यानी–सानुस्वार और सानुनासिक भी हि का प्रयोग करता है। इकारान्त और उकारान्त से–हिं–हिं–और हिं आने पर इ और उ को दीर्घ हो जाता है। इकारान्त और उकारान्त स्त्री और नपुंसक लिंग में भी हि आदि के योग में दीर्घ हो जाते हैं। अपभ्रंश भाषा में अकारान्तसे पर टा आनेपर टा और अ दोनों को एं होता है। तथा भिस् आने पर अ को ए हो जाता है। अपभ्रंश में भिस् को हिं होता है। इकारान्त उकारान्त से पर टा को एं तथा ण होता है।

स्त्री लिंग में सभी शब्दोंसे टा का–ए–होता है।

उदाहरण—धर्मेण, धर्मैः, अग्निना, अग्निभिः, वायुना, वायुभिः, कुलेन, कुलैः, वारिणा, वारिभि मधुना, मधुभिः, मालया, मालाभिः–, मत्या, मतिभिः, धेन्वा, धेनुभिः, गौर्या, गौरीभिः, वध्वा, वधूभिः, ये संस्कृत के हैं।

इनका अर्थ—हिन्दी में धर्म के द्वारा, अथवा धर्मने तथा धर्मों के द्वारा, और धर्मों ने होता है। इसी प्रकार अग्नि–वायु–कुल–वारि मधु माला धेनु गौरी वधू और मति शब्द से भी धर्म के समान–के द्वारा और ने लगा कर हिन्दी में अर्थ समझ सकते हैं।

प्राकृत में समझने के लिये—इन शब्दों को–धम्मेण धम्मेहि, अग्गीणा वाउणा अग्गीहि वाऊही वाऊहि, मालाइ मालाउ मालाए, मालाहि, गोरीए, गोरीई, गोरीउ, गोरीहि, कुलेण, कुलेहि, वारिणा, वारीहि महुणा महूहि, ये रूप प्रयुक्त किये जाते हैं।

पंचमी विभक्ति—अपादान में होती है। अपादान का तात्पर्य किसी से किसी को जुदा करना या होना होता है।

हिन्दी में यहां से का प्रयोग करते हैं। महाराष्ट्री में हून और ऊन यहां प्रयुक्त होते हैं। एक वचन में यहां पूर्वको दीर्घ तथा बहुवचन में पूर्व सानुस्वार दीर्घ होता है।

अंग्रेजीमें इसे Ablative case ऑब्लेटिव् केस कहते हैं। Ablation ऑबलेशन का अर्थ ही किसी से किसी को जुदा करना या जुदा होना है।

संस्कृत में इसके एकवचन में ङसि तथा बहुवचन में भ्यस् आती है। अकारान्त से परे ङसि और अ दोनों के स्थान में आत् का श्रवण होता है। इकारान्त से परे इ और ङसि को ेः है तथा उकारान्त से परे उ और ङसि दोनों को ोः हो जाता है।

नपुसंक लिंग में इकारान्त उकारान्त और उकारान्त से परे ङसि को नः तथा र ष पूर्व हो तो णः होता है।

स्त्री लिंग में आकारान्त से परे याः के रूप में श्रवण होता है। शब्द के पुंयोगसे आये ई और ऊ के योग में उस ई और ऊ को साथ लेकर ङसि को याः और वाः क्रमशः होते हैं। शब्द के समीप के व्यंजन इनमें मिल जाते हैं।

संस्कृतमें भ्यस की स्थिति यथावत् रहती है केवल अकारान्त से परे आने पर अ भी ए के रूपमें परिवर्तित हो जाता है।

प्राकृतमें-अकारान्तसे परे ङ-सि को-आ दो दु और हि आदेश होते हैं। इनका द् चला जाता है इस कारण ये भी ओ और उ की सूरतमें रह जाते हैं। पूर्व को दीर्घ होता है। हेमचंद्र यहां-त्तो-हिन्तो तथा लुक और लुगाश्रित दीर्घ तथा त्तो-ओ और उ पर पूर्व को दीर्घ करते हैं। यह दीर्घ कात्यायन के मत में भी विरुद्ध नहीं है। इकारान्त और उकारान्त से परे पुंलिंग और नपुंसकलिंग में ङसिको णो भी विकल्प से होता है पक्षमें आ-ओं और उ भी होते हैं।

स्त्रीलिंग में ङ. सि को-आ-इ अ और ऐ चार विकल्पसे आदेश होते हैं तथा पूर्वके ह्रस्व को दीर्घ होता है। पर आकारान्त से यहां-आ नहीं होता है।

भ्यस के स्थान में दर्शन विजय सर्वत्र-हिंतो-का प्रयोग और पूर्व के अ को ए तथा अन्य ह्रस्व को दीर्घ करते हैं। कात्यायनं यहां हिंतो के साथ सुंतो और रखते है।

पर हेमचन्द्र इनके साथ-त्तो-ओ-उ-और हि और रख रहे हैं तथा अ को ऐ एवम् विकल्प से दीर्घ करते हैं।

इकारान्त उकारान्त से भ्यस आ जाय तो भ्यस को आदेश और पूर्व को दीर्घ होता है।

अपभ्रंश भाषा में—अकारान्तसे परे ङसिको हे और हुं होते हैं। तथा भ्यस को यहां-हुं-आदेश होता है। इकारान्त उकारान्त से ङसिको हे तथा भ्यस को-हुं-होता है। स्त्री लिंग में सभी शब्दों से आगे ङसि को हे तथा भ्यस को हु होता है।

उदाहरण—धर्मात्-धर्मेभ्यः, अग्नेः, अग्निभ्यः, वायोः, वायुभ्यः, मालायाः मालाभ्यः, वध्वाः, वधूभ्यः, गौर्याः, गौरीभ्यः, कुलात्, कुलेभ्यः, वारिणः वारिभ्यः, ये संस्कृत के हैं इनका अर्थ धर्म से धर्मों से अग्नि से अग्नियों से आदि हैं। सर्वत्र संस्कृत के शब्दों से 'से' लगा देने पर वे हिन्दी में पंचमी विभक्ति के रूप हो जाते हैं। प्राकृतादिक भाषाओं में रूप भेद हो सकता है पर अर्थ भेद नहीं हो सकता।

प्राकृत भाषा में- घम्मा, घम्माओ, घम्माउ, घम्माहि, अग्गिणों, अग्गाओ, वाउणो, वाअओ, मालाइ, मालाउ, मालाअ, मालाआ, मालाए, मे ङसि के उदाहरण है।

धम्माहिंतो धम्मासुंतो, धम्मेहिंतो धम्मेसुंतो, अग्गी सुंतो अग्गी हिंतो वाऊ सुंतो वायुहितो, माला सुंतो मालाहिंतो, बुद्धीसुंतो बुद्धिहिंतो। आदि रूप भ्यस् के होते हैं।

अपभ्रंश में—धम्महे धम्महु, धम्मसु धम्मस्सु धम्महो धम्महुं। अग्गीहि वाउहे, मालहे मालाहु ये रूप होते हैं।

धर्म से और धम्म हे के अर्थ में कोई अन्तर नहीं है केवल शब्दोंका अन्तर है। इसी प्रकार अन्योंका भी अर्थ एक है।

षष्ठी विभक्ति नाना प्रकार के सम्बन्धों को बताने के लिये प्रयुक्त होती है। यह भी एक कारक है।

हिन्दी में-का- एकाकी इसे दिखाया करता है। यह बहुवचन में-के-बनकर आता है। स्त्री लिंग में-की-हो जाता है। इसमें एक और विचित्रता है कि—का के आगे के शब्द के आगे कुछ आनेवाला हो तो झट यह-के-रूप धारण कर लेता है। महाराष्ट्री में-इसे चा-ची-चे व्यक्त करते हैं इनके लगने पर पूर्व को दीर्घ होता है तथा बहुवचन में-दीर्घ भी सानुस्वार होता है।

अंग्रेजी में इसे Possessive case पजेसिवकेस कहते हैं। ठीक है अधिकृत भी किसी सम्बन्ध विशेष से ही होता है।

संस्कृत में ङस्. एक वचन में तथा आम् बहुवचन में आता है।

सर्वत्र अकारान्त शब्दसे परे ङस् का रूप-स्य-होता है। इकारान्त उकारान्त से परे यहां पंचमी के ङसि की सी स्थिति होती है। ई ऊ से भी परे ङसि का सा ही यहां हाल है।

स्त्रीलिंग में आ से परे-याः-ही जाता है। इकारान्त और उकारान्त नपुंसक से परे नः हो जाता है यदि-निमित्त हों तो-णः हो जाता है।

बहुवचन में सर्वत्र नान् और पूर्व को दीर्घ तथा निमित्त हों तो णाम् भी इसका रूप होता है।

प्राकृतमें—अकारान्तसे परे ङस को स्स तथा इकारान्त और उकारान्त से परे णो तथा पक्ष में स्स होता है। क्लीबमें भी इन स्थलों में यही व्यवस्था है।

स्त्रीलिंग में ङस् के स्थान में अ आ इ और ए तथा पूर्व को दीर्घ होता है। पर आकारान्तसे यहां-आ-नहीं प्रयुक्त होता। आम को ण तथा पूर्व को सर्वत्र दीर्घ होता है।

अपभ्रंश में-अकारान्त शब्द से ङ. स को-सु-हो और स्सु आदेश होते हैं। अकारान्त से वह आम को-हं-हो जाता है। पक्ष में षष्ठी का लोप भी हो जाता है। स्त्रीलिंगमें इस को-हे तथा आम को हु होता है।

उदाहरण-धर्मस्य धर्माणाम्-अग्नेः अग्नीनामः वायोः वायूनाम् मधुनः मधूनाम्, वारिणः वारीणाम्, मालायाः मालानाम्, गौर्याः 'गौरीणाम्, वध्वाः, वधूनाम्, ये संस्कृतमें हैं।

घम्मस्स घम्माण, घम्मणं अग्गिणो वाउणो अग्गिस्स वाउस्स, महुणो, वारीणो, घेणुणो अग्गीनं अग्गीनं वाऊण वाऊणं ये प्राकृत के उदाहरण हैं।

अपभ्रंश में—धर्म्मसु धम्मदे धमस्सु घम्महं, तरुसु तरुहे तरुस्सु, तरुहं, रोमावलिहे रोमावलिहु इत्यादिक होते हैं।

धर्मका वायुका मधुका इत्यादिक मूल शब्दों के अनुसार इनके अर्थ होते हैं।

**सप्तमी विभक्ति**—अधिकरण की मानी गई है।

संस्कृतमें इसका-ङि-एकवचन तथा सुप् बहुवचन होता है।

संस्कृतमें-अकारान्त शब्द से-ङि-आनेपर शब्द के अन्त के-अ-और ङि दोनों के स्थान में-ए-हो जाता है। इकारान्त और उकारान्त शब्द से ङि के आनेपर शब्द के अन्त के इ-उ और ङी-दोनों के स्थानमें-औ-होता है। धर्मे, अग्नौ, वायौ-ये तीन तीनों के क्रमशः

# ❀ ‘ धर्मचक्राला ’ दुसऱ्या तपाच्या प्रारंभीं उत्तमोत्तम शुभाशीर्वाद ❀

( **श्रीगजानन महाराज बोरकर** दादर, मुंबई नं. २८ )

प्रा. ना. के भागवत एम्. ए. यांनीं सुरूं केलेल्या सुविचारपरिप्लुत आणि सुविचार प्रचार करणाऱ्या धर्मचक्र मासिकाला आतां १२ वें वर्षें पुरें होत आहे. म्हणजे एक तप या मासिकामार्फत प्रा. भागवत यांनीं मराठी व इंग्रजी जाणणाऱ्या वाचकांना सुविचारांचा पुरवठा करण्याचें कार्य अत्यंत निष्ठेनें, अनेक प्रकारच्या अडचणी आणि झीज सोसून बजावलें आहे या विषयीं त्यांना धन्यवाद द्यावे तितके थोडेच ठरतील.

लवकरच ‘धर्मचक्र’ मासिक एक तप ओलांडून दुसऱ्या तपांत पदार्पण करणार या विषयीं आम्हांला आणि सर्व सुविचारी वाचकांना आनंद वाटेल यांत शंका नाहीं.

**“ तेरावें वर्ष ‘धर्मचक्र’ मासिकाला ‘त्रयोदशगुणी तांबूला’ प्रमाणें रुचकर, सुखास्वाददायी आणि आरोग्यपोषक ठरो ”** असा आशीर्वाद आम्ही अत्यंत आनंदानें आणि प्रोत्साहनपूर्वक देतों. अकराव्या वर्षी आणि बाराव्या वर्षाच्या सुरवातीला ‘ धर्मचक्रा ’ला शुभाशीर्वाद देतांना ‘ एकादश रुद्र द्वादश आदित्य ’ यांची शक्ति आणि प्रकाश ‘ धर्मचक्रा ’ला लाभों ” असें आम्ही म्हटलें होतें. प्रा. ना. के. भागवत यांना ‘ धर्मचक्र ’ चालविण्यासाठीं किती आर्थिक अडचणी आल्या, कसे कष्ठ पडले आणि हें मासिक पुढें चालूं ठेवावें कीं नाहीं या चिंतेनें त्यांचें मन किती मधून मधून हेलकावें खात असे, याची आम्हांला पूर्ण जाणीव आहे.

परंतु आतां आम्हांस नमूद करावयास आनंद वाटतों कीं ‘ एकादश रुद्र आणि द्वादशादित्य ’ खरोखरीच ‘ धर्मचक्र ’ चालकांच्या मदतीला धांवले आणि आपलें सामर्थ्य प्रा. भागवतांच्या पाठीशीं उभें करून आणि त्यांच्या सत्कार्यावर झोत प्रकाश झगझगीत पाडून पुढील मार्गक्रमण या दैवीराशींनीं ‘ धर्मचक्रा ’करतां सुकर केलें.

‘ धर्मचक्राचे ’ मुख्य चालक व संपादक प्रा. ना. के. भागवत यांची विश्वधर्माविषयींची निष्ठा आणि हार्दिक कळकळ या मुळेंच अशा दैवी-शक्ति त्यांना अनुकूल झाल्या, हें ‘ धर्मचक्र ’ मासिकाच्या सहृदय वाच-कांच्याहि लक्षांत आल्यावांचून राहिलें नसेल. महात्मा गांधींच्या पुण्य-स्मरणानें प्रा. भागवतांनीं आपल्या धर्मचक्राला प्रारंभ केला. त्याबरोबरच भगवान् बुद्धांचे आणि ‘ तुका झालासे कळस ’ या न्यायानें श्रीज्ञाने-श्वरांनीं प्रचलित केलेल्या भागवत धर्म प्रचाराच्या प्रचंड इमारतीवर कळस चढविणारे संतश्रेष्ठ तुकाराम महाराजांचे विचार चिरस्थायी आणि विश्व-व्यापी करण्यासाठीं प्रा. भागवतांच्या हृदयाची तळमळ एक सारखी चालूं असते. या साठीं जगांतील आणि भारतांतील धर्मप्रेरक व सत्-धर्म-बोधक संतांचीं चरित्रें, आणि सुविचारांनीं भरलेलें वाङमय ते आपल्या वाचकांना एक तपावर पुरवीत आले आहेत. मानव-धर्म-विषयक सुविचारांची गोडी असलेल्या सहृदय वाचकांना ‘ धर्मचक्र ’ मासिकाचा प्रत्येक अंक म्हणजे पारमार्थिक पौष्टिक मेवाच वाटावा यांत नवल नाहीं !

कालांतरानें कां होईना, मुंबई सरकार आणि मध्यप्रदेश सरकार यांना “ धर्मचक्र ” मासिकामार्फत होत असलेल्या विधायक, मानव धर्म पोषक आणि विश्वव्यापी विश्वधर्मालाहि पोषक, अशा थोर वाङमय-कार्याची जाणीव झाली आणि त्या सरकारांनीं ‘ धर्मचक्र ’ मासिकाची प्रशंसापूर्वक शिफारस केली. तसेंच डायरेक्टर ऑफ एज्युकेशन मुंबई, क्यूरेटर ऑफ लायब्ररीज यांचे मार्फत शाळा, कॉलेजें आणि सार्वजनिक वाचनालयें या करितांहि ती केलीं. एका तपाच्या पवित्र व अविरत तपश्चर्येलाच आलेले हें एक सुफल होय, असें म्हणावयास हरकत नाहीं.

‘ धर्मचक्र ’ मासिकाच्या संपादकीय लेखांत प्रा. भागवत, राजकारण, समाजकारण, शिक्षण, आरोग्य इत्यादि सर्व विषयांचा मोठ्या समतोल आणि सोज्वळ भाषेंत परामर्ष घेतात. त्यावरून सहृदय वाचकांच्या लक्षांत आलें असलें की, या सर्व ‘कारणा’मध्यें भगवंताचें, धर्माचें आणि मानव-धर्म-पोषक सुविचारांचें अधिष्ठान पाहिजे, हीच तळमळ सर्व संपादकीय व इतर लेखांत दिसून येतें. त्यांच्या लिखाणांत पक्षाभिमानाचा उग्र दर्प नसून सत्धर्म पोषक सुविचारांची सरिताच जणू वाहात असते ! मानव समाजाच्या कल्याणाची तळमळ वाक्यावाक्यांतून व्यक्त होत असते.

‘ धर्मचक्र ’ मासिक पृष्ठांच्या संख्येनें मर्यादित असलें तरी मराठी, हिंदी व इंग्रजी विभागांतूनहि संतचरित्रें, संतांचे विचार, संतांची व सज्जनांचीं प्रवचनें आणि कथा यांची पेरणी पानापानांवर झालेली आढळते. आपल्या मर्यादित पृष्ठांच्या मासिकाचें एक पान देखील टाकाऊ आणि दुर्लक्ष्य करण्यासारखें असूं नये, यावर प्रा. ना. के भागवत आणि त्यांचे सहकारी संपादक यांचा तीव्र कटाक्ष दिसतो !

अगदीं अलीकडचे कांहीं अंक चाळणाऱ्या नव्या सहृदय वाचकांनाहि आढळून आलें असेल कीं, दलितश्रमिकांचा उद्धार करून अमर कीर्ति पावलेले श्रीसमर्थ पद्मनाभाचार्य स्वामी सारख्या थोरांचीं चरित्रें इंग्रजी विभागांतून येतात, हिंदी मध्यें अशींच चरित्रें आणि थोर भक्तांचीं जीवनचरित्रें आणि आख्यायिका येतात. मराठी विभागांतूनहि गांधीं जीवनांतील मार्गदर्शक प्रसंग आणि सुबोध वचनें आणि वाङमय येतें. याच बरोबर श्रीअवधूत स्वामींचीं हरिपाठ-अभंगावरील सुभक्तिप्रेरक प्रवचनें **‘ आनंदाचा कंद हरि हा ’** या सदराखालीं क्रमशः–मराठी सदरांत प्रकाशित होत असतात. विश्व-कल्याणकारी मानवधर्म–प्रेरक पारमार्थिक सुविचारांचा मराठी, हिंदी आणि इंग्रजी भाषेंतील हा त्रिवेणी संगमच होय ! या त्रिवेणी संगमांत महिन्यांतून एकदां नित्य नियमानें पवित्र-पावन होण्यासाठीं अवगाहन करण्याची महान् संधीच प्रा. ना. के. भागवत यांनीं ‘ धर्मचक्रा ’चे रूपानें सहृदय वाचकांना प्रत्येक महिन्याच्या मध्यावर उपलब्ध करून ठेविली आहे.

या थोर वाङमयतपश्चर्येवर संतुष्ट झाल्यामुळेंच प्रा. भागवत यांच्या ‘ धर्मचक्राला ’ सुरूं होणारे तेरावें वर्ष ‘ त्रयोदशगुणी तांबूला ’ प्रमाणेंच सुखकर, आरोग्य पोषक आणि परमार्थोत्कर्षदायी श्रीगुरुदत्त महाराजांच्या कृपा प्रसादानें ठरो, असा फिरून एकवार उत्तमोत्तम शुभाशीर्वाद नमूद करून लेखणीला तात्पुरता विराम देतों.

॥ जय सच्चिदानंद—ॐ तत्सत् ब्रह्मार्पणमस्तु ॥

# आनंदाचा कंद हरि हा !

लेखकः श्री. मोरेश्वर वासुदेव लिमये, बी.ए. ऊर्फ श्रीअवधूतस्वामी
धर्मचक्रांतील—लेखांक ६ वा



रामकृष्ण माळा घालितां अढळ । तुटेल भवजाळ मायामोह ॥
होशील तूं साधु न पावशी बाधू । पूर्ण ब्रह्मानंदु तुष्टेल तुज ॥
जपतां रामनाम पुरती सर्व काम । आदिअंतीं नेम साधेल तुज ॥
नामा म्हणे कृतार्थ सर्व मनोरथ । न लगती ते अर्थ मायापाश ॥६९॥

सर्व जगभर सूर्याचा प्रकाश भरलेला आहे व त्या प्रकाशांतच जगाचे सर्व व्यवहार चालले आहेत. सूर्याच्या प्रकाशामुळेंच पृथ्वीवर दिवस व रात्र यांचें चक्र अव्याहत चालूं आहे व सर्व मनुष्य प्राणि या चक्रांत सारखे फिरत आहेत व शरीराच्या निरनिराळ्या अवस्था भोगीत आहेत. सूर्य उगवला कीं सर्व लोक निद्रेंतून जागे होतात व आपापल्या जीवनाच्या व्यवहाराला सुरुवात करतात. सर्व दिवसभर नाना तऱ्हेचे काबाडकष्ट करून आपलें व आपल्या कुटुंबियांच्या जीवनाचें रक्षण-पोषण होऊन सुख प्राप्त व्हावें यासाठीं सारखी धडपड सुरूं होते. सूर्य अस्ताला गेला कीं सर्व प्राणि आपापले उद्योग संपवून आपापल्या निवासस्थानीं विश्रांतीसाठीं येतात व आपल्या बायकामुलांच्या सहवासांत भोजन संभाषण इत्यादि व्यवहार करून शेवटीं निद्रेच्या आधीन होतात व विश्रांति घेतात. रात्रीचा अंधकार संपला कीं सूर्योदय होऊन पुनः दुसऱ्या दिवसाचे व्यवहार सुरूं होतात. असें हें कालचक्र आहे. सर्व प्राणिमात्रांना गरगर फिरविणाऱ्या या कालचक्रावर सूर्यनारायणाच्या रूपानें सर्वसत्ताधीश परमात्म्याचीच सत्ता आहे व राम-कृष्ण रूपानें दिवसा व रात्रीं आपली सत्ता तो गाजवीत असतो. सूर्योदयाबरोबर सूर्यवंशांत जन्माला आलेल्या प्रतापी श्रीरामाचें राज्य सुरूं होतें. सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणीं आपलें तेज घालून त्यांना तो उद्योगाला लावतो व त्यांच्या ठिकाणीं धैर्य, पराक्रम इत्यादि गुण निर्माण करून त्यांना यश व वैभव प्राप्त करून देतो. सूर्यास्त झाला कीं काळोख सुरूं होतो व त्याचबरोबर आपल्या ज्ञानानें काळाचीं ओळख करून देणाऱ्या व सर्वांच्या ठिकाणीं आनंद निर्माण करून सुख-शांति प्राप्त करून देणाऱ्या अशा चंद्रवंशांत जन्माला आलेल्या भगवान श्रीकृष्णाचें राज्य सुरूं होतें. राम व कृष्ण हेच सर्व जगाचे खरे आदर्श राजे आहेत. त्यांच्या राज्यांत अधर्माला, पापाला, दुःखाला जरासुद्धां वाव नाहीं. जिकडे तिकडे आनंदी आनंद आहे. एवढ्याचसाठीं राम-कृष्णांची सर्व श्रेष्ठ सत्ता मानून त्यांना अनन्यभावानें शरण जाऊन त्यांचीच आज्ञा सर्व प्रजेनें पाळली पाहिजे. असे जे करतील त्यांनाच राम-कृष्णांच्या राज्यांतील गोड फळें चाखावयाला मिळतील. परंतु ही रामकृष्णांची राज्यसत्ता न मानतां मनुष्यप्राणि अहंकारानें मदोमन्त होऊन आपलीच सत्ता जगांत चालवूं पाहतील, राम-कृष्णांनीं उपदेशिलेले धर्माचे व नीतीचे नियम झुगारून देऊन आपलेच कायदे निर्माण करतील तर प्रजेचें कल्याण न होतां त्यांना अनन्वित दुःखें भोगावीं लागतील. या रामकृष्णांच्या राज्यसत्तेचे व त्यांनीं नेमून दिलेल्या धर्माचें स्वरूप पूर्वीच्या ऋषिमुनींनीं व आतांच्या सत्पुरुषांनीं वारंवार जगांत ग्रंथ रूपानें प्रगट केले आहेत. त्याचप्रमाणें राम-कृष्णांच्या स्वरूपाचें ज्ञान व्हावें म्हणून गुरु-शिष्य परंपरेच्या द्वारा राम-कृष्ण उपासनेचे मंत्रही ते प्रगट करीत आहेत. सूर्योपासनेचा गायत्रीमंत्र हा अनादिकालापासून जगांत प्रगट आहे. सद्गुरुला शरण गेल्यावर साधकाला सद्गुरूकडून राममंत्र व नाममंत्र प्राप्त होतात. हे मंत्र सद्गुरुनें दिलेल्या नियमाप्रमाणें जपले असतां राम-कृष्ण प्रसन्न होऊन परमेश्वराचे पूर्ण आशिर्वाद प्राप्त होतात. अशा तऱ्हेनें नित्यनेम राम-कृष्णांचे मंत्र जपणें म्हणजेच त्यांना आपल्या प्रेमभक्तीच्या पुष्पमाळा अर्पण करणें होय. नुसत्या फुलांच्या मौल्यवान माळा किंवा इतर पूजासामग्री औपचारिकरीत्या कितीही भगवंताला अर्पण केली तरी त्यांचा कांहीं उपयोग नाहीं. त्याचें कांहींही फळ प्राप्त होत नाहीं. खरी भक्ति गुरुमार्गानेंच प्राप्त होते. राम-कृष्णांच्या मंत्र माळा नित्यनेम सतत भगवंताला अर्पण झाल्या कीं सद्गुरूकृपेनें आपल्याच ठिकाणीं राम-कृष्णांच्या परमेश्वरस्वरुपाचें ऐक्य अनुभवाला येतें. भगवान श्रीकृष्णाला १६१०८ स्त्रिया होत्या. याचा अर्थ असा कीं सद्गुरूनें दिलेल्या नाममंत्राच्या १६१०८ माळा जपल्या कीं १ वैजयंतीमाळा तयार होते. व ती भगवंताला अर्पण झाली कीं तो प्रसन्न होतो व त्यामुळें वैकुंठाला जाण्याचा मार्ग, संसारावर जय मिळून, मोकळा होतो.

परमेश्वराच्या राम-कृष्ण स्वरूपाचा हा खेळ सर्व जगाला आनंद निर्माण करण्यासाठींच चालू आहे. पण परमेश्वराच्या या खेळाचें ज्ञान न झाल्यामुळें लोक परमेश्वराच्याच मायेनं मोहित होऊन भ्रमण करीत आहेत. ज्यांत खरोखर आनंद नाहीं त्या विषयांतच सुखाची कल्पना करून तें प्राप्त करून घेण्यासाठीं अहोरात्र धडपड करीत आहेत. ज्या ज्ञानानें परमेश्वराबद्दलच्या अज्ञानाचा नाश न होतां अहंकार बळावतो व बुद्धि भ्रष्ट होते त्याच ज्ञानाच्या मागें सर्व लागले आहेत. ज्यांचा आपल्याशीं संबंध या जन्मापुरताच पूर्व प्रारब्धानं आला आहे त्यांना आपलीं मानून त्यांच्या मोहपाशांत सर्व पडले आहेत. या सर्व गोष्टींमुळें सारख्या संकटपरंपरा कोसळून अनन्वित दुःखें सर्वांना भोगावीं लागत आहेत. परमेश्वराबद्दलचें अज्ञान हें अनेक जन्मींचें पापच भोगाला आलें आहे. हें पाप साफ धुवून निघण्यासाठींच राम-कृष्ण भक्तीच्या साधनांची जरुर आहे. प्रत्येक

मनुष्यप्राण्यानें साधक बनून सद्गुरुला शरण जाऊन साधुत्त्व प्राप्त करून घेण्याच्या मार्गाला लागलें पाहिजे. असें घडलें म्हणजे जीवनाचे अज्ञानामुळें प्राप्त झालेले सर्व मायापाश तुटतील व संसारांत जन्माला येऊन सर्व व्यवहार योग्य तऱ्हेनें घडून सुद्धां त्यांची कोणत्याही तऱ्हेनें बाधा होणार नाहीं व सर्व दुःखांचा नाश होईल.

परमेश्वराचें स्वरुप पूर्ण आनंदस्वरूप आहे. त्याच्या सत्तेनें अनंत ब्रह्मांडें निर्माण होऊन त्यांचा कारभार सुरळीतपणें सारखा चालू आहे. तरीसुद्धां परमेश्वराच्या ब्रह्मानंदांत जराही कमतरता निर्माण होत नाहीं. सद्गुरुकृपेनें त्या परमेश्वराची भक्ति घडून त्याच्या राम—कृष्ण स्वरुपाशीं ऐक्यता घडली कीं या जन्मींच परमेश्वराचा परिपूर्ण ब्रह्मानंद प्राप्त होणार आहे.

जगामध्यें युगानुयुगें सत्यवानें चालू असणारा हा भक्तिमार्ग सर्वांच्याच वांट्याला सारखा येतो असें नाहीं. फारच थोड्या भाग्यवंत व पुण्यशीलांच्या वांट्याला तो येतो. कांहीं थोर विभूतींच्या जन्मकाळीं सुद्धां तो प्राप्त होतो. कांहींना बालवयांत, कांहींना तारुण्यांत, कांहींना उतारवयांतही प्राप्त होतो. तो केव्हांही प्राप्त झाला तरी परमेश्वराचें कार्य घडायचें घडतेंच. श्रीकृष्णाला सहाव्या दिवशींच भगवान शंकरांनीं दर्शन देऊन अनुग्रह केला. श्रीगणेशाचा जन्म झाला त्यावेळीं भगवान शंकर तपश्चर्येंत मग्न होते. तेव्हां पार्वतीमातेनें दुसऱ्याच दिवशीं सर्व ऋषींना बोलावून त्यांची पूजा केली व त्यांच्याकडून श्रीगणेशाला अनुग्रह देवविला. तोच दिवस आजसुद्धां 'ऋषिपंचमी' म्हणून स्त्रिया साजरा करतात व ऋषींची पूजा करतात. प्रभूरामचंद्राला बालवयांतच वसिष्ठ ऋषींनीं ज्ञानोपदेश केला. ध्रुव, प्रल्हाद, निवृत्ति-ज्ञानदेव, एकनाथ, सद्गुरु श्रीगजाननमहाराज, यांना बालवयांतच भक्तिमार्ग प्राप्त झाला; तुलसीदास, भर्तृहरी, नामदेव, तुकाराम, रामदास, श्रीपद्मनाभस्वामी, श्रीकेसकर महाराज यांना तरुणपणीं तो प्राप्त झाला; आणखी कित्येकांना उतारवयांतही तो प्राप्त झाला. पण या सर्वांनीं प्राप्त झालेला भक्तिमार्ग योग्य तऱ्हेनें रक्षण केला व आयुष्यभर जगाचें कल्याण करून परमेश्वराचें धर्मरक्षणाचें कार्य केलें व आपल्या चारित्र्यानें व ज्ञानोपदेशानें इतरांना योग्य मार्गदर्शन केलें. हें कार्य आयुष्याचा शेवट होईपर्यंत त्यांनीं सतत चालू ठेवलें व शेवटीं देह पडल्यावर ते परमात्म्यांत विलीन झाले. म्हणून मनुष्याला जन्मापासून मृत्यू येईपर्यंत भक्तिमार्गाच्या संस्कारांची जरूर आहे. जन्मतः किंवा बालवयांत संस्कार घडत नाहींत म्हणून हिंदुधर्मांतील चारही वर्णांना 'उपनयन' संस्कार नेमून दिला आहे. या संस्कारामुळें 'गायत्रीमंत्र' प्राप्त होतो व त्याच्या सतत जपानें सूर्योपासना घडून ब्रह्मतेज प्राप्त होतें. हाही संस्कार घडला नाहीं तर शेवटीं सत्पुरुषांना शरण जाऊन भक्तिमार्गाची तरी प्राप्ती करून घेऊन आपला उद्धार करून घेण्याची संधि भगवंतानें सर्वांना दिली आहे. भगवंतानें आम्हांला जन्माला घालून आमच्या पोटापाण्याबरोबर आमच्या आत्मोद्धाराची सर्व तजवीज करून ठेवली आहे. त्याचा कोणी उपयोग करून घेतला नाहीं व जन्मभर ते रडतच राहिले किंवा पशूसारखे जीवन जगले तर जबाबदार कोण? प्राप्त झालेला भक्तिमार्ग मृत्यू येईपर्यंत टिकण्यासाठीं दररोज सकाळीं सूर्योदयाच्या आधीं व नंतर व तसेंच सायंकाळीं सूर्यास्ताच्या आधीं व नंतर एक मुहूर्त म्हणजे साडेतीन तास किंवा साडेतीन घटका सद्गुरुनें दिलेल्या राममंत्राचा व नाममंत्राचा जप घडला पाहिजे. जसजसा असा जप नित्यनेमानें घडेल तसतशीं चित्ताची शुद्धी होऊन सर्व पापबुद्धी जळून भस्म होईल व हळुंहळुं संसाराबद्दल वैराग्य प्राप्त होईल, व जगांत आपलें कांहीं व्हावें किंवा होऊं नये किंवा आपल्याला कांहीं मिळावें किंवा न मिळावें किंवा कोणी आपला मित्र असावा किंवा शत्रू असावा, याबद्दल कोणतीच वासना शिल्लक राहणार नाहीं. जें जें कांहीं घडेल त्यांतच आनंद निर्माण होईल. मनामध्यें जे जे संकल्प विकल्प निर्माण होतील ते ते विवेकानें लय पावतील. अशा तऱ्हेनें वासनाच नष्ट झाल्या तर साहजिकच त्यांच्या पासून निर्माण होणारे क्रोधादिक विकार हेही त्यांच्याबरोबर लयाला जातील व चित्त परमेश्वराच्या ठिकाणीं एकाग्र होईल. इतकेंच नव्हे तर सर्व धर्मशास्त्रामध्यें पुरुषाला या जगांत प्राप्त करून घेण्यासारखे धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे चार पुरुषार्थ सांगितले आहेत त्यांच्या प्राप्तीचीही आवश्यकता राहणार नाहीं. सर्व चित्तवृत्ति परमेश्वराच्याच ठिकाणीं एकरूप झाल्यावर मनुष्य जन्माला येऊन परमेश्वर भक्तीचा सर्वश्रेष्ठ पुरुषार्थ प्राप्त व्हावयाचा तोच झाला. मग दुसऱ्या पुरुषार्थांची आवश्यकता तरी कोठें राहील? व ज्या संसारापासून अनेक तऱ्हेचे मोह निर्माण होतात व त्यामुळें दुःखें भोगावीं लागतात तो संसार म्हणून तरी कसा अनुभवाला येईल? जो काय अनुभव शिल्लक राहील तो एक परमेश्वराचाच अनुभव राहील.

---

# धर्म–संस्थेचें स्थान

## आजच्या व उद्यांच्या सामाजिक जीवनांत

लेखक :—कुंदर दिवाण

[ मागील अंकावरून चालू ]

आज आम्हीं जरी पशुबलि देत नाहीं, तरी आमचे पूर्वज देत. जे देत ते हीन नव्हते. ते देव होते. त्या काळाचे ते विचारी पुरुष होते. जो आपल्या प्रतीतीच्या प्रकाशाला अनुसरून वागतो, तो देव होय. त्यालाच धार्मिक म्हणावयाचें. जो धार्मिक आहे, तो आपल्या धर्माप्रमाणें म्हणजे आपल्याला झालेल्या सत्याच्या प्रतीतीप्रमाणें चालतो. त्यापाईं तो सर्व कांहीं झालेल्या सत्याच्या प्रतीतीप्रमाणें चालतो. त्यापाई तो सर्व कांहीं सहन करतो. आणि मानवाला एवढेंच करणें शक्य आहे आणि त्यांतच त्याच्या जीविताचें साफल्य आहे. अशाप्रकारें आपलें जीवन सफल करून तो मानव-समाजाची उन्नति साधीत असतो. याबाबतींत गॅलिलिओची आख्याइका प्रसिद्ध आहे. धर्म म्हणजे काय, त्यासाठीं माणसाला किती सहन करायला पाहिजे, आणि शेवटीं सत्याचा आणि धर्मांचाच कसा विजय होतो, हें त्या आख्यायिकेवरून चांगलें लक्षांत येण्यासारखें आहे. बायबलामध्यें लिहिलें आहे कीं पृथ्वी ही स्थिर असून सूर्यच तिच्याभोंवतीं फिरतो. गॅलिलिओला आपल्या ज्योतिषज्ञानानें दिसून आलें कीं, पृथ्वीच सूर्याभोंवती फिरत आहे. तेव्हां त्यानें तें सत्य जगाला जाहीर केलें. पण धर्मग्रंथांच्या विरुद्ध प्रतिपादन करतो म्हणून पोपच्या आज्ञेवरून त्याला तुरुंगांत टाकण्यांत आलें. तिथें त्याचा फार छळ झाला. तो सर्व तें सहन करीत होता. पण एकदां छळ असह्य झाल्यावरून तो पृथ्वी फिरत नाहीं असें लिहून द्यायला तयार झाला. पण लिहायला बसला असतां तो उदगारला कीं "मी लिहून दिलें तरी पृथ्वी ही फिरते, फिरते, आणि फिरतेच." आणि असें म्हणून त्यानें तो कागद भिरकावून दिला. सत्याची प्रतीतिही माणसाला असें दिव्य करायला लावते आणि असें दिव्य करणें, आपल्या सत्यनिष्ठेचें असें प्रमाण देणें, याचेंच नांव धर्म होय. "सत्यात् न प्रमदितव्यम्" या आज्ञेंत हाच धर्म सांगितला आहे. याच धर्मासाठीं सॉक्रेटिसानें, येशूनें, मन्सूरनें, गांधीनें आपलें बलिदान दिलें आहे. याहून हितकर आणि श्रेष्ठतर जीवनांत खरोखर दुसरें कांहीं नाहीं.

या सत्यनिष्ठारूप धर्माच्या बाबतींत आस्तिक नास्तिक असा भेद नाहीं. इथें नास्तिकतेला मुळीं वावच नाहीं. जें आहे तें सत्यच आहे आणि त्याचेंच निरंतर अनुसंधान करावयाचें आहे. त्या सत्याला तुम्ही ईश्वर म्हणा वा न म्हणा. तें स्वयमेव ईश्वर आहे. कारण, एक त्याचीच सत्ता आहे.

या सत्यनिष्ठेबाबत व्यावहारिक आणि पारमार्थिक असाहि भेद नाहीं. सर्व व्यवहारच पारमार्थिक आहे. कारण तो सत्यमूलक, सत्यमय आणि सत्यपर्यवसायी आहे. तसा भेद मानिल्यास "पुराणांतलीं वांगीं पुराणांत" च रहायचीं. आणि "गजोऽपि मिथ्या, पलायनमपि मिथ्या" असा खोटा वेदान्त उर्फ दंभाचार चालायचा. या दंभाचारामुळेंच 'धर्मच नको' म्हणणारे कांहीं विचारक निघाले आहेत. परंतु व्यवहार व परमार्थ अशा भेदाचा छेद केला, कीं दम्भ मेलाच. आणि तेंच धर्माचा हिरीरीनें पुरस्कार करणारांना आणि त्याहून अधिक हिरीरीनें त्याचें उच्चाटन करायला निघालेल्या विरोधकांना करायला पाहिजे. सत्यनिष्ठेंत दोन्ही एकवटतात. विरोध विरतो, समन्वय उरतो. म्हणून सत्यनिष्ठा हाच सर्व धर्मांचा निकर्ष व पाया असून सर्वधर्म–विरोध–परिहाराचा मार्गहि तोच आहे.

जोंवर मनुष्य आपला स्वतःचाच इनकार करीत नाहीं, तोंवर धर्माचाहि इनकार होवूं शकणार नाहीं. अर्थात् धर्म ही संस्था नित्य निर्भय आहे. परंतु धर्म आणि धर्मसंस्थान एक असतील असें नाहीं. जेव्हां आत्मानात्मविवेक मंद आणि मंदतर होत जाऊन अनात्मवस्तूला अधिक महत्त्व दिलें जातें, तेव्हां धर्म क्षीण आणि संस्थान पीन होत जातें. आणि त्यामुळेंच आपल्याला जगभर धर्म–पुरुषांचा धर्माच्या संस्थानाधिपतींकडून छळ झालेला दिसून येतो. सॉक्रेटिस, खिस्त, मन्सूर, गांधी यांच्या उदाहरणांवरून हें स्पष्ट होत आलें आहे. धर्म हें एक जीवन–तत्त्व आहे. ती सांचेबंद वस्तु नाहीं. व्यवस्था, संस्था, रचना जरी त्याच्या गतीनें घडत, बिघडत, आणि मोडत असल्या, तरी तो त्या रचना, संस्था, आणि व्यवस्था याहून भिन्न, सर्वतंत्रस्वतंत्र अशी, शक्ति आहे.

> " वासांसि जीर्णानि यथा विहाय नवानि गृह्णाति नरोऽपराणि ।
> तथा शरीराणि विहाय जीर्णान्यन्यानि संयाति नवानि देही ॥ "

हें जसें आत्म्याविषयीं म्हटलें आहे, तसेंच तें धर्म–तत्त्वाला वा शक्तिलाहि लागूं आहे. वृक्षाचीं जीर्ण पानें गळून त्याला नवीन पालवी येत असते, नवा मोहर येत असतो, नवीं फळें येत असतात; त्याप्रमाणें धर्माच्या कल्पवृक्षालाहि नवे विचार, नवे उच्चार, आणि नवे आचार येत असतात. पण त्या सर्वांचेंच संजीवन धर्मवृक्षाचा सत्यानुसरणरूप जीवनरसच करीत असतो. वृक्षधारणाला ज्याप्रमाणें त्या जीवनरसाची आवश्यकता असते, तशीच कोणत्याहि काळच्या समाजाच्या धारणाला धर्माची असते. म्हणूनच त्याला धर्म म्हणावयाचें.

हल्लींचा तरुण हा सोवळें–ओवळें पाळीत नाहीं, खाद्याखाद्यविवेक करीत नाहीं, पूजा–अर्चा आणि जपजाप्य करीत नाहीं. तो संध्यातर्पण आणि श्राद्धपक्षहि नसेल करीत. पण केवळ एवढ्यामुळें तो अधार्मिक झाला आहे, असें म्हणतां येत नाहीं. त्याला जीर्ण आणि निःसत्व धर्म

( पान ११ वर )

# श्री ब्रह्मानंद स्वामींची प्रश्नोत्तरें !

अनुवादकः—भवानीशंकर नीळकंठ वागळे

मंगलमय देव कोण आहे ?—परमात्मा.
दया कोणावर करावी?—दीनदुबळ्यावर.
मायेचा पाश कसा सुटेल?—खऱ्या ज्ञानानें.
नम्रतेचें लक्षण कोणतें ?—अभिमानाचा अभाव.
कर्मांचें बंधन कोणाला नाहीं ?—आत्मज्ञान्याला.
पुण्य क्षीण कशानें होतें ?—गुणांचा गर्व केल्यानें.
ब्रह्मदर्शी कोण ?—उत्तम साधक.
शुद्ध भाव कशानें होतो ?—ममत्वाच्या त्यागामुळें.
बंधनाला कारण काय ?—दृढ आसक्ति.
धन्य कोण ?—समदृष्टि पुरुष.
श्रेष्ठ पुरुष कोण ?—अहंकाररहित पुरुष.
बांधून टाकणारी सांखळी कोणती ?—भोगवासना.
सुख कसें प्राप्त होतें ?—तृष्णा-त्यागानें.
जन्माला कारण कोणतें ?—अज्ञान.
नरकासमान काय आहे ?—क्रोधादि वाईट वृत्ति.
स्वर्ग कसा प्राप्त होतो ?—जीव-दयेनें.
सदा जाग्रत कोण असतात ?—विवेकी जन.
भीषण शत्रू कोण ?—विषय-रत प्रबल इंद्रियें.
परम मित्र कोण ?—विजयी झालेलें मन.
दरिद्रतेला कारण कोण ?—तृष्णा.
ज्ञानाचें साधन कोणतें ?—पूर्ण वैराग्य.
मृत्यूसमान कोण आहे ?—प्रमाद.
परम प्रेमाचा विषय कोणता—सत्य आत्मा.
संपत्तिवान कोण ?—संतोषी जन.
दृढ बंधन कोणतें ?—विषयासक्ति.
शीघ्रता कशामध्यें करावी ?—परमार्थ साधनांमध्यें.
मदिरेसारखें मादक काय आहे ?—धन.
अंध कोण ?—कामातुर.
धर्माचें मूळ काय ?—दया.
चित्ताची एकाग्रता कशी होते ?—प्रभूच्या ध्यानानें.
सर्वोत्तम लाभ कोणता ?—ब्रह्माची प्राप्ति.
संग्रह करण्यायोग्य काय आहे ?—श्रेष्ठ गुण.

अत्यंत दुःखद काय ?—दुराशा.
कोणावर विश्वास ठेवावा ?—प्रभु-कृपेवर.
श्रेष्ठ जीवन कोणतें ?—प्रभु-भक्तीनें पूर्ण.
तत्त्वप्रदर्शक कोण ?—ब्रह्मविद्या.
परम समाधि म्हणजे काय ?—ब्रह्मासी एकता.
जग कोणी जिंकलें ?—ज्यानें मन जिंकलें.
उत्तम कर्म कोणतें ?—भजन-कीर्तन.
शूरवीर कोण ?—कामविजयी.
सुखाचा उपाय कोणता ?—अनासक्ति.
उत्तम कीर्तिमान कोण ? —भक्तजन.
निकृष्ट कर्म कोणतें ?—कामनायुक्त.
सद्गुरु कोणाला मानतात ?—तत्त्वदर्शकांना.
दुस्तर पीडा कोणती ?—आवागमनाची.
आनंद कोण मिळवितो ?—निष्कामी पुरुष.
उत्तम भूषण कोणतें ?—शीलस्वभाव.
चिंतनीय वस्तु कोणती ?—ब्रह्मतत्त्व, भगवान.
खरा शिष्य कोण ?—गुरुआज्ञा पाळणारा.
महान तीर्थ कोणतें ?—आत्मशुद्धि.
त्याग करण्यायोग्य काय आहे ?—दुर्भावना.
क्षमेचें फल काय ?—दुःखाची निवृत्ति.
सदैव ऐकण्याजोगें काय आहे ?—भगवद्गुणानुवाद.
पाप कसें होतें ?—कामनेनें.
सात्त्विक तप कोणतें ?—इंद्रियसंयम.
ब्राह्मणाचा धर्म कोणता ?—सर्वथा संतोष.
क्षत्रियाचा मुख्य धर्म कोणता ?—दीनरक्षा.
वैश्यांचा मुख्य धर्म कोणता ?—परोपकार, सात्त्विक दान.
शूद्राचें कल्याण कशानें होतें ?—निष्कपट सेवेनें.
भक्ति क्षीण कशानें होते ?—भोगेच्छेनें.
साधन-ज्ञान कसें कमी होतें ?—अहंकारानें.
सदैव काय केलें पाहिजे ?—धर्माचें पालन.
खरा ज्ञानी कोण ?—संशयरहित.
मोठें पातक कोणतें ?—परस्त्रीवर कुदृष्टि.

जिवंतपणीं मृत कोण ?—आळशी.
प्रभु कोणाच्या आधीन आहे ?—प्रेमियांच्या.
सुखद आहार कोणता ?—अल्प व साधा.
उत्तम प्रकृति कशी राहील ?—शांत वृत्तीनें.
संगति कोणाची वाईट ?—दुराचाऱ्याची.
महत्वपूर्ण मार्ग कोणता ?—अयाचकता.
उत्तम सहकारी कोण ?—आत्मिक बल.
समाधीची फलप्राप्ति कोणती ?—शांतिप्राप्ति.
भगवान कसा वश होतो ?—खऱ्या प्रार्थनेनें.
धर्माचें साधन कोणतें ?—सरळ निष्कपट व्यवहार.
साधकानें काय सोडावें ?—कुतर्कदृष्टि.
क्षणभंगुर काय आहे ?—संसारांतील भोग.
प्रबल शत्रु कोण आहे ?—न जिंकलेलें मन.
मन कशानें शांत होतें ? - अभ्यासानें, वैराग्यानें
ज्ञानाचें लक्षण कोणतें ?—एकता व समता.
पापाचें मूळ काय ?—स्वार्थ.
स्वार्थाचें मूळ कारण कोणतें ?—अज्ञान.
कर्माचा प्रेरक कोण ?—आपला संस्कार.
ईश्वर काय करतो ?—कर्म-फल-दान.
धर्म सफल कसा होतो ?—सद्भावनेनें.
उत्तम गति कशीं प्राप्त होतें ?—सत्संगतीनें.
वाणी पवित्र कशीं होते ?—सत्य भाषणानें.
कोणापासून सावध रहावें ?—मन-इंद्रियापासून
सतत भय कशाचें बाळगावें ?—दुर्व्यसनांचें
दुःखाचें कारण कोणतें ?—अधिक व्यय.
श्रद्धा कशी वाढते ?—निष्कामतेनें
तप कशानें क्षीण होतें ?—क्रोधानें व दंभानें.
पराक्रम कसा वाढतो ?—ब्रह्मचर्यानें.
बुद्धि निर्मल कशी होते ?—स्वाध्यायानें.
आरोग्य कसें टिकतें ?—सदाचारानें.
भक्तीचा परिणाम काय ?—भगवंताचीं प्रेमप्राप्ति.

---

( पान ९ वरून चालू )

म्हणजे धर्माचे रूढ, बाह्य आकार हृदयस्पर्शी वाटत नाहींत. पण स्वच्छतेचा, सभ्यतेचा, श्रद्धेचा आणि जीवनाचा नवा आदर्श तो शोधीत आहे. असें करण्यांत कदाचित् तो अनेक चुकाहि करील, पण त्या चुका त्याला सत्याच्या मार्गावर अग्रेसरच करतील—जर तो आपल्या आंतरिक विवेकाचा आवाज दडपून टाकणार नाहीं आणि त्यासाठीं रूढीप्रिय समाजाच्याकडून वा राज्याकडून होणारा छळहि सहन करण्याची तितिक्षा ऊर्फ अहिंसा अंगीं बाणवून घेईल. महात्मा गांधींचें जीवन या दृष्टीनें आदर्श म्हणतां येईल.

परंतु धर्म म्हणजे अभिमानाचें पोषण करणारें, मानव-समाजाचें शकलीकरण करणारें, बुद्धीला सत्याचें दर्शन करून देऊन मानवी आत्म्याला परिपूर्ण निर्भय व स्वानंदसम्राट् बनविण्याऐवजीं त्याला अर्थहीन परंपरागत कर्मकांडाचा बंदा गुलाम करणारें तत्त्व असा अर्थ असेल, तर त्याला जगांत कोणत्याच काळीं स्थान असूं नये, आणि कधीं असलेंच तर तें टिकलें नाहीं आणि पुढेंहि टिकणार नाहीं. आजचे जगांतील धर्म हे वस्तुतः धर्म नसून धर्माचे देह आहेत. आत्मा ज्याप्रमाणें देह धारण करतो आणि सोडतो, त्याप्रमाणें धर्महि देह धारण करतो व टाकतो. परंतु अशाप्रकारें देहधारण, देह-विकास आणि देहान्तर होत असतांनाहि धर्मरूप आत्मा अभंगच असतो. आणि तो प्रत्येकाच्या हृदयरूपगुहेंत गुप्त असतो. गीतेंत म्हटल्याप्रमाणें "सर्वधर्मान् परित्यज्य" अवांतर सर्व धर्म सोडून त्यालाच एकाला शरण जावयाचें आहे. त्याच्याच प्रसादानें पराशान्ति आणि शाश्वत स्थान लाभावयाचें आहे. त्याचें स्थान मनुष्याच्या सामाजिक जीवनांत, आजच्या आणि उद्यांच्याहि, अढळ आहे. परंतु त्याच्या देहांचें आणि पोशाखांचें-आजच्या प्रचलित धर्म-संप्रदायांचें व पंथांचें स्थान मात्र सापेक्षपणें तात्कालिकच आहे, होतें, आणि राहणार.

# । महर्षिप्रवर सौभरिजी महाराज और उनका वंश।

लेखक-सर्व-तंत्र-स्वतंत्र विद्यामार्तण्ड प्रो. **माधवाचार्य**

अन्य पुरुषों के चरित्र किसी एक पुरुषार्थ विशेष की ओर झुकते हुए तथा ऋषियों के जीवन-धर्म-अर्थ-काम-और मोक्ष इन चारों पुरुषार्थों में यथायोग्य रीति से विनियुक्त मिलते हैं।

इतर अच्छे से अच्छे लोग इनकी आराधना में श्रद्धा और समय का प्रयोग यथार्थ रीति से नहीं कर पाये हैं। पर ऋषिगण वनों में रहकर भी कभी अपने वास्तविक कर्तव्य से भ्रष्ट नहीं हुए हैं। जिस पुरुषार्थ के अर्जन करने का जो समय नियत है। उन्होंने उसी समय निष्पक्षपात द्रष्टि से उस पुरुषार्थ का उपार्जन किया है।



पं. माधवाचार्य

यह सच है कि-ऋषि, मानव नहीं थे। वेद उन्हें प्रजापति के अंग भूत बताता है। वास्तव में भी वे वैसे ही थे। उन्हें जन्म से ही धर्म का एवम् सच्चे धर्म का साक्षात्कार था। स्वयम् ही सदाँ त्रिकाल के पदार्थों का ज्ञान बना रहता था। उनका प्रत्येक कार्य अपना एक आदर्श रखता था।

सब ऋषिगणों को एक ही तत्व का होने के कारण कोई उनमें पारस्परिक भेद भाव नहीं था। उनके सारे पारस्परिक व्यवहार आर्षत्व धर्म पर ही अवलम्बित रहते थे। राज्यकर्ता, मंत्रद्रष्टा की कन्याओं से तपोनिष्ट मंत्र द्रष्टा ऋषियों का वंश चलता था।

राजर्षि मनु ने अपनी देवहूती पुत्री महर्षि कर्दम को विवाही थी। कर्दम ने अपनी कन्या कला मरीचि के लिये, अनसूया-अत्रि के लिये, श्रद्धा-अंगिरा के लिये, हविर्भू-पुलस्त्य के लिये, ख्याति भृगु के लिये, अरुन्धती-वसिष्ठ के लिये- और शान्ति-अथर्वा के लिये व्याह दी थी। इन्हीं से ऋषियों के वंश चले थे। देवहूती के प्रियव्रत और उत्तानपाद दो भाई थे। भक्त ध्रुव इन्ही उत्तानपाद महाराज के पुत्र थे। दूसरे शब्दों में कहूँ तो यह भी कह सकता हूँ कि-अरुन्धती आदि ऋषि पत्नियों के भक्त ध्रुव मामा के बेटा थे। इसी प्रकार इन नौऊ ऋषियों की परम्परा ने भी समय समय पर राजर्षियों की कन्याएं लेकर विप्र वंश की वृद्धि की थी।

यद्यपि भागवत में पूर्वोक्त नौ ऋषि कर्दम महर्षि की कन्याओं से ग्रहस्थ निष्ठ मिलते हैं। पर इनमें मूल गोत्रकार-भृगु-अंगिरा मरीचि-और अत्रि ये चार ही हैं। इन्ही से अनन्त गोत्रों की उत्पत्ति हुई है। भृगु महर्षि की ज्योतिष की भृगुसंहिता परमप्रसिद्ध है। इसे महर्षिने लक्ष्मीपति में लात मार कर ब्राह्मणों की दरिद्रता को दूर करने के लिये बनाया था।

भृगुके-श्रौत ग्रन्थों में हमें जमदग्नि, वीत हव्य, गृत्समद, वाध्यश्व और वैन्य ये पाँच गोत्र गण मिलते हैं। ऋग्वेद का दूसरा मंण्डल प्रायः गृत्समद के मंत्रों से पूरा हुआ है। यह अंगिरा वंशीय शुन होत्र का पुत्र था, किन्तु इन्द्र ने इसे असुरों से मुक्तकर, भृगुवंशी शुनक का पुत्र बना दिया।

भृगुवंशी महर्षि ऋचीक ने चन्द्रवंशी कुशाम्बु महाराज के पुत्र गाधि की कन्या सत्यवती, एक हजार श्याम कर्ण घोड़ा गाधिको देकर व्याहली। इसी के उदर से महर्षि जमदग्नि की उत्पत्ति हुई।

उन्होंने भी राजा रेणु की कन्या रेणुका के साथ विवाह किया, जिससे परशुराम भगवान उत्पन्न हुए। आपने २३ बार पृथ्वी के क्षात्र तेज को विनष्ट किया था।

महर्षि विश्वामित्र गाधि के ही पुत्र थे। जो कि ब्राम्हणों के परम गोत्रकार हैं। आपने भृगुवंशीय अजीगर्त के पुत्र शुनःशेष को अपना बड़ा पुत्र स्वीकार कर अपने पुत्रों से भी इसको बड़े भाई के रूपमें ग्रहण कराया था। शुनःशेष के भी वेद में सैकड़ों मंत्र हैं।

भृगुनन्दनच्यवन के भी ऋग्वेद मे मंत्र मिलते हैं। आपने राजा शर्यांति की पुत्री सुकन्या के साथ विवाह किया था। आप वृद्ध थे, पर अश्विनी कुमारों ने आपको सुन्दर युवा बना दिया था। इसके प्रति फल रूप आपने भी इन वैद्यों को सोमभागी बनाया। इनके अतिरिक्त आप्नवान, और्व, सावर्णि, जीवन्ति, जावाली, एतिशायन, वैरोहित्य, अवट, मण्डु, आर्ष्टिसेन अनूप, वीतहव्य, यास्क, वाधूल, मौन, मौंक, शुनक, वध्रश्व, मित्रायव, वैन्य और पार्थ आदि गोत्र, भी भृगुवंश में मिलते हैं। दैत्याचार्य भगवान् शुक्र भी तो भार्गव ही हैं। जिनसे मृत संजीवनी विद्या सीखने कच गया था। अंगिरा महर्षि के पुत्रो में-हिरण्यस्तूप, सव्य, कुत्स, घोर, धरुण, प्रियमेघ, विरूप, नाभानेदिष्ट, अयास्य, बृहस्पति, प्रभु, वसु, शुनहोत्र, संवर्त, अभीवर्त, ध्रुव, विश्ववना, वैयश्व और उचथ्य, ऋग्वेद, के मंत्रों के द्रष्टा मिलते हैं।

महर्षि कण्व—भी महर्षि घोर के पुत्र हैं। इनके छोटे भाई बड़े भाई कण्व के वात्सल्य पर इतने मुग्ध हुए कि अन्ततोगत्वा-इनकी पुत्रता स्वीकार करली। इस कारण प्रगाथ के नाम के साथ घोर के स्थान में कण्व लगाने लगा।

महर्षि कण्व के पुत्रों में-प्रस्कण्व, मेध्यातिथि, मेधातिथि, देवातिथि, ब्रह्मातिथि, वत्स, पुनर्वत्स, सध्वंस, शशकर्ण, प्रगाथ, पर्वत, नारद, इरं-बिठि, सौभरि, नीपातिथि, श्यावाश्व, नामाक, विशोक, प्रगाढ़, पुष्टिगु, श्रुष्टिगु, आयुमेध्य, कृश, पृषध्र, सुपर्ण, भर्ग, प्रगाथ, कुसीदी, मूर्ध्वन्वान् और कुरुसुति ऋग्वेद के मंत्रों के द्रष्टा हुए हैं।

महर्षि भरद्वाज, बृहस्पति जी के पुत्र हैं। आपके ही कारण बृहस्पति जीने भावी के गर्भस्थ बालक को दीर्घतमा बना दिया था। गौतम महर्षि भी इसी परम्परा में हैं। जिनकी परम सुन्दरी अहिल्यानारी को भगवान रामचन्द्रजी ने तारा था।

महर्षि अंगिरा के बेटा नातियों में घोर और कण्व अधिक प्रतापी हुये। यही कारण है कि ये दोनों अंगिरा गोत्र के प्रवरों में गिने जाते हैं। हमारे चरित्र नायक महर्षि सौभरि कण्व महर्षि के पुत्रों में संभारे जाते हैं। यह शौनकीय बृहद देवता में लिखा है।

ऋषि परंम्परा के देखने से पता चलता है कि महर्षि सौभरी सृष्टि के आदि के ऋषियों में हैं। क्योंकि ब्रह्मा से अंगिरा, अंगिरा से घोर और घोर से कण्व, और कण्व से महर्षि सौभरि होते हैं। इस प्रकार ये बह्वृचा चार्यों महा महिम मंत्र द्रष्टा ब्रह्मा के पंती हो जाते हैं। यों तो सभी ऋषिगण परम तपस्वी थे। सबकी ही जीवनियाँ नितांन्त तपोमय हैं। फिर भी भार्गव और आंगिरस इन दो वंशों का परम तपस्वियों के रूप में वेदने निर्देश किया है। वेद-पुरोडाशों के कपालो को "ॐ भृगूणामंगिरसां तपसा तप्यध्वम्।"

भृगु और अंगिरा के तप से तपजाओ। यह कह कर तपाने की आज्ञा देता है। वेद में इन दोनों के ही नामों का निर्देश है। इससे पता चलता है कि वेद सब में इन दो वंशों को अधिक तपस्वी मानता है। वास्तव में ये दोनों वंश तप के विषय में सबसे बढ़ चढ़ कर रहे भी।

हमारे निर्दिष्ट महर्षि सौभरि भी इन तपस्वियों में अग्रगण्य हैं। आप-अपने आविर्भाव से लेकर, चक्रवर्ती मान्धाता के यमुना की इन की तपोभूमि के पास आने तक, यमुना के पानी के भीतर ही। समाधि लगाकर दश युग ध्यानमग्न रहे थे।

**आज का कालीह्रद**-ही महर्षि का तपःस्थल था। भागवत १० स्कन्ध १७ वें अध्याय में लिखा है कि एक दिन महाविष्णु भगवान के वाहन गरुड़ ने आकर महर्षि के यमुनासर में एक बहुत बड़े मत्स्य का आखेट किया। सरोवासी सभी मीन विलविला उठे। वाल्मीकि के समान आपका हृदय भी करुणा से भर आया और कह उठे कि :—

'अत्र प्रविश्य गरुडो,
यदि मत्स्यान् स खादति।
सद्यः प्राणैर्वियुज्येत,
सत्यमेतद् ब्रवीम्यहम्।'

भले ही गरुड़ विष्णु का वाहन है। फिर भी यदि इस सर में प्रविष्ट हो कर मत्स्य भक्षण करेगा। तो शीघ्र ही उसके प्राण पखेरू उसके शरीर से निकल जायेंगे। ये मेरे अक्षर त्रिकालाबाध्य होंगे।

ऋषिका-यह मत्स्य जाति पर भारी अनुग्रह था। यही अन्य गरुड विद्रोही तत्त्वों के लिये भी आशीर्वाद सिद्ध हुआ। रमणक द्वीप का निवासी महा अहि-कालिय-भी गरुड़ की वलि कवलित कर गरुड़ से लड़ा। सौ फण वाला रहने पर भी एक दिन लड़ते लड़ते परास्त हो गया। भागकर महर्षि सौभरि जी के ह्रद में शरण ली।

जब तकयहअहि नहीं आया था, यह स्थल महर्षि के निवास के कारण एक तीर्थस्थान बन गया था लोग यहां आकर ऋषि के दर्शन और यमुना में स्नान किया करते थे।

**अहिवास**--के नाम से उस समय से यह स्थल प्रसिद्ध होने लगा। जब से सौ फणों का अलौकिक अहि कालिय यहाँ निवास करने लगा। इसके साथ इसका परिवार भी पूरा अलौकिक ही था। अलौकिकता सवः प्रसिद्धि में मुख्य हेतुता रखा करती है।

महर्षि सौभरि के इस स्थान पर यह अलौकिक अहि बहुत युगों तक रहा। महर्षि की शरणगतवत्सलता की अमर कीर्ति-अहिवासी-के रूप में परिणित हो गई। आपका तपस्थल अहिवास क्षेत्र के नाम से प्रसिद्ध होगया।

यह ध्वनि भी भागवत से निकलती है। राजा परीक्षत ने शुकदेवजी से पूछा है कि—

'। कथमन्तर्जलेऽगाधे,
न्यगृह्णाद् भगवानहिम्।
स वै बहुयुगावासो—
यथासीद् विप्र कथ्यताम्।'

भगवान श्री कृष्ण ने गहरे पानी के भीतर उस शतफणधारी महाप्रतापी अहि का कैसे निग्रह किया। क्योंकि वह अहि वहां बहु युगों का आवासी था।

यहाँ राजा का कालिय न कहकर 'अहि' कहना, तथा स्थल को उसका 'आवास' बताना अहिवास क्षेत्र की प्रसिद्धि की ओर इंगित करता है। राजा के मस्तिक में भी अहिवास क्षेत्र है। इस कारण उसने इसे साहित्यिक ढंग से व्यक्त किया है। ठीक है—इसी प्रकार नाम पड़ा करते हैं। व्याकरण कार पाणिनि का भी सिद्धान्त है। महर्षि पाणिनि कहते हैं कि "प्राधान्येन व्यपदेशा भवन्ति"—प्रधान से ही नाम निर्देश भी किये जाते हैं।

अलौकिक अहि का वास प्रधान एवम् आश्चर्यकारक बना था इसी से इस स्थल का निर्देश-अहिवास-शब्दसे होने लगा। जो नवीन और प्राचीन इतिहास भूगोल जानते हैं। उनके लिये यह कोई आश्चर्य का विषय नहीं हैं। भारत के विषय में ही लीजिये, यह देश सात प्रसिद्ध नदियों के कारण पहिले-सप्तसिन्धु, कहाया करता था। भरत के पश्चात् इसका नाम 'भारत' भी हो गया। ब्रह्म वैवर्तने भी सर्पावास कहकर उल्लेख किया है।

इसी प्रकार किसी विशेष गुण एवम् व्यक्तियों के नाम पर जन पदों के भेद हुए हैं। यही सब देशों के नामकरण का संक्षिप्त इतिहास है।

भगवान सौभरिने अपने तप के स्थल यमुना के ह्रद को अहिवास किया, फिर भी अखण्ड तपस्या निरन्तर चलती रही। इसमें किसी प्रकार का विघ्न नहीं हुआ।

**तप में विक्षेप**-भी आजाया करता है। क्योंकि हृदय में अनन्त संस्कार छिपे रहते हैं। वे समय पर ही व्यक्त होते हैं। कौन समझ सकता था कि युगादि से यमुना के जल में तपस्या करने वाला ऋषि

कभी घरबारी भी हो जायेगा न इन बातों का उन्हें ही कभी ध्यान आता होगा। पर सभी बातें घटना चक्र के वश है। ऋषि के सामने भी एक दिन समाधि के उतार के समय में एक संमोहक द्रष्य आ उपस्थित हुआ। यही अन्त में तप में विक्षेप के पड़ने का मुख्य कारण हुआ। भागवत '९ स्कन्ध अध्याय' कहता है कि—

'यमुनान्तर्जले मग्नः,
तप्यमानः परंतपः।
निर्वृतिं मीनराजस्य—
वीक्ष्य मैथुन धर्मिणः—
जातस्पृहो नृपं विप्रः
कन्यामेकामयाचत।'

एक मस्त मीनराज अपनी स्त्री के साथ एकान्तवास करता हुआ निस्सीम आनन्द, मान रहा था। उसके आनन्दोल्लास को देख कर आपके हृदय के तार भी झंकृत हो उठे। ये भी चाहने लगे कि-मैं भी एक पत्नी विवाह कर इसी प्रकार आनन्द लूँ।

वहीं अयोध्या के चक्रवर्ती महाराजा मान्धाता सपरिवार आये हुए थे। आप उनके पास पहुँचे, और एक कन्या मागी। राजा ने उनका वृद्धत्व देख कर कहा कि–दयालो। अन्तःपुर में पधारिये, और जो कन्या आपको स्वीकार करले उसके साथ विवाह कर लीजिये। वही कन्या मैं आपको देदूँगा।

युगयुगान्तरों के योगनिष्ठः महर्षि सौभरिको राजा के मन की बात समझने में कुछ भी देर न लगी। झट आपने अपने दिव्य योग बल से ऐसा रूप धारण किया कि जिसके आगे काम का सौन्दर्य भी पानी भरने लग जाय एवंम् रति की भी रति डिग जाय। राजकुमारियों का सौन्दर्य इसके सामने क्या चीज था। राजकुमारियोंने तो ऐसी सुन्दरता कभी स्वप्न में भी नहीं देखी थी। मान्धाता की ये पचासों कन्याएँ उन्हें अपना बनाने के लिये आपस में लड़ने लगी। आप बड़े दयालु थे, आपने सभी को स्वीकार किया। इस बात को भागवत ने भी स्पष्ट कहा है कि–पुरुकुत्स, अम्बरीष और मुचुकुन्द की—

'तेषां स्वसारः पंचाशत्—
सौभरिं वव्रिरे पतिम्।'

पचासो बहिनों ने सौभरि को पति वरा। मान्धाता ने देखा कि, पचासो कन्याओंनें महर्षि को अपना पति मान लिया है, तो पचासों कन्याएँ सानन्द महर्षि को भेट कीं।

**आपका विवाह**—इन कन्याओं के साथ हुआ। इस दान को पाकर ऋषि परम संतुष्ट हुए। इतने कि–अपनी कृतज्ञता को न रोक सके, और अपने मंत्रों में प्रकट कर उठे. कि—

—" ॐ अदान्मे पौरुकुत्स्यः पंचाशतं
त्रसदस्यु र्वधूनाम्।
मंहिष्ठो अर्यः सत्पतिः॥

ऋग्वेद ६-१-३५-६

जिसके नाम को सुनकर दस्यु काँपने लग जाय, ऐसे वीर चक्रवर्ती मान्धाता ने मेरे विवाहने योग्य मुझे पचास कन्याएँ दीं। वह राजा बड़ा ही समर्थ, सज्जनोंका पालक एवंम् सबका पूज्यनीय है।

इतनाही नहीं किंतु उस पूज्य राजानें मुझे—

'ओ उत मे प्रयियोर्वयियोः सुवास्त्वा अधितुग्वनि'

उन कन्याओं के साथ उसने मुझे बहुत से रथ-घोडे हाथी वस्त्र अलंकार दिये, तथा अमित धन दिया। इन सबों को लेने के लिये मैं उसकी राजधानी अयोध्या नहीं गया। किन्तु मेरे निवास स्थान यमुना के इसी पवित्र तीर्थ पर दिये। युवा श्याम साडों के साथ गायें भी दीं।

यहाँ निरुक्त ने सुवास्तु का अर्थ नदीं और 'तुग्वनि' का तीर्थ अर्थ किया है। जब हम भागवत पुराण के साथ इनकी एक व्याख्या करते हैं तो मंत्रों का अर्थ और स्पष्ट हो जाता है।

मेरा ऐसा दृढ़ विश्वास है कि–भागवत का निर्दिष्ट प्रकरण इन मंत्रों की व्याख्यारूप है। ऐसा मानने पर ही–'निगम कल्पतरोर्गलितं फलम्' यह वाक्य चरितार्थ होता है। तभी भागवत वेद की स्वतःसिद्ध टीकासिद्ध होता है।

नियम भी वेद का अर्थ करते हुए ऐसाही है कि 'इतिहास पुराणाभ्यां वेदं समुपबृंहयेत्' इतिहास और पुराण से मिलाकर ही वेद की व्याख्या करनी चाहिये इन मंत्रों की व्याख्या में सौभरि की पुराण गाथा आ जाती है। पुराण और वेद दोनों की एक वाक्यातासे निष्पन्न अर्थ ही दोनों का होता है। क्योंकि पुराण के साथ वेद एवंम् वेद के साथ पुराणों का अर्थ निष्पन्न होता है। येही पचास कन्या आदि गोड़ आदिवासी ब्राह्मण वंश की आदि माताएं बनीं एवम् ब्राह्मण मात्र में हरितगोत्र इसवंश के आदि मामाओं के परिवार में आया। क्यों हि हारीत मान्धाता के पौत्र है यह श्रौतसूत्रों में मिलता है।

**ब्रह्मर्षि देश**–कहलाने का प्रारंभ इसका यहीं से होता है। ऋषि अपनी ५० पत्नियों के साथ ५० रूप धारण करके बस गये। एक एक पत्नी से सौ सौ पुत्र हुए। इस पाँच हजार का पुत्र मण्डल भी ऋषि के साथ रहने लगा।

अन्यत्र ऋषि लोग रहते तो थे पर इतनी बड़ी संख्या में नहीं रहते थे। उनका रहना भी था तो, तपोवनों और आश्रमों में ही था। सोने के महलों में नहीं था। वे 'आस्यतां सन्ति नीवाराः'-बैठिये आपके स्वागत के लिये नीवार घर में है। यह कहकर अतिथियों का सत्कार किया करते थे। वन में वनान्न ही उनका भोजन भी होता था। कोई ऐश्वर्यशाली ठाटबाट नहीं थे। पर महर्षि के यहाँ यह बात नहीं थी। आपके सारे परिवार के भिन्न २ सुवर्ण के महल बने हुए थे। आप भी भिन्न २ आलीशान महलों में अपनी ५० पत्नियों के साथ ५० रूप धर कर रहते थे। आपके पाँच हजार पुत्र भी अपने बड़े बड़े पाँच हजार महलों में अलग अलग रहा करते थे। आप और आपके पुत्रों के प्रत्येक भवन में एक एक चक्रवर्ती का ऐश्वर्य नाचा करता था। कहीं किसी प्रकार की कमीं नहीं थी। सभी महलों में यथेष्ट दास दासी गण विद्यमानें थे। जहाँ ऐसे ऋषि वंश रहें, वह क्यों न ब्रह्मर्षि देश के नाम से प्रसिद्ध होगा। गौड़ ब्राह्मण वंशेति वृत्तम् ने भी—इस देश को ब्रह्मर्षि देश कहने का कारण सौभरि वंश का निवास माना है। महर्षि सौभरि के ऐश्वर्य सबसे महान थे इस बातमें किसीको भी संदेह नहीं हो सकता। क्यों कि—आप योगी थे। आपने इन्द्र से सब कुछ अद्भुत स्वर्गीय ही प्रस्तुत करा लिया था।

# ★ " भक्त कवियों की लोक–हित की भावना " ★

## ( ५ )

## " रसखान "

लेखक—**प्रो. अमरनाथ दुबे** एम. ए., सा. र.

**परिचय**—सूर के एक तारे पर साधी गई कृष्णभक्ति की माधुरी उन्हीं तक सीमित न रह सकी। अन्धे कवि ने जिस भाव–विह्वल हृदयसे कृष्ण को देखा था यद्यपि वह तन्मयता अन्यत्र दुर्लभ अवश्य है किन्तु उसका प्रभाव अनेकानेक हृदयों पर हुए बिना न रहा। इस प्रभाव की पराकाष्ठा तो तब होती है जब एक विधर्मी मुसलमान भी कृष्ण के सौन्दर्य पर रीझ कर पुनः पुनः गोकुल की उन्हीं गलियों में जन्म धारण कर ग्वालों के साथ बसना चाहता है जिन्हें कृष्ण की आत्मीयता प्राप्त हो चुकी है। रसखान एक वैसे ही भावुक थे। इतना ही नहीं, आप विठ्ठलनाथ जी के कृपापात्र शिष्य भी थे। कृष्ण की भक्ति में आप का अपार विश्वास था। 'प्रेम नाटिका' में आपने अपने को शाही वंश का बताया है। चाहे कुछ भी हो पर इतना तो निश्चित है ही, कि आप दिल्ली के एक पठान सरदार थे। आपने अपने बारे में 'प्रेम नाटिका' में कहा है :—

" देखि गदर हित साहिबी दिल्ली नगर मसान।
छिनहिं बादसा–बंश की ठसक छाँडि रसखान ॥ "

आपके हृदय परिवर्तन की भी एक विचित्र कहानी है। गोसाई जी का लौकिक प्रेम अलौकिक हो गया। किन्तु आपका लौकिक ही नही अपितु अप्राकृतिक प्रेम भी पारलौकिक बन गया। कथा इस प्रकार है कि रसखान की आसक्ति एक बणिकपुत्र पर थी। सम्भवतः इसकी कुख्यातिभी चारों ओर फैल गई रही होनी ? एक दिन रसखानने किसी किसी को यह कहते सुना कि भगवान से ऐसा प्रेम करना चाहिए जैसा रसखान उस बनिये के लड़के से करते हैं। इस बातने इनके हृदय पर जैसे बिजली गिरा दी हो ऐसा असर किया। इनका हृदय परिवर्तन सा हो गया। श्री नाभा जी को खोजते हुए ये गोकुल आए। वहीं पर गोसाई विठ्ठलनाथजी से दीक्षा ली। इस प्रकार का प्रसंग दो सौ बावन वैष्णवों की वार्ता में आया है। 'प्रेम बाटिका' में एक दोहा रस प्रकार आया है:—

" तोरि मानिती तें हियो, फोरि मोहिनी मान।
प्रेमदेव की छबिहिं लखि, भए मियाँ रसखान ॥ "

—इसी दोहे को आधार मानकर रसखानका सम्बन्ध उनके जीवन की उस घटना से एक और रुप में भी जोड़ते हैं जिसके कारण ये 'मियाँ' से कृष्ण–भक्त रसखान बन गए। कहते हैं कि ये जिस स्त्री पर आसक्त थे वह मानिनी थी। वह इनका आदर नहीं करती थी। एक दिन ये श्री मद्भागवत का फारसी अनुवाद पढ़ रहे थे। उसमें आपने पढा कि गोपियों की कृष्ण के प्रति कितनी अनन्य भक्ति थी। उनका प्रेम कितना अलौकिक था। अतः इन्होंने सोचा कि जिस कृष्ण पर इतनी गोपियाँ आसक्त हैं क्योंन उसी पर मन लगाया जाय। इसी लगन के कारण ये वहाँ से वृन्दाबन चले आए। हमें इन घटनाओं की सत्यता से उतना लेना देना नहीं जितना कि इसके पीछे छिपे एक तथ्य से है कि रसखान निश्चित ही प्रारम्भ से ही एक प्रेमी जीव थे।

काव्य कृतियाँ—अब तक रसखान की दो छोटी छोटी पुस्तकें प्रकाशित हुई हैं—'प्रेम–वाटिका' (दोहे) और 'सुजान रसखानि' (कवित्त–सवैये)। आपने अनेक पुस्तकों की तो रचना नहीं की किन्तु जो कुछ भी आपने किया वह निश्चित ही मर्मस्पर्शी है। कवित्त सवैयों और दोहों में अपने प्रेम की आसक्ति की अभिव्यक्ति इनकी अपनी विशेषता है। इन्होंने अब तक के कृष्ण भक्त कवियो की 'गीति–काव्य' की परिपाटी का आश्रय नहीं लिया अपितु कवित्त सवैयों में मर्मस्पर्शी प्रेम की अभिव्यक्ति की जिसमें कृष्ण के साथ ही साथ उस ब्रजभूमिके प्रति भी प्रेमने कमउफान नहीं मारा जिसकी धूल में कृष्ण ने खेल खेले। प्रेम के इसी उद्गार का परिणाम सम्भवत इस रुपमें हुआ हो कि प्रेम या श्रृंगार सम्बंधी कवित्त–सवैयों को लोग रसखान कहने लगे हों।

शुद्ध चलती हुई ब्रजभाषा का प्रयोग ही सिद्ध करता है कि उस धरती की भाषा भी इन्हें प्रिय थी। आपका रचनाकाल सम्वत् १६४० के उपरांत ही माना जा सकता है। कृष्ण के लीलापक्ष को लेकर भी आपने सुन्दर रचनाएँ की हैं।

लोकहित — प्रारम्भमें यह स्पष्ट किया जा चुका है रसखान दिल्ली के पठान सरदार थे। मुसलमानों में अपने धर्म के प्रति कट्टरता की भावना कूट कूट कर भरी रहती है, उसमें पठान तो और भी कट्टर हुआ करते हैं, जिस बात में उनकी आस्था है उससे वे जल्दी डिग नहीं सकते। किन्तु पठान होकर भी हिंदुओं के भगवान माने जाने वाले श्रीकृष्ण के प्रति अपने अनुराग का दर्शन कर जिस मार्ग को रसखान ने खोला उसे कबीर तो क्या जायसी भी न पा सके थे। कबीर गालियाँ देतेही मर गए। उन्होंने ढोंग और आडम्बर के प्रति अपनी गृद्धदृष्टि राखी। जायसी कुछ कोमलता और सरसता ला सके थे किन्तु रहस्य की प्रकृति के कारण उस अलौकिक सत्ता के सौन्दर्य को वे जन सामान्य के बीच में रख पाने में सर्वथा असमर्थ रहे। यदि ऐतिहासिक दृष्टिकोण से देखा जाय तो मुगल काल का वह युग अकबर महान की छत्रछाया को प्राप्त करके भी अपने उद्देश्यमें असफल ही रहा। हिन्दुओं के अत्यन्त समीप आकर भी अकबर उनसे दूर ही रहा। उसकी माला हृदय के ऊपर ही फिरती रही उसके अन्दर नहीं। अतः हृदयों की एकता जिसमें दो की भावना न हों, जो धर्म को वास्तविक रूप में ही देखता हो, यदि कही पूरी हो सकी तो वह रसखान के ही द्वारा। रसखान के काव्य की इसी आत्मा में लोकहित की महान भावना निहित है। अकबर महान का बाहरी आवरण ही हिन्दू का रहा। हृदय के ऊपर तो उसकी माला लहराती रही किन्तु उस माला के प्रति श्रद्धा की एक भी लहर उसके

हृदय को छू न सकी। दासता के बन्धन से बँध कर हिन्दुओंने उसकी सेवकाई स्वीकार तो करली किन्तु वह सच्चे अर्थों में उनका स्वामी न बन सका। बन भी कैसे पाता। उसने हिन्दुओं के आगे सर तो झुकाया किन्तु उसकी आत्मा न झुक सकी। इसी कारण आडम्बर के आवरण में छिपी उसकी प्रवृत्ति 'दीन इलाही' के नाम से बाहर आ ही गई। श्रद्धा अपने मार्ग का निर्माण नहीं करती। वह तो सदा अनुचर ही बनी रहती है। वह केवल झुकना जानती है, निछावर होना जानती है। वह गुण दोष का विवेचन करने नहीं बैठती। वह तो अटल विश्वास लेकर उस विभूति की स्मृति में आत्मविभोर रहा करती है जिसके प्रति उसका उदय होता है। रसखान के प्रति कुछ इसी प्रकार की स्थिति पाई जाती है। उन्होंने कबीर की तरह यह नहीं कहा :—

"दशरथ सुत तिहुलोक बखाना।
रामनाम कर मरम है आना॥"

वे तो ऐसे दीवाने थे कि उन्हें कृष्ण नाम के मर्म की चिन्ता ही न रही। वह तो करोड़ों ही महलों को करील की कुंजों के ऊपर निछावर करने को तैयार थे। अतः यह सत्य है कि सब प्रकार के आकर्षण, शक्ति एवं सत्ता के केन्द्र अकबर भी जिस कार्य को करने में असफल रहे उसे रसखान नें अपने आत्म समर्पण से पूरा कर दिया। किन्तु खेद है कि रसखान के द्वारा दिखाया गया मार्ग अपना कोई अलग पंथ न बना सका। उनका कोई चेला उनके पीछे कार्य को विस्तृत न कर सका। यह राजमार्ग अपने जन्मदाता की मृत्यु के ही साथ राजरोग से ग्रसित हो गया। रसखान की अपनी कोई परंपरा न चल पाई, कोई मत, वर्ग भी इसी प्रकार की विचार धारा को लेकर उनके पीछे न आसका कबीर के सिद्धान्तों का प्रचार कबीर पंथ के द्वारा—चाहे वह बाद में अपने विकृत रूप को लेकर ही क्यों न चला हो—किया गया। कबीर के बाद नानक, दादू, मलूक, रैदास, सुन्दरदास आदि थोडे बहुत प्रकारान्तर से उन्हीं की बातों को कहते आये। जायसी की प्रेममार्गी सूफी रहस्यवादी विचारधारा कुतुबन, मंझन, उसमान आदि अन्य अनेक संतों के द्वारा शक्ति ग्रहण कर लोगों को उपदेश देती रही, लोगों को अपने मार्ग पर लाने का प्रयत्न करती रही। किन्तु रसखान के द्वारा प्रवाहित पुण्य सलिला की यह भक्तिधारा सूर्य के प्रचंड ताप से पिघलकर वह तो चली किन्तु कुछ भी दूर न चल पाई थी कि हिमाद्रि के असल गहरों के उसे आत्मसात कर लिया। रसखान अपने पंथ में अकेले रह गए। अन्यथा भक्तिकाल का यह मुसलमान हरिजन न जाने कितने 'सूर' दे जाता। इतना ही नहीं, साम्प्रदायिकता की इस विषमज्वाल का—जिसमें भारत में रहकर भी न जाने कहाँ कहाँ के गीत गाये जाते हैं, किस गुलिस्ता की बुलबुल बनने की तमन्ना की जाती है जिसमें इस धरती की सर्वोत्कृष्ट प्रकृतिछटा से भी मुह फेर कर खजूर, ताड और रेगिस्तान की प्रशंसा के स्वर मुखरित होते रहते हैं—यदि अवशेष ध्वस्त न हो गया होता तो कम से कम उसका विनाशकारी स्वरूप तो अवश्य ही समाप्त हो गया होता। किन्तु ऐसा न हो सका और इसी लिये रसखान अपने पथ पर अकेलेही रह गए। उस ओर रहीम आदि कुछ भूले भटके आभी गए थे पर उनकी प्रतिध्वनि 'नक्कारखाने में तूती की आवाज' स कुछ अधिक न हो सकी। सत्य तो यह था कि उनके समक्ष रसखान के समान न तो दृढ़ श्रद्धा थी न तो उतना घोर आत्म समर्पण ही। भक्ति की विचार धारा यदि आई भी तो कहीं कबीर की आत्म-महत्ता मुखरित रही तो कहीं जायसी का रहस्य।

जायसी और रसखान में जहाँ प्रेम के पीर की प्रधानता की एकता दिखाई देती है वहाँ उनके प्रेम में तात्त्विक अन्तर भी पायाजाता है। जायसी के प्रेम (प्रेमवर्णन) में रहस्य की प्रवृत्ति एक महान् बाधा बन जाती है। जहाँ कवि ठोस धरातल पर उतरता भी है वहाँ वह जन साधारण का प्रतिनिधित्व नहीं कर पाता। नागमती का वियोग-वर्णन यदि छोड़ दिया जाय तो शेष वर्णन एक ऐसी जादू की पिटारी बन जाता है जिसमें इन्द्रजालके निस्सार कौलाहल के अतिरिक्त जन साधारण के लिए और कुछ भी शेष नही रह जाता। वह नतो हमें परीलोक की कल्पना से ही अभिभूत कर कर पाता है और न तो ठोस धरातल पर ही खड़ा होने देता है। अतः वहाँ साधारण पाठक का हृदय रमता हुआ नही दिखाई देता। फिर "नौ पौरी पर दसवँ दुवारा" की बात तो जाने ही दीजिए। रसखान में हमें ऐसी कोई भी बात नही दीखती। उन्होंने जो कुछ भी कहा है वह ऐसा कहा है जिसे साधारण से साधारण बुद्धि का व्यक्ति भी समझ सके। और न केवल समझ सके अपितु रीझ सके। इतना ही नहीं तो वह भी रसखान के ही समान "कोटिन ही कलधौत के धाम, करील की कुंजन ऊपर" वार सके। तुलसी ने भी एक स्थार पर "धनि भारत भूमि..." की चर्चा की है। रसखान तुलसी की उसी परंपरा में आते हैं।

(अपूर्ण)

*World Religion Supplement*

# Inspiring Sermons of Sadguru Shree Gajanan Maharaj Borkar

**Culled by his disciple**
**Shri Muralidhar Swami Kilpady**

( 1 )

### Essence of Spiritual Wisdom

The spiritual knowledge is too vast-like a great ocean. Some people take, only a passing interest, whilst others find pleasure in delving too deep in its waters for personal enlightenment.

The common-man, however, is unfortunately, out of the picture and gets no guidance from either ! The learned Pandits, well-versed in Religious-doctrines, preach to the masses citing Scriptural Authority. This fails to reach the heart of the layman, though his intellect may get some food for thought.

The Saints, who have the interest of the entire Humanity, therefore, speak in the language of the Masses and lead a life which is understood by the latter. Philosophic Wisdom loses all meaning in life, if it were not to benefit the ordinary man. The advice Shree Maharaj gave some time back was, therefore, like the breath from the Heavens when he said, "The solution for human-ills, lies in holding fast unto the Feet of God, being full of faith and steadfast in resolve. Keep the sweet stream of Bhakti ( Devotional Love ) ever-flowing. When this much is done, one will experience Divine Protection and Grace, fall on every action of his. Divine Love too will start bubbling within him, which will later overflow through his personality and create an atmosphere surcharged with Divine ecstacy, that will hold others around him under its sway. Such a man, will become a centre of atrtaction and like Lord Krishna, who is depicted as "Sevito hi rasa ani watito aneka", he will drink the nectar of joy and pass it on to others. Steadily, step by step such centres will multiply and the "Kingdom of God" will get established on Earth. But how ? By following the simple course of action that was indicated earlier : to hold fast on to the Feet of the Lord. Be full of faith in Divine compassion and keep the stream of Bhakti (Divine Love) everflowing.

( 2 )

### Influence of Soul force.

The 111th birth-day celebration of Samartha Shree Padmanabha Swami was held on the 24th December 1959 this year at "Shree Datta Mandir" Chinchakhari.

Shree Maharaj said on the occasion :—

"It is a common complaint that one hears now-a-days that the standard of morality has fallen too low. The people are adopting questionable means, which are sickening to contemplate, to gain their ends in life. Nobody ever thinks of the very existence of God !

No doubt, this is called, "Kali Yug" (Dark-Age). But fortunately, not all is lost as yet. The long unbroken chain of Saints is still functioning amongst us. Samarth Shree Padmanabha Swami Maharaj had enough of foresight in him. He wrote several volumes of books like the "Jatha Veda", "Shree Ishastavaraj", etc. and lit 36,000 'lamp—posts' (disciples) to shed the light of Spiritual knowledge to guide the runaways of the World back to the Spiritual fold !

### Place of Prayer in Life.

Shree Maharaj continuing his sermon said, "There is still virtue in human heart. This fund of "Spiritual-wealth" (Bahutha Sukrutachi Jodi) draws him to the places of Divine worship, where he comes under the benign influence of Saints. In such a company, the man's transformation of self slowly takes place.

The individual too, can quicken this process by snatching 5 or 10 minutes from a day of 24 hours for Prayer. Should this be difficult, one may still think of God in the course of doing his daily duties. While eating the jack-fruit one applies oil to his hands. This frees him from the trouble caused by its sticky juice. So also, a little time spent on Prayers, goes a long way in lightening the heavy burden of life which defies solution with its complexities. Prayers

